# श्रीरामचरित्र



लेखक:
कै. चिंतामण विनायक वैद्य
एम्. ए. एल्एल्. बी.



चित्रशाळा प्रकाशन, पुणें २.

# प्रस्तावना.

जसा महाभारत हा ग्रंथ आपणां भारतवासीयांस प्रिय व पूज्य आहे तसाच रामायण हाहि ग्रंथ आपणांस प्रिय व पूज्य आहे. महाभारताच्या कथेची ओळख मराठी वाचकांस थोडक्यांत सोप्या व रम्य भाषेंत, सुंदर व प्रसंगांच्या चित्रांनीं चित्रशाळेंत छापलेल्या "**भारतीय युद्ध**" या पुस्तकानें करून दिली आहे. त्याचप्रमाणें रामायणाच्या कथेचीहि ओळख मराठी वाचकांस व्हावी हें अत्यंत इष्ट आहे. सारांश "भारतीय युद्ध" ग्रंथास जोडीदार असा रामायणावर मराठी ग्रंथ असावा असें वाटल्यावर चित्र-शाळेचे मॅनेजर यांच्या सूचनेनें मीं हें **श्रीरामचरित्र** तयार केलें आहे-यांत प्रथम उपोद्घातांत रामायण ग्रंथाची व रामकथेची थोरवी थोडक्यांत सांगून पुढें वाल्मिकींनीं रामायणांत वर्णिलेली रामकथा दिली आहे. गोष्ट व वर्णनें मूळ ग्रंथांत जशीं आहेत तशींच दिलीं असून एक दोन ठिकाणें खेरीज करून बाकीच्या सर्व कल्पना आद्य कवीच्याच आहेत. किंबहुना जागजागीं मूळ ग्रंथांतीलच संस्कृत शब्द वापरले आहेत. तात्पर्य, ग्रंथ वाचतांना परिचितांस आपण मूळ रामायणच वाचतों आहों असें वाटेल व अपरिचितांस महाकवीच्या उदात्त कवित्वाची ओळख होईल; ग्रंथाची भाषा होतांहोईतों रसाळ व सुगम ठेवली आहे. शेवटीं एक लहानसा उपसंहार जोडून त्यांत रामकालीन स्थिति व रामचरित्राचें रहस्य यांचें लहानसें शब्दचित्र रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे. या पुस्तकांत सर्व विषय असे घेतले आहेत कीं, ते आबालवृद्ध स्त्रीपुरुषांस मनोरंजक व बोध-प्रद व्हावे. सारांश सर्व तऱ्हेनें हें पुस्तक सर्व दर्जाच्या व वयांच्या मराठी वाचकांस गोड व उपयोगी वाटावें असा प्रयत्न केला आहे. हा प्रयत्न कितपत सिद्धीस गेला आहे, हें ठरविणें सुज्ञ व रसिक वाचकांवर सोंपवितों.

ऑगष्ट १९११ चिंतामण विनायक वैद्य

# श्रीराम-चरित्र



## उपोद्घात

श्रीमद्वाल्मीकि-रामायण हा आपल्या भारतीय आर्यांच्या वाङ्मयांतील एक सर्वोत्कृष्ट ग्रंथ आहे. याची थोरवी जितकी वर्णन करावी तितकी थोडीच आहे. ह्या ग्रंथास 'कोहिनूर' हिऱ्याची उपमा दिली असतां साजेल. आर्यांच्या बुद्धिमत्तेच्या खाणींतून निघालेलें हें एक अमूल्य रत्न आहे. याचे किरण आर्यभूमीवर सर्वत्र पसरले असून, ते सर्वांस नीतीचा उज्ज्वल मार्ग दाखवीत आहेत. रामायणासारखा सर्वतोपरी उदात्त ग्रंथ कोणत्याही देशांत व कोणत्याही भाषेंत नाहीं, असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. काव्याचीं अंगें दोन, एक कवि व दुसरें काव्यांत वर्णिलेला नायक. या दोन्ही अंगांनीं रामायणाची बरोबरी करणारा जगांत दुसरा ग्रंथच नाहीं. रामचंद्रासारखा अलौकिक सामर्थ्याचा व उदात्त नीतिमत्तेचा पुरुष इतिहासांत झाला नाहीं; व वाल्मीकीसारखा प्रतिभासंपन्न व उच्च कल्पनांचा कविही आजपर्यंत झाला नाहीं. ग्रीस व रोम या पाश्चात्य प्राचीन देशांत होमर व व्हर्जिल नांवांचे प्रख्यात कवि झाले; व त्यांचीं इलियड व इनीयड अशीं दोन काव्यें पाश्चात्य देशांत उत्कृष्ट मानिलीं जातात. इंग्लंड देशांतील मिल्टन कवीचें 'पॅराडाईज़ लॉस्ट' नांवाचें काव्यही उत्तमांत गणिलें जातें. परंतु या काव्याहून रामायण कितीतरी श्रेष्ठ आहे! कदाचित् कोणी होमर वगैरे कवींची वाल्मीकीशीं तुलना करूं शकेल, पण त्यांच्या काव्यांतील नायक आकिलीस् इनियस् अथवा ॲडम् हे नीतिमत्तेच्या दृष्टीनें रामचंद्रापुढें अगदीं क्षुद्रासारखे भासतात. सारांश, रामायणासंबंधानें हिंदुस्थानच्या आर्यांस जो अभिमान वाटतो तो योग्य आहे. वाल्मीकि कवीनें रचिलेलें रामायण भरतखंडांतील आर्यांस प्रिय होऊन गेलें आहे; व आज

हजारों वर्षांपासून हिंदुस्थानांतील आर्य लोक रामाचे गुण गाऊन परमेश्वराच्या चरणीं लीन होत आले आहेत. हजारों वर्षांपासून हिंदुस्थानांतील आर्यस्त्रियांच्या अंतःकरणांत सीतेचें पवित्र चरित्र भरून राहिलें आहे. तिचें पतीवरील निःसीम प्रेम, तिचें अढळ पातिव्रत्य, पतीवर आलेलीं सर्व संकटें त्याजबरोबर भोगण्याची तिची तयारी इत्यादि अनेक गुणांचें चित्र आमच्या स्त्रियांच्या हृदयांवर उमटलें असल्याकारणानें आज हजारों वर्षांपासून हिंदु स्त्रिया आपल्या समाजास भूषण झाल्या आहेत. सारांश, रामाचें व सीतेचें नांव माहीत नाहीं असा अभागी मनुष्य हिंदुस्थानांत—आर्यांत तरी—आजवर नव्हता, हल्लीं नाहीं व पुढेंही नसणार. अर्थात् श्रीरामचरित्राची थोडीबहुत तरी माहिती प्रत्येक हिंदु विद्यार्थ्यास असावी, हें अधिक विस्तारानें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

रामाचें उदात्त व मनोहर चरित्र म्हणजे संसारांत मनुष्यानें नीतीनें कसें वागावें, हें दाखविणारा एक निष्कलंक आरसाच होय. रामचंद्राचें नांव घेतल्याबरोबर आपल्यासमोर सर्व सद्गुणांची एक मोहक मूर्ति उभी राहते. उत्तम पुत्र, उत्तम पति, उत्तम बंधु, उत्तम मित्र, उत्तम शत्रु, उत्तम राजा यांचें उत्कृष्ट उदाहरण एकाच ठिकाणीं पाहणें असेल तर रामचंद्राचें पाहावें. वाल्मीकि ऋषींनीं एकदां नारद मुनींस ' सर्वांत उत्तम राजा सांप्रत कोण आहे ?' असा प्रश्न केला. तेव्हां नारद मुनींनीं रामचंद्राचेंच नांव सांगितलें. नारदांनीं त्या प्रसंगीं रामचंद्राचें जें वर्णन केलें तें फारच मनोहर आहे. 'इक्ष्वाकुकुलांतील रामचंद्रानें आपणा स्वतःस जिंकलें असून आपल्या पराक्रमानें आपल्या शत्रूंसही जिंकिलें आहे; तो नीतिमान्, बुद्धिमान्, धर्मज्ञ व सत्यप्रतिज्ञ आहे; त्याचें मन फार मोठें आहे; तो सज्जनांना उदार आश्रय देणारा असून सर्वांवर त्याची समदृष्टि आहे; तो समुद्रासारखा गंभीर आहे; हिमालयासारखा धैर्यानें निष्कंप आहे; अग्नीसारखा क्रोधानें तीव्र आहे; पृथ्वीसारखा क्षमाशील आहे; कुबेरासारखा उदार आहे व धर्मासारखा सत्यवादी आहे.' सर्व सद्गुणांचें माहेरघर असा राजा रामचंद्र प्रत्यक्ष परमेश्वराचा अवतार होता, असें आपण मानितों, याचें इंगित हेंच आहे. सर्व गुण एका मनुष्यांत असणें, हें परमेश्वराच्या अंशाशिवाय संभवत नाहीं. ज्या ज्या विभूतींच्या ठिकाणीं तेज आणि नीति हीं एकत्र दृष्टीस पडतात, त्यांच्या ठिकाणीं ईश्वरी अंश आहे, असा आपल्या आर्यांचा सिद्धांत

आहे. शिवाजीमहाराजांना जरी एवढें मोठें ऐश्वर्य प्राप्त झालें होतें, तरी त्यांच्या अंगच्या लोकोत्तर सद्गुणांत यत्किंचितूही न्यूनता आली नाहीं. त्यांची मातापितरांच्या ठिकाणची अलौकिक भक्ति, त्यांचा परस्त्रीच्या ठिकाणचा मातेसमान भाव, त्यांचें आपल्या लोकांविषयींचें विलक्षण प्रेम व औदार्य या गोष्टी पाहून लोक त्यांस शंकराचा अवतार समजत, यांत आश्चर्य कोणतें ? मग सर्वच दृष्टीनें अत्यंत उदात्त असा नीतीचा घडा घालून देणारे रामचंद्र विष्णूचे अवतार आहेत, असें आपण मानतों, यांत वावगें काय आहे ? रामचंद्राच्या चरित्रांत दिसून येणाऱ्या अलौकिक नीतिमत्तेबद्दल सर्व मतांच्या मनुष्यांस आदर वाटलाच पाहिजे भारतीय आर्यांस तर रामाचें चरित्र यामुळें अत्यंत प्रियकर वाटणें साहजिक आहे.

अशा या उदात्त चारित्राला वाल्मीकीच्या लोकोत्तर काव्यानें अजरामर करून ठेविलें आहे. वाल्मीकींनीं रामायण कसें रचिलें,याबद्दलची मनोरंजक हकीगत वाचकांस माहीत असणें अवश्य आहे.वर सांगितल्याप्रमाणें नारद-मुनींनीं रामाचें वर्णन करून त्याचें चरित्र वाल्मीकिऋषींस थोडक्यांत सांगि-तलें. वाल्मीकींस रामाचें चरित्र ठाऊक नव्हतें असें नाहीं. रामचंद्राची प्रिय पत्नी सीता ही त्यांच्या आश्रमांत होती. परंतु मोठ्या मनुष्यानें आपल्या अधिकारयुक्त वाणीनें एखादी गोष्ट सांगितली, म्हणजे ती आपल्या हृदयांत भरून जाते,त्याप्रमाणें वाल्मीकींच्या हृदयांत रामाचें चरित्र नारदांनीं वर्णन केल्यानंतर विशेष रीतीनें भरून गेलें. त्याच चरित्राचा विचार करीत ते स्नानास बाहेर निघाले. त्यांचा आश्रम अंतर्वेदींत गंगा व तमसा या नद्यांच्या संगमावर होता. त्यांच्या डोक्यांत रामाचें उदात्त चरित्र भरून गेलें असल्या-मुळें, विचाराच्या नादांत ते तमसानदीच्या कांठाकांठानें जातां जातां एका गहन अरण्यांत शिरले. इतक्यांत क्रौंच पक्ष्यांचें एक जोडपें त्यांच्या नजरेस पडलें. तें नदीच्या कांठीं आनंदानें क्रीडा करीत होतें. तों एका पारध्यानें त्या जोडप्यांपैकीं नराला बाण मारला;त्याबरोबर तो पक्षी रक्तबंबाळ होऊन खालीं पडला; व ती मादी आपल्या पतीस ठार मारलेलें पाहून मोठा आक्रोश करून ओरडूं लागली ! हा हृदयद्रावक देखावा पाहून वाल्मीकि ऋषींचें कोमल अंतःकरण कळवळलें.ते क्रोधाच्या आवेशांत त्या व्याधाकडे पाहून म्हणाले," हे निषादा ! ज्या अर्थी तूं या क्रौंच जोडप्यापैकीं कामानें मोहित झालेल्या नरपक्ष्यास निर्दयपणानें ठार मारिलेंस, त्या अर्थी तुला या

जगतांत हजारों वर्षे प्रतिष्ठा मिळणार नाहीं.''‘मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः। यत्क्रौंचमिथुनादेकमवधीः काममोहितम्,’ हे शब्द वाल्मीकींच्या मुखांतून निघाले, ते कविताबद्ध वाणीनें निघाले.ज्या वेळेस मनुष्याचें हृदय उचंबळतें, त्या वेळेस त्याच्या तोंडांतून प्रासादिक लयबद्ध शब्द निघतात, हें कित्येकांच्या अनुभवास आलें असेल. वाल्मीकि ऋषींस तर सरस्वती जन्मतःच अनुकूल होती. तेव्हां वरील प्रसंगीं त्यांचा शोक श्लोकबद्ध निघाला यांत आश्चर्य कोणतें? लौकिक संस्कृतांतील हा चार चरणांचा पहिलाच लयबद्ध श्लोक होय.ह्या श्लोकाची सुश्लिष्ट रचना पाहून वाल्मीकींसच मोठें आश्चर्य वाटलें.त्यांस त्या दुःखांतही आनंद झाला! रामचरित्रावर अशा सुंदर श्लोकांचें एक काव्य रचावें असा त्यांच्या मनांत एकदम विचार आला. ही कल्पना त्यांच्या मनांत येत आहे तों स्वतः ब्रह्मदेव तेथें प्रकट होऊन त्यांनीं वाल्मीकींचा “आदिकवि” या पदवीनें गौरव केला व तुम्हांस माझ्या प्रसादानें रामाचें सर्व चरित्र—मग तें प्रत्यक्ष असो अगर गुप्त असो—गत असो अगर भावी असो—प्रत्यक्ष पाहिल्याप्रमाणें ज्ञात होईल, असा त्यांनीं त्यांस वर दिला. ब्रह्मदेवाच्या प्रसादानें याप्रमाणें रामाचें सर्व चरित्र वाल्मीकींस हातांतील वस्तूप्रमाणें प्रत्यक्ष झाल्यावर त्यांनीं आपल्या रसाळ वाणीनें व अलौकिक प्रतिभेनें रामायण काव्य रचिलें. या काव्याचीं सहा काण्डें आहेत, शिवाय भविष्यासहित उत्तरकाण्ड असून एकंदर श्लोकांची संख्या २४००० होती. याप्रमाणें काव्य रचून तयार झाल्यावर तें प्रथम कोणास शिकवावें याचा ऋषी विचार करूं लागले; तों सीतेचीं सुंदर मुलें त्यांच्या दृष्टीस पडलीं. त्यांची कुशाग्रबुद्धि व मधुर कंठ हीं पाहून हीं मुलें हें काव्य शिकण्यास योग्य आहेत, असें वाटून वाल्मीकींनीं लवांकुशांस तें काव्य गाण्यास शिकविलें.अगोदरच रामचंद्राचें उदात्त चरित्र,त्यांत आदिकवींची मनोहर कविता व रामचंद्राचे प्रत्यक्ष पुत्र व सौंदर्याचे पुतळे असे लवांकुश आपल्या मधुर कंठानें गाणारे, असा दुर्लभ योग जमल्यावर मोहकतेची सीमा झालीच पाहिजे. जो जो त्या मुलांचें गाणें ऐके, तो तो तल्लीन व तटस्थ झाल्यावांचून राहत नसे. वाल्मीकि ऋषि एकदां रामचंद्राचा यज्ञ पहाण्याकरितां त्या मुलांस घेऊन अयोध्येस गेले. तेव्हां तें काव्य ऐकण्याकरितां हजारों लोक जमा होऊं लागले. शेवटीं त्या मुलांची कीर्ति रामचंद्राच्याही कानांवर गेली. त्यांनीं वाल्मीकींस मुलांसह बोलावून आणून सभेंत सर्व

ऋषींसमोर लवांकुशांस रामायण काव्य गाऊन दाखविण्याची आज्ञा केली. वीणा व मृदंग अशा साहित्यानिशीं त्या सुंदर मुलांनीं आपल्या कोमल व मधुर कंठांनीं तें काव्य गाण्यास आरंभ केला, तेव्हां रामचंद्राची व सर्व सभाजनांची चित्तवृत्ति तल्लीन होऊन ती सभा चित्रासारखी तटस्थ झाली. ( बालकांड, सर्ग १–४ ). ती कथा येणेंप्रमाणें:—



# बालकांड

आर्यावर्तांत कोसल नांवाचा एक विस्तीर्ण व सुपीक देश असून त्यांतून शरयू नांवाची मोठी नदी वहात आहे. या नदीच्या कांठीं त्या देशाची राजधानी अयोध्या वसली होती. हें शहर खुद्द मनूनें वसविलें होतें. या शहरामधून मोठमोठाले रुंद राजरस्ते ठेविले होते; त्या रस्त्यांवर रोज सुवासिक पाणी टाकलें जाऊन ठिकठिकाणीं फुलांचे मोठमोठे उपहार मांडिले जात. प्राचीन काळीं रस्त्यांच्या चव्हाट्यांवर फुलांचे हार व गुच्छ ठेवण्याची चाल असे. त्यामुळें रस्त्यांस शोभा येत असे; इतकेंच नव्हे तर शहरांत नेहमीं सुवास भरून जाई. अयोध्येंत ठिकठिकाणीं मोठमोठे बाजार असून ते सर्व प्रकारच्या जिनसांनीं भरलेले असत. नगरांतील बहुतेक वाडे सातमजली उंच असून त्यांनीं अयोध्येस फारच शोभा आली होती. शहराभोंवतीं उंच व मजबूत कोट होता व शहरच्या दरवाजांवरून व कोटावरील ठिकठिकाणच्या बुरुजांवरून युद्धसामुग्री नेहमीं जय्यत ठेवलेली असे. कोटाबाहेर पाण्यानें भरलेला खोल खंदक असून प्रत्येक दरवाजापाशीं खंदकावरून जाण्यायेण्याकरितां काढतांघालतां येणारे पूल केले होते. नगराबाहेर विस्तीर्ण व रमणीय अनेक बाग असून रोज सायंकाळीं शहरांतील स्त्रीपुरुष या बागांत फिरावयास जात. अशा वेळीं विंध्यपर्वतांतून व हिमालयांतून आणलेले शेंकडों उंच व शृंगारलेले हत्ती इकडून तिकडे फिरतांना दिसत. तसेंच सिंध, कांबोज, बल्क इत्यादि देशांतून आणलेले हजारों सुंदर घोडेही पाहावयास मिळत. त्या घोड्यांवरून व हत्तींवरून जाणारे वीरही इतर ठिकाणीं दिसण्यासारखे नव्हते. शत्रु गैरसावध असतां त्यावर ते कधींही बाण टाकीत नसत व त्यांचा टाकलेला बाण कधीं फुकटही जात नसे. ते आपल्या नुसत्या बाहूंनीं वाघासारखे भयंकर बलाढ्य प्राणी मारूं शकत.

अशा शूर क्षत्रियांनीं, त्याचप्रमाणें विद्वान् ब्राह्मणांनीं व श्रीमान् व्यापाऱ्यांनीं भरलेल्या ह्या राजधानींत इक्ष्वाकु वंशांतील दशरथ राजा राज्य करीत होता. तो मोठा न्यायी व दूरदर्शी असून लोकांस अत्यंत प्रिय होता. तो अत्यंत धर्मशील व पराक्रमी असून त्यानें अनेक राजे जिंकले होते. तो सर्व पृथ्वींत विख्यात असून शेंकडो राजे त्याच्याशीं सख्य करण्याची इच्छा करीत होते. दशरथ राजाच्या पदरीं हुषार, इमानी व दक्ष असे अष्टप्रधान होते. दशरथ राजाची प्रजा संतुष्ट व सुखी असून समजूतदार, शुद्धवर्तनाची व एकमताची होती. त्याच्या राज्यांत चोर, दुष्ट अथवा जारकर्म करणारा अगर खोटें बोलणारा एकही मनुष्य नव्हता! सारांश, दशरथाच्या राज्यांत, कोसलदेशांत सर्वप्रकारचें सुख नांदत होतें. ( बालकांड, सर्ग ५–७ ).

दशरथास सर्व गोष्टी अनुकूल होत्या, पण एका गोष्टीसंबंधानें मोठें न्यून होतें. त्याच्या तीन पतिव्रता राण्यांच्या पोटीं त्यांस एकही पुत्रसंतान नव्हतें. यामुळें त्यास वारंवार दुःख होई. शेवटीं राजास विचार सुचला कीं, अश्वमेध व पुत्रकामेष्टि हे यज्ञ केल्यास कदाचित् ईश्वराच्या कृपेनें आपल्यास पुत्र होईल. राजानें आपला विचार वसिष्ठ गुरूंस व सुमंत वगैरे प्रधानांस सांगितला. तेव्हां सर्वांनीं राजाच्या विचारास आनंदानें अनुमोदन दिलें. लागलीच अश्वमेधाची तयारी सुरूं झाली. शरयूच्या तीरावर एक विस्तीर्ण यज्ञमण्डप उभारला गेला व यज्ञाकरितां हजारों खंड्या अन्नसामुग्री जमविण्यांत आली. नंतर दशरथानें आपल्या तिन्ही राण्यांस यज्ञाची दीक्षा घेण्यास सांगितलें; तेव्हां त्यास अतिशय आनंद झाला. पुत्र नसल्यामुळें त्यांचीं मुखें चिंतेनें नेहमीं कोमेजलेलीं दिसत; परंतु ही आज्ञा ऐकतांच हिंवाळा गेल्यानंतर जशीं कमळें प्रफुल्लित होतात तशीं त्यांचीं मुखें प्रसन्न दिसूं लागलीं. वसिष्ठांनीं दशरथास त्याच्या राण्यांसह यज्ञदीक्षा देऊन यज्ञाचा घोडा सोडला. तो पुष्कळ देश फिरून परत आल्यावर ऋत्विजांनीं त्यास यथाविधि मारून त्याचें अग्नींत हवन केलें. अश्वमेध संपूर्ण झाल्यावर ऋष्यशृंग ऋषींनीं दशरथाकरितां पुत्रकामेष्टि नामक यज्ञ करण्यास प्रारंभ केला. ( बाल. सर्ग ११–१४ ).

ऋष्यशृंगास पुत्रकामेष्टीकरितां मुद्दाम आणविलें होतें ऋष्यशृंग हा दशरथाचा जावई होता. ऋष्यशृंगाची हकीगत फारच मनोवेधक आहे. ऋष्यशृंग हा विभांडक ऋषींचा मुलगा असून तो लहानपणापासून बापाच्या देखरेखीखालीं वाढला होता. विभांडक ऋषि त्यास क्षणभरहि विसंबत नसत व

त्यास ते स्वतः शिकवीत. याप्रमाणें वाढतांवाढतां ऋष्यशृंग एक अत्यंत तेजस्वी व विद्वान् ब्राह्मण झाला. एकदां दशरथाचा स्नेही अंगदेशाचा राजा लोमपाद याच्या राज्यांत फार मोठा दुष्काळ पडला. सर्व देश त्रस्त होऊन लोक अन्नपाण्यावांचून मरूं लागले. तेव्हां ऋष्यशृंग ऋषीस आपल्या राज्यांत आणलें तर पर्जन्यवृष्टि होऊन आबादानी होईल, असा पुष्कळांनीं लोमपाद राजास सल्ला दिला. परंतु विभांडक ऋषींच्या भीतीनें तें काम करण्यास कोणी धजेना. शेवटीं राजानें दशरथाची मुलगी शांता इजला दत्तक घेऊन ऋष्यशृंगास तिला देण्याचा विचार केला, व अशा रीतीनें विभांडक ऋषींचा राग शांत करण्याची युक्ति योजून एके दिवशीं विभांडक ऋषि आश्रमाबाहेर गेले असतां ऋष्यशृंगास फसवून आपल्या राज्यांत आणिलें. ऋष्यशृंग अंग देशांत येतांच पर्जन्याची वृष्टि होऊन चोहोंकडे आनंद झाला. लोमपादानें ऋष्यशृंगास घरीं आणून त्यांस आपली कन्या शांता अर्पण केली व लागलाच त्यांच्या विवाहाचा उत्सव चोहोंकडे सुरू झाला. इकडे आश्रमांत परत आल्यावर ऋष्यशृंग घरीं नाहीं असें पाहून विभांडक ऋषींस मोठें दुःख झालें. ते मोठ्या क्रोधानें व दुःखानें त्याचा शोध करण्यास निघाले; पण त्यांचा राग नाहींसा करण्याची तजवीज लोमपाद राजानें पूर्वींच करून ठेविली होती. ते अंगदेशांत येऊन, ' हा देश कोणाचा ' म्हणून विचारूं लागले, तेव्हां " हा देश ऋष्यशृंगाचा " असें लोकांनीं सांगितलें ! ते पुढें चंपा नगरींत आले, तेव्हां जिकडे तिकडे उत्सव सुरू आहे, असें त्यांस दिसलें. चौकशी करितां हा ऋष्यशृंगाच्या विवाहाचा उत्सव आहे, असें त्यांस समजलें, तेव्हां त्यांचा राग अर्धा नाहींसा झाला. शेवटीं राजवाड्यांत येऊन मुलास व सुनेस पाहून त्यास परम संतोष झाला व त्यांस आशीर्वाद देऊन आपल्या आश्रमांत परत आले. याप्रमाणें ऋष्यशृंग, लोमपाद व दशरथ राजांचे जांवई झाल्याची मनोरंजक हकीगत आहे. **विद्यार्थिदशेंत संसारापासून अगदीं अलिप्त राहिलें असतां मनुष्य कसा तेजस्वी व सामर्थ्यवान् होतो,** याचें चित्र या कथेंत चांगलें रेखाटलें आहे. ( बाल. सर्ग ९–१० ).

असो; ऋष्यशृंग ऋषींनीं दशरथाकरितां पुत्रेष्टि करण्यास प्रारंभ करून ते अथर्वशीर्षांत सांगितलेल्या मंत्रांनीं पवित्र केलेले हविर्भाग अग्नीस अर्पण करूं लागले. होतां होतां यज्ञसमाप्तीची वेळ आली, तेव्हां अग्नींतून एका

एकीं एक दैदीप्यमान पुरुष बाहेर आला. त्याचा वर्ण काळा असून तो तांबडें वस्त्र नेसला होता. त्याच्या अंगावर रत्नांचे अलंकार असून तो सूर्यासारखा तेजस्वी दिसत होता. त्याच्या हातांत दिव्य पायसानें भरलेलें एक सुवर्णाचें पात्र होतें. त्यानें दशरथाकडे पाहून म्हटलें, "राजा, मी प्राजापत्य पुरुष तुझ्या यज्ञानें संतुष्ट होऊन तुझी इच्छा पुरी करण्याकरितां आलों आहें. हें देवांनीं तयार केलेलें पायस घेऊन तूं आपल्या राण्यांस प्यावयास दे, म्हणजे तुला देवांसारखे पुत्र होतील." दशरथानें त्या दिव्य पुरुषास साष्टांग नमस्कार घालून अत्यंत नम्रतेनें त्याजपासून तें सुवर्णपात्र घेतलें, त्याजबरोबर तो पुरुष अग्नींत गुप्त झाला. दशरथानें मोठ्या प्रीतीनें तें पायस आपल्या राण्यांस दिलें. प्रथम वडील राणी कौसल्या हिला अर्धभाग दिला; व बाकी राहिलेल्या अर्ध्यांतून अर्धा भाग दुसरी राणी सुमित्रा हीस दिला, व बाकीचा कैकेयीस दिला, परंतु पुनः मनांत कांहीं कल्पना येऊन कैकेयीच्या भागांतून अर्धा भाग काढून सुमित्रेस दिला. याप्रमाणें तें पायस वांटून दिल्यावर त्या तिघां राण्यांनीं तें मोठ्या भक्तीनें व आनंदानें प्राशन केलें. यज्ञ समाप्त झाल्यावर दशरथानें ऋत्विजांस अगणित द्रव्य दाक्षिणारूपानें दिलें, ब्राह्मणांस अन्नदान केलें व आपल्या सर्व सेवकांस बहुमोल पोषाख दिले. योग्य काळीं तिन्ही राण्यांना गर्भ राहून ते दिवसेंदिवस वाढूं लागले. त्याबरोबर सर्व प्रजाजनांचा आनंदही वाढूं लागला. बारा महिने पूर्ण झाल्यावर चैत्र महिन्याच्या शुद्ध नवमीस सूर्य मध्यान्हीं आला असतां पुनर्वसु नक्षत्रावर पांच ग्रह उच्चस्थानीं असून कर्कलग्नीं गुरु व चंद्र असतां कौसल्या राणीच्या पोटीं–सर्व लोकांना नमस्कार करण्यास योग्य, किंबहुना सर्व जगताचे नाथ असे–श्रीरामचंद्र जन्मास आले; व त्यांनीं विष्णूच्या अर्ध्या अंशानें अवतार घेऊन इक्ष्वाकुकुलाला धन्य केलें. नंतर दुसरे दिवशीं कैकेयीच्या पोटीं चतुर्थांशानें म्हणजे बाकीच्या चतुर्थांशानें भरत जन्मास आला; व तिसरे दिवशीं सुमित्रेच्या पोटीं लक्ष्मण व शत्रुघ्न हे विष्णूच्या त्या त्या अंशानें अवतार घेऊन उत्पन्न झाले. पुष्य नक्षत्रावर मीन लग्नांत भरताचा जन्म झाला व आश्लेषा नक्षत्रावर कुलीर म्हणजे कर्कलग्नांत लक्ष्मणशत्रुघ्नांचा जन्म झाला. सारांश, राम सर्वांत वडील असून त्याच्याहून भरत लहान, भरताहून लक्ष्मण व लक्ष्मणाहून शत्रुघ्न लहान होता. प्राचीन काळीं अशी चाल होती, कीं लहान भाऊ वडील भावांस बापाप्रमाणें मान देत व त्यांची सेवा

करीत. तीप्रमाणें ते तिघेही धाकटे भाऊ रामास मान देत व त्याची सेवा करीत; पण त्यांतल्या त्यांत रामावर लक्ष्मणाचें प्रेम विशेष होतें व तो त्याची नेहमीं सेवा करी; शत्रुघ्नाचें प्रेम भरतावर असून तो भरताची सेवा करी; यामुळें रामलक्ष्मण व भरतशत्रुघ्न अशा नेहमीं जोड्या दिसत,व याच अनुक्रमानें आपण त्यांचा नेहमीं नामानिर्देश करतों. असो;पुत्र होतांच दशरथाच्या राजवाड्यांत व राज्यांत जो आनंदीआनंद झाला तो गगनांतही मावेना. पुत्रजन्माचें वर्तमान ऐकतांच दशरथानें ब्राह्मणांस हजारों गाई दिल्या;बंदिजनांना बाक्षिसें वाटलीं; व आप्तेष्टांना वस्त्रें दिलीं. बारशाच्या दिवशीं वासिष्ठ गुरूंनीं मुलांचीं रामलक्ष्मण, भरतशत्रुघ्न अशीं नांवें ठेवलीं व पुढें जसजसे ते शुक्लपक्षाच्या चंद्राप्रमाणें वाढूं लागले,तसतसे त्यांचे संस्कार करून त्यांनीं त्यांस विद्याही शिकविली. त्या सर्वांत रामचंद्र अत्यंत बुद्धिमान्,तेजस्वी व बलवान् होता,हें सांगावयास नकोच.त्याच्या सद्गुणानें, बुद्धिमत्तेनें व मोहक रूपानें रामचंद्र हें नांव अन्वर्थक झालें होतें. पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें रामचंद्रास पाहून सर्वांस आनंद होई, इतकेंच नव्हे तर त्यास पाहून पाहणाऱ्यांच्या डोळ्यांची तृप्ति होत नसे ! ते चौघे राजपुत्र घोड्यावर व हत्तीवर बसणें, धनुष्यानें बाण मारणें, इत्यादि क्षत्रियविद्येंत, तसेंच वेदविद्येंतही हळुहळू निष्णात झाले. विद्या शिकत असतांना त्या चौघांनींही आपल्या मातापितरांची सेवा करण्यांत अंतर केलें नाहीं. रामचंद्राची सेवा लक्ष्मण अत्यंत भक्तीनें व प्रेमानें करी; जेव्हां जेव्हां रामचंद्रानें घोड्यावर बसून अरण्यांत मृगयेस जावें,तेव्हां तेव्हां लक्ष्मणानें त्याचे धनुष्यबाण घेऊन मागून पायांनीं चालावें. याप्रमाणें ते चौघे राजपुत्र वाढतांवाढतां आपल्या सौजन्यानें, विद्येनें व रूपानें सर्वांस अत्यंत प्रिय झाले. दशरथास तर आपल्या सद्गुणी व सुंदर मुलांस पाहून होणाऱ्या आनंदापुढें व सुखापुढें स्वर्गसुख तुच्छ वाटे. ( बाल. सर्ग १५–१८ ).

एके दिवशीं दशरथ राजा आपल्या प्रधानांसह सभेंत बसून आपल्या मुलांच्या लग्नाचा विचार करीत होता.इतक्यांत एकाएकीं विश्वामित्र ऋषि तेथें आले. विश्वामित्र आल्याची खबर पोहोंचतांच दशरथानें त्यांस सामोरे जाऊन त्यांची मधुपर्कानें पूजा केली व त्यांस आदरानें राजसभेंत आणून एका सुंदर आसनावर बसविलें; नंतर हात जोडून त्यांस म्हटलें:—"मुनिराज, आपल्या अकल्पित आगमनानें मला जो आनंद झाला आहे तो वर्णन

करतां येत नाहीं. आपल्यासारखे महर्षि माझ्या येथें आपण होऊन आले, हा माझा भाग्योदयाचाच योग आहे. आपली काय इच्छा आहे, ती मला सांगा. आपणांस हवें असेल तें मी देईन; मला निःशंकपणानें आपण आज्ञा करा." दशरथाचें हें प्रेमपूर्वक केलेलें भाषण ऐकून विश्वामित्र म्हणाले:— "दशरथा, तुझा इक्ष्वाकुकुलांत जन्म झाला असून तुझे गुरु वसिष्ठ आहेत. तुझ्या तोंडून निघालेलें हें भाषण दुसरीकडे ऐकावयास मिळणार नाहीं. तूं आपल्या वचनाप्रमाणें माझी प्रार्थना मान्य करशील अशी मला खात्री आहे. माझ्या मनांत यज्ञ करण्याचें आहे. परंतु मारीच व सुबाहु हे दोघे राक्षस मला नेहमीं विघ्न करीत असतात. माझा यज्ञ होऊं लागला म्हणजे वेदीवर रक्तमांस इत्यादि अमंगल वस्तु आणून टाकितात. मींच त्यांचें पारिपत्य केलें असतें. परंतु मीं मोठ्या प्रयासानें संपादिलेलें तपोबल खर्चूं इच्छित नाहीं. तर तूं मला माझ्या यज्ञाच्या संरक्षणाकरितां रामचंद्रास दे. हा तुझा पुत्र लहान आहे, परंतु महान् पराक्रमी आहे. माझ्या संरक्षणाखालीं असल्यावर त्याला यत्किंचितही इजा पोंचणार नाहीं. यासाठीं तूं बिलकूल काळजी करूं नको. माझ्या कृपेनें रामचंद्रांचेंही पुष्कळ कल्याण होईल. मी लवकरच यज्ञ सुरूं करणार आहे, तर दहा दिवसपर्यंत रामचंद्रास माझ्या स्वाधीन कर."हें ऐकून दशरथाच्या पोटांत एकदम धस्स झालें व क्षणभर तो अगदीं स्तब्ध बसला. थोड्या वेळानें भानावर येऊन दशरथानें मोठ्या काकुळतीनें त्यांस म्हटलें:—"ऋषिवर्य ! रामास अद्याप उणेंपुरें सोळावें वर्षही लागलेलें नाहीं. त्याचें राक्षसाबरोबर युद्ध करण्यासारखें वय नाहीं. त्याला तुम्ही कसे नेतां! पाहिजे तर मला घेऊन चला; मी एक अक्षौहिणी सैन्य घेऊन आपल्याबरोबर येतों. माझ्या देहांत प्राण आहे, तोंपर्यंत मी राक्षसांशीं सैन्याच्या अग्रभागीं होऊन लढेन. आपण रामास नेऊं नका. राम लहान आहे, तो अद्याप अस्त्र-विद्या शिकलेला नाहीं व त्यास युद्धाचा अद्याप प्रसंगही आलेला नाहीं. राक्षस फार कपटयुद्ध करितात, त्यास त्यांचे डावपेंच माहीत नाहींत. सुंदोपसुन्दाचे पुत्र मारीच व सुबाहु मोठे पराक्रमी असून काळासारखे भयंकर आहेत. त्यांच्याशीं युद्ध करण्यास रामास नेऊं नका. अथवा नेतच असाल तर मलाहि रामाबरोबर घेऊन चला. मला रामावांचून क्षणभरहि चैन पडणार नाहीं. ऋषीश्वरा, मी एकट्या रामास देऊं शकत नाहीं." असें म्हणून दशरथ स्तब्ध झाला. दशरथाचें हें भाषण ऐकून विश्वामित्रास राग आला व ते

म्हणाले:—"राजा! प्रथम वचन देऊन आतां तूं माझी विनंति मान्य करीत नाहींस, हें तुझ्या कुळाला उचित नाहीं. असो; तुला रामास देववत नाहीं तर मी जातों." असें म्हणून विश्वामित्र एकदम उठले. तेव्हां चोहोंकडे हाहाकार झाला, व पृथ्वी कांपूं लागली. इतक्यांत वसिष्ठगुरु दशरथास म्हणाले:—"दशरथा! इक्ष्वाकुकुलांत जन्म घेऊन तूं असा वचनभंग करितो आहेस हें तुला शोभत नाहीं. रामचंद्र अस्त्रविद्या शिकलेला असो किंवा नसो, त्याच्या केसासही धक्का लावण्याचें सामर्थ्य कोणत्याही राक्षसास नाहीं. त्यांतून विश्वामित्र ऋषि रामाचे पाठिराखे आहेत. हे महातपस्वी,प्रत्यक्ष धर्म आहेत, इतकेंच नव्हे तर हे मोठे पराक्रमी वीरही आहेत. यांच्यासारखी अस्त्रविद्या हल्लीं कोणासही येत नाहीं व पुढेंही कोणास येणार नाहीं. यांच्याबरोबर रामास पाठविलें तर त्याचें मुळींच अकल्याण होणार नाहीं. किंबहुना त्याचें मोठें हितच होईल.तर रामचंद्रास यांचे हवालीं करण्यास मागेंपुढें पाहूं नको." वसिष्ठगुरूंचें हें भाषण ऐकून दशरथानें आपले शब्द परत घेतले आणि रामास व लक्ष्मणास बोलावून आणून त्यांस आनंदानें विश्वामित्र ऋषींच्या स्वाधीन केलें. ( बाल. सर्ग १८–२१ ).

वसिष्ठ ऋषींनीं विश्वामित्राची जी तारीफ केली,ती अयोग्य नव्हती. विश्वामित्र ऋषि हे मूळचे क्षत्रिय असून ते आपल्या तपश्चर्येनें ब्राह्मण झाले होते. आर्यांचे जे परमपूज्य सप्तर्षि आहेत, त्यांतच विश्वामित्रांची गणना असून सर्व आर्यांना वंद्य अशा गायत्री मंत्राचेही ऋषि तेच आहेत. विश्वामित्र ब्राह्मण कसे झाले याची कथा फार बोधप्रद आहे. ब्रह्मदेवाचा पुत्र कुश यास पुत्र होते; त्यांपैकीं कुशनाभ यास गाधिनांवाचा मुलगा झाला. ह्या गाधीचे विश्वामित्र हे पुत्र होत. कुशाचा पणतु व गाधीचा पुत्र या नात्यानें विश्वामित्रास कौशिक व गाधिज असेंही म्हणत. विश्वामित्रानें आपलें वडिलोपार्जित कनोज येथील राज्य पुष्कळ दिवस उत्तम रीतीनें केलें. एके दिवशीं ते आपल्या सैन्यांसह अरण्यांत शिकारीस गेले असतां त्यास वसिष्ठांचा आश्रम लागला. वसिष्ठांनीं त्यांचें स्वागत करून त्यांस प्रेमानें आपल्या आश्रमांत राहून घेतलें. वसिष्ठाजवळ शबला नांवाची एक कामधेनु होती, ती इच्छिलेला पदार्थ ऋषीस देत असे. विश्वामित्राचें आदरातिथ्य करण्याकरितां वसिष्ठांनीं शबलेजवळ सामुग्री मागतांच तिनें त्यांस दिव्य सामुग्री दिली. त्या सामुग्रीनें वसिष्ठांनीं राजासही करतां येणार नाहीं,अशा

थाटाचा विश्वामित्रांचा भोजनादिकांनीं सत्कार केला. आश्रमांत कांहीं एक नसतां वसिष्ठांनीं अरण्यांत केलेला तो अप्रतिम पाहुणचार पाहून राजास मोठें आश्चर्य वाटलें व चौकशी करितां त्यास वसिष्ठाच्या कामधेनूचें विलक्षण सामर्थ्य समजलें. तेव्हां विश्वामित्रास त्या कामधेनूचा लोभ उत्पन्न झाला. वसिष्ठ ऋषींस त्या कामधेनूच्या मोबदला वाटेल तें देण्यास विश्वामित्र तयार झाले, किंबहुना आपलें राज्यही त्यांनीं त्यांस देऊं केलें. परंतु वसिष्ठांनीं विश्वामित्रांचें म्हणणें मान्य केलें नाहीं. एक यःकश्चित् ब्राह्मण आपणासारख्या सार्वभौमाचें ऐकत नाहीं, असें वाटून विश्वामित्रास फार राग आला; व त्यांनीं सत्तेच्या घमेंडींत आपल्या सैनिकांस त्या कामधेनूस जबरदस्तीनें घेऊन जाण्याची आज्ञा केली. शबलेस ते लोक नेऊं लागले, तेव्हां त्यांस धक्का देऊन मोठ्या दुःखानें ती वसिष्ठ महर्षीपाशीं आली व "मला आपण कां देऊन टाकतां ?" असें त्यांस मोठ्या काकुळतीनें म्हणाली. वसिष्ठांनीं तिचें समाधान करून, "मी तुला देऊन टाकिलें नाहीं. राजा तुला जबरदस्तीनें घेऊन जात आहे. तुझी इच्छा असेल तर रहा." असें म्हणतांच शबलेनें क्रोधानें आपल्या केसांतून लक्षावधि यवन वीर उत्पन्न केले व त्या वीरांनीं विश्वामित्रांच्या सैन्याचा फडशा उडविला.

आपल्या सैन्याचा यवनांकडून वसिष्ठांनीं असा नाश करविला, हें पाहून विश्वामित्र खजील होऊन आपल्या राजधानीस परत गेले व आपल्या पुत्रास राज्यावर बसवून वसिष्ठांचा सूड उगविण्याच्या हेतूनें तपश्चर्या करण्याकरितां हिमालयांत निघून गेले. त्यांनीं आपल्या तपानें शंकरास प्रसन्न करून घेऊन त्यांजपासून सर्व धनुर्विद्या व संपूर्ण अस्त्रविद्या मिळविली; याप्रमाणें युद्धाचें सामर्थ्य संपादून विश्वामित्र वसिष्ठाच्या आश्रमावर चालून आले व तो आश्रम त्यांनीं आपल्या अस्त्राच्या सामर्थ्यानें एका क्षणांत उध्वस्त केला. तेव्हां वसिष्ठ ऋषि निरुपायानें आपला ब्रह्मदण्ड घेऊन विश्वामित्रांस आडवे झाले. विश्वामित्रांनीं अनेक अस्त्रें वसिष्ठांवर सोडिलीं, परंतु तीं सर्व वसिष्ठांच्या ब्रह्मदंडानें गिळून टाकिलीं. शेवटीं विश्वामित्रांनीं ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला; तोही फुकट गेला ! तेव्हां त्यांनीं तोंडांत बोट घातलें; आणि "धिग्बलं क्षत्रियबलं ब्रह्मतेजो बलं बलम्" असें म्हणून ब्रह्मत्व मिळविण्याचाच निश्चय करून तेथूनच पुनः तपश्चर्या करण्याकरितां त्यांनीं अरण्यवास पत्करला

**ज्ञानाच्या सामर्थ्यापुढें केवळ दांडगाईचें सामर्थ्य व्यर्थ आहे**

ही गोष्ट सर्व काळांस सारखीच लागू आहे, आणि म्हणूनच शहाणे लोक ज्ञानाची थोरवी गातात व ज्ञान मिळविण्याचा नेहमीं प्रयत्न करितात.

विश्वामित्रांनीं ब्रह्मत्व मिळविण्याकरितां हजारों वर्षें उग्र तपश्चर्या केली. परंतु ब्रह्मदेवानें त्यांस 'राजर्षि' यापलीकडे बहुमानपद दिलें नाहीं. " मला ब्रह्मर्षि कां म्हणत नाहीं ?" असें त्यांस विश्वामित्रांनीं विचारिलें; तेव्हां तूं अद्याप जितेंद्रिय झाला नाहींस, असा त्यांनीं जबाब दिला. **केवळ ज्ञानानेंच ब्राह्मण होत नाहीं तर ज्ञानास योग्य असें त्याचें आचरणही पाहिजे** हें लक्षांत ठेविलें पाहिजे. " **तोचि ब्राह्मण जेथें शांति दया दान सत्य तप धर्म** " या मोरोपंतांच्या उक्तीप्रमाणें **ज्ञानाला शुद्धाचरणाचीही जोड मिळाली पाहिजे.** असो; ब्रह्मदेवाच्या म्हणण्याचा प्रत्यय विश्वामित्रांस लवकरच आला. अयोध्येचा त्रिशंकु म्हणून एक राजा होता; त्यास सदेह स्वर्गास जाण्याची इच्छा झाली; व त्यानें वसिष्ठगुरूंस या हेतूनें यज्ञ करण्याची विनंति केली. परंतु ही गोष्ट अशक्य आहे, असें म्हणून वसिष्ठांनीं त्रिशंकूचा निषेध केला. वसिष्ठांचा शत्रु विश्वामित्र आपलें कार्य करील, असें जाणून त्रिशंकु विश्वामित्राकडे गेला. तेव्हां त्यांनीं ती गोष्ट कबूल करून आपलें तप खर्चून त्रिशंकूस सदेह स्वर्गास पोंचाविलें. परंतु इंद्रास तें न आवडून त्यानें त्रिशंकूस स्वर्गातून खालीं ढकलिलें; तेव्हां विश्वामित्रांनीं आपल्या तपाच्या सामर्थ्यानें ' तिष्ठ तिष्ठ ' म्हणून त्यास आकाशांतच थांबवून धरिलें ! त्रिशंकूचा डोकें खालीं केलेला तारा अद्याप दक्षिण आकाशांत चमकत आहे ! वसिष्ठांच्या मत्सरानें त्रिशंकूकरितां विश्वामित्रांनीं आपलें सर्व तप खर्च केलें. तेव्हां त्यास पुनः तपास सुरवात करावी लागली. या वेळेस इंद्रानें विश्वामित्रांच्या तपाचा भंग करण्याकरितां मेनकेस पाठविलें. मेनकेस विश्वामित्रांपासून शकुंतला झाली, तेव्हां त्यांस पुनः पश्चात्ताप झाला, व त्यांनीं मेनकेस टाकून पुनः तपश्चर्या सुरू केली ! इंद्रानें रंभेस पाठविलें, तेव्हां विश्वामित्रांनीं क्रोधानें तिला शाप दिला व पुनः तप सुरू केलें. अनेक विघ्नें आलीं तरी विश्वामित्रांनीं आपला हेतु मात्र सोडिला नाहीं. शेवटीं सर्व इंद्रियें जिंकून हजारों वर्षें विश्वामित्रांनीं तप केलें तेव्हां ब्रह्मदेवांनीं प्रसन्न होऊन त्यांस ' ब्रह्मर्षि ' हें पद आनंदानें दिलें. वसिष्ठांनीं मला ब्रह्मर्षि म्हणावें अशी विश्वामित्रांनीं विनंति केल्यावरून वसिष्ठऋषींनींही तेथें येऊन ' ब्रह्मर्षि ' या नांवानें विश्वामित्रांचा गौरव केला; व ब्रह्मदेवानें या दोघां महर्षींचें सख्य करून दिलें. याप्रमाणें विश्वामित्र ब्राह्मण झाल्याची कथा आहे. शंकराच्या

प्रसादानें सर्व अस्त्रविद्या त्यांस पूर्वीच अवगत झाली होती. सारांश, याप्रमाणें विश्वामित्र आपल्या तपोबलानें ' शापादपि शरादपि ' तेजस्वी झाले होते. ( बाल० सर्ग ५१–६५ ).

असो; दशरथानें वसिष्ठ गुरूंच्या आज्ञेवरून रामलक्ष्मणांस विश्वामित्रांच्या हवालीं केलें, तेव्हां कौसल्या मातेनें मोठ्या प्रेमानें त्यांस आशीर्वाद देऊन त्यांस निरोप दिला. नंतर विश्वामित्र पुढें, राम मध्यें व लक्ष्मण मागें याप्रमाणें ते जात असतां प्रथम त्यांस शरयू नदी लागली. शरयूवर येतांच विश्वामित्रांनीं 'रामा' म्हणून मधुर आवाजानें हांक मारून म्हटलें: "रामा! ये; हातांत पाणी घे. तुला 'बला' व 'अतिबला' या विद्यांचे मंत्र आतांच शिकवितों; हे मंत्र आले म्हणजे तुला कधींही श्रम होणार नाहीं, तुला ज्वर येणार नाहीं, तुझें रूप कधींही फिकें पडणार नाहीं, तुला तहानभुकेची पीडा होणार नाहीं, व गैरसावध किंवा निद्रिस्त असतां तुझ्यावर राक्षस हल्ला करूं शकणार नाहींत. सारांश, तुझ्यासारखा सामर्थ्यवान् वीर हल्लींही कोणी नाहीं व यापुढेंही होणार नाहीं.तर लवकर ये, आणि हे मंत्र घे." हें ऐकून रामचंद्रांनीं लागलेंच हातांत पाणी घेऊन विश्वामित्रापासून त्या विद्या ग्रहण केल्या, तेव्हां त्यांचे मुखावर विलक्षण तेज चमकूं लागलें. नंतर त्या दोघां राजपुत्रांनीं विश्वामित्रांची सेवा करून वाळलेलीं पानें जमवून तिघांकरतां पानांची शय्या तयार केली, व त्या रात्रीं तिघांनीं शरयूच्या तीरावर निद्रा केली.

दुसरे दिवशीं प्रातःकाळींच विश्वामित्रांनीं रामलक्ष्मणांस उठाविलें. तेव्हां त्यांनीं प्रातर्विधि आटोपून शरयूनदींत स्नान केलें व निघण्याची तयारी करून विश्वामित्रापाशीं येऊन त्यांस नमस्कार केला. तेव्हां ते तिघेही पूर्वीप्रमाणें रस्ता चालूं लागले. त्या दिवशीं संध्याकाळीं ते शरयू व गंगानदीच्या संगमावर येऊन पोहोंचले. तेथें पुष्कळ ऋषींचे आश्रम होते; त्यांनीं त्यांचें स्वागत करून त्यांस रात्रीं आपले येथें उतरविलें. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं नित्यकर्मे आटोपून ऋषींनीं आणविलेल्या नावेनें शरयूच्या व गंगेच्या संगमावरच्या मार्गानें गंगानदी उतरून ते पार झाले. नंतर दोन्ही नद्यांस नमस्कार करून ते रस्ता चालूं लागले; तों लवकरच त्यांस एक भयंकर अरण्य लागलें; त्या अरण्यांत जंगली झाडांची अतिशय गर्दी झाली असून त्या झाडांस कोणींही कधींही हात न लावल्यामुळें त्यांचे

गगनचुंबित वृक्ष झाले होते, व त्यांजवर चोहोंकडून मोठमोठ्या वेली चढल्या होत्या. कांटेरी झाडें चोहोंकडे वाढून रस्ते बहुतेक बंद झाले होते व त्यांच्या जाळ्यांतून वाघ, सिंह, अस्वलें, इत्यादि हिंस्रपशूंच्या मधून मधून भयंकर गर्जना ऐकूं येत. ' झिल्ल ' किर्र ' इत्यादि कानाला कठोर लागणारे आवाज तर सारखे चाललेच होते. ठिकठिकाणीं सापांचे भयंकर फूत्कारही ऐकूं येत. आकाशाकडे पाहावें तों मोठमोठाले क्रूर पक्षी वर घिरट्या घालतांना दिसत. याप्रमाणें तें घोर अरण्य पाहून रामांनीं " हें अरण्य असें कां वाढलें आहे ? " असें विश्वामित्रांना विचारिलें. तेव्हां ते म्हणाले:—" रामा, हा पूर्वी मलदकारूष नांवाचा एक सुपीक देश होता. परंतु येथें सुंदाची बायको ताटका नांवाची यक्षिणी वावरूं लागल्यापासून हा देश उध्वस्त होऊन येथें हें भयंकर अरण्य वाढलें आहे. ह्या देशास या यक्षिणीपासून सोडविण्याकरितां मी तुला येथें आणिलें आहे. तिला मारून या देशास सुखी कर. स्त्रीहत्येच्या दोषाची शंका मनांत आणूं नकोस. सर्व जगतास ताप देणाऱ्या स्त्रियांचा वध करणें हें पाप नाहीं. भृगुऋषींची स्त्री म्हणजे शुक्राची आई इंद्राचा नाश करूं लागली, तेव्हां श्रीविष्णूंनीं तिला तात्काळ मारिलें. तसेंच विरोचनाची कन्या मंथरा सर्व पृथ्वीचा द्रोह करूं लागली म्हणून इंद्रानें तिचा वध केला. सारांश, दुष्टस्त्रीवधाचा दोष नाहीं. तर तयार हो; ही यक्षिणी केव्हां येऊन तुझ्यावर तुटून पडेल याचा नेम नाहीं. " तें ऐकून रामचंद्रानें लागलीच धनुष्यास दोरी लावून व तिचा टणत्कार करून त्या आवाजानें दाही दिशा भरून टाकल्या. इतक्यांत समोरून एक वावटळ येत आहे, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. थोड्याच वेळानें ती यक्षिणी धूळ उडवीत व दगड फेंकीत रामावर चालून आली. तेव्हां त्यानें नेम धरून तिच्या वक्षःस्थलावर एक बाण इतक्या जोरानें मारला कीं, तो वज्रतुल्य बाण तिचा देह फोडून बाहेर निघून गेला ! तेव्हां ती यक्षिणी मृत होऊन धाडकन् खालीं जमिनीवर पडली. रामाचें प्रसंगावधान, सामर्थ्य व अचुक शरसंधान करण्याची शैली हीं पाहून विश्वामित्रांस फारच आनंद झाला. त्यांनीं त्याची पाठ थोपटून त्याच्या धैर्याची व पराक्रमाची तारीफ केली व ते त्यास म्हणाले:— "रामा, तुझ्यासारखा लोकोत्तर सत्वाचा वीर पुरुष माझ्या पाहण्यांत आजपर्यंत आला नाहीं. माझ्यापासून अस्त्रविद्या शिकण्यास तूं सर्वथैव योग्य

आहेस. मला येत आहे ती सर्व अस्त्रविद्या मी तुला आजच शिकवितों. " नंतर त्या तिघांनीं तेथेंच मुक्काम केला व विश्वामित्रांनीं नानाप्रकारचीं अस्त्रें त्यांच्या मंत्रांसह रामचंद्रास शिकविलीं व त्या अस्त्रांची ' संग्रहणविद्या ' म्हणजे त्यांचा प्रयोग केल्यावर तीं परत घेण्याची विद्याही त्यास दिली. ( बाल० सर्ग २३–२७ ).

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं निघून मार्गक्रमण करीत ते लवकरच अरण्याच्या बाहेर पडले. थोड्याच वेळानें विश्वामित्रांचा रमणीय सिद्धाश्रम दिसूं लागला. नदीच्या कांठानें असलेले नानाप्रकारचे वृक्ष व फुलझाडांच्या शोभिवंत बागाही त्यांचे दृष्टीस पडूं लागल्या. तसेंच निरनिराळ्या प्रकारच्या पिकांनीं भरलेलीं शेतेंही त्यांस लागलीं. पूर्वी विष्णूंनीं वामनाचा अवतार घेऊन बळीस पाताळीं घातल्यानंतर याच सिद्धाश्रमांत तपश्चर्या केली होती. असा तो पुण्य व रमणीय आश्रम पाहून ते राजपुत्र म्हणालेः—"मुनिवर्य, हा आपला सिद्धाश्रम दिसतो आहे असें वाटतें; तरी आज आम्ही धन्य स्थळीं येऊन पोहोंचलों. " विश्वामित्रांनीं उत्तर केलें:—" हा माझा आश्रम नव्हे, तर तो तुमचाच आहे. आजपासून या आश्रमाचें राक्षसांपासून संरक्षण करा. कारण, आजच मी यज्ञाची दीक्षा घेणार आहें. " असें ते म्हणत आहेत तोंच आश्रमांतील सर्व ऋषि त्यांस सामोरे आले व त्यांनीं मोठ्या उत्सुकतेनें त्या राजपुत्रांचें आदरातिथ्य केलें. नंतर लागलीच त्यांनीं यज्ञाची तयारी करून विश्वामित्रांस दीक्षा दिली. सहा दिवसपर्यंत तो यज्ञ चालूं असतां रामलक्ष्मणांनीं रात्रंदिवस सज्ज राहून आश्रमाचें व यज्ञाचें संरक्षण केलें. सातवे दिवशीं एकाएकीं राक्षसांचें सैन्य काळ्या मेघांच्या समूहाप्रमाणें आश्रमावर चालून आलें. सुबाहु आणि मारीच व त्यांचें सैन्य दृष्टीस पडतांच रामचंद्रानें लक्ष्मणास सावध राहण्यास सांगून स्वतः धनुष्य सज्ज केलें. रामानें प्रथम मानवास्त्राचा मारीचावर प्रयोग केला. त्या अस्त्राच्या सामर्थ्यानें मारीच शतयोजनें दूरसमुद्रांत जाऊन पडला. नंतर रामानें सुबाहूवर अग्न्यस्त्राचा प्रयोग करून त्यास ठार केलें व शेवटीं सैन्यावर वायव्यास्त्र टाकून त्याची दाणादाण केली. याप्रमाणें शत्रुसैन्याचा विध्वंस करून यज्ञामध्यें आलेलें विघ्न त्या दोघां दशरथपुत्रांनीं नाहींसें केलें व तो यज्ञ सिद्धीस गेला. तेव्हां विश्वामित्रांनीं रामलक्ष्मणांस आलिंगन देऊन त्यांची अत्यंत प्रशंसा केली व

मोठ्या आनंदानें सर्व ऋषींसहवर्तमान यज्ञाची समाप्ति केली. ( बाल० ( स० २८-३४. )

सुबाहु व मारीच या बलाढ्य राक्षसांचा रामानें सहज लीलेनें पराभव केला, यावरून जनकराजाचें धनुष्य रामचंद्र सहज उचलील व त्याची कन्या रामचंद्रास योग्य पत्नी आहे असा विचार मनांत आणून विश्वामित्र ऋषि यज्ञ संपल्यानंतर त्या दोघां राजपुत्रांस घेऊन जनकाचा यज्ञ पाहण्याच्या मिषानें ऋषींसह निघाले.मार्गांत कित्येक देश,शहरें व नद्या लागल्या त्यांची माहिती रामचंद्रास विश्वामित्र सांगत. प्रथमतः शोण नदीवर येऊन तो नद उतरून ते मगध देशांत शिरले.मगध देशाची राजधानी गिरिव्रज ही चार डोंगरांच्या मध्यें वाहणाऱ्या एका नदीच्या कांठीं वसली होती. त्या गिरिव्रजावरून विश्वामित्रादि मंडळी जान्हवी म्हणजे भागीरथी नदीवर पोहोंचली. भागीरथीचें रम्य, पवित्र व विस्तीर्ण पात्र पाहून सर्वांस फारच आल्हाद झाला. हंस, सारस इत्यादि पक्ष्यांनीं व नानाप्रकारच्या कमलांनीं सुशोभित झालेल्या जान्हवीच्या तीरावर त्या दिवशीं त्यांनीं मुक्काम करून स्नानें केलीं. अग्निहोमादि कृत्यें करून पितृदेवतांचें तर्पण केलें व भोजनोत्तर भागीरथीच्या निर्मल व मधुर जलाचें यथेच्छ पान केलें. नंतर सर्व मंडळी विश्वामित्राभोंवतीं जमून बसली असतां जान्हवी (भागीरथी) गंगेविषयीं रामचंद्रानें प्रश्न केल्यावरून विश्वामित्रांनीं गंगेची कथा सांगण्यास प्रारंभ केला. ते म्हणाले:—

"रामचंद्रा ! हिमालय पर्वताला मेरुकन्या मेना नामक पत्नीपासून दोन मुली झाल्या,—एक गंगा व दुसरी उमा अथवा पार्वती. देवांनीं हिमालयापाशीं गंगेची मागणी केल्यावरून हिमालयानें गंगेस देवांस अर्पण केलें व ते स्वर्गलोकास पावन करण्याकरितां गंगेला स्वर्गास घेऊन गेले. तेथें ती आकाशगंगा अद्याप दिसत आहे व यामुळें तिला सुरनदी किंवा स्वर्णदी असेंही म्हणतात.गंगा स्वर्गांत गेल्याकारणानें पृथ्वी व पाताल लोक हे तिच्यावांचून अतृप्त राहिले. यानंतर इक्ष्वाकु वंशांत सगर नांवाचा महान् बलाढ्य राजा तुझा पूर्वज होऊन गेला. त्याला दोन स्त्रिया होत्या. त्यांनीं भृगु ऋषींची पुत्रप्राप्तीच्या इच्छेनें आराधना केली. तेव्हां भृगुऋषि प्रसन्न होऊन म्हणाले कीं, "तुमचे मनोरथ पूर्ण होतील. एकीस एकच मुलगा होईल, परंतु तो वंश चालविणारा होईल. दुसरीस साठ हजार बलवान् प्रतापी पुत्र होतील. यांपैकीं जिला जसें पाहिजे तसें तिनें मागून घ्यावें." तेव्हां केशिनी राणीनें

वंशकर असा एक पुत्र मागून घेतला व दुसरी राणी जी सुपर्णाची बहीण व अरिष्टनेमीची मुलगी सुमति इनें साठ हजार मुलगे मागितले. त्याप्रमाणें दोघी स्त्रियांना सगरापासून पुत्र झाले. थोरला मुलगा असमंजस हा फार दुष्ट निघाला. त्यानें लोकांचीं मुलें उचलून शरयूनदींत टाकावीं व तीं हातपाय हालवून बुडून मेलीं म्हणजे हंसावें! याप्रमाणें तो दुष्ट राजपुत्र प्रजाजनांच्या प्राणांशींच खेळूं लागला, तेव्हां सगरानें त्यास हद्दपार करून त्याचा पुत्र अंशुमान् यास युवराज केलें. यानंतर सगर राजानें अश्वमेध करण्याचा निश्चय केला. हिमालय व विंध्य या दोन पर्वतांमधील विस्तीर्ण प्रदेशांत त्यानें अश्वमेध करण्यास प्रारंभ केला, व यज्ञाचा अश्व सोडून त्याजबरोबर रक्षणाकरितां अंशुमान् यास दिलें. सगराच्या अश्वमेधानें इंद्रास भय उत्पन्न होऊन इंद्रानें अदृश्यरूपानें यज्ञाचा अश्व नाहींसा करून त्यास पाताळांत नेऊन सोडून दिलें. यज्ञाचा घोडा एकाएकी नाहींसा झालेला पाहून अंशुमानास वाईट वाटलें व त्यानें परत जाऊन सगरास सर्व हकीकत सांगितली. यज्ञ चालविणारे ऋत्विज व इतर लोक हा मोठाच अपशकुन झाला असें म्हणूं लागले; तेव्हां सगरानें रागानें आपल्या साठ हजार पुत्रांस आज्ञा केली कीं, पृथ्वीवर जेथें अश्व असेल तेथून तो शोधून काढा व पृथ्वीवर न सांपडेल तर पृथ्वी खणून पाताळांतून शोधून काढा. सगराच्या आज्ञेनें त्याच्या साठ हजार पुत्रांनीं सर्व पृथ्वी धुंडाळिली, परंतु अश्वाचा शोध लागेना. तेव्हां एकाएकानें एक एक योजन खोल याप्रमाणें पृथ्वी खोदून ते रसातळास पोहोंचले. प्रथम चारी दिशांस चार दिग्गज त्यांच्या दृष्टीस पडले. त्यांस नमस्कार करून ते पुढें चालले. तों श्रीविष्णु कपिलाचा अवतार घेऊन पृथ्वीचा भार डोक्यावर धारण करून बसलेले त्यास दिसले व शेजारींच तो घोडा चरतांना त्यांच्या दृष्टीस पडला. यज्ञाचा अश्व हरण करणारा हाच अपराधी आहे असें वाटून सगराच्या पुत्रांनीं त्यांजवर दूषणांचा व शस्त्रांचा भडिमार सुरू केला. कपिल महामुनींनीं क्रोधानें डोळे उघडून त्यांजकडे पाहिलें व हुंकारानें त्यांचा निषेध केला. त्याबरोबर ते साठ हजार सगराचे पुत्र लागलींच जळून खाक झाले व त्यांच्या भस्मराशी तेथें पडल्या!

इकडे सगर राजा पुत्रांची वाट पाहतां पाहतां कष्टी होऊन गेला. तेव्हां त्यानें आपल्या नातवास आज्ञा केली कीं, तूं माझ्या पुत्रांनीं खणलेल्या रस्त्यानें रसातळास जा आणि अश्वाचा व पुत्रांचा शोध लाव. अंशुमान्

आजाच्या आज्ञेप्रमाणें ताबडतोब निघाला तो रसातळास जाऊन दिग्गजांना नमस्कार करून आपल्या चुलत्याविषयीं त्यांस हकीकत विचारूं लागला. त्यांनीं त्यास आशीर्वाद देऊन पुढें जाण्याविषयीं सांगितलें. तेव्हां पुढें जातां जातां साठ हजार पितरांच्या भस्मराशि त्याच्या नजरेस पडल्या व जवळच तो यज्ञाचा घोडाही त्यास दिसला. हें पाहून अंशुमान् फार शोकाकुल होऊन आपल्या पितरांस सद्गति मिळावी या इच्छेनें त्या राशींवर शिंपडण्याकरितां जल पाहूं लागला. तों कोठेंही त्यास जल मिळेना. इतक्यांत सुपर्ण म्हणजे गरुड (त्या पितरांचा मामा) त्यास भेटला. त्यानें त्यास म्हटलें:—"बाबा अंशुमाना! हे तुझे पितर विष्णूच्या कोपानें जळून गेले आहेत. त्यांचा उद्धार करावयाचा असेल, तर गंगेस स्वर्णदी गंगा इच्या उदकानें त्यांचा उद्धार होईल. तुझ्यांत शक्ति असेल, तर गंगेस येथें घेऊन ये. सध्यां तूं हा यज्ञाचा घोडा घेऊन जाऊन आपल्या आजास दे, म्हणजे त्याचा यज्ञ समाप्त होईल." याप्रमाणें गरुडानें त्यास उपदेश केल्यावर अंशुमान् तो घोडा घेऊन पृथ्वीवर आला व सगराचा यज्ञ समाप्त झाला. यानंतर स्वर्गाहून गंगा कशी आणावी, ह्या विचारास सगर लागला; परंतु ती गोष्ट त्यास साध्य झाली नाहीं. कालवशात् सगर स्वर्गस्थ झाल्यावर अंशुमान् गादीवर बसला. त्याच्याही हातून तें कार्य सिद्धीस गेलें नाहीं. त्याच्या मागून त्याचा पुत्र दिलीप राज्य करूं लागला. त्यानेंही यत्न केला; परंतु पितरांचा उद्धार त्यालाही करतां आला नाहीं. दिलीपानंतर त्याचा पुत्र भगीरथ सिंहासनावर बसला. तो महान् पराक्रमी व निश्चयी होता. त्यानें हजार वर्षें उग्र तप करून ब्रह्मदेवास संतुष्ट केलें व गंगा नदीनें पाताळांत येऊन आपल्या पितरांचा उद्धार करावा, असा त्याजपासून वर मागून घेतला. ब्रह्मदेवाच्या आज्ञेप्रमाणें गंगा नदी स्वर्गाहून परत खालीं येण्यास कबूल झाली; परंतु माझ्या पडण्याचा वेग शंकराशिवाय दुसऱ्या कोणासही सहन करितां येणार नाहीं, असें गंगेनें सांगितलें; तेव्हां भगीरथानें पुनः तपश्चर्या सुरू केली व शेवटीं आपल्या तपानें शंकरास प्रसन्न करून घेतलें. शंकरानें आपल्या मस्तकावर गंगेचा ओघ धारण करण्याचें कबूल केलें; तेव्हां आकाशांतून गंगा शंकराच्या मस्तकावर पडूं लागली. इतक्यांत गंगेला आपल्या वेगाचा गर्व होऊन असें वाटूं लागलें कीं, मी आपल्या वेगानें शंकराला ही पाताळांत लोटीत घेऊन जाईन; परंतु देवादिकांनींही केलेला गर्व चालत नाहीं! ही गंगेची गर्वाची कल्पना वेगाच्या अधिक जोरामुळें

शंकरास साहजिकच कळली. तेव्हां शंकरानें तिचा गर्व हरण करण्याकरितां आपल्या जटेच्या आंतच गंगेचा सगळा ओघ गुरफटून घेतला ! शंकराच्या जटेच्या बाहेर पडण्यास गंगेस वाटच मिळेना ! असें पाहून भगीरथानें शंकरास पुनः प्रसन्न केलें; तेव्हां जिच्या गर्वाचा परिहार झालेला आहे अशी गंगा शंकराच्या जटेंतून बाहेर पडली. ती सात प्रवाहांनीं निघाली. ल्हादिनी, पावनी, व नालिनी हे तीन ओघ पूर्व दिशेनें चालले; सुचक्षु, सिता आणि सिंधु हे तीन ओघ पश्चिम दिशेनें चालले. सातवा मुख्य ओघ भगीरथाच्या मागून वाहूं लागला. भगीरथ दिव्य रथांत बसून मोठ्या परिवारानिशीं व मंगलवाद्यादिकांसह पुढें जात आहे व मागून मासे, कांसवें, मगर इत्यादि जलचरांनीं भरलेला व गंभीर आवाज करणारा पांढरा सफेत पाण्याचा प्रचंड ओघ येत आहे, असा तो अद्भुत देखावा पाहण्याकरितां देव, ऋषि, मनुष्य, नाग, यक्ष, राक्षस, गंधर्व आपापल्या यानांत बसून आकाशांत व पृथ्वीवर जमा झाले. त्यांनीं भगीरथावर पुष्पवृष्टि केली व तेही त्या ओघाबरोबर चालूं लागले. शंकराच्या जटेंतून गंगा निघाली म्हणून अधिक पवित्र झालेल्या तिच्या पात्रांत स्वर्गांतून च्युत झालेल्या अनेक दिव्य विभूती स्नान करून पुनः स्वर्गास जाऊं लागल्या व हजारों लोक गंगेच्या पवित्र पात्राचें दर्शन करून, स्नान करून, व पाणी पिऊन तृप्त होऊं लागले. या रीतीनें तो गंगेचा प्रवाह देवादिकांसह व मनुष्यांसह कोठें संथपणें तर कोठें झपाट्यानें, कोठें उतरता तर कोठें सपाट, असा जातां जातां जन्हु राजा यज्ञ करीत होता तेथें आला. तेव्हां हा केवळ मनुष्य, याचा माझ्यापुढें काय पाड आहे, असा गंगेला पुनः गर्व झाला व तिनें त्याची यज्ञभूमि बुडवून टाकली. तेव्हां जन्हु राजास राग येऊन तो सगळा गंगेचा ओघच त्यानें पिऊन टाकिला ! तें त्याचें विलक्षण सामर्थ्य पाहून जन्हुराजाची देवादिकांनीं स्तुति केली व तिन्ही लोकांस पावन करण्याकरितां गंगेच्या ओघाला कृपा करून मोकळा सोड, अशी सर्वांनीं त्याची प्रार्थना केली. तेव्हां त्यानें आपल्या कानांतून गंगेचा ओघ बाहेर सोडिला. याप्रमाणें गंगा ही जन्हु राजाची मुलगी झाली, म्हणून तिला जान्हवीही म्हणतात. असो; भगीरथाबरोबर जातां जातां गंगा सगरपुत्रांनीं खणलेल्या रस्त्यानें सागरांतून पाताळांत पोहोंचली व तिनें आपल्या पवित्र उदकानें त्यांच्या साठ हजार भस्मराशींस पवित्र केलें. तें पाहून भगीरथास जो आनंद झाला तो काय वर्णन करावा ! हजारों

वर्षांचा कुलाचा पण, भगीरथ राजानें जितके जितके अडथळे आले तितके सर्व दूर करून सततोद्योगानें सिद्धीस नेला, हें पाहून ब्रह्मदेवानें भगीरथास प्रत्यक्ष दर्शन देऊन त्याची स्तुति केली. "सगर, अंशुमान् व दिलीप अशा तुझ्या पूर्वजांस जें साध्य झालें नाही, तें तूं आपल्या दीर्घ उद्योगानें सिद्ध केलेंस; तेव्हां तुला इहलोकीं अवश्य कीर्ति मिळेल व ही गंगा तुझी मुलगी म्हणोन भागीरथी या नांवानें प्रसिद्ध होईल. हिला 'त्रिपथगा' तिन्ही लोकांत गमन करणारी हें नांव तुझ्या प्रयत्नानें मिळालें आहे. हे तुझे पितर–सगराचे पुत्र–जोंपर्यंत सागर म्हणजे महासमुद्र कायम आहेत तोंपर्यंत स्वर्गलोकांत सुख भोगतील." याप्रमाणें वर देऊन ब्रह्मदेव अंतर्धान पावले. नंतर भगीरथानें आपल्या पितरांची क्रिया गंगेच्या जलानें करून त्यांस पवित्र केलें व आपल्या कुलाचा पण सिद्धीस नेला. गंगा पृथ्वीवर आल्याची ही पुण्यकथा ऐकून राम–लक्ष्मणांस फार कौतुक वाटलें व आपल्या कुळांत कसकसे प्रतापी, दीर्घोद्योगी, भगीरथ प्रयत्न करणारे व धर्मशील राजे झाले यांविषयी त्यांस माहिती होऊन आपण आपल्या पूर्वजांस योग्य अशीच करणी करून दाखवूं, असा त्यांनीं मनाशीं निश्चय केला. जान्हवीच्या तीरावरच त्या रात्रीं त्यांनीं निद्रा केली. (बाल० स० ३५–४४).

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं उठून नित्याप्रमाणें स्नानसंध्यादि कर्मे आटोपून विश्वामित्र ऋषि त्या दोघां राजपुत्रांना व इतर ऋषींना घेऊन गंगेच्या किनाऱ्यावर येऊन व सुंदर नावांत बसून गंगापार झाले. गंगातीरावर बसलेल्या विशाल नगरीच्या राजानें सामोरे येऊन त्या सर्वांचें आदरातिथ्य केलें व त्या दोन सुंदर राजपुत्रांना पाहून अत्यंत आनंद प्रदर्शित केला. नंतर ते वाट चालूं लागले. सायंकाळच्या सुमारास ते मिथिलेजवळ येऊन पोहोंचले, तों त्यांस एक शांत व सुंदर आश्रम लागला. त्याची शोभा व तशीच त्याची शून्यता पाहून रामचंद्रास फार आश्चर्य वाटलें व त्यानें विश्वामित्रास हा आश्रम कोणाचा व तो असा शून्य कां दिसतो असा प्रश्न केला; तेव्हां विश्वामित्रांनीं गौतम ऋषि व त्याची पत्नी अहल्या यांची हकीकत सांगितली. ते म्हणालेः–रामा! पूर्वी एके काळीं गौतमाची सुंदर स्त्री अहल्या इजला इंद्रानें गौतमाचें रूप घेऊन फसविलें. इंद्र आश्रमांतून बाहेर पडतो तों गौतमऋषि तेथें आले. आपलें रूप कपटानें धारण करणाऱ्या इंद्रास पाहतांच ऋषींस

अतिशय संताप आला. त्यांनीं अंतर्ज्ञानानें खरी हकीकत जाणली; तेव्हां त्यांनीं कोपानें इंद्रास शाप दिला. नंतर ते आश्रमांत शिरले, तेव्हां त्यांची स्त्री भयानें थरथर कांपत त्यांच्यासमोर हात जोडून उभी राहिली. गौतम ऋषींनीं " तूं हजारों वर्षेंपावेतों अदृश्यरूप, निराहार व दुःखभागी अशी या भस्मराशींत शिलारूप होऊन पडशील " असा तिला शाप दिला; पण जेव्हां रामचंद्र या वाटेनें येतील. त्यावेळेस तूं मुक्त होऊन त्यांचें आदरातिथ्य करून व पवित्र होऊन माझ्याशीं युक्त होशिल, असा तिला उःशापही दिला. ती बिचारी अहल्या अदृश्य होऊन जमिनीवर शिलारूपानें जी पडली, ती तेव्हांपासून अद्याप तशीच आहे. गौतमऋषीही येथेंच तपश्चर्या करीत बसले आहेत; यामुळें हा रमणीय आश्रम शून्य व भयाण दिसत आहे. तुझ्या योगानें ही हतभागिनी अहल्या शापापासून मुक्त होणार आहे; तर आपण आंत जाऊं या. " असें म्हणून विश्वामित्र रामलक्ष्मणांस घेऊन आश्रमांत शिरले व अहल्या पडली होती तेथें गेले. रामचंद्राचे चरणरज तेथें लागतांच अहल्या शापमुक्त होऊन पुढें आली. त्याबरोबर ते दोघे राजपुत्र मोठ्या आदरानें तिच्या पायां पडले. इतक्यांत गौतम ऋषीही समाधि विसर्जन करून तेथें आले. **एकादे वेळेस मनुष्याचे हातून पातक घडतें; परंतु त्याजविषयीं त्याला पश्चात्ताप होऊन त्याजबद्दल दीर्घ काळ प्रायश्चित्त त्यानें केलें तर मनुष्य निर्मळ किंबहुना वंद्यही होतो,** असा संसारांतील गोड व करुणायुक्त नियम मनांत आणून गौतमांनीं अहल्येचा प्रेमानें स्वीकार केला. नंतर दोघांनीं मोठ्या आनंदानें रामलक्ष्मण व विश्वामित्र या तिघांचें मधुपर्कानें पूजन केलें व त्या सर्वांस त्या दिवशीं आपल्या येथें ठेवून घेतलें. त्या दिवशीं तें उपवन आनंदानें उचंबळून गेलें, हें सांगणें नको. ( बाल० सर्ग० ४५–४९ ).

दुसरे दिवशीं विश्वामित्र रामलक्ष्मणांस घेऊन जनकाकडे जावयास निघाले. त्यांच्या येण्याची खबर जनक राजास अगोदर लागलीच होती. यज्ञमंडपाजवळ येतांच जनक राजा आपल्या पुरोहितासह व अमात्यासह विश्वामित्रांस सामोरा आला व मोठ्या गौरवानें भेटून त्यांस यज्ञमंडपांत घेऊन आला. त्यानें त्यांस उत्तम आसनांवर बसवून त्यांची यथाशास्त्र पूजा केली. नंतर राजा म्हणाला:—"विश्वामित्रा ! आपल्या येण्यानें मी पवित्र झालों आहें. माझा हा यज्ञ कृतार्थ झाला आहे. आपण काय हेतूनें आलां ? आणि हे दोघे तेजस्वी

वीर्यवान्, नुकतेच जावळ ठेवलेले राजपुत्र कोणाचे छावे आहेत व येथें कां आले आहेत? हें समजण्याची मला उत्कंठा झाली आहे. स्वर्गाहून देव अश्विनीकुमारच येथें आले आहेत कीं काय, असें वाटतें. यांचें रूप, यांचें सामर्थ्य व यांचें लहान वय पाहून मला मोह उत्पन्न झाला आहे. तेव्हां हे कोण व यांस येथें आपण कां घेऊन आलां? हें मला सविस्तर सांगा." तेव्हां विश्वामित्रांनीं हे दशरथाचे पुत्र राम व लक्ष्मण आहेत, असें सांगून आपल्या यज्ञाची, सुबाहूशीं व मारीचाशीं झालेल्या युद्धाची व अहल्येच्या उद्धाराची सर्व हकीकत जनकास सांगितली,तेव्हां त्यास मोठें आश्चर्य वाटलें. इतक्यांत विश्वामित्र म्हणाले:—"जनका! तुझी कन्या सीता सुरलोकींच्या देवकन्येप्रमाणें अप्रतिम सुस्वरूप असून तिच्या विवाहासंबंधानें जो कोणी शंकराचें धनुष्य उचलील त्याला ती देण्याचा तूं पण केला आहेस,असें मीं ऐकिलें आहे;तर हा तुझा अत्यंत कठिण पण रामच सिद्धीस नेईल,असें वाटतें. तें पाहाण्याकरितां व तुझा हा यज्ञही पहावा या हेतूनें मी येथें आलों आहें." हे विश्वामित्राचे शब्द ऐकताच जनकास जो आनंद झाला तो वर्णन करतां येत नाहीं. त्यानें आपल्या लोकांस तें धनुष्य ज्यांत ठेविलें होतें तो पेटारा तेथें घेऊन येण्यास तात्काळ आज्ञा केली.ती आज्ञा होतांच जनकाचे अमात्य धांवले व शहरांत जाऊन त्यांनीं पांचशें मोठ्या मजबूत हमालांकडून एक मोठा—आठ चाकांच्या गाडीवर ठेविलेला—पेटारा ओढीत आणविला. इतक्यांत जनक राजा विश्वामित्रांस मोठ्या दुःखानें व भीतीनें म्हणाला:—"हें महान् धनुष्य दक्षप्रजापतीच्या यज्ञाच्या वेळेस शंकरानें देवांचें शासन करण्याकरितां उचललें होतें; परंतु सर्व देवांनीं शंकराची प्रार्थना केली, तेव्हां शंकरानें तें खालीं ठेवून आमच्या पूर्वजांच्या स्वाधीन केलें. तें आमच्या घराण्यांत तेव्हांपासून आहे. विश्वामित्रमुने, मी यज्ञाचें क्षेत्र नांगरीत असतां एक अयोनिजा, सुस्वरूप मुलगी मला सांपडली.ती क्षेत्रांत सांपडली म्हणून तिचें नांव सीता असें मीं ठेविलें आहे. ही माझी प्राणाहूनही प्रिय कन्या जसजशी वाढूं लागली, तसतशी हें दिव्य कन्यारत्न कोणास द्यावें याजविषयीं मला चिंता उत्पन्न झाली.तेव्हां जो कोणी लोकोत्तर वीर्याचा पुरुष आमच्या येथील शिवधनुष्य उचलील त्याला मी आपली कन्या देईन, असा मीं पण मांडला. तेव्हां अनेक राजे तिला वरण्याकरितां आले;पण हें शिवधनुष्य त्यांना उचलतां न आल्यामुळें ते लज्जेनें खालीं

माना घालून निघून गेले. शेवटीं सर्वांनीं मिळून एकदां त्वेषानें मिथिलेला वेढा दिला, परंतु मी तपश्चर्येनें देवांपासून अस्त्रें मिळवून त्यांचा पराभव केला, तेव्हां त्यांनीं वेढा उठविला; अशी या धनुष्याची व माझ्या पणाची हकीगत आहे. हें धनुष्य उचलणारा कोण मिळेल तो मिळो! ह्या सुंदर व तरुण दशरथपुत्रानें हें धनुष्य उचललें, तर माझ्यासारखा भाग्यवान् या पृथ्वीवर कोणी नाहीं. विश्वामित्रा, तुम्ही मजवर अनंत उपकार करण्यास येथें आलां आहां, असें मला वाटतें." जनकराजा असें बोलत आहे तों ती पेटी यज्ञाच्या मंडपांत आणून अमात्यांनीं उघडली. तेव्हां विश्वामित्र ऋषि पेटीजवळ जाऊन धनुष्य पाहून रामचंद्रास म्हणाले:—"रामा!—धनुष्य तूं सहज उचलशील. तुला ही गोष्ट कठिण नाहीं. ये, धनुष्य उचल; आणि जनकाचा हा कठिण पण सिद्धीस ने." हे शब्द ऐकतांच सिंहगतीनें पेटीपाशीं येऊन रामचंद्रानें डाव्या हातानें सहज लीलेनें धनुष्य पेटीच्या बाहेर काढलें व उजव्या हातानें त्यास दोरी चढवून ती खेंचली. तों तें जुनेंपुराणें झालेलें धनुष्य काडकन् मोडलें! तेव्हां धरणीकंपानें एकादा पर्वत तुटतांना जसा भयंकर शब्द होतो, तसा त्या धनुष्य मोडण्याचा आवाज इतका भयंकर झाला कीं, जनक, विश्वामित्र व रामलक्ष्मण खेरीजकरून इतर सर्व लोक त्या आवाजानें मूर्च्छित झाले! कांहीं वेळानें सर्व लोक सावध झाल्यावर जनकानें विश्वामित्रांस हात जोडून प्रार्थना केली कीं, "विश्वामित्रा, तुमच्या प्रसादानें मी आज आपल्या दुर्धर पणांतून मोकळा झालों. रामचंद्रासारखा अलौकिक सामर्थ्याचा वीर पृथ्वीवर सांपडणार नाहीं. हें धनुष्य उचलून सज्ज करण्याचें ह्याचें हें कृत्य मीं आपल्या प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलें आहे. असा सुंदर, पराक्रमी व अलौकिक शक्तीचा पति मिळाल्यानें माझी कन्या सीता आमच्या कुलाला विख्यात करील यांत संशय नाहीं. तर आतां उशीर करूं नका; ही आनंदाची बातमी व अत्यंत आश्चर्य करण्यासारखें रामचंद्राचें कृत्य दशरथास लौकर कळवा आणि त्यास विवाहाच्या तयारीनें येथें येण्यास ताबडतोब विनंति करा. माझा हा यज्ञ बहुतेक संपला आहे, तरी आपण येथें राहून हा माझ्या आयुष्यांतील अत्यंत सुखाचा सोहळा आपल्या समक्ष पार पाडा." असें म्हणतांच विश्वामित्रांनीं तसें करण्यास तात्काळ परवानगी दिली व लागलेच कित्येक सांडणीस्वार ती आनंदाची बातमी घेऊन अयोध्येस रवाना झाले. (बाल०स०५०-६७).

ते स्वार आपल्या वाहनांच्या जीवांकडे न पाहतां अशा त्वरेनें निघाले कीं, ते दोन दिवसांतच अयोध्येस पोहोंचले व त्यांनीं दशरथ राजास विश्वामित्रांचा तो आनंदाचा निरोप कळविला. तो ऐकून सर्वांस फारच हर्ष झाला. वसिष्ठ गुरूंस, आपल्या स्त्रियांस व आप्तइष्टमित्रांस घेऊन दशरथही तावडतोब निघाला तो चार दिवसांनीं मिथिलेस पोहोंचला. जनकानें त्यांचें यथासांग सीमांतपूजन केलें व आनंदाच्या भरांत म्हटलें:—" हें काय माझें धन्य भाग्य! आज माझ्या घरीं श्रीमान् दशरथ राजा आपल्या मुलांसह माझ्या कन्येला पदरांत घेण्याकरितां आला आहे आणि परमपूज्य वसिष्ठ ऋषींचे पाय माझ्या नगरीस लागले आहेत. रघूंच्या वीर्यश्रेष्ठ कुलाशीं माझ्या कुलाचा संबंध होत आहे; या माझ्या भाग्याचें मी कोठवर वर्णन करूं! मीं सीतेविषयीं अत्यंत दुष्कर पण लाविला होता, तो रामानें आपल्या लोकोत्तर सामर्थ्यानें जिंकला आहे. रामाला मीं सीता दिलीच आहे व लक्ष्मणालाही आपली दुसरी कन्या उर्मिळा देतों.''हे जनकाचे शब्द ऐकून विश्वामित्र ऋषि वसिष्ठाशीं कानगोष्ट करून नंतर जनकास म्हणाले:—— " जनका, तुमच्या दोन्ही कुलांचा हा शरीरसंबंध अत्यंत प्रशंसनीय आहे. रघुकुलाची व जनककुलाची कुलीनपणांत, धार्मिकपणांत व बलिष्ठपणांत कोणीही बरोबरी करूं शकणार नाहीं. तेव्हां हा रामाचा सीतेशीं व लक्ष्मणाचा उर्मिळेशीं विवाह फारच अभिनंदनीय आहे. त्यांतल्यात्यांत आणखी एक गोष्ट मी सुचवितों, म्हणजे, हा दोन्ही कुलांचा संबंध अधिकच दृढ व यशस्वी होईल. तुझा धाकटा भाऊ जो कुशध्वज, याच्या दोन्ही कन्या लग्नास योग्य झाल्या आहेत, त्या आम्ही भरत व शत्रुघ्न यांकरितां पसंत करून मागतों; तेव्हां तुझें काय म्हणणें आहे? हे आमचे पुत्र भरत व शत्रुघ्न रामलक्ष्मणांसारखे सर्व गुणांनीं युक्त, बलवान्, तरुण व सुंदर आहेत. यांचा विवाह तुमच्या येथें झाल्यानें रघु-जनककुलांचा संबंध अधिकच दृढ होईल.'' हे शब्द ऐकून जनकाला आनंदाश्रु आले व हात जोडून त्यानें म्हटलें:——"माझ्याजवळ आपण दोघे महर्षि ही याचना करितां आहां; पण यांत माझेंच कल्याण करीत आहां.तेव्हां माझ्यासारखा धन्य या भूतलावर कोणी नाहीं. आपण सांगतां त्याप्रमाणें भरत-शत्रुघ्नांस मी आपल्या भावाच्या मुली देतों. चारही राजपुत्रांचे विवाह एकाच दिवशीं होऊं द्या. व हे चारी देवासमान गुणश्रेष्ठ बंधु चारी कन्यांचे पाणिग्रहण परवां उत्तरा-

फाल्गुनी नक्षत्रावर करितील. तो दिवस चांगला आहे, असें मला वाटतें." तेव्हां विश्वामित्र, वसिष्ठ व इतर ऋषींनीं माना डोलविल्या. याप्रमाणें ठरल्यानंतर दोन्ही पक्षांकडे लग्नाची तयारी दोन दिवसांत झाली. दशरथानें प्रथम श्राद्धादि कृत्यें करून घेऊन अनेक ब्राह्मणांस सहस्रावधि गाई दान दिल्या. नंतर सुमुहूर्तीं रामचंद्र व त्याचे तिघे बंधु असे चारी नवरदेव वऱ्हाडांसह जनकानें आपल्या येथें मोठ्या थाटानें लग्नमंडपांत आणिले. या वेळेचा उत्सव, आनंद व दोहों बाजूंच्या ऐश्वर्याची थोरवी काय वर्णन करावी! जनकाचा उपाध्याय गौतमपुत्र शतानंद व दशरथाचा उपाध्याय वसिष्ठ आणि दोन्ही पक्षांचे अभिमानी मध्यस्थ विश्वामित्र असे जेथें उभे तेथें सुखसंपत्तीस काय कमी आहे! नानाप्रकारचे अलंकार घातलेली व उत्तम वस्त्रानें सुशोभित झालेली अशी आपली प्रियकन्या सीता जनकानें आणून रामचंद्रापुढें उभी केली व म्हटलें:—"रामचंद्रा, तुला योग्य व अनुरूप अशी ही माझी कन्या सीता, ही तुझी सहधर्मचारिणी होत आहे. हिचें पाणिग्रहण कर." असें म्हणून जनकानें सीतेचा हात रामचंद्राच्या हातांत दिला. त्या वेळेस शतशः मंगलवाद्यें वाजूं लागलीं व सर्व ऋषींनीं व लोकांनीं दोघांवर अक्षता टाकिल्या. नंतर जनकानें उर्मिळेस लक्ष्मणाबरोबर उभी करून त्याजकडून तिचें पाणिग्रहण करविलें; नंतर मांडवीचें भरताकडून व श्रुतकीर्तीचें शत्रुघ्नाकडून त्यानें पाणिग्रहण करविलें. याप्रमाणें त्या चारी राजपुत्रांच्या लग्नाचा सोहळा पाहून वृद्ध दशरथ व त्याच्या राण्या यांना आनंदाश्रु आले व विश्वामित्र रामास घेऊन गेले ते आपल्या कुलाच्या कल्याणाकरितांच घेऊन गेले, असें दशरथास समजून येऊन विश्वामित्रांचा त्यानें फारच गौरव केला. (बाल० स० ६८–७३).

लग्नांचा सोहळा दोन्ही कुलांच्या वैभवानुरूप चार दिवस झाल्यानंतर विश्वामित्र ऋषि दोन्ही राजांचा निरोप घेऊन हिमाचलावर तपश्चर्या करण्याकरितां उत्तरेकडे निघून गेले. दशरथ राजाही आपल्या सुनांसह अयोध्येस परत जाण्याकरितां निघाला. जनकानें त्यांची बोळवण आपल्या ऐश्वर्याबाहेर केली. आपल्या जामातासह व मुलींस त्यानें शेंकडों दासदासी, अलंकार व वस्त्रें यांचें आंदण दिलें. आणि मोठ्या प्रेमानें व दुःखानें त्यांस निरोप दिला. दशरथ राजा कृतार्थ होऊन आपल्या सैन्यासह, आपल्या गुरुवर्यांसह व आपल्या कुटुंबासह सावकाश परत येऊं लागला. वाट चालतां चालतां

एके दिवशीं एकाएकीं अंधकार झाल्यासारखें झालें, नानाप्रकारचे अपशकुन होऊं लागले व दिशा धुंद झाल्या; तेव्हां हा काय प्रकार आहे म्हणून वसिष्ठ ऋषींना दशरथ राजा विचारूं लागला. इतक्यांत एक वावटळ सुटली, वृक्ष उलथून पडूं लागले, धरणी कांपूं लागली, सूर्यावर काळोखी आली व सर्व सैन्यावर भस्मासारखी धूळ पसरली. या अशा स्थितींत जामदग्न्याची उंच व भयंकर मूर्ति सर्वांच्या दृष्टीस पडली. डोक्यावर मोठा जटाभार वाढला आहे, नेत्र आरक्त झाले आहेत, एका खांद्यावर मोठा थोरला परशु ठेवला आहे व दुसऱ्या खांद्यावर एक प्रचंड भयंकर धनुष्य लटकावलें आहे, आणि हातांत बाण घेतला आहे; अशा प्रकारची कृतांतासारखी ती भयंकर मूर्ति आपणांकडे येत आहे असें पाहून वसिष्ठ ऋषींस वाटलें कीं, जामदग्न्य राम पूर्वी सर्व क्षत्रियांचा नाश करून तृप्त होऊन शस्त्र खालीं ठेवून तपश्चर्येस गेला होता, तो पुन्हां तर खवळला नाहीं ना ? पुनः क्षत्रियांच्या वधाचें सत्र सुरू करण्याचें तर त्याच्या मनांत आलें नाहीं ना ? असा ते विचार करीत आहेत, तों जामदग्न्य जवळ आला. तेव्हां त्यांनीं त्याचें स्वागत करून त्याची पूजा केली. ती ग्रहण करून जामदग्न्य राम दाशरथि रामाकडे वळून म्हणाला:—" दाशरथे रामा ! तुझा अत्यद्भुत पराक्रम मी ऐकतों. तूं शिवधनुष्य उचललेंस, इतकेंच नव्हे तर त्याचा भंगही केलास. तुझें हें अमानुष वीर्य ऐकून मी हें दुसरें धनुष्य घेऊन आलों आहें. हें धनुष्य घे आणि ही दोरी चढवून खेंचून हा बाण लाव पाहूं ? तुझ्या सामर्थ्याची मी परीक्षा पहाण्यास आलों आहे. आणि यांत जर तूं माझ्या कसोटीस उतरशील, तर तुझ्याशीं द्वंद्वयुद्ध करीन. कारण मला माझ्या बरोबरीचा वीर आजपर्यंत भेटलाच नाहीं. घे हें धनुष्य." हे त्याचे खडखडीत शब्द ऐकून दशरथ राजानें दीन वदन करून हात जोडून म्हटलें:—" रामा ! क्षत्रियांचा वध करून तूं पूर्वींच तृप्त झाला आहेस; आणि त्यांतूनही तूं ब्राह्मण शमप्रधान आहेस. माझ्या अर्भक मुलांस तुझें अभय असावें ही प्रार्थना आहे. तूं इंद्राशीं पूर्वी प्रतिज्ञा करून चुकला आहेस कीं, मी आतां शस्त्र उचलणार नाहीं. त्वां सर्व पृथ्वी जिंकून ब्राह्मणांस दान केली व तूं महेंद्र पर्वतावर तपश्चर्येस गेलास. असें असतां माझ्या दुर्दैवानें पुनः येथें कां आला आहेस ? तूं आपली प्रतिज्ञा रक्षण कर व माझ्या कुलाचा नाश करूं नकोस. हीं मुलें मला

प्राणाहूनही प्रिय आहेत, हीं मारूं नको. '' इत्यादि प्रकारानें दशरथानें त्याची विनवणी केली, परंतु तिजकडे दुर्लक्ष करून जामदग्न्य दाशरथी रामास म्हणाला:—" हीं दोन दिव्य धनुष्यें त्रैलोक्यांत प्रसिद्ध आहेत. तीं खास विश्वकर्म्यानें निर्माण केलीं आहेत. एक शिवधनुष्य, तें तर तूं मोडलेंस. दुसरें हें वैष्णव धनुष्य; हें त्याच्याचप्रमाणें वजनदार व मजबूत आहे. '' असें म्हणून तें धनुष्य त्यानें रामास दिलें. तें घेऊन दाशरथी राम म्हणाला:—जें कर्म तूं पूर्वी केलेंस म्हणून मी ऐकतों, तें केवळ पित्याच्या आदरासाठीं मी मान्य करीत आहें. तूं मला प्राकृत क्षत्रियासारखा बलहीन समजूं नकोस. माझा पराक्रम काय आहे हें मी तुला आतांच दाखवितों. '' असें म्हणून रामानें त्या धनुष्यास दोरी लावली व ती ओढून बाण चढविला व कोपाविष्ट होऊन रामचंद्र म्हणाले:—" तूं ब्राह्मणच म्हणून पूज्य आहेस; तुझ्यावर हा प्राणहरण करणारा बाण मी सोडीत नाहीं; परंतु हा वैष्णव बाण फुकट जावयाचा नाहीं. तूं आपल्या तपश्चर्येनें आजपर्यंत जे लोक मिळविले आहेस त्यांवर मी हा बाण सोडतों व तुझें सर्व पुण्य भस्म करून टाकतों. '' असें म्हणून रामानें तो बाण आकाशांत सोडला; तेव्हां जामदग्न्य राम निर्वीर्य व निस्तेज होऊन जागच्या जागीं बधिर व निश्चेष्ट झाला. शेवटीं हळूहळू तो दाशरथी रामास म्हणाला:— " तुझ्या ह्या धनुष्य चढवून बाण चालविण्याच्या पराक्रमावरूनच मीं तुला ओळखिलें. तूं सर्व देवांतील श्रेष्ठ, मधुदैत्याचा नाश करणारा प्रत्यक्ष श्रीविष्णु आहेस. तुझा जयजयकार असो ! तूं माझा असा पराभव केलास याबद्दल तूं वाईट वाटूं देऊं नकोस. मी महेंद्रपर्वतावर पुनः तपश्चर्या करण्यास जातों. '' असें म्हणून जामदग्न्य राम तेथून निघून गेला. तेव्हां दशरथाचे व सर्वांचे प्राण खालीं पडले. जिकडे तिकडे प्रसन्न व शांत दिसूं लागलें; दिशा रमणीय दिसूं लागल्या व धूळ नाहींशी होऊन आकाश स्वच्छ झालें ! ( बाल० स० ७४–७६ ).

दशरथ राजाला अत्यंत आनंद होऊन तो आपल्या परिवारासह पुढें चालूं लागला. हळूहळू दशरथ अयोध्येस पोहोंचला. अयोध्येंतील सर्व नागरिकांनीं तें शहर सुशोभित करून शृंगारलें होतें. रस्त्यावर सुवासिक पाणी टाकून ठिकठिकाणीं फुलांचे उपहार ठेविले होते. गुढ्या–तोरणें उभारलीं होतीं. नगरचे सर्व लोक उत्तम पोषाख करून दशरथ राजा आपल्या मुलां-

सुनांसह आला तेव्हां त्याचें स्वागत करण्यास सामोरे आले होते. सर्वांचे नमस्कार घेऊन त्या वधूवरांना मिरवीत मिरवीत दशरथाची स्वारी राजवाड्यांत पोहोंचली. अप्सरांच्या नृत्यानें व बंदिजनांच्या स्तुतिपाठ गाण्यानें राजवाडा दुमदुमून गेला होता. दशरथानें सर्वांचा सत्कार केल्यावर वसिष्ठ ऋषींनीं वधूवरांस पावन केलें. नंतर त्या चारी सुनांनीं ज्यांस नमस्कार करावयाचे त्या सर्वांस नमस्कार करून अंतःपुरांत प्रवेश केला. त्या दिवशीं सर्व नगरभर अत्यंत आनंदाचा उत्सव झाला हें निराळें सांगणें नको.

याप्रमाणें त्या चारी राजपुत्रांचे अनुरूप स्त्रियांशीं विवाह होऊन तीं वधूवरें आनंदानें व सुखानें नांदूं लागलीं. रामचंद्राची प्रीति सीतेवर दिवसेंदिवस वाढत चालली. ह्यास ती अलौकिक रूपसंपन्न होती हें तर कारण खरेंच, पण त्याहून तिची गुणसंपदा अधिक होती. तिनें आपल्या गुणानें, पतिप्रेमानें व निष्काम भक्तीनें रामचंद्रास इतकें वश करून घेतलें कीं, रामास सीता प्राणाहूनही प्रिय झाली. पण त्यामुळें रामचंद्रानें आपल्या मातापितरांची व प्रजाजनांची शुश्रूषा करण्यास यत्किंचित्‌ही कमतरता केली नाहीं. त्यानें आपल्या सौजन्यानें, शहाणपणानें, शौर्यानें व प्रेमानें सर्वांस आपल्यावर प्रीति करण्यास लाविलें. याप्रमाणें विवाह झाल्यानंतर कित्येक वर्षें तीं वधूवरें, तीं मातापितरें, ते पुत्र, तो राजा व ती प्रजा हीं अयोध्येंत राहून निरतिशय सुखाचा अनुभव घेत होतीं. ( बाल० स० ७७ ).



# अयोध्याकांड

या संसारांत कोणतीही गोष्ट चिरस्थायी नाहीं. विशेषतः आनंदाचे व सुखाचे दिवस सर्वदा सारखेच कायम राहतात, असें तर कधींच घडत नाहीं. चक्रनेमिक्रमाप्रमाणें संसारांत सुख व दुःख हीं मनुष्यांस एकमेकांमागून येतात. मग तो राजा किंवा रंक असो; विद्वान् असो किंवा मूर्ख असो; श्रीमान् असो किंवा दरिद्री असो. पण एक गोष्ट विसरतां कामा नये; संकटांचा किंवा दुःखांचा एक मोठा उपयोग आहे. कारण, खऱ्या सद्गुणाची व धैर्याची परीक्षा त्याच काळीं होते. काळ बदलला तरी मनुष्यानें आपला धर्म व नीति सोडतां कामा नये. आपलें कर्तव्य जसें सुखास्थितींत, तसेंच दुःखस्थितींतही बजावण्यास मनुष्यानें तयार असलें पाहिजे. दुःखानें घाबरून जाऊन कुमार्गाकडे मनुष्याचें मन कित्येक वेळां धांवतें; परंतु त्या मनास आवरून सन्मार्गांतच स्थिर केलें पाहिजे. दुष्टपणा, कुविचार, अनीति, इत्यादि गोष्टी चांगल्या मनुष्यांसही दुःस्थितींत असतां सुचतात. वाईट लोकांस तर अनीतीचे मार्ग सदोदितच आवडतात. त्यांचेजवळ कितीही पैसा असला, त्यांची स्थिति कितीही चांगली असली, तरी त्यांस कुकल्पनाच पसंत पडावयाच्या. असो; संकट आलें असतां खोटें बोलणें किंवा परद्रव्यापहार करणें किंवा दुसरें एखादें पातक करणें हा संकटांतून पार पडण्याचा मार्ग सर्वांस सुलभसा वाटतो; परंतु अशा वेळेसच सत्पुरुषांची खरी परीक्षा होते. महानुभावी पुरुष अशा वेळींही सन्मार्गापासून लवमात्र ढळत नाहींत. हेंच दाखविण्याकरितां रामचंद्रावर पुढील प्रसंग आला, असें म्हटलें तरी चालेल.

असो; रामाचा विवाह होऊन बारा वर्षें लोटल्यावर एके दिवशीं दशरथ राजाच्या मनांत असें आलें कीं, आपण आतां वृद्ध झालों आहों; तेव्हां रामचंद्रास युवराज नेमून त्याच्या अंगावर राज्याचा सर्व

भार टाकावा; रामचंद्रही आतां वयानें, अनुभवानें,शक्तीनें व शिक्षणानें हा भार सहन करण्यास योग्य झाला आहे, असा विचार करून दशरथ राजानें आपल्या राज्यांतील विद्वान् ब्राह्मण, मांडलिक क्षत्रिय व सामान्य लोक, अनेक शहरांतून व प्रांतांतून बोलावून आणले. सर्व सभा जमल्यावर दशरथ राजानें आपल्या गंभीर व आनंद देणाऱ्या वाणीनें बोलण्यास आरंभ केला. तो म्हणालाः—" सभ्यहो,आपल्या सर्वांचें आजपर्यंत मीं सदैव रक्षण केलें आहे.आपलें हित साधण्याकरितां या शुभ्र छत्राचे छायेखालीं मेहनत करतां करतां मी फार वृद्ध झालों आहें. तेव्हां आतां या जीर्ण झालेल्या शरीरास विश्रांति द्यावी, असें मला वाटतें. कारण,इंद्रियें दुर्बल झाल्यावर प्रजेच्या रक्षणाचें जूं मानेवर वाहणें फार कठिण आहे. आपल्या सर्वांचें जर अनुमोदन असलें तर माझा वडील मुलगा रामचंद्र यास युवराज नेमून त्याजवर आतां हा भार सोंपवावा, असें माझ्या मनांत आलें आहे. हा माझा पुत्र सद्गुणी, वीर्यवान् व इंद्रासारखा पराक्रमी असून युवराज होण्यास अगदीं योग्य आहे. तो तुमचा राजा झाला असतां,मला वाटतें,माझ्यापेक्षांही तुम्हां सर्वांस अधिक सुख होईल.असो; माझ्या मनांतून उदईकच त्यास युवराज नेमावें असें आहे, तरी आपली सर्वांची काय इच्छा आहे ? रामचंद्राचे गुण पुत्रस्नेहानें मला अधिक तर वटत नाहींत ना ? मीं काय करावें याजाविषयीं मला आपण सर्वजण सल्ला द्या. " हें दशरथाचें आनंद देणारें भाषण ऐकतांच सर्व लोकांनीं अत्यंत उत्साहानें राजाचें अभिनंदन केलें. मेघवृष्टि झाली म्हणजे ज्याप्रमाणें मोरांचे आनंदयुक्त टाहो चारी बाजूंनीं उठतात, त्याप्रमाणें सर्व सभाजनांच्या तोंडून "योग्य योग्य" असा स्निग्ध व गंभीर ध्वनि निघाला व त्यामुळें सभागृह हालूं लागलें. थोडीशी शांतता झाल्यावर पुढारी ब्राह्मण सर्व शहरांतील व प्रांतांतील लोकांच्या संमतीनें म्हणूं लागलेः—" राजा ! तुझ्या ज्येष्ठ व श्रेष्ठ मुलाच्या सद्गुणांचें आम्हीं कोठवर वर्णन करावें ! थोडक्यांत सांगणें तर आजपर्यंत इक्ष्वाकुवंशांत रामचन्द्रासारखा पराक्रमी व थोर राजपुत्र झालाच नाहीं. सुशील, सत्य बोलणारा,शांत, असूयेनें रहित, जितेंद्रिय, कृतज्ञ असा हा तुझा ज्येष्ठ पुत्र वृद्ध व विद्वान् ब्राह्मणांची आपल्या वैभवाप्रमाणें पूजा करितो. त्यामुळें याची कीर्ति सर्व राज्यांत पसरली आहे. याचें सामर्थ्य व याचा पराक्रम इंद्राप्रमाणें आहे.हा सर्व शस्त्रास्त्रांचा जाणता आहे. वेदविद्या शिकून गृहस्थधर्माचें तो यथाशक्ति पालन करीत आहे.अयोध्येंतील व

बाहेरगांवच्या लोकांना नेहमीं आपल्या कुटुंबाच्या माणसांप्रमाणें कुशल प्रश्न विचारून तो त्यांच्या मुलांबाळांची, शिष्यांची व नोकरांची नेहमीं काळजी वाहतो. सारांश, रामचंद्र त्रैलोक्याचें राज्य करण्यास समर्थ व योग्य आहे, मग पृथ्वीच्या राज्याची कथा काय! आम्हांस तुझ्या ह्या श्रेष्ठ व ज्येष्ठ पुत्रास यौवराज्याचा अभिषेक झालेला पाहाण्याची उत्कंठा झाली आहे, ती तूं लवकर तृप्त कर." असें म्हणून सर्व लोकांनीं राजाला हात जोडले. त्यांची या प्रकारची उत्कंठा व संमति पाहून दशरथास अत्यंत आनंद झाला, व तो म्हणालाः—"माझ्या प्रिय ज्येष्ठ पुत्राला तुम्ही युवराज झालेला पाहूं इच्छितां, तेव्हां मी खरोखर धन्य आहे. हा चैत्र महिना सुरू झाला आहे, जिकडे तिकडे वनें व उद्यानें पुष्पांनीं भरलेलीं आहेत. याच रमणीय महिन्यांत पुष्य नक्षत्रावर उदईक रामाला यौवराज्याचा अभिषेक करण्याचें मीं योजलें आहे." असें म्हणून वसिष्ठ महामुनींना दशरथानें म्हटलें:—"गुरुवर्य, रामाच्या अभिषेकाच्या सामुग्रीविषयीं आतांच आपण आज्ञा द्या म्हणजे त्याप्रमाणें सर्व तयारी होईल." तेव्हां वसिष्ठांनीं पांढरीं फुलें, लाह्या, मध, तूप, शुभ्र नवीन वस्त्रें, सर्वायुधांनीं भरलेला रथ, चतुरंग सेना, उत्तम लक्षणांचा हत्ती, शुभ्र छत्र, चामर, व्यजन व ध्वज, सोन्याचे अग्नीप्रमाणें चकाकणारे शंभर कलश, सोन्यानें मढविलेलें गव्याचें शिंग, समग्र—कोठेंही छिद्र न पडलेलें—वाघाचें चर्म व हवनसामुग्री इतक्या वस्तु उदईक सकाळीं दशरथाच्या अग्निशाळेंत सिद्ध ठेवण्याविषयीं सचिवांना आज्ञा केली. त्याचप्रमाणें नगरचें व अंतःपुराचे दरवाजे चंदनयुक्त माळांनीं शोभिवंत करून, सुगंधित धूपांनीं धूपित करून, जिकडे तिकडे गुढ्यातोरणें उभारून व रस्ते शिंपून एकंदर शहर शृंगारण्याविषयींही त्यांनीं सांगितलें. नंतर रामचंद्रास सभेंत बोलावून आणण्याविषयीं सुमंतास दशरथ राजानें आज्ञा केली. तेव्हां त्यानें रामाच्या वाड्यांत जाऊन त्याला राजाज्ञा कळविली व त्यास रथांत बसवून तो तावडतोब तेथें घेऊन आला. रामचंद्र सभेंत शिरतांच त्याचें सिंहासारखें चालणें, त्याचें चंद्रासारखें अत्यंत मोहक वदन आणि त्याची शांत व सुशील वृत्ति पाहून प्रजाजनांचें हृदय भरून आलें. त्याच्या वृद्ध पित्यास तर त्याच्याकडे पाहून तृप्तीच होईना. रामचंद्रानें सिंहासनाजवळ जाऊन 'मी रामचंद्र नमस्कार करतों' असें म्हणून आपल्या पित्यास लवून नमस्कार केला. हात जोडून आपल्याजवळ रामचंद्र विनयानें उभा आहे,

असें पाहून दशरथानें त्यास पोटाशीं धरून आलिंगन दिले, आणि मोठ्या प्रेमानें म्हटलें:–बेटा रामचंद्रा ! तूं माझ्या ज्येष्ठ पत्नीच्या पोटीं झालेला माझा ज्येष्ठ व अत्यंत प्रियकर पुत्र आहेस आणि वयानें, गुणांनीं व विद्येनें तूं आतां राज्य करण्यास योग्य झाला आहेस. तुला युवराज नेमून तुझ्यावर सर्व राज्याचा भार टाकण्याचा मीं आज विचार केला आहे व या गोष्टीला सर्व प्रजाजनांचें अनुमोदन आहे. याकरिता उदईक तुला यौवराज्याचा अभिषेक करण्याचें वसिष्ठ महर्षींच्या संमतीनें मीं ठरविलें आहे. तूं स्वतः सुज्ञ, सुशील, व सुशिक्षित आहेस. तेव्हां तुला या प्रसंगीं दोन शब्द सांगण्याची जरूरी नाहीं. तथापि पुत्रप्रेमानें मी तुला दोन शब्द सांगतों. माझ्यानें अनुभवसिद्ध उपदेश तुला केल्यावांचून राहवत नाहीं. राज्य करणारानें अत्यन्त विनयशील वृत्तीनें राहिलें पाहिजे. त्यानें आपलीं इंद्रियें आपल्या ताब्यांत ठेवलीं पाहिजेत. त्यानें कामक्रोधास पायाखालीं दाबून टाकिलें पाहिजे. कामक्रोधापासून उत्पन्न होणारीं संकटें फार भयंकर असतात. तरी प्रत्यक्ष व परोक्ष रीतीनें सर्व प्रजाजनांचीं सुखदुःखें समजून घेऊन त्यांना पोटच्या पोराप्रमाणें वागवीत जा. आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्यांना नेहमीं संतुष्ट व अनुरक्त ठेव; म्हणजे तुला व तुझ्या मित्रांना, देवांना अमृतप्राप्तीपासून जसा आनंद झाला तसा आनंद होईल; यापेक्षां तुला जास्त सांगणें नको. तरी आतां जा आणि उद्यांपर्यंत सीतेसह उपवासी व व्रती रहा. ’’ अशी आज्ञा होतांच दूतांनीं ती आनंदाची वार्ता कौसल्या राणीला सांगितली; तेव्हां तिला परमावधीचा आनंद झाला ! तिनें ही सुखवार्ता सांगणाऱ्या दूतांस कडींतोडे बक्षीस दिले ! रामचंद्र पित्याची आज्ञा होतांच पित्यास नम्रतेनें नमस्कार करून कौसल्या मातेस भेटण्यास गेला. तेथें सुमित्रा, लक्ष्मण व सीता तीं बातमी ऐकून पूर्वीच आलीं होतीं. त्या सर्वांचा आनंद गगनांत मावेनासा झाला होता. मातांची भेट घेऊन व त्यांचा आशीर्वाद घेऊन रामचंद्र आपल्या वाड्यात आला. इकडे सभेंतील सर्व प्रजाजनही दशरथ राजाची आज्ञा झाल्यावर आपआपल्या घरीं आनंदानें गेले व घरोघरीं उत्सवाची तयारी होऊन अयोध्येंत चोहोंकडे गडबड सुरू झाली. ( अयो० स० १–६ ).

सायंकाळच्या सुमारास कैकेयी राणीची माहेराहून बरोबर आलेली दासी मंथरा महालाच्या गच्चीवर साहजिक गेली, तों तिला अयोध्या नगरीची कांहीं

अपूर्व शोभा दिसूं लागली. राजरस्त्यावर सुगंधी पाण्याचे सडे घातले आहेत; जिकडेतिकडे लोक गुढ्यातोरणें उभारीत आहेत; ठिकाठिकाणीं कमळें वगैरे फुलांचे उपहार ठेवले जात आहेत; शहराचे दरवाजे शृंगारले जात आहेत; कोणी देवळांचे दरवाजे सफेतीनें रंगवीत आहेत; घरोघरीं नगारेचौघडे वगैरे मंगलवाद्यें वाजवत आहेत. सर्व लोक शिरःस्नात होऊन उत्तम उत्तम वस्त्रें परिधान करून बाहेर पडत आहेत. याप्रमाणें अयोध्यानगरींत सर्व ठिकाणीं आनंद व उत्सव चालू झाला आहे. इकडे राजवाड्यांतही कौसल्येच्या महालांत ध्वज, पताका लागल्या आहेत; मंगलवाद्यें वाजत आहेत; शेंकडों ब्राह्मण दानें घेऊन बाहेर पडत आहेत, अशी आनंदाची धांदल चालली आहे; हें पाहून त्या कुब्जा मंथरा दासीनें जवळ कैकेयीची म्हातारी दाई उभी होती तिला विचारलें, "अग दाई, ही आनंदाची गडबड कशाबद्दल आहे? रामाची आई कौसल्या ब्राह्मणांना दानें कां देत आहे ! आणि शहरांतही सर्व ठिकाणीं उत्सव कां होऊन राहिला आहे?" तेव्हां ती दाई म्हणाली:— " मंथरे, तुला माहीत नाहीं काय ? उद्यां दशरथ राजा आपल्या रामाला यौवराज्याचा अभिषेक करणार आहे. ही आनंदाची बातमी चोहोंकडे पसरली असून तुला कशी कळली नाहीं?" हे त्या निष्कपट म्हातारीचे शब्द त्या दुष्ट कुब्जेस कोठून रुचणार ! तिनें कपाळाला आठ्या घालून म्हटलें:—" ही काय आनंदाची बातमी ? हें एक मोठें भयच उत्पन्न झालें आहे. मला याचा बंदोबस्त झाला तर आतांच केला पाहिजे. " असें म्हणून मंथरा गच्चीवरून खालीं उतरली व आपली यजमानीण कैकेयी पलंगावर पडली होती तिच्याजवळ जाऊन म्हणाली:—"मूर्खे कैकेयी, ऊठ. तूं अशी आनंदांत स्वस्थ काय बसली आहेस ? तुझ्यावर मोठें भयंकर संकट ओढवत आहे, तें तुला कळलें नाहीं का ? तुला आपल्या सौभाग्याचा व ऐश्वर्याचा मोठा गर्व आहे; पण तुझें हें भाग्य उन्हाळ्यांतील ओढ्याप्रमाणेंच लवकरच सुकून जाणार आहे. हे देवी, तुझ्या निरंतर दुःखाचा पाया दशरथ राजा उद्यां घालणार आहे व रामचंद्राला उदईक यौवराज्याचा अभिषेक करणार आहे. जास्त काय सांगूं ! माझ्या अंगाला पायापासून डोक्यापर्यंत आग लागली आहे. आणि तुझ्या हिताकरितां—तुझे डोळे उघडावे म्हणून—मी तुजजवळ धांवत आलें आहे. " हें भाषण ऐकून कैकेयी आनंदानें बिछान्यावर उठून बसली. आणि म्हणाली:—" यांत दुःख करण्याचें कारण तें काय ?

जसा माझा भरत तसाच राम मला आवडतो. जशी भरत माझी सेवा करितो तशीच रामही करितो. भरताप्रमाणें किंबहुना त्याहूनही अधिक मी रामास मानत्यें. त्याला महाराज युवराज करणार आहेत तर मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. " हें ऐकून मंथरा कैकेयीस म्हणते:—"वेडे कैकेयी, तूं अगदीं भोळी आहेस ग भोळी! अश्वपतीच्या राजकुलांत तुझा जन्म होऊन तुला राजकारण कसें अतिगूढ असतें हें समजत नाहीं. ' लाडके, ' 'प्रिये,' इत्यादि गोड शब्द मात्र तुझ्या वांट्याला आणि अर्थाची बाब तेवढी कौसल्येच्या वांट्याला ! तुझ्या भरताला मामाच्या घरीं पाठवून देऊन दशरथ राजानें हा राज्याभिषेकाचा बेत एकाएकीं केला आहे, यांतलें कपट तुझ्या लक्षांत आलें नाहीं काय ! हा दशरथ राजा पतिरूपानें तुला शत्रूच उत्पन्न झाला आहे, तर सावध हो आणि आपलें आणि आपल्या पुत्राचें भावी संकटापासून रक्षण कर." कैकेयीचा आनंद हें भाषण ऐकून कांहींही कमी झाला नाहीं असें पाहून मंथरा पुनः म्हणाली:—"कैकेयी, तूं शोकसागरांत पडली असतां तुला हर्षच होत आहे, ह्याचें मला आश्चर्य वाटतें. उदईक कौसल्येच्या मुलास पुष्य नक्षत्रावर ब्राह्मण अभिषेक करतील तेव्हां कौसल्या खरोखर धन्य होईल. कारण मग सर्व पृथ्वीच्या अधिपतीच्या आईपुढें तूं हात जोडून उद्यां दासीसारखी उभी राहशील आणि तुझ्याबरोबर आम्हांलाही हात जोडावे लागतील. तुझा मुलगाही रामापुढें दासाप्रमाणें हात जोडील. यापुढें भरतवंश राज्यापासून कायमचा नष्ट झाला असें समज व रामाचाच वंश राज्य करील.रामाचा तरी काय भरंवसा आहे ? हल्लीं तो तुझ्यापुढें गोड गोड बोलतो, पण तोच उद्यां युवराज झाल्यावर भरताला राज्यांतून हांकून देशांतराला पाठवील. कदाचित् लोकांतरालाही पोहोचवील ! कैकेयी, तूं अशी आंधळी होऊं नकोस, तर रामाला यौवराज्याभिषेक न होईल, असा कांहीं उपाय कर आणि त्याला १४ वर्षे वनवासाला पाठीव; हेंच मला अधिक बरें वाटतें. विचार कर ! तूं आपल्या रूपाच्या व ऐश्वर्याच्या भरांत आणि पतीच्या लाडकेपणाच्या गर्वांत ज्या कौसल्येचा अनेक वेळां पाणउतारा केला आहेस,ती तुझी सवत रामाला यौवराज्य मिळाल्यावर तुझा सूड घेणार नाहीं काय ? " हे शब्द ऐकतांच कैकेयीची मनोवृत्ति पालटली. तिच्या ठिकाणीं सवतीमत्सराचा अग्नि पेटला व क्रोधानें तोंड लाल करून ती म्हणाली:—"माझ्या मुलाला मामाच्या घरीं पाठवून कौसल्येच्या मुलास

महाराज युवराज करणार काय ? पाहत्यें कसें करतात तें. रामाला वनाला घाडून भरताला राज्य देववीन, तरच मी खरी कैकेयी ! पण मंथरे, याला युक्ति काय करावी बरें ? छे ! मी कौसल्येपुढें कधींही हात जोडणार नाहीं." मंथरेनें थोडासा विचार करून म्हटलें:—कैकेयी, याची युक्ति माझ्या लक्षांत आली आहे. तुला आठवण नाहीं का, कीं दशरथ राजानें तुला दोन वर दिले आहेत ! फार पूर्वी जेव्हां दैत्यराक्षसांशीं देवांचें युद्ध झालें आणि दक्षिणेंत शंबरासुराच्या वैजयंत नगरावर देवांना सहाय्य करण्याकरितां दशरथ राजानें स्वारी केली, त्या वेळेस दंडकारण्यांत भयंकर युद्ध झालें. राक्षस रात्रींसुद्धां निजलेल्या वीरांना मारून खाऊं लागले. त्या घोर युद्धांत दशरथाबरोबर तूं होतीस आणि त्याचें सारथ्य करीत होतीस. युद्धांत दशरथ राजा जखमी होऊन पडला, त्या वेळेस त्याला युक्तीनें युद्धांतून काढून त्याचे प्राण तूं रक्षण केलेस. तेव्हां त्यानें तुला दोन वर दिले ते तूं तेव्हां तसेच राहूं दिले आहेस. आतां ते वर मागण्याची वेळ आली आहे. एका वरानें रामाला १४ वर्षे दक्षिणेंत वनवासाला धाड आणि दुसऱ्यानें भरताला यौवराज्य माग. एवढ्या पुष्कळ अवधीनें राम दक्षिणेंतून राक्षसांच्या तडाक्यांतून वांचून कसचा परत येतो ? आणि आलाच तरी भरत राज्यावर स्थिर झाल्यावर तो त्याला काय दाद देणार आहे ! तर ऊठ लवकर, महाराज येण्याची वेळ झाली आहे. ते येण्यापूर्वीच क्रोधागारांत जा. आपले केस मोकळे सोडून मळकें वस्त्र नेसून जमिनीवर लोळ. दशरथाची तुझ्यावर फार प्रीति आहे, आणि त्यानें वर दिले आहेत, ते तर तुला त्यास दिलेच पाहिजेत. पण सांभाळ; महाराजांच्या गोड भाषणाला भुलूं नकोस. नानाप्रकारचीं रत्नें, अलंकार किंबहुना राज्यही तुला देऊं करतील, पण तूं आपलें म्हणणें सोडूं नकोस. लक्षांत ठेव." याप्रमाणें त्या दुष्ट दासीचा उपदेश मान्य करून ती सौंदर्यमदानें मत्त झालेली व सवतीमत्सरानें ग्रस्त झालेली कृत्या कैकेयी क्रोधागारांत गेली. तिनें गळ्यांतला मुक्ताहार फेंकून दिला. सर्व अलंकार काढून अस्ताव्यस्त जमिनीवर टाकले, उत्तम वस्त्र सोडून मळकें वस्त्र नेसून 'हाय देवा !' 'अभागी मी !' इत्यादि दुःखोद्गार काढीत ती जमिनीवर लोळूं लागली. ( अयो० स० ७–९ ).

नित्याप्रमाणें दशरथ राजा संध्याकाळच्या वेळीं अंतःपुरांत प्रवेश करून कैकेयीच्या महालाकडे चालला. त्याच्या मनांत मोठे आनंदाचे विचार घोळत

होते. रामाला उद्यां आपण यौवराज्याभिषेक करविणार आहों, ही प्रिय वार्ता आपण कैकेयीस सांगू व ती ऐकून कैकेयीला मोठा आनंद होईल, असें त्याला वाटत होतें. अरिष्टसूचक ग्रह आपल्या जन्मनक्षत्रीं असल्यामुळें आपल्यास शरीरारिष्ट आहे, असें ज्योतिष्यांकडून कळल्यामुळें दशरथानें रामास युवराज नेमण्याचा बेत एकाएकीं केला होता. त्यामुळें भरत आजोळीं गेला असतां त्यालाही आणविण्याची फुरसत त्यास झाली नव्हती व म्हणूनच कैकेयीला आपला बेत त्यानें प्रथम कळविला नव्हता; परंतु या गोष्टीमुळें पुढें भयंकर अनर्थ उद्भवेल हें त्याच्या स्वप्नींही नव्हतें. कारण रामचंद्र सर्वांस सारखा प्रिय होता व कैकेयीचीही त्याजवर निष्कपट भक्ति होती. असो; आपण कैकेयीस ही आनंदाची बातमी एकाएकीं सांगूं असा विचार करीत अंतःपुराच्या बागेंतून दशरथ राजा चालला होता. मोर, पोपट, करकोचे, हंस, इत्यादि पक्ष्यांचे मधुर आवाज ऐकत, पालवींनें भरलेल्या लतागृहांची शोभा पहात, चंपक, अशोक, बकुल इत्यादि सुंदर वृक्षांच्या छायेंतून, निरनिराळ्या प्रकारच्या दगडांनीं बांधलेल्या व हस्तिदंत, रुपें, सोनें यांनीं चित्रविचित्र केलेल्या पायरस्त्यावरून, कारंजीं, पुष्करणी, वापी, लहान सरोवरें इत्यादिकांच्या सुगंधी पाण्याचा थंडावा घेत घेत, दशरथाची स्वारी कैकेयीच्या महालांत पोहोंचली. तों नित्याप्रमाणें त्याचें अभिनंदन करण्यास कैकेयी पुढें आली नाहीं. कैकेयीनें ही वेळ पूर्वी कधींही टाळली नव्हती. यामुळें व शय्येवरही ती नाहीं असें पाहून राजास आश्चर्य वाटलें. इतक्यांत प्रतिहारीनें हात जोडून विनंति केली कीं 'आज राणीसाहेब रागावून क्रोधागारांत गेल्या आहेत.' राजास ते शब्द ऐकून फारच आश्चर्य वाटलें व क्रोधागाराकडे मोठ्या दुःखानें त्यानें पाऊल टाकिलें. तों तेथें कैकेयी जमिनीवर उसासे टाकीत लोळत आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्या वृद्ध राजास आपली प्रियकर स्त्री अशी शोक करीत असलेली पाहून फार वाईट वाटलें व त्यानें तिच्या तोंडावर हात फिरवून विचारिलें:—कैकेयी, तुला राग कां आला आहे? माझा अपराध तर मला यत्किंचितही दिसत नाहीं. तुझा कोणी अपमान केला काय? तुला कोणी कांहीं बोललें काय? माझें हें समृद्ध राज्य सर्व रीतीनें तुझ्या सेवेला सादर असतांना तुला कोणीं दुःख दिलें? तुला काय पाहिजे आहे, तें मला सांग." हें ऐकून कैकेयी म्हणाली:—"मला कोणीं दुःख दिलें नाहीं किंवा माझा कोणीं अपमान केला नाहीं

परंतु मला जें पाहिजे आहे तें तुम्ही मला द्याल असें वचन द्या; म्हणजे मी माझी इच्छा सांगेन." दशरथास विचार थोडाच पडणार! त्याच्या पोटांत कोणत्याही प्रकारचें पाप नव्हतें म्हणून वाईटाची कल्पनाही त्याला सुचली नाहीं. तो म्हणालाः--" उन्मत्त कैकेयी, रामाशिवाय दुसरा कोणीही मला तुझ्याहून अधिक प्रिय नाहीं, त्या रामाची शपथ घेऊन मी सांगतों कीं, तूं जें मागशील तें मी तुला देईन. तुझ्या मनांत जें असेल तें सांग. माझ्याविषयीं व्यर्थ शंका घेऊं नकोस." कैकेयीस हे शब्द ऐकून आनंद झाला व तिनें आपलें भयंकर मागणें मागण्यास आरंभ केला. ती म्हणालीः– " महाराज, ज्याअर्थी रामाची शपथ घेऊन मला तुम्ही ' देतों ' म्हणतां, त्याअर्थी ऐका. चंद्र, सूर्य, दिवस–रात्र, भूलोक, भुवर्लोक, या सर्वांस साक्षी ठेवून मी सांगतें, सत्यप्रतिज्ञ, धर्मिष्ठ, धर्मज्ञ, दशरथ राजानें माझें मागणें देण्याचें कबूल केलें आहे. तरी मी असें मागतें कीं, रामचंद्राच्या अभिषेकाची जी सामुग्री तयार केली आहे त्याच सामुग्रीनें माझ्या भरताला यौवराज्याचा अभिषेक करावा, आणि रामानें वल्कलें नेसून १४ वर्षें दंडकारण्यांत वनवास भोगावा; म्हणजे माझ्या भरताला निष्कंटक राज्य मिळेल, हीच माझी इच्छा व प्रार्थना आहे. मला तुम्ही पूर्वी दोन वर दिले आहेत त्यांवरूनच मी हें मागणें मागतें आहे, नवीन मागत नाहीं. तर उठा; रामाला आजच वनवासाला धाडा, म्हणजे माझा राग शांत होईल." हे भयंकर शब्द तिच्या मुखांतून निघाले, ते दशरथाच्या कानांवर वीज कोसळावी तसे कोसळले! एक मुहूर्त राजा चिंताग्रस्त होऊन बसला व त्याच्या हृदयांत शोकाचा वणवा पेटला. शेवटीं कांहीं वेळानें रागाच्या आवेशांत दांत ओठ खाऊन जसा एकाद्या सर्पाला लांकडाचा प्रहार बसला असतां तो जोरानें फूत्कार करितो त्याप्रमाणें दीर्घ उच्छ्वास टाकून दशरथानें तिचा ' धिक् धिक् ' या शब्दानें धिक्कार केला, आणि दुःखशोकाच्या वेगानें मूर्च्छा येऊन दशरथ राजा खालीं पडला. कांहीं वेळानें शुद्धीवर येऊन तो म्हणालाः—" दुष्टे पापिणी, कुलविध्वंसिनी! रामानें तुझें असें काय पाप केलें आहे, कीं, तूं त्याचा असा छळ मांडिला आहेस! तुझ्या ठिकाणीं जो सख्ख्या आईप्रमाणें लीन असतो, त्याचें वाईट करण्याविषयीं तूं उद्युक्त झालीस तरी कशी! तूं प्रत्यक्ष काळसर्पिणी आहेस, आणि म्यां मूर्खानें तुला आपल्या नाशाकरितां आपल्या घरांत घेतली आहे.

हजारों लोक किंबहुना सर्व जग रामाचे गुण गात आहे, त्या रामाला कोणतें नांव ठेवून मी वनवासाला धाडूं ? रामाहून प्रियकर वस्तु मला कोणचीच नाहीं. मी आपली राज्यलक्ष्मी किंबहुना प्राणसुद्धां रामाकरितां त्यागीन; पण रामाचा कधींही त्याग करणार नाहीं. सूर्यावांचून पृथ्वी राहूं शकेल, पण रामावांचून मी क्षणभर देखील जिवंत राहणार नाहीं. तर चांडाळणी ! हा तुझा हट्ट सोड. मी तुझ्या पायां पडतों. माझ्यावर दया कर. इक्ष्वाकूंच्या कुळांत हा भयंकर प्रसंग उत्पन्न झाला आहे. तुझी आजपर्यंत सरळ व न्यायी असलेली बुद्धि आज कशी नष्ट झाली ? आजपर्यंत असें अप्रिय भाषण तूं कधीं केलें नाहींस किंवा वाईट गोष्ट मागितली नाहींस; मग आतांच तुझा हा बुद्धिभ्रंश झाला तरी कसा कोण जाणे ! नऊ आणि पांच–चौदा वर्षें रामानें वनवास तरी कसा भोगावा ? राजसुखांत वाढलेल्या माझ्या सुकुमार रामाला वनवासास पाठविण्याची तुला इच्छा तरी कशी झाली ? प्रिये कैकेयी, माझ्या वृद्धावस्थेकडे पहा. मी दीन होऊन तुझी करुणा भाकतों आहे. माझें म्हणणे ऐक. जगतात ज्या ज्या श्रेष्ठ वस्तु असतील त्या मी तुला देतों. पण हा मृत्युतुल्य प्रसंग आणूं नकोस.'' याप्रमाणें अनेक प्रकारानें त्या शोकाविष्ट राजाने कैकेयीची मनधरणी केली; परंतु ती दुष्ट चांडाळीण आपला हट्ट सोडीना. तिनें शेवटचेंच एकदम सांगितलें, “ मला एकदा दोन वर देऊन पुनः नाकबूल करीत असाल, तर तुमचा धार्मिकपणा केवळ दांभिकपणा आहे असें मी समजेन ! जगांतील सर्व लोक तुम्हांस नांवें ठेवतील. सर्व धर्मज्ञ राजर्षि जमतील तेथें तुमची निंदा होईल. शिबि राजानें आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें श्येन पक्ष्याला अंगचे मांस तोडून दिलें. अलर्कानें आपले डोळे काढून ब्राह्मणाला दिले. समुद्र आपली प्रतिज्ञा भंग करून मर्यादेचें अतिक्रमण करीत नाहीं. तरी तुम्ही आपल्या वचनाचा भंग करून आपल्या पूर्व लौकिकाला बट्टा लावूं नका. तुमच्या मनांत वचनभंग करून रामाला राज्य देऊन कौसल्येसह सुखोपभोग घेण्याचें असलें तर खुशाल घ्या; पण रामाला जर अभिषेक कराल तर मी खचित सांगतें कीं, तुमच्या समोर विष पिऊन मी आपला प्राण देईन. मग तुम्हांस हवें तें करा. मी आपल्या कंठाची व भरताची शपथ घेऊन सांगतें कीं, रामाला वनवासास धाडल्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही गोष्टीनें माझी तृप्ति व्हावयाची नाहीं. आणखी जास्त काय सांगूं ? '' हे दारुण शब्द उच्चारून तिनें जें मौन धारिलें तें

दशरथानें तिच्या शतशः विनवण्या केल्या तरी तिनें सोडलें नाहीं. तिचा निश्चय पाहून रामाचा भावी वनवास व भरताचें भावी ऐश्वर्य दशरथाच्या डोळ्यांसमोर उभें राहिलें. आणि एक मुहूर्तपर्यंत दशरथ राजा त्या केस पिंजारलेल्या राक्षसीकडे अनिमिष डोळे वटारून पहात राहिला व शेवटीं कुऱ्हाडीनें तोडलेल्या झाडाप्रमाणें धाडकन् खालीं पडला. पुनः शुद्धीवर येऊन कैकेयीची काकुळत करून दशरथ म्हणालाः—" आज हजारों लोक नाना नगरांहून रामाचा अभिषेकोत्सव पाहण्याकरितां आले आहेत. त्यांना कैकेयी, मी काय सांगूं ? पराभव पावलेल्या सैन्याप्रमाणें चारी दिशेनें उधळलेले त्यांना माझ्यानें कसें पाहवेल ? आणि ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य इत्यादि प्रजा मला काय म्हणतील ? 'हा वृद्ध थेरडा राजा व्यर्थ इतका वाढला, हा अगदीं मूर्ख आहे. रामाला यौवराज्य देण्याचें ठरवून लागलींच त्याला वनवासास पाठवीत आहे; या राजाला वेड तर लागलें नाहींना ?' इत्यादि प्रकारांनीं लोक माझा धिक्कार करतील. रामास वनवासाला जातांना पाहून आर्य-लोक 'पुत्रविक्रय करणारा हा अनार्य आहे,' असें म्हणून माझी निंदा करतील; आणि ज्याप्रमाणें सुरा पिणाऱ्या ब्राह्मणास रस्त्यांत शेणमार होतो, त्याप्रमाणे माझ्यावर सर्व लोक थुंकतील. हे दुष्टे, तुला न ओळखतां मीं आजपर्यंत व्यर्थ आपल्या घरांत फांसाच्या दोरीप्रमाणें ठेविलें. हे पापिणी, मला कौसल्येला आणि सुमित्रेला नरकांत ढकलून तूं सुखी होणार आहेस ? राम वनवासास गेल्यावर मला मृत्यु आल्यावाचून राहणार नाहीं. मग विधवा होऊन खुशाल पुत्रासहित राज्य कर. हे चांडाळणी ! विचार कर. माझें जीवित रामाविणें टिकणें अशक्य आहे. मी तुझ्या पायां पडतों, हा तुझा हेका सोड." असें म्हणून तिचे पसरलेले पाय धरण्याच्या इराद्यानें राजा पुढें सरसावला; परंतु तिनें आपले पाय मागें ओढल्यामुळें पाय हातीं न लागतां तो धरणीवर पडला ! ( अयो० स० १०–१२ ).

संध्याकाळ संपून सूर्य अस्तास गेला आणि रात्रीचा समय होऊन चंद्राचें आल्हादजनक शुभ्र चांदणें चोहोंकडे पसरलें; पण त्या कैकेयीच्या महालांत आनंद पसरला नाहीं. तो महाल अधिकाधिक भयाण दिसूं लागला. दशरथ राजा शोकाकुल होऊन एकसारखा अश्रु ढाळीत होता. मधूनमधून आपल्या त्या दुष्ट बायकोची निर्भर्त्सना तो करी; मधूनमधून तिची विनवणी करी; परंतु तिनें आपला हट्ट रतीभरही सोडला नाहीं. बायका स्थितींत आहेत

तोंपर्यंतच ठीक आहे; पण एकदां त्यांनीं मर्यादा सोडली म्हणजे त्या ब्रह्म-देवाचेंही ऐकावयाच्या नाहींत. दशरथ राजानें ती रात्र शोकांत घालविली. वारंवार दीर्घ आणि उष्ण असे निःश्वास टाकावे, आकाशाकडे दृष्टि लावून बसावें, कधीं कधीं क्रोधानें त्या सर्पिणीसारख्या फुणफुणणाऱ्या आपल्या पत्नीकडे निश्चल पाहावें. असें होता होता रात्र संपली, पण त्याची ती कष्टा-वस्था संपली नाहीं.

प्रातःकाळच्या सुमारास वसिष्ठ ऋषि आपल्या आश्रमाहून घाईघाईनें स्नानादि कर्मे आटोपून शिष्यांसहवर्तमान निघाले. शहरांत शिरतांच जिकडे तिकडे आनंद पसरला आहे, रस्ते स्वच्छ झाडून शिंपले आहेत, पताका, तोरणें उभारलीं आहेत, आनंदलेल्या लोकांनीं रस्ते भरले आहेत, सकाळचे बाजार जिकडे तिकडे लागून गेले आहेत, अशा प्रकारची शोभा पाहून वसिष्ठ ऋषि संतुष्ट झाले. नगरामधून शृंगारलेल्या वाड्यांत ते पोंचले आणि दश-रथाच्या अग्न्यागारांत जाऊन अभिषेकाची तयारी करूं लागले. त्यांनीं सुमं-त्रास आज्ञा केली कीं, " दशरथ राजास उठवा, स्नान घाला, मी आलों म्हणून सांगा. पुष्यनक्षत्रावर चंद्रमा पोहोंचला आहे. सुमुहूर्तावर रामास यौवराज्याभिषेक करण्याची वेळ चुकूं देऊं नका. " याप्रमाणें वसिष्ठाची आज्ञा होतांच सुमंत्र कैकेयीच्या महालांत जाऊन राजा निजला आहे असें समजून 'सूत' या नात्यानें राजाचा स्तव करूं लागला. प्राचीन काळीं राजे लोकांस सूत, मागध व बंदिजन सकाळीं त्यांच्या व त्यांच्या कुळाच्या गुणांच्या स्तुतिपर पद्यें म्हणून जागे करीत असत. त्याप्रमाणें तो सुमंत्र सूत दशरथाचा स्तव करूं लागला; परंतु राजाला ते त्याचे स्तुतिपर शब्द सुरी-सारखे खोंचले! तो म्हणालाः–"सुमंत्रा, मी जागा आहें, तुझे शब्द मला भाल्याप्रमाणें टोंचताहेत; पुरे कर. " राजाचे हे दीन शब्द ऐकून आणि त्याची शोकाकुल मुद्रा व दुःखानें, रडण्यानें व जागरणानें लाल झालेले डोळे पाहून सुमंत्रास अतिशय दुःख झालें व तो हात जोडून किंचित् मागें सरून दूर उभा राहिला. राजानें त्याजकडे पाहिलें; परंतु त्याच्यानें बोलवेना. तेव्हां ती निर्लज्ज कैकेयी म्हणालीः–"सुमंत्रा, रामाला अभिषेक होणार, या हर्षानें राजास रात्रभर झोंप लागली नाहीं, म्हणून राजास ग्लानि आलेली आहे! तरी तूं आतांच जाऊन राजपुत्र रामचंद्रास येथें घेऊन ये. मनांत कोणताही विचार आणूं नकोस. " सुमंत्रानें प्रार्थना केली, " बाईसाहेब, महाराजांची

काहीं आज्ञा झाल्याशिवाय मी कसा जाऊं?'' तेव्हां दशरथ त्यास म्हणाला, ''सुमंत्रा, जा; माझ्या सुंदर रामाला घेऊन ये.'' राजाची अशी आज्ञा होतांच येथें काहीं तरी विपरीत आहे, ही शंका निरसन होऊन, सुमंत्र लागलाच गजबजलेल्या अंतःपुरांतून बाहेर पडून रामाच्या वाड्यांत पोहोंचला. रामचंद्र स्नानादि कर्में आटोपून उत्तम प्रकारचीं वस्त्रें परिधान करून सुवर्णपर्यंकावर बसले होते व जवळच सीतादेवी हातांत लहानसा चंदनाचा पंखा घेऊन रामास वारा घालीत उभी होती. त्यास पाहतांच सूतानें लवून भुईस हात लावून वंदन केलें व हात जोडून विनंति केली:—''धन्य असो माता कौसल्या ! रामा, दशरथ राजा कैकेयीसहवर्तमान तुला भेटूं इच्छितो आहे. लवकर चलावें.'' रामानें झटकन् उठून सीतेकडे पाहून म्हटलें:—''देवी, राजा आणि मातुश्री कैकेयी माझ्या अभिषेकासंबंधानें निश्चयानें काहीं तरी विचार करीत आहेत. तर मी आतां जाऊन येतों. तूं येथें परिवारासह आनंदानें ऐस.'' असें म्हणून राम घाईनें निघाला. सीता साशंक होऊन रामाचें कल्याण होवो असें सप्रेम मनानें चिंतीत दरवाजापर्यंत त्यास पोहोंचवावयास गेली. रामाच्या बरोबर शेंकडों लोक, मित्र, पौरजन व दास धांवले. त्या सर्वांस सौजन्यानें थोपवून राम अंतःपुरांत शिरला, आणि कैकेयीच्या महालाशीं पोहोंचला. तों सर्व शून्य दिसूं लागलें. आंत शिरून पाहतो तों, एका आसनावर आपला दीन व म्लान झालेला पिता बसला आहे व जवळच केश मोकळे सोडलेली, रागानें तोंड लाल झालेली, मलिन वस्त्र नेसलेली सापत्न माता जमिनीवर बसली आहे. अशा प्रकारच्या स्थितींत आपल्या मातापितरांस पाहतांच रामाचें तोंड सुकून गेलें व त्याच्या घशाला कोरड पडली. पण त्यानें समोर जाऊन नेहमींप्रमाणें प्रथम पित्याच्या चरणांवर मस्तक ठेविलें व मागून कैकेयीच्या पायांवर ठेविलें. ''रामा,''—इतकेंच त्याच्या बापानें म्हटलें; शोकाच्या वेगामुळें त्यास पुढें बोलवेना व डोळ्यांतून खळखळ अश्रुधारा वाहूं लागल्यामुळें त्यास रामाकडे पाहवेंही ना. ही राजाची अपूर्व भयंकर स्थिति पाहून रामाला भीति उत्पन्न झाली. शोकानें कृश झालेला, वारंवार उसासे टाकणारा व दुःखानें व्याकुळ झालेला तो राजा ग्रहण लागलेल्या सूर्याप्रमाणें किंवा खोटें बोललेल्या महान् ऋषीप्रमाणें निस्तेज दिसत होता. त्याचें दुःखी व क्षुब्ध अंतःकरण पाहून रामासही पौर्णिमेच्या दिवशींच्या समुद्राप्रमाणें दुःखाचें भरतें आलें व त्यानें शोकानें आर्त झालेल्या

स्वरानें आपल्या मातुश्रीस म्हटलें:--"देवी कैकेयी,ज्यामुळें माझ्या पित्यास अत्यंत राग येण्यास कारण झालें असेल असा माझा तर कांहीं अपराध झाला नाहीं नाँ ! मातुश्री,माझ्या तर्फेनें राजाला प्रसन्न कर. कांहीं मानसिक अथवा शारीरिक संताप तर राजाला आला नाहीं ना! कारण सदैव सुखाची स्थिति राहणें अशक्य आहे. माझा प्रियबंधु भरत याजविषयीं कांहीं वाईट बातमी तर आली नाहीं ना ! किंवा शत्रुघ्नास अथवा माझ्या मातुश्रीस कांहीं अशुभ तर झालें नाहीं ना !" हें ऐकून ती निर्लज्ज बायको म्हणाली:--" रामा, राजाला तुझा राग आला नाहीं; परंतु त्याच्या मनांतली गोष्ट तुझ्या भीतीनें तो बोलूं शकत नाहीं. आपल्या आवडत्या मुलास वाईट बोलण्यास राजाची वाणी प्रवृत्त होत नाहीं. म्हणून मी तुला ती गोष्ट सांगतें. तूं ती अवश्य करशील यांत शंका नाहीं. हें पहा, राजानें पूर्वी मला दोन वर देऊन आतां त्याजबद्दल प्राकृत पुरुषाप्रमाणें तो पश्चात्ताप करीत आहे. ' मी देतों, ' असें प्रथम म्हणून मग मागें फिरणें म्हणजे पाणी निघून गेल्यावर पाळ बांधण्यासारखें आहे. सर्व धर्माचें मूळ सत्य आहे हें तुला व सर्व सत्पुरुषांना ठाऊक आहे. तें सत्य तुझ्याकरितां सुद्धां राजा सोडणार नाहीं, ही मला खात्री आहे. " हें कैकेयीचें भाषण ऐकून रामाला फार दुःख झालें आणि तो राजासमक्ष कैकेयीस म्हणाला:-"हे देवी, मी जर राजाची आज्ञा पाळणार नाहीं, तर मला धिक्कार असो ! माझ्याविषयीं तूं अशी शंकाही बाळगूं नकोस. राजाची आज्ञा असेल तर मी अग्नींत सुद्धां उडी टाकीन. तर मला सांग राजाची काय आज्ञा आहे. राम दुबार भाषण करीत नसतो. " हें त्या आर्य राजपुत्राचें निर्वाणीचें भाषण ऐकून ती अनार्य आपलें भयंकर वचन बोलूं लागली. ती म्हणाली:--" रामा, पूर्वी देवांचें व असुरांचें युद्ध झालें.त्या वेळेस तुझा बाप देवाच्या सहाय्यास गेला असतां लढाईत जखमी होऊन निश्चेष्ट पडला. त्या वेळेस मी त्याचें सारथ्य करीत होतें. मी युक्तीनें युद्धाबाहेर रथ काढून तुझ्या पित्यास वांचविलें. त्या वेळेस त्याने मला दोन वर दिले.ते मीं तेव्हां घेतले नाहींत. तसेंच ठेविले. आतां मीं ते वर तुझ्या पित्याजवळ मागितले. एका वरानें भरताला यौवराज्याचा अभिषेक व्हावा म्हणोन मीं मागीतलें आहे व दुसऱ्यानें तूं १४ वर्षे दंडकारण्यांत वनवासास जावें असें मागितलें आहे. बापाची प्रतिज्ञा तुला सत्य करणें असेल व तसेंच तुला आपली आतां बोललेली वाणी

खरी करणें असेल, तर पित्याची आज्ञा ऐक आणि आतांच वनवासाला जा. हा अभिषेकाचा समारंभ सोडून वल्कले नेसून वनाला जा. माझा भरत या पृथ्वीचें राज्य करील. अशा प्रकारची एकदर गोष्ट असल्यामुळें राजाला तुझ्याविषयीं करुणा येत आहे आणि म्हणून तुझ्याशीं त्याच्यानें बोलवत नाहीं. पण राजाची प्रतिज्ञा सिद्धीस नेऊन त्याला तू संकटांतून तार. '' हें कैकेयीचें मृत्यूसारखें भयंकर भाषण ऐकून रामाला मुळींच दुःख झालें नाहीं. तो शांतपणें म्हणाला:—"एवढीच गोष्ट असेल तर कांहीं चिंता नाहीं. तूं म्हणतेस तसेंच असो. मी आनंदानें राजाची प्रतिज्ञा सिद्धीस नेतों आणि आतांच वल्कलें नेसून वनाला जातों. मातुश्री, तुला कोणत्याही प्रकारें दुःख होऊं देऊं नकोस. मी आतांच वनवासाला जातों, हा निश्चय समज. माझ्या राजानें, माझ्या गुरूनें, माझ्या पित्यानें, माझें आजपर्यंत कल्याण करणारानें, मला आज्ञा केली असतां ती मी ऐकणार नाहीं, हें कधीं तरी संभवेल काय ! पण हे देवी, एक गोष्ट माझ्या मनाला खात आहे कीं, राजानें स्वतः मला सांगितलें नाहीं कीं, 'मी भरताला अभिषेक करतों म्हणून.' राजाची तशी आज्ञा व इच्छा असेल तर ती शिरसावंद्य करून लागलीच मी ती अमलांत आणीन. तर राजाचें समाधान कर. राजाच्या डोळयांतून हे मंद मंद अश्रू पडत आहेत, त्याचे कांहीं कारण नाहीं. भरताला आणण्याकरितां आताच दूत शीघ्र अश्वावर बसून जाऊं दे. आणि मीही राजाज्ञेचा यत्किंचितही खेद न मानतां चौदा वर्षें वनवास करण्याकरिता जातो. '' हे शब्द ऐकून कैकेयीला आनंद झाला व पडत्या फळाची आज्ञा घेऊन रामाला वनवासाला जाण्यास जलदी करण्याच्या दुष्ट हेतूनें ती म्हणाली:—" रामा, तुझा पिता लज्जेने तुझ्याशीं बोलूं शकत नाहीं; पण मी तुला सांगत्यें, जोंपर्यंत तूं अरण्यांत जाणार नाहींस तोंपर्यंत तुझा बाप स्नान करणार नाहीं किंवा अन्न घेणार नाहीं ! '' हे शब्द ऐकताच दशरथ राजा 'धिक् धिक् ' असें बोलून मोठ्यानें उच्छ्वास टाकून आपल्या पर्यंकावर मूर्च्छित पडला ! त्याबरोबर रामानें पुढें धावून राजाला आपल्या बाहूंत धरून उठवून बसविलें आणि ज्याप्रमाणें उमद्या घोड्याला चाबकाचा फटका बसला असतां तो एकदम जोरानें निघतो, त्याप्रमाणें कैकेयीच्या भाषणाचा प्रहार त्याच्या हृदयावर होऊन तो म्हणाला:—" देवी कैकेयी, मला सामान्य जनाप्रमाणें अर्थलुब्ध समजूं नकोस. मी ऋषीप्रमाणें धर्माचे ठिकाणीं निश्चल आहें. मातापितरांची

शुश्रूषा करणें व त्यांचें वचन पाळणें ह्यापेक्षां माझा परम धर्म मी दुसरा कोणताच समजत नाहीं. कैकेयी, मला तूं खरोखर सद्गुणी समजत नाहींस. कारण तसें असतें तर तूंही माझी पूर्ण मालकीण असून तूंच मला वनवासाची कां आज्ञा केली नाहींस ? राजाला तरी कशाकरितां भरीस घातलेंस ! असो; तुझी तशीच राजाची आज्ञा मला शिरसावंद्य आहे. मी मातुश्रींचा निरोप घेऊन व सीतेची समजूत करून आतांच वनवासास जातों. भरतानें राज्य करून पित्याची शुश्रूषा करावी; तूंही राजाचा सांभाळ कर. कारण हा आपला सर्वांचा सनातन धर्म आहे. " हे रामाचे शब्द ऐकून दशरथ राजाला अत्यंत दुःखोद्वेग आला; पण त्याच्यानें कांहींच बोलवेना व तो मोठा स्वर काढून रडूं लागला ! ( अयो० स० १३–१९ ).

या दुःखद प्रसंगाचा निर्गम केलाच पाहिजे, असा विचार करून रामचंद्रानें आपल्या निश्चेष्ट झालेल्या पित्याचे चरण वंदिले व नंतर मातेचेही चरण वंदिले आणि दोघांस प्रदक्षिणा घालून तो बाहेर पडला. बाहेर त्याचे मित्र त्याच्या दृष्टीस पडले. सर्वांच्या डोळ्यांतून अश्रू चालले होते. त्यांचें शांतवन करून अभिषेकाकरितां जमविलेल्या सामुग्रीला त्याने प्रदक्षिणा घातली व हळूंहळूं तो कौसल्येच्या महालाकडे चालला. त्याच्या भावी अपकर्षानें त्याच्या तेजाला आणि त्याच्या रम्य कांतीला यत्किंचितही कमतरता आली नव्हती. छत्र, चामर, वगैरे राजचिन्हांचा निषेध करून व पाठीमागून येणारे मित्र शहरवासी यांनाही परतवून फक्त लक्ष्मणासहित तो कौसल्येच्या वाड्यांत शिरला. ती साध्वी मोठ्या हर्षानें व्रतस्थ राहून या वेळेस अग्नीची पूजा करीत होती. मौल्यवान् पैठणी नेसलेल्या त्या आपल्या प्रेमळ मातेचे चरणवंदन करितांना तिनें त्यास आपल्या पोटाशीं धरून त्याच्या टाळूचें आघ्राण केलें व त्यास मोठ्या प्रीतीनें " बाळा, तूं मोठमोठ्या धर्मशील राजर्षींच्या पंक्तीला जाऊन बसशील, " असा आशीर्वाद दिला. राम अगोदरच विनयसंपन्न, त्यांत या वेळच्या तिच्या गैरमाहीत स्थितींत तिला अत्यंत विनयानें म्हणालाः—" देवी कौसल्ये, मजवर मोठें संकट आलेलें तुला माहीत नाहीं. तें ऐक; तुला सीतेला आणि लक्ष्मणाला मोठें भय उत्पन्न झालें आहे. आई, मी १४ वर्षें वनवास भोगण्याकरितां आजच जात आहे. महाराज दशरथ भरताला यौवराज्य देणार आहेत व मला वनवासाला धाडीत आहेत. " हे शब्द कानीं पडतांच जशी एखादी केळ कुऱ्हाडीच्या एक

घावानें तुटून कोसळून पडावी त्याप्रमाणें ती हतभागिनी कौसल्या एकदम मूर्च्छा येऊन पडली. रामानें तिचें शांतवन करून तिला बसती केली व तिच्या धुळीनें मळलेल्या अंगावरून आपला हात फिरविला. या वेळेस कौसल्या म्हणाली:-"रामा, वांझेला एकच दुःख असतें, कीं मला मूल नाहीं; परंतु पुत्रवती स्त्रीला वारंवार दुःखें येतात. रामा, आजपर्यंत मला जें सुख मिळालें नाहीं तें मला तूं युवराज झाल्यावर मिळेल अशी आशा होती. आता मी सर्वांत श्रेष्ठ असूनही सवतीचे पूर्वीहूनही भयंकर शब्द मला ऐकावे लागतील. तूं येथें असतांनाही माझी कोणी काळजी केली नाहीं; मग तूं वनवासास गेल्यावर मीं जगणेही कठिण आहे. खरोखर माझें हृदय वज्राहून कठिण आहे. कारण अशी भयंकर बातमी ऐकूनही तें शतशः फुटून गेलें नाहीं." इत्यादि विलाप करीत ती पुनः म्हणाली:-"रामा, जशी पित्याची आज्ञा तशीच मातुश्रीची आज्ञाही तुला मानली पाहिजे. मी तुला सांगत्यें कीं, तूं वनवासाला जाऊं नकोस. अथवा जाणेंच असेल तर मला बरोबर घेऊन चल. तुझ्यावांचून मी पळभरही जीव कसा धरावा ? " पण रामानें अनेक धर्मपर गोष्टी सांगून मातुश्रीचें समाधान केलें. "पित्याची आज्ञा पाळणें हा परम धर्म सर्व ऋषि सांगतात. जामदग्न्यानें पित्याच्या आज्ञेनें मातेचेंही शिर तोडलें. सगराच्या पुत्रांनीं पित्याच्या आज्ञेनें पृथ्वी खणून टाकिली व शेवटीं ते प्राणास मुकले. राजाची आज्ञा व पित्याची आज्ञा जशी मला वंद्य आहे तशीच भर्त्याची इच्छाही तुला पाळली पाहिजे. याशिवाय भर्त्यास सोडून जाणें हें साध्वी स्त्रियांना उचित नाहीं. मी अरण्यात गेल्यावर तूंही राजाला सोडलेंस तर माझा प्रिय पिता खरोखर जिवंत राहाणार नाहीं. तर तूं येथें राहून माझ्या पित्याची सेवा कर. हा तुझा व माझा परम धर्म आहे. तर आई, मला जाण्याची परवानगी दे व मला आशीर्वाद दे. मी १४वर्षें वनवास भोगून पुनः परत निश्चयानें तुझें दर्शन घेण्यास परत येईन. तूं काळजी करूं नकोस." हें रामाचें भाषण ऐकून कौसल्या शांत होऊन म्हणाली:—"दशरथाच्या व कौसल्येच्या पुत्राची धर्माच्या ठिकाणीं अशी स्थिरता असावी यांत आश्चर्य नाहीं. रामा, तुझा वनवासास जाण्याचा निश्चय मी पालटूं शकत नाहीं. बाळा, तूं निःशंक चित्तानें वनवासास जा. तुझें सदैव कल्याण असो. पण तूं परत येईपर्यंत मला झोंप लागणार नाहीं. पित्याची प्रतिज्ञा पूर्ण केल्यानंतर वनवास संपून परत आलेला तुला पाहीन

तेव्हां माझ्या हृदयाचा शोक नाहींसा होईल. जो धर्म तूं एवढ्या प्रीतीनें व निश्चयानें पाळतो आहेस, तोच तुझें वनांत रक्षण करो. विश्वामित्रांनीं जीं दिव्य अस्त्रें तुला दिलीं आहेत, तीं तुझें रक्षण करोत. तुझी मातृभक्ति आणि पितृभक्ति व तुझें शील हीं तुला संभाळून पुनः परत आणोत. वनांतील राक्षस, यक्ष,भूत, पिशाच यांपासून तुला यत्किंचितही भय उत्पन्न न होवो." असा आशीर्वाद देऊन उत्तम सुवासिक फुलें देवांवरून काढून तिनें रामचंद्राच्या हातावर ठेवलीं आणि आसवांनीं भरलेल्या डोळ्यांनीं त्याच्याकडे प्रेमभरानें पाहून त्याला पुनः पोटाशीं धरिलें.रामानें मातेचे चरण आपल्या हातांनीं वारंवार दाबून व तिच्या पायांवर पुनः एकदां डोकं ठेवून तिचा शेवटचा निरोप घेतला. ( अयो० स० २०–२५. )

कौसल्येचा निरोप घेऊन राम निघाले ते मोठ्या उत्सुकतेनें घरीं आले. आपल्यापुढें काय वाढून ठेविलें आहे याची कल्पनाही बिचाऱ्या सीतादेवीस नव्हती.भक्तिपूर्ण अंतःकरणानें देवाची पूजा करून ती रामाची वाट पहातच बसली होती. राम तिच्या दृष्टीस पडतांच ती आसनावरून तटकन् उठून धांवत रामाला सामोरी गेली.तों त्याचा चेहरा चिंतेनें व्याकुळ झालेला पाहून तिच्या पोटांत एकदम धस्स झालें; व तिचे हातपाय लटलट कांपूं लागले. रामचंद्राचें धैर्य इतका वेळेपर्यंत टिकलें होतें.पण त्या आपल्या प्रिय आणि अत्यंत प्रेम करणाऱ्या पत्नीस पाहतांच तें एकदम खचलें व त्यांच्या हृदयांतलें दुःख त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसूं लागलें. त्यांचा फिक्का व डबडबून घाम आलेला चेहरा पाहून सीतेनें आर्त स्वरानें विचारिलें:—
"महाराज, हें आतां नवीन काय उत्पन्न झालें आहे ? या वेळेस पुष्ययुक्त बार्हस्पत्य मुहूर्त आहे, अशा वेळीं तुम्हांस दुःख कां होत आहे ? तुमच्या बरोबरचीं छत्रचामरादि चिन्हें कोठें आहेत? सूत, बन्दि,मागध आज नित्याप्रमाणें तुमचा स्तव कां करीत नाहींत ? हें आहे तरी काय ? तुमचें मुख आजपर्यंत कधींही दिसलें नाहीं इतकें म्लान आतां कां दिसतें आहे ! काय झालें तें मला सांगा."रामानें उत्तर केलें:—"सीते,माझे परमपूज्य तात मला वनवासाला धाडीत आहेत. हा प्रकार एकदम कसा घडून आला तें ऐक. माझ्या सत्यवचनी पित्यानें कैकेयी मातेस पूर्वी एका युद्धाचे प्रसंगीं दोन वर दिले होते; ते वर तिनें आज माझ्या अभिषेकाचे प्रसंगीं राजापाशीं मागितले. एकानें तिनें भरताला यौवराज्याचा अभिषेक मागितला आहे व दुसऱ्यानें

मला दंडकारण्यांत वनवासास धाडावें असें मागितलें आहे. तरी आतां वनवासास जाण्यापूर्वी मी तुझा निरोप घेण्यास आलों आहें. सीते, भरताची आज्ञा तूं कधींही अमान्य करूं नकोस, व भरताच्या सन्निध माझ्या गुणांचा स्तव करूं नकोस. कारण वैभवशाली पुरुषांना दुसऱ्याची प्रशंसा आवडत नाहीं. मी पित्याची प्रतिज्ञा सत्य करण्याकरितां आजच वनवासास जात आहे. माझ्या पश्चात् तूं येथें व्रतस्थ राहून काळजीनें वाग. सकाळीं उठून देवांची पूजा करून माझा प्रिय पिता जो दशरथ त्यास वंदन करीत जा व नंतर माझ्या दुःखित मातेचें सांत्वन करीत जा. माझ्या दुसऱ्या मातांनांही वंदन करून भरताला प्रिय असें नेहमीं आचरण ठेव. कारण तो आपल्या देशाचा व कुलाचा मालक होणार आहे. तर मी येतों. तूं व्रतपरायण राहून भरताच्या आज्ञेंत वाग बरें!" रामाचे हे दुःखानें उच्चारिलेले शब्द ऐकून सीता रागानें व प्रेमानें म्हणालीः—"वीराना, क्षत्रियांना, शस्त्रास्त्रें जाणणाऱ्यांना न शोभणारे असे हे अयशस्कर शब्द आपण कसे उच्चारितां! महाराज, आईबाप, बंधु, पुत्र हे आपआपल्या भाग्याचे अधिकारी आहेत व आपापल्या पुण्याप्रमाणें ते आपलें भाग्य भोगतात. पण **भार्या ही एकटी आपल्या पतीचें भाग्य भोगणारी** आहे. याकरितां तुमच्या वनवासाची मी वाटेकरीण आहे, म्हणून वनवासास जाण्याची मलाहि आज्ञा झाली आहे, असें मीं समजत्यें. स्त्रियांना पति हाच आधार आहे; बाप नाहीं, माता नाहीं, पुत्र नाहीं, किंवा सखी नाहीं; किंबहुना त्यांचा आत्मा हाही त्यांचा आधार नाहीं. केवळ पति हाच त्यांचा आधार आहे.जर वनवासास तुम्ही आज जात असाल तर तुमच्यापुढें मी होऊन रस्त्यांतील कांटे आपल्या पायांनीं दाबून तुमचा रस्ता साफ करून ठेवित्यें. वीरश्रेष्ठा! मनांतील ईर्ष्या आणि रोष काढून टाकून माझ्यावर विश्वास ठेवून मला बरोबर घेऊन चला. माझ्या ठिकाणीं यत्किंचितही पाप नाहीं. मी मोठमोठाल्या दुर्गम व शून्य अरण्यांत जेथें नानाप्रकारचीं भयंकर व्याघ्रादि श्वापदें असतील तेथें सुद्धां—तुमच्या बरोबर चालेन. पित्याच्या घरच्या आनंदापेक्षां जास्त अशा आनंदानें वनांत तुमच्याबरोबर मी सुखानें राहीन; कशाचीही आठवण करणार नाहीं. तुमची नेहमीं सेवा करून व व्रत-नियमानें राहून मोठ्या प्रेमानें तुमच्याबरोबर मधुर सुगंधांनीं भरलेल्या निरनिराळ्या वनांमध्यें मी रममाण होईन. शेंकडों लोकांचें रक्षण वनांमध्यें तुम्ही करूं शकाल, मग माझी एकटीची काय कथा! तुम्हांला

वनवासांत असतांना मी कोणतेंही दुःख देणार नाहीं. चालावयाचें तें तुमच्यापुढें चालेन, तुम्हांला भोजन घालून मग मी जेवीन. तुमच्या आधारानें निर्भय राहून निरनिराळे डोंगर, अरण्यें, नद्या, सरोवरें, हंसकारंडवांनीं भरलेलीं तळीं पाहण्याची माझी फार इच्छा आहे. तर आर्यपुत्र, मला घेऊन चला. मला मागें टाकलेंत तर मीं मरण्याचा निश्चय केला आहे. माझी प्रार्थना मान्य करण्यांत तुम्हांला कांहींच भार नाहीं." असें म्हणत असतां सीतेच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. (अयो० स० २६-२७).

याप्रमाणें सीतेनें अनेक प्रकारांनीं रामाचें मन वळविण्याचा यत्न केला. पण वनवासाच्या दुःखाचा विचार करितां रामाच्या मनांत तिला नेण्याचें येईना. तिचे डोळे पुसून व तिचें सांत्वन करून राम म्हणाले:—"सीते, जनकाच्या अत्यंत पवित्र कुलांत तुझा जन्म झाला आहे. आणि तूं पूर्वीपासून धर्माचरण करीत आहेस. तुला येथेच राहून स्वधर्माचें आचरण करणें कठीण पडणार नाहीं आणि असें केलेंस तर माझ्या मनाला सुख होईल. कारण वनवासाचीं दुःखें कोठवर वर्णन करावींत ? गिरिगव्हरांत राहणाऱ्या सिंहाच्या गर्जना गिरिगव्हरांनीं प्रतिध्वनित होऊन भयंकर होतात, त्या कानांनीं ऐकणें सुद्धां कठीण आहे आणि म्हणून वनवास फार दुःख देणारा आहे. नद्यांतून मोठमोठे नक्र असल्यामुळें व किनाऱ्यावर ढोपरढोपर चिखल असल्यामुळें मत्त हत्तींस सुद्धां नद्या ओलांडणें भयंकर असतें, मग माणसाची काय कथा ! म्हणून वनवास कठीण आहे. रस्त्यावर हजारों कांटेरी वेली असून त्यांतून सरडांचे भयप्रद शब्द ऐकूं येतात. कोस कोसपर्यंत पाणी प्यावयास मिळत नाहीं; असे रस्ते आक्रमण करणें कठीण आहे. म्हणून तूं वनवासास येऊं नकोस. जमीन आपल्या हातानें फोडून सारखी करून त्याजवर पानांच्या अंथरुणावर निजावें लागतें, म्हणून वनवास कठीण आहे. अहोरात्रींतून काय मिळतील तीं फळें खाऊन संतोष मानावा लागतो, म्हणून तूं वनवासास येऊं नये. नाना प्रकारचे भयंकर साप रस्त्यावरून दर्पानें निर्भयपणें फिरतात. सीते, वनवास अतिदुःखद आहे, म्हणून तूं आग्रह धरूं नको. वारा-ऊन सहन करावें लागतें, भूकतहान मारावी लागते व शेंकडों भयें उपस्थित होतात. तर वनवासास येण्याचा तुझा हट्ट सोड. पुन्हां पुन्हां विचार करितां तुला वनांत राहणें शक्य नाहीं, असेंच मला वाटतें." हें भाषण ऐकून सीतेनें सद्गदित कंठानें मंद मंद उत्तर दिलें:—"रामा, तुमच्या

सहवासाच्या आनंदापुढें जे वनवासाचे दोष तुम्हीं वर्णन केले, ते मला गुणासारखेच वाटतात. वाघ, सिंह, हत्ती, हे तर सर्व तुम्हांस भिऊन पळतात, त्यांची मला भीति नाहीं. उलट त्यांचें पूर्वी ज्या प्रकारचें रूप पाहिलें नाहीं तसें पाहण्यास सापडेल. माहेरीं असतांना मला ज्योतिष्यानें सांगितलेंच आहे कीं, पतीबरोबर तुला वनवास घडेल. म्हणून मी वनवासास जाण्याची वाटच पाहात आहे. ज्याच्या हातावर पाणी घालून बापानें आपली मुलगी दिली ती त्याची झाली, मग तो सुखी असो कीं दुःखी असो कीं मृत असो! अशी ही सर्वस्वीं आपली झालेली पतिव्रता पत्नी आपल्याबरोबर तुम्ही कां नेत नाहीं? द्युमत्सेनाचा सुत जो सत्यवान् त्यावर जशी सावित्रीची प्रीति होती, तशीच तुमच्यावर माझी आहे, हें निश्चयानें समजा आणि मला वनाला घेऊन जा. अगदीं घोर वनामध्यें रम्य हिरव्यागार तृणांवर कुशाचें आंथरूण घालून मी निजेन त्या वेळच्या सुखापेक्षां अधिक सुख तें कोणतें? फार काय सांगूं? **रामचंद्रा, मला तुमच्या सहवासांत स्वर्गसुख आहे आणि तुमच्या वियोगांतच नरकाचें दुःख आहे.** हें माझें प्रेम ओळखून मला बरोबर घेऊन चला. मी तुमचा वियोग एक मुहूर्तही सहन करूं शकणार नाहीं; मग चार अधिक दहा वर्षें इतका दीर्घ वियोग मी कसा सहन करूं?" असें म्हणून शोकानें विव्हल होऊन तिनें रामाच्या गळ्यास मिठी मारिली आणि आपल्या अश्रुधारांनीं त्याचें वक्षःस्थल भिजवून टाकिलें! तेव्हां रामानें तिचें अतिशय प्रेम पाहून तिचें समाधान करून म्हटलें:—सीते, तूं तयार असशील तर चल माझ्याबरोबर. तुझा धीर व निश्चय कोठपर्यंत आहे, हेंच मला पहावयाचें होतें. तुला दुःख देऊन मला स्वर्गसुखसुद्धां गोड लागणार नाहीं. तुझा विचार घेतल्याशिवाय 'तूं अरण्यांत चल,' असें मला म्हणतां येईना. तुझें रक्षण करण्याचें मला पूर्ण सामर्थ्य आहे, तर चल, ऊठ, कर वनांत जाण्याची तयारी. आपल्या मैत्रिणींना, नोकरांना व ब्राह्मणांना आपलें वित्त देऊन टाक आणि माझ्याबरोबर चल." याप्रमाणें पतीची आज्ञा होतांच सीतेचा आनंद गगनांत मावेना. तिनें यत्किंचितही दुःख न करितां आपली सर्व संपत्ति सख्यांना, ब्राह्मणांना व नोकरांना दान केली, व ती आपल्या पतीबरोबर निघण्यास सिद्ध झाली. हा सर्व प्रकार लक्ष्मण पाहतच होता. हीं पतिपत्नी वनवासास जाण्यास सिद्ध झालेलीं पाहून लक्ष्मणानेंही दोघांच्या पायांवर लोटांगण घातलें.

व हात जोडून म्हटलें:—" रामा, मी तुमच्याबरोबर वनास येतों. तुमच्यावांचून मला देवांचेंही राज्य नको. मग पृथ्वीवरील राज्याची काय कथा ! तुम्हाला वनवासांत माझ्यापासून मदत होईल. मी तुमची वनवासांत सेवा करीन. धनुष्य धारण करून तुमच्यापुढें वनामध्यें चालेन. माझ्या सहवासानें नानाप्रकारच्या पक्ष्यांच्या मंजुळ स्वरानें दुमदुमलेलीं अरण्यें तुम्हांला अधिक प्रियकर होतील. " रामाने त्याचेंही पुष्कळ प्रकारें निवारण केलें; परंतु तो आपला हट्ट सोडीना; तेव्हां नाइलाजास्तव रामानें त्यालाही आपल्याबरोबर येण्याला परवानगी दिली, व त्यास सांगितलें कीं, " जा सर्व सुहृज्जनांचा निरोप घेऊन ये व वरुणानें एका यज्ञांत जनकाला दोन भयानक धनुष्यें दिलीं, तीं आचार्यांच्या गृहांत संभाळून ठेविलीं आहेत, व दोन दिव्य अक्षय्य बाणांचे भाते, तशाच सूर्यासारख्या चकाकणाऱ्या दोन तरवारी तेथें ठेविल्या आहेत त्याही येतांना घेऊन ये. लक्ष्मणा, लवकर जा. तोंवर मी आपलें धन ब्राह्मण, तपस्वी, इत्यादिकांना देऊन टाकतों. ब्राह्मण हे नित्य स्वाध्यायनिरत असल्यामुळें ते आपल्या चरितार्थाची काळजी बाळगीत नाहींत. तेव्हां अशा ब्राह्मणांना दान देणे हें आपलें मुख्य कर्तव्य आहे. " याप्रमाणें लक्ष्मणाला आज्ञा देऊन रामानें आपलें वित्त विद्वान् ब्राह्मणांना दिलें. त्याचप्रमाणें परिजनादिकांना धन–धान्य, गायी–घोडे वगैरे जी संपत्ति होती, ती सर्व देऊन टाकिली; आणि लवकरच ते तिघे वनवासास जाण्यास निघाले. ( अयो० स० २९–३२ ).

राम, लक्ष्मण व सीता हीं सर्वस्व दान करून घराबाहेर पडलीं. तीं वनवासास जाण्यापूर्वी दशरथाचा निरोप घेण्याकरितां राजवाड्याकडे चाललीं असतां रस्त्यांत हजारों लोक जमा झाले होते; पाऊल टाकण्यासही जागा नव्हती. त्या गर्दीतून हळूहळू पायीं जात असतां त्यांची ती दीन स्थिति पाहून प्रजाजनांनीं आक्रोश केला. रस्त्यांत जागा मिळेना, तेव्हां शेंकडों स्त्रीपुरुष खिडक्यांतून व गच्च्यांवरून त्या उदार देवतातुल्य राजपुत्रांचें व राजकन्येचें दर्शन घेण्यास उभे राहिले. "हा दुष्ट कैकेयी, हा मूर्ख दशरथा, अशा सद्गुणी पुत्रांस व सुनेस कोण देशपार करील ? गरीब बिचारी सीता ! " प्रजाजनांनीं असे शोकाकुल होऊन काढलेले उद्गार ऐकत अखेरीस तीं तिघें कैकेयीच्या महालापाशीं पोहोचलीं. तेव्हां रामानें सुमंत्रास आपल्या पित्यास आपण आल्याची वर्दी देण्याविषयीं सांगितलें. सुमंत्राने महालांत प्रवेश करून, खग्रास

झालेल्या सूर्याप्रमाणें अथवा राखेनें झांकलेल्या अग्नीप्रमाणें निस्तेज दिसणाऱ्या व निश्चेष्ट पडलेल्या राजासमोर उभें राहून व हात जोडून प्रार्थना केली:——'महाराज, तुमचा पुत्र पुरुषव्याघ्र राम आपलें वित्त ब्राह्मणांस दान करून आपल्या द्वारीं उभा आहे. वनवासास जाण्यापूर्वी आपल्या सर्व मित्रांचा निरोप घेऊन तो आतां आपला निरोप घेण्याकरितां आला आहे, तर त्याला दर्शनास येण्याची परवानगी असावी.'' सत्यवाक् धर्मात्मा दशरथ हें वाक्य ऐकून क्षोभ पावला नाहीं.कारण आकाशाला कधींही कंप सुटत नाहीं किंवा गंभीर समुद्र खळबळला तरी मर्यादेबाहेर जात नाहीं.त्यानें शांतपणानें म्हटलें:–"बा सूता,माझ्या प्रिय पुत्रास सर्व स्त्रियांसहवर्तमान मी भेटूं इच्छितों.तर माझ्या सर्व स्त्रिया व माझीं सर्व माणसें बोलावून आण.सर्वांना माझ्या धर्ममेरु पुत्राचें दर्शन घेऊं दे. '' अशी आज्ञा होतांच सुमंत्रानें सर्व राजस्त्रियांस व राजपुत्रांस बोलावून आणिलें.कौसल्यादिकरून सर्व राजस्त्रिया व वसिष्ठादि सर्व सुहृज्जन राजाज्ञेने कैकेयीच्या महालात आले. तेव्हां दशरथानें सुमंत्रास रामास बोलावण्यास सांगितलें; रामानें लक्ष्मण व सीता यांसहवर्तमान महालात प्रवेश केला; आणि तो दुरूनच हात जोडून राजापुढें येऊं लागला, तों दशरथ राजा रामास पाहताच उठून त्याला आलिंगन देण्याकरितां पुढें धावला. परंतु शोकानें व दुःखानें विव्हल झाल्यामुळें मध्यंतरींच तो मूर्च्छा येऊन पडला ! रामानें व लक्ष्मणानें पित्यास उठवून पर्यंकावर बसविलें व तीं तिघें त्याच्यासमोर उभीं राहिलीं. तिघांच्याही डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा चालल्या होत्या. 'हा रामा–'म्हणोन सर्व स्त्रियांनीं दुःखोद्गार काढून आपल्या डोळ्यांना पदर लाविले. तेव्हां दुःखध्वनि भूषणध्वनीसहित त्या महालांत भरून गेला. दशरथ शुद्धीवर येतांच राम म्हणाला:—"महाराज ! मी आपला निरोप घेतों. आम्हां सर्वांचे आपण प्रभु आहात. मला दंडकारण्यांत जाण्याची परवानगी देऊन आशीर्वाद द्या. लक्ष्मणालाही परवानगी असावी. ही सीता माझ्याबरोबर येत आहे, तिला येऊं द्या.यांना मीं पुष्कळ सांगितलें, परंतु तीं माझ्याबरोबर येण्याचा आग्रह सोडीनात. आम्ही सर्व आपलीं लेंकरें आहोंत. सर्व शोक सोडून आम्हास जाण्याची आज्ञा असावी. '' असें म्हणून पित्याची आज्ञा काय होते, हें ऐकण्याकरितां उत्कंठेनें पित्याच्या मुखाकडे राम पाहूं लागले. शेवटीं दशरथ राजानें हळूहळू बोलण्यास आरंभ केला–" रामा, कैकेयीनें वरदान घेऊन

मला मोहित करून सोडिलें आहे, तर मला बंधनांत टाकून तूंच 'अयोध्येचें राज्य कर." हें ऐकून रामास फार दुःख झालें व धर्मनिष्ठ व वाक्यकुशल रामानें नम्रतेने उत्तर दिलें:-" आज हजारों वर्षें आपण अयोध्येचें उत्तम-प्रकारें राज्य केलेंत; आपल्याहून अयोध्येला अधिक चांगला राजा कोण मिळेल ! आपली प्रतिज्ञा सत्य करण्याकरितां मी आनंदानें वनवासास जातों. मला खरोखर राज्याची मुळींच इच्छा नाहीं.नऊ आणि पांच चौदा वर्षें आपल्या आज्ञेप्रमाणें वनांत विहार करून मी पुनः आपल्या चरणांस स्पर्श करीन,यांत संदेह नाहीं.तर आपण मला निःशंक मनानें आज्ञा द्या." हें ऐकून दशरथ म्हणाला:-" बा रामा, जा; अरण्याला तूं जा; सर्वप्रकारें तुझी वृद्धि होवो. तुला कोठूनही कष्ट प्राप्त न होवोत. आणि तुझे मार्ग नेहमीं कल्याणप्रद असोत. पण माझी एक विनंति ऐक. आजचा दिवस तरी येथें रहा. आजचे दिवसभर तुझें दर्शन घेऊन आम्ही आईबाप कांहीं-तरी तृप्त होऊं. तूं आज आमच्या येथें सर्व सुखें भोग; तुझी जी इच्छा असेल ती तृप्त करून मग तुला उद्यां सकाळीं आम्ही वनवासाला पाठवूं. तर ऐवढें माझें ऐक; आज येथेंच रहा. " रामानें उत्तर केलें:-" महा-राज, मी आतांच वनांत जाण्यांत जे गुण, जो लौकिक व जी सत्य-प्रातिज्ञता आहे ती मला उद्यां कोण देणार आहे ! आपण कैकेयीला जे वर दिले आहेत ते पुरे पुरे द्यावेत अशी माझी प्रार्थना आहे. आपल्या मनांत कोणताही किंतु येऊं देऊं नका. मी खरोखर राज्याची इच्छा करीत नाहीं आणि माझी कोणतीच इच्छा अतृप्त राहिलेली नाहीं. महा-राज, आपण असें दुःख करून अश्रू गाळूं नका. सर्व नद्यांचा पति महा-सागर कधींही क्षोभ पावत नाहीं. माझी हीच परम इच्छा आहे कीं आपलें वचन सत्य व्हावें, खोटें पडूं नये. मी आपल्या पायांची व सुकृताची शपथ घेऊन सांगतों, मला दुसरी कोणतीच इच्छा नाहीं. आणि आमच्याविषयीं आपण किमपिही काळजी करूं नका. आम्ही हरिणानीं भरलेल्या व अनेक पक्ष्यांच्या मधुर शब्दांनीं गजबजलेल्या वनामध्ये आनंदानें राहू." हें भाषण ऐकून दशरथ निरुत्तर झाला. परंतु आपल्या पुत्रास आलिंगन देऊन तो दुःखानें पुनः निश्चेष्ट पडला! कठोर कैकेयीखेरीज तेथें जमलेल्या सर्व स्त्रिया रडूं लागल्या; सुमंत्रही रडूं लागला. सारांश, तें सर्व गृह शोकानें भरून गेलें ! ( अयो० स० ३३-३५ ).

वचनानें बद्ध झालेल्या दशरथास कांहींच बोलतां येईना. शेवटीं त्यानें सुमंत्राला म्हटलें:—" सर्व चतुरंग सेना तयार करा आणि ती रामचंद्रास पोंचवावयास जाऊं द्या. " तेव्हां रामानें विनंति केली:—" महाराज, मला वनांत मुनिवृत्तीने रहावयाचें आहे. माझ्या अनुयात्रेकरितां सेना कशाला पाहिजे ? वनवासाला योग्य अशा वस्तु म्हणजे कुदळ, फावडीं, व वल्कलें हीं मला मिळालीं म्हणजे पुरे आहे. " हे शब्द ऐकतांच निर्लज्ज कैकेयीनें स्वतः वल्कलें आणून सर्वांसमक्ष रामापुढें ठेविलीं. रामानें आपलीं सूक्ष्म वस्त्रें सोडून लागलींच तीं मुनिवस्त्रें धारण केलीं. तसेंच लक्ष्मणानेंही पित्यासमक्ष आपलींही उंची वस्त्रें बदलून तापस वेष धारण केला. परंतु गरीब बिचारी सीता ! तिला नित्य रेशमी शालूच नेसणें ठाऊक. तिच्या पुढें आणून ठेविलेलीं तीं वल्कलें कशीं धारण करावीं हें तिला समजेना. जशी एखादी हरिणी जाळें समोर पसरलेलें पाहून संत्रस्त होते, त्याप्रमाणें ती घाबरून गेली व तीं वल्कलें उचलून वेड्यासारखी तीं हातांत फिरवीत अश्रुपूर्ण नेत्रांनीं आपल्या पतीकडे पाहून ती म्हणाली:—" काय करावें बाई ! वनांतल्या मुनींच्या स्त्रिया वल्कलें कशीं नेसतात, हें मला ठाऊक नाहीं."असें म्हणून ती आतां मूर्च्छा येऊन खालीं पडते कीं काय असें भासूं लागलें. एक वल्कल गळ्याशीं व दुसरें पोटाशीं धरून ती परम लज्जित होऊन खालीं मान घालून रडूं लागली. परंतु इतक्यांत रामानें लागलींच पुढें जाऊन तिच्या रेशमी वस्त्रावरच तिच्या गळयाशीं त्या वल्कलास गांठ देऊन तें बांधिलें. स्वतः रामास सीतेच्या गळ्याभोंवतीं वल्कलें बांधतांना पाहून अंतःपुरांतील सर्व स्त्रियांच्या नेत्रांतून घळघळ अश्रु वाहूं लागले. त्या सर्वांनीं त्यास म्हटलें:—" रामा, सीता वनवासाचीं दुःखें सहन करण्यास योग्य नाहीं. हिला बिचारीला तापस वृत्ति काय ठाऊक ? रामा, आमची प्रार्थना ऐक. सीतेला येथच राहूं दे. " परंतु रामाने त्यांचें बोलणें मनावर घेतलें नाहीं आणि सीतेच्या गळयाभोंवतीं वल्कलाची गांठ बांधलीच. सीतेला वल्कलें नेसतांना पाहून कुलगुरु वसिष्ठ यानाही फार वाईट वाटलें; आणि सीतेला तीं टाकून देण्यास सांगून ते कैकेयीस म्हणाले:—" हे अतिप्रमत्ते कैकेयी ! हे कुलपांसिनी देवी ! राजाला फसवूनही तुझी तृप्ति होत नाहीं आणि मर्यादा सोडून असलीं कृत्ये करतेस ! हे दुःशीले ! सीता वनाला जाणार नाहीं, इतकेंच नव्हे तर येथें राहून रामाच्या ऐवजीं

राज्य करील. कारण स्त्रियाही पुरुषांचा आत्माच आहेत. जो पुरुष आपल्या बायकोचा यथायोग्य संग्रह करतो त्याच्या ठिकाणीं ती तशीच पूज्य आहे आणि सीता वनवासास जाईल तर तिच्या बरोबर आम्ही आणि हे सर्व नगरवासीही जातों. सर्व राष्ट्र, सर्व परिच्छदासह सर्व अमात्य, सर्व अंतःपाल व देशाच्या सीमेचे रक्षणकर्ते जेथें राम सीतेसह जाईल तेथें जातील; किंबहुना भरतही शत्रुघ्नासह वल्कलें धारण करून जेथें राम असेल तेथें जाईल. मग तूं खुशाल या शून्य नगरीमध्यें निश्चल झाडांना घेऊन राज्य कर. दुष्टे, जेथें राम नसेल तें राष्ट्र कधींही टिकणार नाहीं. जेथें राम राहील तेथें अरण्य असलें तरी थोडक्या वेळांत आनंदानें भरलेलें राष्ट्र होईल. जर भरत दशरथाचा पुत्र असेल तर पित्यानें केवळ जबरदस्तीनें दिलेलें यौवराज्य तो कधींही भोगणार नाहीं किंवा तुला माता म्हणूनही मानणार नाहीं; जरी तूं आकाशपाताळ एक केलेस तरी तो तुझें ऐकणार नाहीं; आणि आपल्या कुलाला कधींही कलंक लावणार नाहीं. तर हे दुष्टे ! हें एकंदर कृत्य मूर्खपणानें आपल्या मुलासाठीं व्यर्थ केलें आहेस. कारण रामावर ज्याची भक्ति नाहीं असा एकही मनुष्य तुला सांपडावयाचा नाहीं; मग भरताची गोष्ट कशाला ? आजच पहा. समग्र अयोध्या रामाबरोबर वनवासाला जाईल. झाडेंसुद्धां रामाकडे आपलीं तोंडे फिरवतील. रामाला तूं वनवासाला पाठविलेंस आणि त्याबरोबर सीतादेवीचाही छळ करतेस, हा केवढा तुझा दुष्टपणा आहे ? तर असें करूं नकोस. वेडे, आपल्या या पतिपरायण सुनेस उत्तमोत्तम अलंकार दे, आणि हीं वल्कलें परत घेऊन जा. ” असें म्हणून वसिष्ठांनीं सीतेजवळचीं वल्कलें काढून घेतलीं.

वसिष्ठाचें तें भाषण ऐकून दशरथास फार वाईट वाटलें. त्यानें कैकेयीचा धिक्कार करून म्हटलें:—“ हे चांडाळणी ! रामानें कदाचित् तुझा अपराध केला असेल, पण या सीतेनें तुझें काय केलें आहे ! रामाला वनवासाला पाठवूं दिलेंस तेवढें पातक पुरे आहे.आणखी अन्य पातक कशाला करतेस ? तुझें मागणें पूर्वी कबूल केलें त्याप्रमाणें तुला दिलें. आतां मैथिलीचा व्यर्थ छळ करून नरकाला जावयाचें आहे काय ? सुमंत्रा, आण, उत्तमोत्तम वस्त्रें आण, अलंकार आण, आणि ही परमोदार राजकन्या आपल्या भर्त्याबरोबर वनाला जात आहे,तरी हिला वस्त्रालंकार देऊन आपण

धन्य होऊं." असें म्हणून त्यानें आपल्या सुनेस वर्षें मोजून वनवासांत लागतील तितकीं वस्त्रें आणि अलंकार दिले, तेंव्हा रामचंद्र, सीता आणि लक्ष्मण यांनीं दशरथाच्या पायांवर डोकें ठेविलें आणि त्यांस प्रदक्षिणा घालून त्यांचा शेवटचा निरोप घेतला. रामानें जातांना पित्यास हात जोडून विनंति केलीः— "महाराज, ही माझी वृद्ध माता कौसल्या माझ्या विरहानें शोकसागरांत पडेल, हिचा आपण सांभाळ करा. ही तुमची निंदा करणार नाहीं. आणि हिला अपमान सहन होणार नाहीं." असें म्हणून त्यानें मातेचाही निरोप घेतला. इतक्यांत अश्रुपूर्ण नयनांनीं दशरथ सुमंत्रास म्हणालाः—"सुमंत्रा, रथ तयार कर आणि रथांत बसवून रामाला देशाच्या हद्दीपर्यंत पोचीव. आम्ही मातापितरें आपल्या वीर व साधु पुत्राला व्यर्थ हद्दपार करीत आहोंत. त्यांत गुणवंताचा एवढा तरी सत्कार होवो. बाबा, सुमंत्रा, उत्तम घोडे जोडून त्वरित रथ घेऊन ये." त्या आज्ञेप्रमाणें रथ तयार होऊन येतांच राम पित्यास नमस्कार करून बाहेर पडला. लक्ष्मणानें आपल्या मातुश्रीचा निरोप घेतला, तेंव्हां ती वीरमाता म्हणालीः—"लक्ष्मणा, **दशरथाचे ठिकाणीं रामास समज. माझे ठिकाणीं सीतेला समज आणि अयोध्येच्या ठिकाणीं अरण्य समज** म्हणजे तुला कोणतेंही दुःख होणार नाहीं. खुशाल वनाला जा." (अयो० स० ३६–४०).

राम, लक्ष्मण व सीता वाड्याबाहेर पडून रथात बसलीं. रथामध्यें सीतेचीं वस्त्रें व अलंकार, आयुधे, खड्ग, चर्म वगैरे नेऊन ठेविलीं आणि सुमंत्रानें घोड्याना चाबूक लाविला. रथ चालूं लागला तों हजारों लोक रथाला चारी बाजूंनीं बिलगले. जसा जसा अति तान्हेला मनुष्य पाण्याकरतां धावतो, त्याप्रमाणें रामाच्या दर्शनाकरितां स्त्रिया, मुले व वृद्ध माणसे यासह सर्व अयोध्या नगरी धांवली! कोणी रथाला पुढून, कोणी मागून, कोणी बाजूंनीं लोंबकळूं लागल्यामुळे रथ चालेनासा झाला!

"सुमंत्रा, घोड्याच्या दोऱ्या ओढून धर; आम्हाला रामाचें मुख एकदां पाहूं दे. कैकेयीचें हृदय दगडाचें आहे; कारण कीं ती अशा सत्पुत्राला वनाला धाडीत आहे. धन्य! धन्य सीता देवी! आपल्या भर्त्याबरोबर छायेप्रमाणें चालली आहे!" इत्यादि विलाप करीत प्रजाजन, रथाबरोबर धांवूं लागले. इतक्यांत दशरथ राजा, 'रामा, एकवार तुला पाहूं दे,' असें म्हणत स्त्रीजनांसह अन्तःपुराच्या बाहेर धांवत आला. राम जोंपर्यंत समोर

उभा होता तोंपर्यंत त्याच्या वियोगाचें दुःख दशरथाला भासलें नाहीं, पण राम रथांत बसून गेला, हें ऐकतांच त्याच्या हृदयांत विरहाग्नीनें पेट घेतला आणि तो महालाच्या बाहेर पडला. शेंकडो पौरजन रथाला झोंबताहेत, हें पाहून तर त्याचें दुःख दुप्पट झालें आणि त्यानें ' शिव शिव ' म्हणोन धाडकन् देह टाकिला! रथाच्या मागें दूर आक्रोश झालेला ऐकून रामानें मागें पाहिलें, तों पित्याची करुणमूर्ति त्याच्या दृष्टीस पडली! तेव्हां आता काय करावें हें त्यास सुचेनासें झालें. शेवटीं सुमंत्रास ' रथ हांक ' म्हणोन त्यानें म्हटलें; पण ' सुमंत्रा, थाब ' म्हणून लोक ओरडले. सुमंत्राला दोन्ही गोष्टी करणें अशक्य झालें. रामाच्यानें आपल्या मागें पायीं येणाऱ्या मातापितरांकडे पाहवेना. ' सुमंत्रा, जलदी रथ हांक ' असें त्यानें मोठी काकळूत करून सुमंत्रास सांगतांच रथ चालूं झाला. जशी एखादी नवीन व्यायलेली गाय कोणीं आपल्या वत्साला ओढून नेत असता हंबरडा फोडीत त्याच्या मागें धांवते, त्याप्रमाणें रामाची माता ' रामा थाब ' म्हणोन रथामागें धावली! दशरथ राजा, जोंपर्यंत रथ दिसत होता तोंपर्यंत रथावर दृष्टि देऊन रथामागें जात होता. शेवटीं अमात्यांनीं विज्ञाप्ति केली:—' महाराज, ज्यानें लवकर परत यावें अशी आपली इच्छा असेल त्याला पोंचविण्यास फार दूरवर जाऊं नये. ' असें म्हणून जबरदस्तीनें त्या मातापितरांस त्यांनीं थांबवून धरिलें. शेवटीं रथ दिसेनासा होतांच दशरथ राजा मूर्च्छा येऊन रस्त्यांतच पडला. शोकानें संतप्त झालेल्या कौसल्येनें धुळीनें भरलेल्या आपल्या पतीस सांवरून बसविलें. तेव्हां सद्गदित शब्दानें राजानें हळूच म्हटलें:—" मला कौसल्येच्या मंदिरांत घेऊन चला, मला दुसरें कोठेंही शांति मिळणार नाहीं. " तेव्हां परिचरांनीं राजास हळूहळू कौसल्येच्या मंदिरात नेऊन शयनावर ठेविलें. त्या मंदिरात पोंचतांच दशरथाचें चित्त अधिकाधिकच भ्रांत होऊं लागलें. " हा रामा, सरतेशेवटीं आम्हांस टाकून गेलास ना! " असें म्हणून उंच स्वरानें तो रडूं लागला. " धन्य ते लोक! जे तुझें मुख तूं १४ वर्षांनीं या नगरांत परत आल्यावर पाहतील! धन्य सीता देवी! आणि पुत्र लक्ष्मण! त्यांना माझ्या रामाचा निरंतर सहवास घडत आहे. " असें म्हणून वारंवार श्वास टाकीत दशरथ राजा शोक करूं लागला. इतक्यांत संध्याकाळ होऊन रात्र झाली. मध्यरात्रीच्या सुमारास दशरथानें हात पसरून म्हटलें:— " कौसल्ये, तुझें रूप मला दिसत नाहीं. तूं मजजवळ आहेस ना? माझ्या

पाठीवर हात फिरीव. कौसल्ये, माझा जीव, माझी दृष्टि, हीं रामाच्या मागें गेलीं तीं अद्याप परत येत नाहींत ! हा दुष्टे कैकेयी ! तूं माझी बायको नव्हेस व मी तुझा आजपासून पति नाहीं. तुझे आप्तही माझे आप्त नव्हेत. दुष्टे ! रामास वनवासास पाठवून माझें असें वैर साधलेंस !" इत्यादि नानाप्रकारचे विलाप करण्यांत आणि कौसल्येचे त्यांजहून कष्टतर विलाप ऐकण्यांत त्या वृद्ध दशरथाची रात्र गेली. ( अयो० स० ४१–४४ ).

इकडे रामचंद्रानें पौरजनाचें कसेंबसें समाधान करून रथ चालूं केला, तरी त्याच्या मागें अनेक विद्वान् ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य जातच होते. त्यांस पाहून रामास फार दुःख झालें व रथांतून उतरून तो पायीं चालूं लागला. तेव्हां ब्राह्मणांनीं त्याच्यावर आपलीं वाजपेययज्ञाचीं छत्रें धरिलीं. लोकांचें सर्व प्रकारें समाधान करीत जातां जातां संध्याकाळच्या सुमारास तमसा नदी लागली, तेव्हां 'आतां येथेंच मुक्काम करूं,' असें म्हणून रामानें सुमंत्रास घोडे सोडण्याची आज्ञा केली. रात्रीं सर्व लोकांनीं संध्यादि कर्में आटोपून केवळ जलपान केलें. सुमंत्रानें रामाकरितां पर्णांची शय्या तयार केली. पहाटेच्या सुमारास रामानें लक्ष्मणास जागा करून म्हटलें:—" हे बिचारे प्रजाजन झाडांखालीं निजले आहेत. हे उठले नाहींत तोंच आपण रथांत बसून निघून जाऊं, म्हणजे ते अयोध्येस परत जातील, नाहीं तर जाणार नाहींत." हें ऐकून सुमंत्रानें लागलाच रथ सज्ज केला; आणि तिघेही मोठ्या पहाटेस निघाले, ते त्वरित गतीनें दूर निघून गेले. अनेक गांवांच्या दूर दूर हद्दी आणि अनेक सुगंधी पुष्पांनीं भरलेलीं वनें मागें टाकीत ते चालले. रथाचे घोडे अतिवेगानें चालले होते, तरी आपण सावकाशच जातों आहों असें रामास बरोबर आलेल्या प्रजाजनांच्या धास्तीनें वाटे. याप्रमाणें, सूर्योदयापासून पुष्कळ दूर गेल्यावर त्यांस वेदश्रुति नावाची पवित्र नदी लागली. तेथें स्नानसंध्यादि कर्में आटोपून ते पुनः चालूं लागले. शीतवहा नदी ओलांडून नंतर गोमतीच्या तीरावर हजारों गाई चरत होत्या तेथें ते पोहोंचले. गोमतीचें विस्तीर्ण पात्र ओलांडून दक्षिण दिशेकडे धनधान्यादि समृद्ध अशा कोसल देशांतून ते चालले. कोणाचेंही भय नसल्यामुळें गावढे गावचे लोक आनंदित, संपन्न, समृद्ध व संतुष्ट दिसत होते; ठिकठिकाणीं चैत्ययूपें दिसत होते; मोठमोठ्या आम्रवृक्षांच्या राया पाहात, पाण्यानें भरलेल्या तळ्यांच्या बाजूंनीं हृष्टपुष्ट जनांचे नमस्कार घेत तीं चाललीं असतां शेवटीं हजारों गाईंच्या कळपांनीं

वेळोवेळीं थांबविलेला त्यांचा तो रथ सायंकाळच्या सुमारास रमणीय कोसल देशांतून बाहेर पडला. तों थोडक्याच वेळानें ऋषिगणांनीं सेवन केलेलें त्रिपथगा भागीरथीचें पवित्र पात्र दिसूं लागलें. इतक्यांत शृंगवेर पुराजवळ सुमंत्राचा रथ आला. तें एका निषादाचें लहानसें संस्थान होतें. तेथें रामाचा प्रियसखा गुह राज्य करीत होता. त्यास बातमी लागतांच तो आपल्या वृद्ध अमात्यांसह रामास सामोरा आला. " सुमंत्रा, या पुष्प-फळांनीं भरलेल्या इंगुदी वृक्षाखालीं आज आपण मुक्काम करूं. "म्हणोन रामाची आज्ञा होतांच सुमंत्रानें त्या झाडापाशीं रथ नेला आणि घोडे सोडून, त्यास पाणी पाजून, त्यांची चाकरी केली व त्यांस जव खावयास दिलें. इकडे रामलक्ष्मणांनीं सायंकाळची संध्या करून पुनः नुसतें जलपान केलें. नंतर सुमंत्रानें व लक्ष्मणानें रामाची शय्या करून दिली. नंतर लक्ष्मणानें रामाचें व सीतेचें पादप्रक्षालन केलें व आपण दूर एका वृक्षाखालीं सुमंत्राशीं भाषण करीत पहारा देत बसला. गुहानेंही त्यांजबरोबर सर्व रात्र जागून काढली. रामचंद्राचें अद्भुत आत्म-संयमन, दशरथाचा म्हातारचळ, कैकेयीचा दुष्टपणा, पौरजनांचें प्रेम इत्यादि गोष्टींचें वर्णन लक्ष्मणाच्या तोंडून गुह मोठ्या उत्सुकतेने ऐकत होता. प्रातः-काळ होताच रामानें लक्ष्मणाला हाक मारिलीः-" लक्ष्मणा, ऊठ. रात्रीचा समय संपला. हे पहा, कृष्णकोकिल बोलूं लागले. रानात मयूरांचा ध्वनि ऐकूं येत आहे. आपण लौकर गंगा उतरून पार होऊं. " नंतर दोघेही वीर प्रातःकर्में आटोपून चर्म, खड्ग व धनुष्यबाण घेऊन सिद्ध झाले; आणि हळूहळू गंगेच्या किनाऱ्याकडे चालले. गुहाचे लोक नांव घेऊन तयार होतेच. इतक्यांत सुमंत्रानें पुढें होऊन हात जोडून विनंति केलीः-" राजपुत्रा, मी काय करावें याबद्दल मला आज्ञा व्हावी. " रामानें म्हटलेः-" सुमंत्रा, तूं येथून आता परत जा आणि अयोध्या नगरास जाऊन माझ्या वृद्ध, आर्य व जितेंद्रिय पित्याला माझा नमस्कार सांगून हा माझा निरोप सांग,-' महाराज, आम्ही वनास जात आहों याबद्दल किंवा अयोध्यानगरी आम्हांस अंतरली याबद्दल मला व लक्ष्म-णाला यत्किंचित् दुःख होत नाहीं. आम्ही चौदा वर्षें वनवास पुरा करून पुनः आपले चरणांचें दर्शन घेण्यास परत येऊं. आपण यत्किंचितही काळजी करूं नका. ' अशी राजास विज्ञप्ति करून मग माझ्या माता कौसल्या व सुमित्रा व तशीच कैकेयी या सर्वांचें समाधान कर, आणि मी खुशाल आहें, व आपले चरण वंदन करितों म्हणून त्यांना सांग. भरत आला म्हणजे माझ्यातर्फे

त्याला आलिंगन देऊन माझा त्याला असा निरोप सांग कीं,"राजाची व सर्व मातृजनांची काळजी घे. तातांचें जें जें प्रिय असेल ते तें करीत जा आणि राज्याचें काम लक्ष लावून कर म्हणजे उभयलोकांत तुला सुख प्राप्त होईल." याप्रमाणें निरोप ऐकत असतांना सुमंत्र रडूं लागला व हात जोडून म्हणाला:— "रामा, मी आपल्या बरोबर येतों;मला परत धाडूं नका."तेव्हां सुमंत्राचीही रामानें समजूत करून म्हटलें:-"सुमंत्रा,तूं परत न गेलास तर कैकेयीचें समाधान होणार नाहीं. राजाची प्रतिज्ञा सत्य झाल्याबद्दल तिची खात्री करण्यास तुझें परत जाणें अवश्य आहे.तर तूं माझ्यासाठीं परत जा. माझ्याविषयीं तूं काळजी करूं नकोस."याप्रमाणें सुमंत्राचें समाधान करून नंतर राम गुहास म्हणाले:— " आतां यापुढें आम्हांस निर्जन अरण्यांत राहणें आहे. तेव्हां मुनिजनांस योग्य असा विधि केला पाहिजे.याकरिता वडाचें दूध घेऊन ये; म्हणजे जटा-धारण करून नंतर आम्ही वनवासाला आरंभ करून पित्याचें वचन पूर्ण करूं." अशी आज्ञा होतांच गुहानें वडाचा पांढरा चीक एका भांड्यांत काढून आण-विला. तो आपल्या हातानें केंसास लावून रामानें आपल्या डोक्यावरच्या केंसांच्या जटा केल्या व लक्ष्मणाच्याही केंसास तो चीक लावून त्याच्या मस्त-कावर जटाभार रामानें स्वतः रचला ! याप्रमाणें वल्कलें धारण करणारे व जटाबद्ध केशांचे ते राजपुत्र महान् तपस्वी ऋषिपुत्रांप्रमाणें शोभूं लागले. नंतर त्वरा करून राम गंगेच्या तीरावर पोंचले आणि प्रथम सीतेला नावेंत बसवून नंतर दोघे बंधु नावेवर चढले. कोळ्यांस निषादाधिपति गुहाची आज्ञा होतांच त्यांनीं ती नाव हाकारली. थोड्याच वेळानें कोळ्यांनीं झपाट्यानें वल्ही मारून नाव परतीरास पोंचविली.नंतर नाव चांगल्या जागीं लावल्यावर,राम, लक्ष्मण व सीता तींतून उतरलीं व त्यांनीं आपल्या वनांतील प्रवासास आरंभ केला. "लक्ष्मणा,तूं पुढें चाल; सीता मध्यें चालेल व मी तुम्हा दोघांचें रक्षण करीत मागून चालतों. आज सीतेला वनवासाच्या दुःखाचा खरा अनुभव येईल. शेत-वाड्या, बाग आतां दिसणार नाहींत.मनुष्य क्वचित् नजरेस पडेल, सपाट भूमि आतां पहावयास नको; आतां वनाचें खरें स्वरूप समजेल. " इत्यादि भाषणांनीं सीतेचें सांत्वन करीत राम चालूं लागले. कांहीं वेळानें तिघांसही अतिशय भूक लागली. त्यास दोन दिवसांचें खडखडीत उपोषण होतें. रामानें जातां जातां चार मेध्य मृग मारून आणिले आणि एका मोठ्या वृक्षाखालीं वसति केली. संध्याकाळची वेळ झाल्यामुळें त्या दिवशीं

तेथेंच त्यांनीं मुक्काम केला. सायंसंध्या करून रामलक्ष्मणांनीं जमिनीवरच पर्णांची शय्या करून निजण्याची तयारी केली. " वस्तीचा प्रदेश सोडून निर्जन अरण्यांत ही आपली पहिलीच रात्र आहे, तेव्हां सावध राहिलें पाहिजे. " असें म्हणून राम, लक्ष्मण, सीता, हीं अयोध्येच्या गोष्टी फार वेळपर्यंत बोलत बसलीं;कैकेयी दशरथाचा प्राण घेईल कीं काय! आपल्या मातुश्रीला किती दुःख झालें असेल ! अभागी कौसल्या माझ्या विरहानें आपल्याला वनवासाहून परत आल्यावर जिवंत भेटेल काय ! मी किती अभागी पुत्र आहे कीं, मला मातेस असें दुःख द्यावें लागत आहे, वगैरे अनेक प्रकारचे विलाप करीत त्यांनीं ती रात्र घालाविली.

प्रातःकाळीं उठून त्रिवर्ग पुनः मार्गक्रमण करूं लागलीं. अनेक रमणीय स्थळें पहात पहात दोन प्रहर उलटल्यानंतर त्यांना भरद्वाज ऋषींचा आश्रम दुरून दिसूं लागला. गंगा-यमुनांच्या संगमावर म्हणजे प्रयाग-क्षेत्रीं हा आश्रम होता. दुरूनच गंगेच्या आणि यमुनेच्या ओघाचा एकमेकांवर आदळण्याचा पवित्र आवाज त्यांच्या कर्णी पडूं लागला. तेव्हां रामचंद्रानें म्हटलें:—"लक्ष्मणा, हा पाण्याच्या दोन ओघाच्या आदळण्याचा आवाज ऐकूं येत आहे तो ऐक. या निबिड झाडींतून हा धूर निघत आहे, तेव्हां आपण खचित भगवान् भरद्वाज ऋषींच्या आश्रमापाशीं येऊन पोहोंचलों आहों. " थोड्या वेळानेंच आश्रम अगदीं जवळ आला. ऋषींनीं आणलेले लांकडांचे भारे दिसूं लागले. मृग व पक्षी रामलक्ष्मणांचे धनुष्यबाण पाहून भीतीनें रस्ता सोडून जाऊं लागले. निरनिराळ्या लहान लहान पर्णकुटिका दिसूं लागल्या. थोड्याच वेळानें आश्रमापाशीं पोहोंचून शिष्याकरवीं भरद्वाज महर्षीस आपली वर्दी दिल्यानंतर राम, लक्ष्मण व सीता यांनीं आश्रमांत जाऊन भरद्वाज मुनींस नमस्कार केला. रामानें आपलें नांव व हकीगत सांगितली तेव्हां भरद्वाजऋषींनीं त्यांचा मधुपर्कानें आदर करून त्यांना नानाविध वन्य फळें व अन्नरस खावयास दिले आणि त्यांची तेथें उतरावयाची सोय केली. नंतर भरद्वाज ऋषि म्हणाले:—"रामा,तुला पाहिल्यास कित्येक वर्षें झालीं.तुला वनवास कां झाला,याचें कारण मला यापूर्वींच कळलें आहे. तरी तुला सुख वाटल्यास येथेंच वनवासास रहा; किंवा येथून दहा कोसांवर यमुनेच्या पलीकडे चित्रकूट म्हणून पर्वत आहे, तेंही रम्य स्थान गंधमादन पर्वताप्रमाणें पवित्र आहे. जोंपर्यंत चित्रकूट पर्वताचीं शिखरें नज-

रेस पडतात तोंपर्यंत मनुष्याचें मन नेहमीं पवित्र आणि कल्याणकारक विचारांनीं भरलेलें असते. त्याला मोह प्राप्त होत नाहीं. तें ठिकाण एकांतांतही आहे, तेव्हां तेथें राहून तुला सुख होईल, किंवा हेंही प्रयागाचें स्थान रम्य व पवित्र आहे, येथें रहा." रामचंद्रानें म्हटलें,–" भगवन् ! हें ठिकाण अयोध्येला फार जवळ आहे, मला येथे राहणें शक्य दिसत नाहीं." याप्रमाणें कांहीं वेळ भाषण झाल्यानंतर श्रान्त झालेल्या त्या त्रिवर्गांनीं त्या दिवशीं तेथेंच मुक्काम केला.

पहाटेस भरद्वाजऋषींनीं रामलक्ष्मणांस जागें करून त्यांच्या निघण्याची तयारी केली व मोठ्या प्रेमानें त्यांचें स्वस्त्ययन केलें. " रामा, येथून गंगायमुनाच्या संगमावर जाऊन यमुनेच्या कांठानें पश्चिमाभिमुख जा म्हणजे जेथें नदी पश्चिमवाहिनी झाली आहे, तेथें उतार आहे. उतरण्याच्या घाटाची वाट मळलेली दिसेलच. तेथें नदी उतरून पुढें जा, म्हणजे एक अत्यंत हिरवागार वटवृक्ष लागेल. तेथेंच विश्रांति घे अथवा तसाच पुढें जा. या रस्त्यानें कित्येक वेळा मी चित्रकूटास गेलों आहें. हा रस्ता सुगम असून गहन अरण्य सोडूनही आहे." याप्रमाणें रस्त्याची माहिती देऊन भरद्वाज ऋषि मागें फिरले. ते राजपुत्र व ती राजकन्या ऋषिनिर्दिष्ट मार्गानें जातां जातां सांगितलेल्या कालिंदीच्या तीर्थावर पोहोंचली. नंतर रामलक्ष्मणांनीं नदी उतरण्याकरितां प्लव तयार केला. वाळलेल्या लांकडांची एक मोळी करून तिला उशीर गवताच्या दोऱ्यांनीं बांधून व चांगली आंवळून त्यांनीं ती पाण्यांत लोटली. तिच्यावर सीतेला बसण्याकरितां एक लहान लहान फांद्यांची वर पल्लव पसरून बैठक तयार केली. मग रामचंद्रानें, किंचित् लाजून खालीं मान घालणाऱ्या आपल्या प्रिय सीतेस आपल्या हातांनीं उचलून त्या प्लवावर बसविलें आणि आपलीं हत्यारें व तिचीं वस्त्रें तिच्याजवळ ठेवलीं. नंतर त्या दोघां वीरांनीं पाण्यांत शिरून व त्या प्लवाचे दोन्ही टोंकाला धरून पोहत पोहत तो नदीपलीकडे नेला. नदीच्या मध्यभागीं सीतेनें कालिंदी नदीची अशी प्रार्थना केलीः–"आई यमुने, तुझ्या प्रसादानें माझा भ्रतार चौदा वर्षांचा वनवास संपवून खुशाल परत आला म्हणजे मी तुझी षोडशोपचारानीं पूजा करीन." असो; त्या दोघां वीरांनीं मोठ्या हौसेनें आणि सावधपणानें तो प्लव पलीकडच्या किनाऱ्यास लावल्यावर सीतेस खालीं

उतरविलें व नंतर तीं तिथें मार्ग चालूं लागलीं. चालतां चालतां भरद्वाजानें सांगितलेला वटवृक्ष त्यांस लागला. नंतर पुष्कळ मेध्य मृग मारून त्यांनीं आपला चरितार्थ केला. त्या दिवशीं त्यांनीं तेथेंच मुक्काम केला. दुसरे दिवशीं सकाळीं स्नानसंध्यादि कर्मे आटोपून त्यांनीं मार्ग क्रमण्यास आरंभ केला, तों थोड्याच वेळानें चित्रकूट पर्वत दिसूं लागला. तेव्हां राम आनंदानें सीतेस म्हणाले:-" कमलपत्राक्षे! हे पहा सर्व वृक्ष कसे फुलांनीं भरून गेले आहेत. या फुललेल्या मधुक वृक्षावर जणूं काय दिवे लागले आहेत! हे किंशुक वृक्ष तर रक्तपुष्पांनीं किती सुशोभित दिसत आहेत! हे पहा, दुसरे वृक्ष फळांनीं कसे लवले आहेत! या पुष्पफलांनीं भरलेल्या वनांत आपली उपजीविका सहज चालेल. हीं पहा, मोठमोठ्या कड्यांवर घागरघागर मध निघेल अशीं मधमाश्यांचीं पोळीं लोंबत आहेत! या सुंदर प्रदेशांत फुलांचा जणूं काय बिछाना पसरलेला आहे! इकडून नत्यूह पक्षी बोलत आहे; त्याला दुसऱ्या बाजूनें मयूर प्रत्युत्तर देत आहे! हा चित्रकूट पर्वताचा सर्वांत उंच भाग पहा. येथें हत्तींचे मोठाले कळपही दिसत आहेत. सीते, आपण या पर्वतावरील एखाद्या रम्य व गर्द झाडींत सपाट जागा पाहून तेथें मोठ्या आनंदानें राहूं." असें म्हणत म्हणत तीं चित्रकूट पर्वताजवळ येऊन पोंचलीं. तेथें वाल्मीकि ऋषींचा आश्रम होता. तेथें प्रथम जाऊन त्यांनीं वाल्मीकि ऋषींना नमस्कार केला. महर्षींनीं मोठ्या आनंदानें आणि प्रेमानें त्यांचें आदरातिथ्य केलें. नंतर राम लक्ष्मणाला म्हणाले:-" लक्ष्मणा, चांगलीं चांगलीं बळकट लांकडें आणून आपल्याकरितां पर्णकुटी तयार कर. या ठिकाणीं वास करावा असें मला फार वांटतें. ही जागा मला आवडली आहे." नंतर सौमित्रानें ताबडतोब लांकडें तोडून आणून व एक सपाट जागा पाहून तेथें पर्णशाला उभी केली. ती दृढ आणि सुंदर अशी पर्णकुटी पाहून रामानें लक्ष्मणाची प्रशंसा करून म्हटलें:—" लक्ष्मणा, आज एक मृग मारून आण. या पर्णशाळेचें वास्तुशमन आजच करूं. आजचा दिवस फार चांगला आहे." याप्रमाणें आज्ञा होतांच लक्ष्मणानें मृग मारून आणल्यावर रामचंद्रानें त्याचें यथासांग हवन करून वास्तुशांति केली; व तीं त्रिवर्ग त्या झोंपडींत आनंदानें शिरलीं. तेथें सर्व प्रकारची सोय करून रामानें योग्य ठिकाणीं अग्नीच्या व देवांच्या स्थानांची व्यवस्था केली. याप्रमाणें त्या रम्य चित्रकूटपर्वतावर माल्यवती नदीच्या कांठीं पर्णकुटिकेंत तीं मोठ्या

आनंदानें राहूं लागलीं व अयोध्येंतून आपल्याला काढून दिल्याचें दुःख तीं अगदीं विसरून गेलीं. ( अयो० स० ५४–५६ ).

गंगेतून रामलक्ष्मण सीतेसह नावेनें पलीकडे जात असतां, सुमंत्र आणि गुह अश्रुपूर्ण नयनांनीं त्यांच्याकडे पाहात होते; नाव पलीकडे पोंचून तीं त्रिवर्ग किनाऱ्यावर उतरून दिसेनाशीं झालीं, तरीसुद्धां त्यांच्यानें जागेवरून हालवेना. राम कदाचित् माझें स्मरण करील अशा व्यर्थ आशेनें सुमंत्र दोन दिवस गुहाचे घरीं राहिला. शेवटीं निषादाकडून त्यास बातमी लागली कीं, राम प्रयागीं भरद्वाज मुनीस भेटून, पुढें यमुना पार होऊन, चित्रकूट पर्वतावर जाऊन राहिले आहेत, तेव्हां मोठ्या दुःखानें रथाला घोडे जुंपून व गुहाचा निरोप घेऊन अश्रु ढाळीत सुमंत्र परतला. तो दुसरे दिवशीं संध्याकाळीं त्यास अयोध्या दिसूं लागली. चारी बाजूंनीं शून्य अशी त्या नगरीची अवस्था पाहून व स्वतांचेंही अंतःकरण शोकानें ग्रस्त झालेलें असल्यामुळें रामाच्या विरहदुःखाग्नीनें हत्ती, घोडे, लोक, राजा, यासहित सर्व अयोध्या जळून खाक झाली नाहीं ना, असें त्यास वाटूं लागलें. तेव्हां घोड्यांस चाबूक मारून मोठ्या त्वरेनें नगरद्वारांतून तो येऊन पोहोंचला. आंत शिरतांच त्याचा रथ पाहून शेंकडों नरनारी पुढें धावल्या, आणि " सुमंत्रा, रामाला कोठें सोडलेंस ? " म्हणून दीन स्वरानें विचारूं लागल्या तेव्हां " गंगेच्या किनाऱ्यावर त्यांना पोहोंचविल्यावर राम, लक्ष्मण व सीता पलीकडे गेलीं, नंतर त्यांची आज्ञा घेऊन मी परत आलों." असें म्हणतांच सर्व "हा धिक् ! धिक् ! राम गंगापार झाले, " असें ओरडून शोक करूं लागले. सुमंत्राच्यानेंही शोक आवरेना. त्यानें डोळ्यांला पदर लावून मोठ्या मुष्किलीनें रथ राजवाड्यापाशीं नेला. नंतर रथाखालीं उतरून, वाड्यांत शिरून व सात चौक ओलांडून तो पलीकडे गेला. चोहींकडे अन्तःपुरांतील स्त्रिया ' सुमंत्र एकटाच परत आला, ' असें म्हणत त्याजकडे दीन मुखानें व अश्रुपूर्ण नयनांनीं पाहत होत्या. शेवटीं आठव्या चौकांतील पांडुरगृहांत पुत्रशोकानें कृश व दीन झालेल्या राजासमोर जाऊन व त्याला प्रणाम करून त्यानें रामाचा निरोप त्यास सांगितला. तो निरोप कांहीं—एक शब्द न बोलतां राजानें ऐकून घेतला. शेवटीं शोकाचा आवेश दुःसह होऊन " हे राम ! " असें म्हणून दशरथ राजा मूर्च्छित होऊन खालीं पडला. तेव्हां अंतःपुरामध्यें एकदम कल्लोळ झाला. सर्व स्त्रिया

बाहू वर करून शोक करूं लागल्या. सुमंत्र व कौसल्या या दोघांनीं मोठ्या कष्टानें राजास बसविलें; नंतर त्याला कौसल्या म्हणाली:— " महाराज, हा दूत दुष्कर काम करणाऱ्या रामाचा निरोप घेऊन आला आहे; त्याच्याशीं आपण कांहीं तरी कां बोलत नाहीं ? प्रथम हा भयंकर अपराध करून आतां आपण असें दुःख कां करितां ? जिच्या भीतिस्तव रामचंद्राची आपण कांहीं हकीकत विचारीत नाहीं ती कैकेयी येथें नाहीं. आपण कांहींही शंका न धरतां बोला. " असें म्हणतांना खुद्द कौसल्येला शोकाचा आवेश येऊन तीही मूर्च्छा येऊन खालीं पडली. तो दुःखसागर त्या महालांत उचंबळलेला पाहून सूतानें मोठ्या मुष्किलीनें दोघांचें समाधान केलें. "सूता, आम्हांला रथांत घालून रामाकडे घेऊन चल; नाहींतर आमचे प्राण राहात नाहींत. " असें दशरथ म्हणत असतांना सुमंत्रानें त्यास विनंति केली:—" महाराज, राम आपली प्रतिज्ञा आनंदानें पाळतो आहे. आज वनवासांत त्याजला कांहीं दुःख नाहीं. सीताही रामाचा बाहू धरून अरण्यातलीं फुलझाडे पहात व फुलांचीं नांवें विचारीत आनंदाने फिरत आहे. सिंह व वाघ यांसही पाहून तिला भीति वाटत नाहीं. तरी आपण संताप करूं नका. चौदा वर्षें वनवास भोगून राम, लक्ष्मण व सीता सुखरूप परत येऊन आपल्या चरणांना वंदन करतील. " इत्यादि प्रकारें त्यांचें सांत्वन करून सुमंत्र निघून गेला; पण त्या सांत्वनाचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तीं मातापितरें सारखा विलाप करीत एकमेकांचें दुःख दुणावीत होतींच ! मध्यरात्रीच्या सुमारास दशरथ राजा कौसल्येस सांगूं लागला:—" देवी कौसल्ये, मला आतां लहानपणची एक गोष्ट आठवली. मी त्या वेळेस लहान होतों. तुझें लग्नही झालें नव्हतें. एके दिवशीं वर्षाऋतूंत सूर्य दक्षिणेस गेला असतां उष्मा नाहींसा होऊन पाण्यानें भरलेले मेघ आकाशांत फिरूं लागले. तेव्हां बेडूक, मोर, इत्यादिकांस आनंद झाला. पक्षीही पुष्कळ दिवसांनीं स्नात होऊन पंख चिंब झाल्यानें मोठ्या मुष्किलीनें उडूं लागले. वृक्ष, पाणी आणि वारा यामुळे, तृप्त होऊन गेले. जिकडेतिकडे जलमय दिसूं लागलें. डोंगरावरून पांढरेतांबडे असे पाण्याचे लांब ओघ भस्म लागलेल्या सर्पांप्रमाणें लोंबूं लागले. अशा त्या आनंददायक वेळीं धनुष्यबाण घेऊन व रथांत बसून मृगया करण्याकरितां मी शरयू नदीच्या बेहड्यांत शिरलों.

रात्रीची वेळ होती. पाणी पिण्याला एखादा हत्ती, किंवा रानरेडा, किंवा दुसरें कोणी जनावर पानवठ्यावर येईल, असें मनांत आणून अंधारांत शरसंधान करून मी बसलों होतों. इतक्यांत पाण्याची घागर भरण्याचा 'गुड् गुड्' असा आवाज माझे कानीं आला. तेव्हां एखादा हत्ती पाणी पीत आहे, असें मला वाटलें. अशा समजुतीनें शब्दाचा वेध घेऊन अंधारांत मीं बाण नेमका मारला. तों "हा! मेलों!" असा शब्द ऐकूं येऊन, कोणी तरी मनुष्य पाण्यांत पडलें आहे, असें मला वाटलें. तेव्हां मोठ्या दुःखानें व भीतीनें जवळ जाऊन पाहिलें, तों एक जटाधारी विव्हळ होऊन पडला आहे, असें दिसलें. नंतर तो म्हणाला:—"माझ्यासारख्या वनांत राहणाऱ्या मुनीला मारणें, हें तुला उचित आहे काय? माझी गोष्ट राहूं दे. मला माझ्या मरणाविषयीं दुःख वाटत नाहीं; पण माझे वृद्ध आणि अन्ध मातापितर जवळच्या आश्रमांत आहेत, त्यांचें मीं आजवर पोषण केलें; त्यांची माझ्यावांचून काय स्थिति होईल?" हे शब्द ऐकतांच माझ्या हातून धनुष्यबाण गळून पडले. शेवटीं तो मुनिपुत्र म्हणाला:—"ही पायवाट माझ्या पित्याच्या आश्रमाला जाते. त्या वाटेनें हें भांडें भरून घेऊन जा, आणि माझ्या तान्हेल्या पितरांना पाणी पाज. पण माझ्या अंगांतून हा बाण प्रथम ओढून काढ; कारण मला फार दुःख होत आहे." तेव्हां मीं त्याच्या अंगांतून बाण ओढून काढला. त्याबरोबर त्या तपस्व्यानें प्राण सोडले! तेव्हां तर मला अतिशय दुःख झालें. निरुपायानें त्याच्या सांगण्याप्रमाणें मीं त्याचा घट भरून घेतला, आणि त्या आश्रमाकडे गेलों. माझे पाय वाजतांच तो वृद्ध मुनि म्हणाला:—"पुत्रा, इतका कां बरें वेळ लावलास? मला आणि तुझ्या मातेला फार तहान लागली आहे. ये, लवकर ये; आणि आम्हांस पाणी पाज. तूं आमचे कधींही हाल केले नाहींस. तुझ्यासारखा सुपुत्र भाग्यानें आम्हांस लाधला आहे." हे त्याचे शब्द माझ्या हृदयाला बाणाप्रमाणें टोंचले! परंतु नाइलाजास्तव धैर्यानें पुढें जाऊन, "मी क्षत्रिय दशरथ आहें! अंधारांत चुकून माझ्या हातून तुमच्या मुलास बाण लागून तो गतप्राण होऊन पडला आहे. भगवन्, मला क्षमा करा. आणि मीं हें पाणी त्याच्या सांगण्यावरून आणलें आहे, हें आपण घ्या." हें माझें वज्रासमान कठिण भाषण ऐकून तो मुनि 'हा! पुत्र!' म्हणोन निश्चेष्ट पडला. थोड्या

वेळानें सावध होऊन तो मला म्हणालाः—" हे क्षत्रिया, मला तूं आपल्या तोंडानें ही हकीकत न सांगतास तर तुझें शिर सहस्रधा भिन्न झालें असतें. असो, जें झालें तें झालें. आतां आम्हांस जेथें आमचा मुलगा मरून पडला आहे तेथें घेऊन चल." अशी आज्ञा होतांच मी त्यांस शरयूच्या कांठीं घेऊन गेलों व शवापाशीं नेऊन त्यांस पुत्राचा स्पर्श करविला. तेव्हा त्या वृद्ध मातापितरांनीं जो शोक केला, तो कोठवर सांगूं! मुलाचे गुण वारंवार आठवून, " हे पुत्रा, तूं उत्तम गतीला जाशील. तुझा अपराध नसतांना बाणानें तुझा प्राण गेला आहे. समरांगणांत समोर घाव खाऊन मरणारे वीर ज्या सद्गतीला जातात त्या गतीला तूं जाशील. आमची मात्र आतां जिवंत राहण्याची आशा व्यर्थ आहे. हे राजा, तुझ्या हातून ह्या न जाणून घडलेल्या पातकाबद्दल तुला शाप दिल्यावांचून राहवत नाहीं. जशीं आम्ही पुत्रशोकानें मरत आहों, त्याप्रमाणें तूंही ' हे पुत्रा ! हे पुत्रा ! ' म्हणून आक्रोश करून मरशील." असा घोर शाप देऊन तीं वृद्ध मातापितरें चितेवर जळून मरण पावलीं ! त्या मुनीच्या त्या शापाचें मला आतां स्मरण झालें. कौसल्ये, माझ्या डोळ्यांपुढें अंधेरी येत आहे. मला धरून बैस. हे पुत्रा ! हे पितृवत्सला रामा ! तूं आम्हांस सोडून गेलास ! आतां तुझें सुंदर मुख आमच्या कसें दृष्टीस पडेल ! धन्य सीता ! धन्य लक्ष्मण ! तीं माझ्या रामाची वनांत सेवा करीत आहेत. पुत्रशोकानें, कौसल्ये, माझा जीव जाऊं पाहत आहे. मला आपल्या हातानें स्पर्श कर. रामा ! तुझ्याशीं जें मीं वर्तन केलें, तें पित्याला योग्य नसून तूं माझ्याशीं जें वर्तन केलेंस, तें मात्र सत्पुत्राला उचित होय. धन्य ! धन्य ते लोक ! ते देवांहूनही धन्य होतील, कीं जे माझ्या सत्पुत्राला अरण्यांतून १४ वर्षांच्या वनवासाची प्रतिज्ञा संपवून परत आलेला पाहतील. पण माझें तसें भाग्य कोठें आहे ? कौसल्ये, तेल संपलेल्या दिव्याच्या वाती जशा तडतड करितात, त्याप्रमाणें मोहानें माझें हृदय तटतट तुटत आहे. कौसल्ये, हें पुत्रवियोगाचें दुःख, नदीवेग जसा घसाला पाडून टाकतो, त्याप्रमाणें मला घेऊन चाललें ! हे महाबाहो रामा, हे पितृप्रिया रामा, माझ्या नाथा रामा, कोठें गेलास ? मला भेट दे. हा कौसल्ये ! हा सुमित्रे ! हा दुष्टे कुलपांसिनी कैकेयी, माझ्या रामाला कोठें पाठविलेंस ? रामा ! बाळा रामा ! हा पुत्रा ! " इत्यादि प्रकारें विलाप

करीत प्रिय पुत्राची आठवण सहस्र वेळ करून कंठ शोषून गेलेल्या त्या दुःखी वृद्ध दशरथानें अर्धरात्र उलटल्यानंतर प्राण सोडले ! ! ( अयो० स० ५७–६४ ).

वारंवार मूर्च्छा येणाऱ्या दशरथ राजाजवळ कौसल्या आणि सुमित्रा या होत्या. परंतु त्यांनाही विलाप करितां करितां ग्लानि आली होती व दशरथाचा प्राण गेला तेव्हां कोणीही शुद्धींत नव्हती ! नित्याप्रमाणें पहाटेस बंदिजन राजास उठविण्यास आले. परिजनांनीं चंदनोदकानें भरलेले सुवर्णाचे घडे स्नानाकरितां रोजच्याप्रमाणें आणून ठेविले. दासी महालांत शिरून कौसल्येस जागी करून राजासही त्या जाग्या करूं लागल्या; तों राजाची कांहींच हालचाल दिसेना. शेवटीं कोरड्या पडलेल्या समुद्राप्रमाणें किंवा शांत झालेल्या अग्नीप्रमाणें दिसणाऱ्या त्या राजास पाहून कौसल्येनें ‘ हा महाराज ! ’ म्हणोन हंबरडा फोडला. तेव्हा सुमित्रादि सर्व स्त्रिया रडूं लागल्या. वाड्यांत एकच कल्लोळ झाला. राजगृहांत उत्सव नाहींसा होऊन तें एकदम भयाण दिसूं लागलें. चोहोंकडे लोक दीनवदनानें फिरूं लागले. शोकानें कृश झालेली कौसल्या राजाचें डोकें मांडीवर घेऊन म्हणूं लागलीः—“ हे कैकेयी घे, तुझ्या मनाची हौस पुरली ना ? आतां निष्कंटक राज्य भोग. हे दुष्टे, पापचारिणी ! तुला महाराज मेल्याचें कशाला दुःख होईल ? पण माझा मुलगा वनाला गेला आणि आतां माझे पतिही मरण पावले. आतां मी कोणाकरितां जिवंत राहूं ? स्त्रियांना पति हेंच दैवत. त्या पतीला मारून कैकेयीखेरीज कोणती स्त्री आनंद मानील ? आपण काय पातक करतों आहों, हें लोभामुळें मनुष्यास दिसत नाहीं. लोभानें मनुष्य अंध होतें. या लोभाच्याचमुळें कुब्जेच्या नादीं लागून कैकेयीनें रघुकुलाचा घात केला. रामा, दशरथ राजा तुझ्या शोकानें मरण पावला ही बातमी वनांत तुला कळली नाहीं; जर तुला कळली असती तर माझी अनाथाची तूं अशी उपेक्षा न करितास. आतां मला दुसरी कशाचीही इच्छा नाहीं. मी आपल्या भर्त्याबरोबर चितेवर आरोहण करून जळून जातें. ” असें म्हणून ती पतीच्या देहावर पडली. तेव्हां व्यवहारकुशल स्त्रियांनीं तिला जबरदस्तीनें धरून ओढून दुसरीकडे नेलें. सर्व शहरांत बातमी पसरून जिकडे तिकडे शोकार्त लोक रस्त्यांत बाहेर पडून राजवाड्यांकडे येऊं लागले. अमात्यही राजवाड्यांत जमा झाले. पुत्र असतांना पुत्राशिवाय प्रेतकार्य कसें करावें, या विवंचनेनें

अमात्यांनीं राजाचें प्रेत तेलानें भरलेल्या कढईत घालून ठेविलें. संध्याकाळ होऊन सर्वांची ती रात्र तशीच दुःखानें आक्रोश करण्यांत गेली.

प्रातःकाळ होतांच शहरांतील व राज्यांतील मोठे मोठे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, राजसभेत जमा झाले. राजाचे सर्व अमात्यही सभेत आले. तेव्हां पुढें काय करावें याचा विचार सुरू झाला. मार्कंडेय कश्यपादि ऋषि म्हणूं लागले:—" वसिष्ठा, कोणी तरी इक्ष्वाकुवंशांतील राजपुत्र शोधून काढून त्याला राजा करा. कारण राजाशिवाय राज्य राहाणें चागलें नव्हें. अराजक देशांत कोणी कोणाचें ऐकत नाहीं. पित्याचें पुत्र ऐकत नाहीं. भर्त्यांची बायको पर्वा करीत नाहीं. देशांत सर्व रीतीनें अंदाधुंदी माजते. कोणीही निर्धास्त फिरूं शकत नाहीं. सारांश, **योग्य आणि अयोग्य यांची निवड करणारा राजा जर देशांत नसेल तर सर्वत्र अंधेर माजेल.** कोणास कांहीं सुचणार नाहीं. " हें ऐकून वसिष्ठ ऋषि म्हणाले:—" दशरथाचें राज्य भरताला दिलें आहे. तो आपल्या मातुलगृहीं सुखानें आहे. त्याला इकडची हकीकत न सांगतां जलदीनें बोलावून आणावें, असें मला वाटतें. " तेव्हां, सर्वांनीं भरताला ताबडतोब बोलावून आणा, म्हणून संमति दिली. मग वसिष्ठांनीं शीघ्र जाणारे दूत निवडून काढून त्यांस भरतास बोलावून आणण्यास सांगितलें व आज्ञा केली कीं, " पुरोहित वसिष्ठ यांनीं तुला आशीर्वाद देऊन त्वरित बोलाविलें आहे; कांहीं जरूरीचें काम आहे, असें भरतास सांगावें. हीं उत्तम उत्तम वस्त्रें व अलंकार हीं भरताला द्यावीं व भरताकडून तीं त्याच्या मामाला व आजाला देववावीं. राम वनाला गेल्याची व राजा मरण पावल्याची त्यास हकीकत सांगूं नये. कारण असें केल्यास राघवकुलाचा नाश होईल. " कैकेयीचें लग्न झालें त्या वेळेस सर्व राज्य शुल्क म्हणून, तिला म्हणजे तिच्या बापाला—कैकेयकुळांत द्रव्य घेऊन कन्या देण्याची चाल असल्यामुळें—दशरथानें दिलें होतें. कदाचित् ही संधि साधून अश्वपति राज्यावर घाला घालील, अशी वसिष्ठांना भीति पडली होती. याप्रमाणें आज्ञा झाल्यावर ते दूत जवळच्या मार्गानें विश्रांति न घेतां घोडे मारीत निघाले. ते कैकेयराजा अश्वपति याची राजधानी गिरिव्रज अथवा राजगृह येथें तीन दिवसांत येऊन पोहोंचले; व त्यांनीं भरताची भेट घेऊन त्यास वसिष्ठ महर्षींचा निरोप सांगितला. भरतानें मोठ्या उत्कंठेनें " राजा कुशल आहे ना ! माझे प्रियबंधु

रामलक्ष्मण खुशाल आहेत ना ? माझी हट्टी माता कैकेयी काय म्हणाली ? माझी सावत्र माता आर्या कौसल्या व सुमित्रा या आनंदांत आहेत ना ?" इत्यादि प्रश्न विचारिले. तेव्हां दूतांनी सांगितलें कीं, " ज्यांच्या कुशलतेबद्दल तुला काळजी आहे ते कुशलच आहेत. तुला लक्ष्मी प्राप्त होत आहे तर त्वरा कर. रथ जोड. " तें दूतांचें सावधपणाचें द्व्यर्थी उत्तर ऐकून भरताचें समाधान झालें व त्यानें लागलींच आपल्या मामाचा व आजोबांचा निरोप घेतला व त्यांजला वासिष्ठांनीं पाठविलेले वस्त्रालंकार अर्पण केले निरनिराळ्या प्रकारच्या उंची शालजोड्या, उत्तम उत्तम घोडे, अति चपळ खेंचरें, अंतःपुरांत वाढविलेले, धिप्पाड शरीराचे, तीक्ष्ण दंष्ट्रांचे व वाघांशीं झगडणारे असे कुत्रे, उंच व बलाढ्य हत्ती आणि दशसहस्र सुवर्ण, इत्यादि अत्यंत मौल्यवान् वस्तु प्रीतीची देणगी म्हणून देऊन अश्वपतीनें त्याची व शत्रुघ्नाची बोळवण केली. भरत व शत्रुघ्न घाईनें व वेगानें राजगृहाहून निघाले, ते पूर्वदिशेनें चालले. त्याच्या बरोबर सैन्य असल्यामुळें त्यांस दूतांहून जरा दूरचा पण सरळ रस्ता घ्यावा लागला. सुदामा, ऱ्हादिनी, दूरपारा, ह्या पश्चिमवाहिनी नद्या उतरून शतद्रु नदीवर ते येऊन पोहोंचले. ती नदी, ऐळधानी नदी व अपर पर्वतापाशीं शिलानदी ओलांडून आग्नेय शल्यकर्षणास आले. तेथें स्नान करून पवित्र होऊन शिलावहा नदीचा चमत्कार पाहात डोंगराळ मुलुखांतून, चैत्ररथ वनांतून, सरस्वती—गंगासंगमीं ते पोहोंचले. सरस्वती उतरून उत्तरमत्स्याच्या भारुंड वनांतून पर्वतांनीं वेढलेली व वेगानें धांवणारी कुलिंगा नांवाची नदी उतरून यमुनेवर येऊन पोहोंचले. तेथें आपल्या सैन्याला त्यांनीं थोडीशी विश्रांति दिली. तेथें श्रांत झालेल्या अश्वांना धुऊन, पाणी पाजून व पाणी बरोबर घेऊन ते पुन्हां अरण्यात शिरले. ते अंशुधान गांवाजवळ भागीरथीवर येऊन पोंचले. तेथें नदीस उतार नव्हता, म्हणून प्राग्वट पुरावर येऊन ते भागीरथीपार झाले. नंतर कुट्टिकोटका उतरून धर्मवर्धन ग्रामीं आले. तोरणग्राम दक्षिणेस टाकून जम्बूप्रस्थावरून बरूथग्रामीं रम्य वनात थोडीशी विश्रांति घेऊन उजिहाना नगरीच्या प्रियक वृक्षांनीं भरलेल्या उद्यानांत पोहोंचले. तेथे आपले सैन्य ठेवून थोडक्या लोकांनिशीं भरत, शत्रुघ्न पुढे निघाले. अनेक नद्या ओलांडून, गोमती नदी विनत ग्रामीं उतरून, कलिंग नगराच्या सालवनांत पोंचले. त्याही वनाला झपाट्यानें मागें टाकून संध्याकाळच्या सुमारास मनूनें निर्माण केलेल्या अयोध्येजवळ येतांच पांढरी जमीन

दिसूं लागली. शून्य निःशब्द अयोध्येस पाहतांच भरताच्या पोटांत धस्स झालें आणि तो सारथ्याला म्हणालाः–"सूता,नेहमीं अयोध्येंत स्त्री–पुरुषांचा तुमुल नाद ऐकूं येतो, तो आज कां ऐकूं येत नाहीं ? शहराबाहेरील बागांत खेळण्याकरितां जाणाऱ्या येणाऱ्या लोकांची आज गर्दी मुळींच दिसत नाहीं. मोठमोठाले लोक रथांवर, घोड्यांवर, हत्तींवर बसून आंतबाहेर जातांना येतांना नेहमीं दृष्टीस पडतात, पण आज कोणींच दिसत नाहीं, हें आहे तरी काय ? माझे बंधुवर्ग सर्व खुशाल आहेत ना ? माझें हृदय गळून जात आहे." असें म्हणत आहे, तों नगरीच्या वैजयंती वेशीपाशीं रथ आला. द्वारपाळांनीं उठून व त्यास प्रणाम करून जयशब्दानें त्याचा सत्कार केला; तो स्वीकारून त्यांच्यासहित कष्टानें तो पुढें चालला; तों सर्व नगरी त्यास शून्य दिसली. रस्ते, चव्हाटे, बाजार, दरवाजे, निर्मनुष्य पाहून भरताला अति दुःख झालें. त्याच्या मनांत नानाप्रकारच्या वाईट कल्पना येऊं लागल्या. शेवटीं दीनमन होऊन व तोंड खालीं करून आपल्या पित्याच्या दुःखमय राजवाड्यांत तो शिरला. ( अयो० स० ६५–७१ ).

राजाच्या महालांत दशरथ राजा त्याला दिसला नाहीं. तेव्हां आपल्या मातेच्या महालात बहुधा राजा असेल, असें वाटून भरत मोठ्या त्वरेनें कैकेयीच्या महालात आला. कैकेयीनें त्यास पाहातांच मोठ्या आनंदानें सुवर्णाच्या पीठावरून उठून त्याचें स्वागत केलें. भरतानें मातेच्या चरणांवर डोकें ठेविलें; तेव्हां तिनें प्रेमानें त्याच्या टाळूचें अवघ्राण केलें. नंतर त्याला मांडीवर बसवून व पाठ कुरवाळून ती म्हणालीः—"बाळा भरता, तुझा आजा खुशाल आहे ना ? तुझा मामा युधाजित् कसा आहे ? तुला निघाल्यास किती दिवस झाले ? तुला मामानें काय दिले ?" वगैरे जें तिनें विचारलें त्या प्रश्नास यथायोग्य उत्तर भरतानें दिलें. नंतर त्यानें उत्सुकतेनें विचारलेंः—"आई,माझे पूज्य तात कोठे आहेत ? मी आलों आहें म्हणून त्यांना सांग. किंवा महाराज कौसल्येच्या महालांत गेले आहेत ?" हे त्याचें बिचाऱ्याचें अजाणपणाचें भाषण ऐकून राज्यलोभानें मोहित झालेली कैकेयी म्हणालीः––"बाळा भरता, महात्मा, सत्यसंध, तेजस्वी, अनेक यज्ञ करणारा व सज्जनांचा आधार असा तुझा पिता सर्व प्राणिमाण ज्या गतीला जातात त्या गतीस गेला." हें भयंकर वाक्य भरतानें ऐकतांच 'हा प्रिय ताता' म्हणून पितृशोकानें त्यानें धरणीवर आंग टाकलें."आई, मी कोणत्या

आशेनें आलों आणि हें काय ऐकतों ? मला वाटलें माझे पूज्य तात रामाला यौवराज्याचा अभिषेक करीत असतील किंवा एखादा यज्ञ करीत असतील म्हणून वसिष्ठ महर्षींनीं मला बोलाविलें आहे. तें सर्व मिथ्या झाले आणि माझें सदैव हित चिंतणारे तात मला सोडून स्वर्गास गेले ना ! आई, त्यांना झालें तरी काय ? धन्य माझे बंधु रामलक्ष्मण ! त्यांनीं मरणसमयीं वडिलांची सेवा केली, व त्यांचे हात त्यांना लागले. महाराज, आतां माझें शिर प्रेमानें कोण अवघ्राण करील ? माझ्या अंगावरून सुखस्पर्श असा हात कोण फिरवील? आई कैकेयी, माझे प्रिय बंधु राम हेच मला आतां पित्याप्रमाणें आहेत. त्यांचा मी दास आहें. मी आल्याची खबर त्यांना कळीव. ज्येष्ठ भ्राता आर्यांना पित्याच्या ठिकाणीं आहे. त्यांचे चरण मी वंदन करीन. आर्ये कैकेयी, माझे प्रिय तात मरतांना काय म्हणाले ? मला कांहीं शेवटचा निरोप त्यांनीं सांगितला आहे काय ? " तेव्हां कैकेयी म्हणाली:—" भरता, तुझा बाप ' हा राम ! हा सीते ! हा लक्ष्मणा ! ' असा आक्रोश करीत शोकानें मेला. कारण राजपुत्र राम सीतेसह वल्कलें धारण करून दण्डकारण्यांत वनवासाला गेला आहे. आणि लक्ष्मणही त्यांच्या बरोबर गेला आहे." याप्रमाणें एकाहून एक भयंकर वातम्या कैकेयी सागत गेली, तों तो भरताला अधिकाधिक दुःख झालें. तो म्हणाला:—" माते, रामाला हद्दपार करण्याला कारण तरी काय घडलें ? त्यानें कोणा ब्राह्मणाच्या धनाचा तर अपहार केला नाहीं ? किंवा कोणी निष्पाप गरीब अथवा धनिक मनुष्य मारला नाहीं ना ? किंवा कोण्या परस्त्रीवर रामानें डोळा ठेविला नाहीं ना ? काय झालें तरी काय ? सांग. कारण मला आपल्या कुलाचा मोठा अभिमान आहे. पण आमच्या कुळांत असे वाईट पुरुष उत्पन्न होत नाहींत. मग परम पवित्र व धार्मिक अशा रामाविषयीं शंका कशाला ? रामाला कोणत्या कारणासाठीं हद्दपार केलें ? माते साग, लवकर साग. " तेव्हां आपल्याला वृथा शहाणी समजणारी ती महामूर्ख कैकेयी आनंदानें म्हणूं लागली:— " भरता, नाहीं; रामानें हें कांहीं केले नाहीं. राम परस्त्रीकडे तर ढुंकूनसुद्धां पहात नाहीं. पण बाळा भरता, मीं हें तुझ्यासाठीं केलें आहे. महाराज रामाला यौवराज्याभिषेक करणार, असें मला समजताच पूर्वीं मला दिलेले दोन वर मीं राजापाशीं मागितले. एकानें रामाला वनवास मागितला, दुसऱ्यानें तुला युवराज करावें म्हणून मागितलें, ते सत्यसंध अशा

राजानें मला दिलें. तेव्हां राम पित्याच्या आज्ञेप्रमाणें लागलाच वनवासाला निघून गेला. आतां हें सर्व राज्य तुझ्या हातीं आलें आहे. तर तूं लवकर राजा हो. व्यर्थ शोकसंताप करूं नको. ही सर्व नगरी व हें समृद्ध राज्य आतां तुझ्या स्वाधीन आहे.''आपल्या बापाची सत्यनिष्ठता, रामाची पित्याची आज्ञा पाळण्याची निःसीम तत्परता व त्या दोघांवर त्यामुळें प्राप्त झालेला भयंकर प्रसंग व तोही आपल्याकरितां आपल्या मातुःश्रीनें आणिलेला पाहून भरताला परम दुःख झालें.त्यास घावावर घाव घातल्यासारखें झालें. दुःखानें संतप्त होऊन तो मातेस म्हणालाः—'' माते कैकेयी, तूं या कुलाचा नाश करण्याकरितां जन्मास आलीस असें वाटतें. माझ्या पित्यानें केवळ अग्नीचा गोळा आपल्या पोटाशीं धरिला होता, राम तुझ्या ठिकाणीं अगदीं कौसल्येसारखी प्रीति करीत होता, आणि कौसल्या माताही दूरवर दृष्टि पोंचवून तुझ्याशीं सख्ख्या बहिणीप्रमाणें वागत होती. तिच्या मुलाला वल्कलें नेसवून वनाला पाठवितांना तुला कसें दुःख झालें नाहीं ! आतां पराक्रमी रामलक्ष्मण येथें नाहींत, तर मी कोणाच्या आधारावर राज्य करूं ! माझी कदाचित् राज्य करण्याची शक्ति असली तरी,तुझे हे दुष्ट मनोरथ सिद्धीस न जावे, एवढ्याचकरितां मी हें राज्य घेणार नाहीं; तर माझे प्रिय ज्येष्ठ बंधु राम यांजला वनांतून परत बोलावून त्याना राज्य देईन व त्यांचा दास म्हणून मी आनंदानें त्यांच्यापाशीं राहीन. दुष्टे सर्पिणी, तुझ्या या कृत्यानेंच माझे तात मरण पावले.राम वनवासाला गेले आणि माझे कपाळीं हा अपयशाचा डाग लागला; तूं माझी माता नव्हस. तर हे नृशंसे, राज्यलुब्धे,पतिघातिनी,तूं माझी वैरीण आहेस. हे पापिणी, तुझ्या पापाचा मी वांटेकरी होणार नाहीं.जेव्हां पौरजन आंसवांनीं भरलेल्या डोळ्यानीं मजकडे बघतील,तेव्हां मी त्यांस काय सांगूं!तूं माझी माता नव्हस आणि मी हें राज्यही घेणार नाहीं.''असें म्हणून भरतशत्रुघ्न कौसल्येच्या महालाकडे धांवले. सतत रडून डोळे सुजलेल्या व जमिनीवर पडलेल्या त्या कौसल्येस पाहून भरतास रडे कोसळलें व त्यानें एकदम तिचे पाय धरिले ! तेव्हा कौसल्या दुःखाच्या आणि संतापाच्या आवेशात म्हणालीः—''भरता, तुला राज्य पाहिजे होते ना ? घे,तुझ्या आईने क्रूर कर्म करून तुला निष्कंटक राज्य मिळवून ठेविले आहे! पण माझ्या पुत्राला वल्कलें देऊन वनाला पाठविण्यांत कैकेयीला काय सुख मिळालें ! आता मला ही कैकेयी वनाला पाठवो; जेथें राम तपश्चर्या करीत आहे तेथें मी जात्यें. नाहीं तर भरता,तूंच

मला वनाला पोंचीव, आणि मग ही विस्तीर्ण धनधान्यसंपन्न भूमि आणि गजाश्वरथादि सर्व राज्य तूं खुशाल भोग. '' हे शब्द ऐकून भरताला व्रणावर मीठ घातल्यासारखें दुःख झालें. तो मोठ्या संतापानें व आवेशानें म्हणालाः— " माते कौसल्ये, मी निष्पाप आहें. मला कांहींच माहीत नाहीं. मला तूं व्यर्थ दोष देत आहेस. कारण माझी रामावर किती प्रीति आहे, हें तुला ठाऊक आहे. माझ्या संमतीनें जर रामचंद्र वनाला गेला असेल, तर मी लोकांचा दासानुदास होवो. ज्याच्या संमतीनें आर्य रामचंद्र वनाला गेला असेल त्याला निजलेल्या गाईला लाथ मारल्याचें किंवा सूर्याकडे तोंड करून लघुशंका केल्याचें पातक लागो. षड्भागापेक्षां जास्त करग्रहण करून प्रजारक्षण न करणाऱ्या राजाकडून जो अधर्म होतो तो त्याचे माथीं येवो. ज्याच्या संमतीनें आर्य रामचंद्र वनाला गेला असेल तो निर्लज्ज, तो अकृतज्ञ लोकांमध्यें छीःथू पावो. मोठ्या भयंकर संग्रामाच्या ठिकाणीं पळत असतांना तो मारला जावो. किंवा हातांत कपाल घेऊन सर्व पृथ्वीभर भिक्षा मागत तो उन्मत्तासारखा फिरो. '' याप्रमाणें भयंकर शपथा घेत दुःखानें अतिसंतप्त होऊन भरत धाडकन् जमिनीवर पडला. तेव्हां कौसल्येला त्या शोकांतच अधिक शोक झाला. तिनें त्याला मांडीवर घेऊन त्याचें तोंड कुरवाळून म्हटलें:—" बाळा भरता, तुझ्या अशा कठीण शपथा ऐकून माझें दुःख दुणावत आहे. तूं धर्मात्मा, सत्यप्रतिज्ञ आहेस. तुझें हृदय धर्मापासून पराङ्मुख होत नाहीं, हें महद्भाग्य होय. प्रिय भ्रातृवत्सला पुत्रा, तूं उत्तम लोकाला जाशील. '' असें म्हणून त्यास पोटाशीं धरून कौसल्या मुक्तकंठ रडूं लागली, व भरतही रडूं लागला. याप्रमाणें त्या मायलेकांचा शोक समुद्राच्या भरतीसारखा वाढूं लागला. आणि त्यांनीं ती सर्व रात्र दुःखांत काढिली. ( अयो० स० ७२–७५ ).

दुसरे दिवशीं सकाळीं वसिष्ठ ऋषि भरताला भेटण्यास आले. त्यांनीं त्याच्या दुःखाचे सांत्वन करून पित्याचें और्ध्वदेहिक करण्याविषयीं त्यांस सांगितलें. तें ऐकून धरणीवरून उठून वसिष्ठाच्या अनुमतानें राजाचें सर्व प्रेतकार्य त्यानें केलें. तेलाच्या कढईतून राजाचा देह काढून जमिनीवर ठेविला. त्या वेळेस केवळ झोप लागल्याप्रमाणें दशरथाची चर्या असून तोंड किंचित् पिवळें पडलें होतें. नंतर यथाविधि शवास स्नान घालून तें शिबिकेंत ठेविलें. प्रेताची स्मशानयात्रा चतुरंग सेनेसह निघाली. शवाच्यापुढें सोनें, चांदी व नानाप्रकारचीं वस्त्रें परिचारक उडवीत चालले. याप्रमाणें स्मशानांत पोंहोंचल्या-

वर चंदनकाष्ठांच्या चितेवर राजाचा देह ठेविला. नंतर चितेला सर्वांनीं प्रदक्षिणा घातल्यावर त्यास यथाशास्त्र मंत्राग्नि दिला. सामगांनीं साम गायिले. कौसल्यादि राजस्त्रियांनीं अत्यंत दुःखित होऊन फार शोक केला. शेवटीं सर्व लोक शरयूच्या तीरीं जाऊन त्यांनीं राजाला उदक दिलें! परंतु त्यांच्या डोळ्यांचें उदक खळलें नाहीं. दशरथाचे अनेक गुण आठवून रुदन करीत मंत्री, पुरोहित, राजस्त्रिया इत्यादि लोक नगरांत परतून राजवाड्यांत आले. दहा दिवस संपल्यावर अशौचाची निवृत्ति होऊन बारावे दिवशीं भरतानें श्राद्धें केलीं व ब्राह्मणांना धन, रत्नें, गाई, पुष्कळ अन्न व कांबळीं वगैरें वस्त्रें दिलीं. गज, दास, दासी, रथ, वेश्यादि दानेंही और्ध्वदेहिकनिमित्तानें केलीं. तेरावे दिवशीं सकाळचा समय झाला, तेव्हां स्मशानांत पित्याच्या चितेच्या ठिकाणीं भरत गेला, तेव्हां त्याचा शोक वाढून तो विलाप करूं लागला:— " महाराज, रामाच्या स्वाधीन आपण मला करणार तो राम तर अरण्यांत गेला. आतां मला टाकून कसें गेलांत ? कौसल्या माता पुत्रविहीन आहे. आपण तिला सोडून कसें गेलात ? " इत्यादि प्रकारें भरतानें अति शोक केला. शत्रुघ्नानेंही पित्याचे गुण आठवून फार शोक केला व दोघांनींहीं शोकाकुल होऊन धरणीवर अंगें टाकिलीं शेवटीं. वसिष्ठ ऋषींनीं त्यांचें समाधान करून त्यांस उठविलें व अवशेष अस्थींचा त्यांच्याकडून संचय करविला. नंतर सुमंत्रादि अमात्यांनीं त्या रडून रडून डोळे लाल झालेल्या राजपुत्रांस त्वरा करून स्मशानांतून राजवाड्यात आणिले. चौदावें दिवशीं सकाळीं शहरांतील प्रमुख प्रमुख ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य वगैरे लोक व अमात्य राजवाड्यांत सभेंत जमले व त्यांनीं भरताला अशी विनंति केली:—"भरता, राजा दशरथ आम्हांस सोडून स्वर्गास गेला. ज्येष्ठ पुत्र रामचंद्र लक्ष्मणासहित वनवासास गेला. तर तूं आतां आमचा राजा होऊन आमचें यथाशास्त्र पालन कर. " हे ऐकून भरतानें दुःखित होऊन उत्तर दिलें:—" राम आम्हां सर्वांत वडील. तोच तुमचा राजा होईल. मला मातेने पापानें मिळविलेलें राज्य नको. मी आतां वनांत जाऊन माझ्या प्रियबंधूस परत घेऊन येतों. " असें म्हणून सुमंत्रास त्यानें आज्ञा केली कीं, " चतुरंग सेना तयार करा आणि हें अभिषेकाचें सर्व साहित्य तयार ठेवा. मी रामाला घेऊन येण्याकरितां वनाला जाणार. सैन्याकरितां रस्ता तयार करा. " असें भरत म्हणत असतां सर्व सभासदांच्या डोळ्यांतून प्रेमाश्रू वाहूं लागले. " भरता, तुझा सदैव जय असो.

ज्येष्ठ भावाला तूं अनायासें मिळालेलें राज्य देत आहेस.तुझी धन्य आहे!" याप्रमाणें सर्वांनीं त्याची प्रशंसा केली. मग सर्व सेना सिद्ध जाहली. बेलदार वगैरे शिल्पकारांनीं रस्ता तयार केला. उंचनीच प्रदेश सपाट केला. सुतार,बढाई, झाडतोड्ये, यांनीं वेलीवृक्षादिकाच्या अडचणी काढून टाकल्या. आचारी, पाणके, वगैरे नोकरचाकर मंडळी पुढें रवाना झाली. थोड्याच दिवसांत सर्व तयारी होऊन रस्त्याच्या दोन्ही बाजूंनीं पताका लाविल्या.ठिकठिकाणीं सुंदर पुष्पांनीं युक्त अशीं झाडें लाविलीं आहेत व त्याजवरून अनेक पक्षी मधुर आवाज करीत आहेत, असा तो सेनेचा रस्ता शोभिवंत दिसूं लागला.जाताना ठिकठिकाणीं जेथें जेथें फौजेचे मुक्काम व्हावयाचे होते,तेथें तेथें भरताला राहण्याकरितां सुंदर प्रासादासारखे सेनानिवेश म्हणजे बंगले तयार झाले.याप्रमाणें गंगानदीपर्यंत रस्त्याची व्यवस्था झाली रस्ता तयार झाल्यावर निघण्याच्या दिवशीं प्रातःकाळीं सूत,मागध वगैरे बंदिजनांनीं विशेषस्तवयुक्त गीतांनीं भरताला जागें केलें. त्याचे भरतास दुःख होतें न होते तोंच गावभर व्यासाचा राजदुंदुभि सुवर्णाच्या काठीनें धमूधम् आवाजानें वाजूं लागला व शंखतूर्यादि जयवाद्येंही वाजूं लागलीं. ह्या आवाजानें भरताला दुप्पट दुःख झालें. त्यानें, " मी राजा नाहीं, वाद्ये वाजवूं नका, " असा हुकूम देऊन, ताबडतोब तयार असलेल्या रथावर आरोहण केलें आणि चतुरंग सेनेसह अमात्य, मंत्री, पुरोहितादिकांस बरोबर घेऊन व आपल्या दुःखी मातांस यानांत बसवून प्रयाणास आरंभ केला. सहस्रावधि लोकही मोठ्या उत्सुकतेनें रामाच्या दर्शनाकरिता निरनिराळ्या यानात बसून निघाले. याप्रमाणें तो लोकसमुदाय हळूहळू शृंगवेरपुरास पोहोंचला.त्या अफाट सैन्याला पाहून गुहास भीति उत्पन्न झाली कीं,रामाचा समूळ नाश करण्याकरितां हा भरत येत आहे कीं काय! असें वाटून त्यानें आपल्या लोकांस गुप्तपणें गंगेंत हत्यारबंद तयार राहण्यास सांगितलें व आपण अमात्यांसह भरतास सामोरा गेला. सुमंत्रानें भरताला पूर्व हकीगत सांगून त्याचा आदर करविला. तेव्हां भरताचा खरा अभिप्राय त्याला समजून आला. तेव्हां " अचानक हातांत आलेलें राज्य तूं रामचंद्रास परत देत आहेस, तेव्हां तुझ्यासारखा धार्मिक, भ्रातृभक्त पुरुष निर्माण होणार नाहीं." असें म्हणून भरताची त्यानें प्रशंसा केली. भरत मोठ्या दुःखानें म्हणाला:—" गुहा, मला दाखीव, रामचंद्र कोठें निजले होते ? त्यांनीं येथें काय खाल्लें? ते काय म्हणाले ? त्यांनीं रात्र

कशी काढली ? सगळें मला सांग.'' गुहानें त्या हिंगणबेटाच्या झाडाखालीं भरताला,त्याच्या अमात्यांना व त्या शोकार्त राजमातांस नेऊन रामाची व सीतेची ती शय्या दाखविली. व "मीं पुष्कळ पदार्थ त्यांना खाण्याकरितां आणले होते, परंतु ते त्यांनीं खाल्ले नाहींत. नुसतें भागीरथीच्या जलाचें पान करून त्यांनीं रात्र काढली. दुसरे दिवशीं वडाच्या चिकानें दोघांनीं आपल्या केसांच्या जटा केल्या आणि सकाळींच तीं तिघें गंगापार झालीं.'' वगैरे हकीगत त्यानें सांगितली. तेव्हां भरताचा शोक अनावर होऊन तो म्हणालाः—"धिक्कार असो मला, कीं माझ्याकरितां सर्वत्रैलोक्याधिपति रामचंद्र आणि जनकाची कन्या सीता यांस येथें जमिनीवर निजावें लागलें. सुवर्णाच्या पर्यंकावर उत्तमोत्तम आस्तरणांवर जो निजणारा त्याला भूमीवर निजावें लागलें, तेव्हां दैवाची गति विचित्र आहे. गुहा, आजपासून मीही जटावल्कलें धारण करून जमिनीवर निजेन आणि रामाला अयोध्येंत परत आणून त्याची वनवासाची बाकीची मुदत मीच वनांत काढीन ! '' असें म्हणून शोकसंतप्त झालेल्या भरतानें आपल्या केसांच्या जटा केल्या आणि उत्तम वस्त्रांचा त्याग करून वल्कलें धारण केलीं. ( अयो० स० ७६–८८ ).

दुसरे दिवशीं प्रातःकाळींच ती सर्व सेना गंगा उतरूं लागली. शेंकडों पताका लाविलेल्या नावा इकडून तिकडे जात होत्या. हत्ती नदी पोहून उतरले. घोडे, रथ, माणसें, हीं नावांवरून उतरलीं. याप्रमाणें समग्र सेना गुहाच्या निषादांनीं गंगापार केली. तेथून कूच करून सेनेसह हळूहळू भरत प्रयागीं पोहोंचला. भरद्वाजाश्रमापासून सेनानिवेश दूर करून भरद्वाज ऋषींच्या दर्शनास मंडळी पायींच निघाली. भरद्वाज मुनि वसिष्ठास पाहतांच आसनावरून ताडकन् उठून, 'शिष्यांनो, अर्घ्य ! अर्घ्य !' असें म्हणतच पुढें धांवले. यथाशास्त्र वसिष्ठाचा व भरताचा अर्घ्योपचारानें सत्कार करून भरद्वाजानें त्यांस आसनावर बसविल्यानंतर त्यांनीं शरीर, अग्नि, शिष्य, वृक्ष, मृग, पक्षी इत्यादिसंबंधीं अनुक्रमें भरद्वाजमुनींचें कुशल विचारिलें. कुशल वर्तमान सांगून भरद्वाज भरतास विचारूं लागले:—"भरता, तुला राज्य मिळालें असतां तें तूं सोडून येथें कां आलास,हें मला सविस्तर सांग,आणि माझी शंका निवारण कर.'' हें ऐकून भरत दुःखानें म्हणालाः—"भगवन्, आपणही जर माझ्याविषयीं साशंक असाल तर माझ्यासारखा हतभागी कोणी

नाहीं. मला आपण दोष लावूं नका. माझ्याबद्दल माझ्या आईनें जें कारस्थान केलें तें मला अगदीं मान्य नाहीं. मी त्यानें संतुष्ट झालों नाहीं आणि मी तिचें वचनही मानलें नाहीं आणि म्हणूनच मी पुरुषव्याघ्र राम याला परत नेण्याकरितां आलों आहें. मी त्याच्या पायां पडून, त्याला प्रसन्न करून परत घेऊन येतों." वसिष्ठ महर्षींनींही भरद्वाजऋषींची तशीच खात्री केली. तेव्हां ते म्हणाले:—"ज्या राघववंशांत तूं जन्म घेतलास त्या वंशाला योग्य असेंच तुझें हे आचरण आहे. वडिलांचे ठिकाणीं भक्ति, आपल्या तृष्णेचें नियमन आणि साधूचें अनुसरण करण्याची इच्छा, हीं तुझ्या ठिकाणीं दिसत आहेत; तुझ्याविषयीं माझी पूर्वी खात्री होतीच; तीच त्वां आतां दृढ केलीस. याकरितां माझ्या मनांत तुझा यथायोग्य सत्कार करावा असें आहे; तर आज येथें रहा. रामचंद्र चित्रकूटास रहात आहेत तेथें उद्यां जा." तेव्हां सर्वांनीं 'होय' म्हटलें. नंतर भरद्वाजऋषींनीं आपल्या तपाच्या प्रभावानें नवी सृष्टिच निर्माण केली ! रत्नखचित व सुवर्णादि धातूंनीं मंडित असे राजवाडे निर्माण केले. सुंदर बगीचे, स्पृहणीय जलानें भरलेले जलाशय, उत्तम उत्तम पक्वान्नांनीं भरलेलीं स्वयंपाकगृहें, हीं निर्माण करून व ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें ज्याला त्याला आसन, आच्छादन व वसतिस्थान देऊन, मंत्रि, पुरोहित, राजमाता व सकल सैन्य, यांसहवर्तमान भरताला त्यांनीं मेजवानी केली. दिव्य कनकपात्रांतून दिव्यान्नरस वाढले. त्या दिवशीं पूर्वी कधींही खाल्लीं नाहींत अशीं स्वादु पक्वान्नें सर्व लोकांनीं खाल्लीं. नंतर मोठ्या राजसभेंत सर्वांना हारतुरे व अत्तर दिलें. त्या वेळेस राजसिंहासन मांडलें होतें त्यावर न बसतां त्याजला भरतानें प्रदक्षिणा करून राजाचीं मोर्चेलें आपल्या हातीं घेतलीं. पानसुपारीही सचिवस्थानावर बसून घेतली ! तेव्हां सर्वांचीं अंतःकरणें सद्गदित होऊन त्यांना प्रेमाश्रु आले. असो; याप्रमाणें मेजवानी होऊन सर्व मंडळी रात्रभर त्या प्रासादांत राहिली. सकाळीं भरतानें भरद्वाजांच्या पायांवर डोकें ठेवून व त्यांच्या दिव्य पाहुणचाराबद्दल आपली कृतज्ञता दाखवून, त्यांस विनंति केली:—"भगवन्, मी रामास परत आणण्यास जात आहे, तर मजकडे आपण कृपादृष्टीनें पहावें." असें भरत बोलत आहे तों कौसल्यादि स्त्रिया भरद्वाजांच्या दर्शनास आल्या. त्यांनीं त्यांच्या चरणांवर मस्तक ठेविल्यावर भरद्वाजांनीं विचारल्यावरून सर्व मातुःश्रींचीं नांवें भरतानें सांगितलीं. तेव्हां भरतानें आपल्या आईची फार निंदा केली; त्या वेळेस

भरद्वाज ऋषि म्हणाले:-" भरता, तूं आईला दोष देऊं नकोस. तिनें रामाला वनवासाला पाठविलें हा एक जगतावर उपकारच केला आहे. रामाच्या वनवासापासून सर्व सृष्टीचें कल्याण होणार आहे." नंतर भरताला चित्रकूटाची वाट सांगून भरद्वाज ऋषि आपल्या आश्रमात गेले. (अयो० ८९-९२).

सांगितलेल्या रस्त्यानें जातां जातां भरत सैन्यासह चित्रकूट पर्वताजवळ पोहोंचला. त्या वनाची एकंदर शोभा व मंदाकिनीचें रम्य पात्र हीं पाहून व हाच चित्रकूट पर्वत असें जाणून, भरतानें सेनेला दूरच ठेविलें. नंतर एके ठिकाणीं धूर निघतांना दिसत होता, तेथेंच रामाची पर्णकुटिका असेल असा अंदाज करून भरत अत्यन्त उत्सुकतेनें शत्रुघ्नासह तडक निघाला, तो आश्रमाच्या सन्मुख येऊन पोहोंचला. इकडे रामचंद्र नित्याप्रमाणें आश्रमाच्या उंच ठिकाणावरून सीतेचें मन रिझवण्याकरितां व आपल्या चित्ताचेंहीं समाधान करण्याकरितां तिला वनाची व पर्वताची शोभा दाखवीत होते. राम म्हणाले:-" सीते, ह्या वनश्रीची शोभा पाहून मला वनवासाचें मुळींच दुःख होत नाहीं. नानाधातूंनीं भरलेले हे निरनिराळ्या पर्वतांचे उंच भाग पाहिलेस काय ? नानाप्रकारचे पुष्पांनीं व फळांनीं भरलेले वृक्ष येथें आहेत. ते पहा मंद मंद पाण्याचे झरे पडत असल्यामुळें हे पर्वतांचे कडे मदाचा स्राव करणाऱ्या हत्तीसारखे दिसतात. सीते, मी या वनांत अनेक वर्षे राहिलों, तरी मला अयोध्येची आठवण होणार नाहीं." पर्वतांवरून दृष्टि काढून व मंदाकिनी नदी दाखवून राम म्हणाले:-"ही पहा मंदाकिनी नदी, हंससारसांनीं हिचें वाळवंट कसें प्रफुल्ल दिसत आहे ! ठिकठिकाणीं हरिणांचे कळप पाणी पीत आहेत, कांहीं ऋषिजन स्नान करीत आहेत, कांहीं नदीकांठीं सूर्याकडे तोंड करून तप करीत आहेत; या नदीच्या कांठच्या डोंगरावर दाट वृक्ष असून ते वाऱ्यानें हालले, म्हणजे डोंगर जणूं काय मोराप्रमाणें नाचत आहे, असें वाटतें. चक्रवाक् पक्ष्यांचे मंजुळ आवाज कानीं येत आहेत. सीते, चित्रकूट पर्वताचें आणि मंदाकिनीचें दर्शन झालें म्हणजे शहरामध्यें राहणें व्यर्थ आहे, असें मला वाटतें." इतक्यांत अनेक मनुष्यांची गर्दी दिसली; तेव्हां राम लक्ष्मणास आश्चर्यानें म्हणाले:—" लक्ष्मणा, हे सैन्य भरताचें आहे असें वाटतें." तेव्हां लक्ष्मण तो सेनेचा भार पाहून रामाला मोठ्या त्वेषानें म्हणाला:—

" अरे, हा भरत अयोध्येचें राज्य पटकावून पुन्हां आम्हांस मारण्याकरितां सैन्याची चढाई करून येथें आला आहे ! निःसंशय भरताच्या पोटांत पाप आहे ! तो तर आमचा शत्रु झालाच आहे,तेव्हां त्याचा वध करणें सर्वथैव योग्य आहे. " लक्ष्मणाचें क्रुद्ध स्वरूप पाहून राम म्हणाले:—"लक्ष्मणा, भरताला राज्य द्यावयाचें अशी प्रतिज्ञा केल्यावर-आता त्याला ठार मारून आपल्यास काय प्राप्त होणार आहे ? शिवाय भरताला मारून राज्य संपादन केलें, तर भरतावांचून किंवा तुझ्यावांचून मला राज्य गोड लागेल कसें ? तुमच्यावांचून मला सुख होत असेल, तर तें अग्नि जाळून भस्म करो. मला वाटतें, लक्ष्मणा, भरत निष्पाप आहे, भ्रातृवत्सल आहे, तो कुलधर्म सोडणार नाहीं. माझ्या प्राणाहूनही मला भरत प्रिय आहे. तो बहुधा मला वनांतून परतविण्याकरितां येत आहे;शोकानें व्याकुळ होऊन भरत येत आहे, यांत शंका नाहीं. तर तूं त्याला निष्ठुर किंवा अप्रिय बोलूं नकोस; त्याला बोलशील तर मलाच बोललास, असें समज. " असें म्हणतांच लक्ष्मणाला फार लज्जा उत्पन्न झाली. मग लक्ष्मणाचें सांत्वन करून राम म्हणाले:— " लक्ष्मणा, बहुधा आपण दुःखांत आहों, असें समजून आपल्यास शहरांत परत नेण्याकरितां भरत येत आहे. किंवा अत्यन्त सुखांत राहण्यास योग्य अशा माझ्या प्रिय सीतेस माझा पिता बहुधा अयोध्येस परत घेऊन जाईल. हा पहा, वृद्ध ताताचा शत्रुंजय नांवाचा मोठा हत्ती सर्वांपुढें चालत आहे. पण त्याजबरोबर पित्याचें सर्वविश्रुत दिव्य पांढरें छत्र कोठें दिसत नाहीं ! तेव्हां मला मोठाच संशय आला आहे. कांहीं विपरीत तर झालें नाहीं !" अशीं भाषणें करीत व लक्ष्मण व सीता यांचें सांत्वन करीत राम उटजाच्या द्वारीं बसले होते. इतक्यांत त्याची ती जटाधारी, कृष्णाजिन पांघरलेली, वल्कलें परिधान केलेली, सिंहासारख्या स्कंधांनीं शोभिवंत दिसणारी,कमलासारखे डोळे असलेली अशी दिव्य मूर्ति भरतानें पाहिली. त्यास पाहतांच दुःख व मोह यांनीं ग्रस्त होऊन भरत पुढें धांवला आणि ' आर्य '— इतकाच एक शब्द तोंडांतून निघतो न निघतो तोंच रामचरणापाशीं येऊन मूर्च्छित पडला ! रामाच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. त्यांनीं भरतास उचलून व आपल्या मांडीवर बसवून त्याच्या टाळूचें प्रीतीनें आघ्राण केलें, आणि ममतेनें विचारलें:—"भरता, तुझा बाप कोठें आहे ? आणि तूं अरण्यांत कसा आलास ? कारण तात जिवंत असतील तर ते तुला येऊं

देणार नाहींत. भरता, फार दिवसांनीं आणि फार दूर अशा ठिकाणीं तुझी भेट झाली आहे. या अशा दुर्गम अरण्यांत तूं कां आलास? माझा दीन पिता सहसा लोकांतराला तर गेला नाहीं ना? किंवा तुला लहान पाहून तुझें राज्य तर कोणीं हरण केलें नाहीं ना? भरता, ताताची सेवा नीट करतोस ना? वसिष्ठ महर्षींची आज्ञा पाळतोस ना? मग तूं असा जटावल्कलें धारण करून अरण्यांत कां आलास? सांग, बाबा सांग." भरतानें हात जोडून विनंति केली:—"आर्या, माझ्या आईच्या आग्रहावरून दुष्कर कर्म करून आपले तात पुत्रशोकानें स्वर्गाला गेले! आतां ही महत्पाप करणारी माझी आई राज्यफल न पावतां विधवा मात्र झाली; इतकेंच नव्हे तर ती घोर नरकांत पडणार आहे. आर्या, माझ्यावर कृपा करा; मी आपला दास आहें. आपण आपलें राज्य संभाळा, आणि हें अभिषेकाचें सर्व सामान तयार झालेलें मी बरोबर आणलें आहे त्यानें आपल्यास आजच राज्याभिषेक करून घ्या. राज्याचे सर्व मंत्री आणि माझ्या सर्व माता येथें आल्या आहेत, त्या सर्वांवर कृपा करा. तुम्ही सर्वांहून ज्येष्ठ आणि श्रेष्ठ आहां. राज्य तुम्हालाच योग्य आहे. तर त्या राज्याचा स्वीकार करून आम्हां सर्व सुहृज्जनांचे मनोरथ पूर्ण करा." असें म्हणून भरतानें रुदन करीत रामाचे पाय घट्ट धरले. रामानें भरताला पोटाशीं धरून म्हटलें:—"भरता, तूं निष्पाप आहेस; तुजकडे मुळींच दोष नाहीं, आणि तूं आपल्या आईलाही दोष देऊं नको. कारण आईबाप हे आपल्या पुत्रांचे धनी आहेत. जसें पित्याच्या ठिकाणीं गौरव आहे, तसेंच मातेचे ठिकाणींही आहे. मातापितरांनीं दोघांनीं मला वनांत जाण्याची आज्ञा केली, ती मला पाळलीच पाहिजे. आणि तुला त्यांनीं अयोध्येचें राज्य दिलें आहे, तें तूं घेतलेंच पाहिजे. ही आज्ञा देऊन तात स्वर्गाला गेले; आता ती आज्ञा मला कशी मोडतां येईल! आणि अयोध्या नगरी ताताविणें मला शून्य दिसणार, ती घेऊन मला अभाग्याला काय करावयाचें आहे? राजा माझ्या शोकानें मेला, त्याला माझे हातही लागले नाहींत, केवढा अभागी मी! अहो धन्य भरत-शत्रुघ्न! कीं ज्यांनीं ताताचा प्रेतसंस्कार करून त्याचा शेवटचा सत्कार केला. चौदा वर्षें वनवास भोगून अयोध्येस परत गेल्यावर मला कोण सदुपदेशाच्या गोष्टी सांगेल?" असें म्हणून व उठून सीतेजवळ जाऊन रामचंद्र शोकानें संतप्त होऊन

म्हणाले:—" सीते, तुझे श्वशुर स्वर्गवासी झाले. लक्ष्मणा, तुझे तात निवर्तले. भरतानें राजा स्वर्गवासी झाल्याची कष्टप्रद बातमी आणली आहे." असें राम म्हणत आहेत तों सर्वांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. डोळ्यांत अश्रूंचा पूर आल्यानें सीतेला विचारीला तर कांहींच दिसेना. शेवटीं रामानें सर्वांचें समाधान करून लक्ष्मणाला म्हटलें:—" लक्ष्मणा, इंगुदीच्या कण्या आण. माझें उत्तरीय वल्कल घेऊन ये. आपल्याला नदीवर जाऊन ताताला पाणी दिलें पाहिजे. सीते, पुढें हो चल. लक्ष्मणा, मी तुझ्यामागें चालतों. हा दारुण मार्ग पूर्वीपासूनच चालत आला आहे." याप्रमाणें शोक करीत ते त्रिवर्ग मंदाकिनी नदीवर उतरले. नदीवर यथाविधि स्नान करून व राजाला उदक देऊन नदीतीरावर रामानें इंगुदीच्या कण्यांनीं दशरथाला पिंड दिले. रामानें डोळ्यांत आसवें आणून म्हटलें:—" जें अन्न मनुष्य खातो तेंच अन्न देवादिकांनाही तो अर्पण करितो. तेव्हां राजा दशरथा, तुला हे मी इंगुदी-बदरीचे पिंड देत आहे." श्राद्ध आटोपून व पुन्हां डोंगर चढून ते आपल्या आश्रमापाशीं आले. तेव्हां रामानें भरत, लक्ष्मण व शत्रुघ्न यांना पोटाशीं धरून मुक्तकण्ठ रडण्यास आरंभ केला. त्याबरोबर तिघांसही रडूं कोसळलें. तेव्हां त्या पुरुषसिंहाच्या शोकाचा आवाज सर्व गिरिकंदरांत भरून गेला. तो आर्त नाद ऐकून रामदर्शनाकरितां निघालेले सुमंत्रादि अमात्य व पौरजन हे तात्काळ पुढें धांवले, आणि आश्रमद्वारीं रामास पाहून तेही रडूं लागले. रामानें त्या सर्व लोकांचें सांत्वन करून व त्यांस आलिंगन देऊन त्यांचा सत्कार केला.

इतक्यांत राजमाता वसिष्ठादिकांसहित येऊन पोंचल्या. वल्कलाजिन धारण करणाऱ्या रामास त्या उटजद्वारीं पाहून सर्वांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. रामानें सर्वांस प्रत्युत्थापन देऊन आपल्या सर्व मातांचे क्रमानें चरण वंदिले. त्या सर्वांनीं आपल्या मृदुस्पर्श हातांनीं त्याला पाठीवर कुरवाळून त्याच्या पाठीवरची धूळ झाडून टाकिली. रामानंतर लक्ष्मणानें मातांना वंदन केलें व त्याचे पाठीमागून सीतेनें केलें. सीता वंदन करून आपल्या समोर उभी राहिलेली आहे असें पाहून कौसल्येनें तिला आपल्या पोटाशीं धरिलें आणि म्हटलें:—" सीते, तुझें हें कृश वदन पाहून माझ्या पोटांत दुःखाग्नीनें भडका घेतला आहे." इतक्यांत रामानें वशिष्ठ महर्षींच्या पायांवर डोकें ठेविलें आणि लक्ष्मणानें व सीतेनेंही त्यांचे चरणांस स्पर्श

करून वंदन केलें. नंतर मातापुत्र, गुरुशिष्य, सासवासुना, बंधुबंधु, राजा-प्रजा, हीं सर्व एके ठिकाणीं बसून रामाचे व दशरथाचे गुणानुवाद गाऊं लागलीं. त्यांच्याविषयीं शोक करितां करितां व त्यांचे गुण गातां गातां रात्र निघून गेली, त्याचें कोणास भानही राहिलें नाहीं. ( अयो० स० ९३–१०४ ).

प्रातःकाळ झाल्यावर सर्व लोक स्नानादि नित्यकर्में आटोपून पुनः रामाश्रमासन्निध येऊन बसले. कांहीं वेळ कोणीच कांहीं बोलेना. सर्व आपापल्या ठिकाणीं दुःखानें विचार करीत होते. शेवटीं भरतानें बोलण्यास आरंभ केलाः—" रामा, राजानें माझ्या आईचें सांत्वन करण्याकरितां मला राज्य दिलें, तें मी आपणांस देतों. आपण निष्कंटक राज्याचा उपभोग घ्या. ही सर्व प्रजा तुम्ही राज्यावर बसलेले पाहून दैदीप्यमान सूर्यास पाहिल्याप्रमाणे संतुष्ट होईल. " या भरताचे शब्दांची सर्व लोकांनीं " साधु साधु " म्हणून वाहवा केली. रामचंद्रानें शांतपणानें भरताचें सांत्वन करून म्हटलेंः—" भरता, मनुष्य हा जरी स्वच्छंदानुसार आचरण करूं शकतो, तरी सर्वथैव तो आपला मुखत्यार नाहीं. कारण त्याच्या मर्जीविरुद्ध दैव हे त्याला इकडे तिकडे खेंचून नेतें. सर्व गोष्टींना नाश हा आहे. संचय झाला, कीं त्याचा व्यय व्हावयाचाच. उंच चढेल तो खालीं येईलच. संयोगाच्या मागें वियोग निश्चित आहे. जीविताच्या मागें मरण आहे. फळ उत्पन्न होऊन पिकून अखेर तें पडणारच; याप्रमाणें उत्पन्न झालेल्या नराला मरण आलेंच पाहिजे. जी रात्र जाते ती परत पुनः येत नाहीं. समुद्र उदकानें भरलेला आहे तथापि त्यांत जाणारें यमुनेचें पाणी परत येत नाहीं, अशा या अपरिहार्य स्थितींत नदीच्या प्रवाहाप्रमाणें मनुष्याचें आयुष्य चाललें आहे. तें परतायचें नाहीं. हा विचार करून मनुष्यानें आपला आत्मा सुखासमाधानांत ठेविला पाहिजे. कारण प्राणिमात्राला सुख हें पाहिजे आहे. सारांश, जी स्थिति प्राप्त झाली आहे, तींत तूं आतां शोक करूं नको. स्वस्थ हो, आणि आत्मा स्ववश ठेवणाऱ्या आपल्या पित्यानें आज्ञा केली आहे तीप्रमाणें अयोध्या नगरीस जाऊन राज्य कर. पित्याच्या आज्ञेप्रमाणें मलाही वागणें युक्त आहे. आपणा दोघास पित्याची आज्ञा मानली पाहिजे. किंबहुना प्रत्येक स्वर्गेच्छु मनुष्यानें धर्माला अनुसरून, नृशंसता सोडून व गुरुजनांची आज्ञा पालन करून राहावें, हा उत्तम पंथ होय. " हें रामाचें उत्तर ऐकून भरतानें

पुनः विनंति केली:—" रामा, आपण सत्यप्रतिज्ञ, बुद्धिमान् व देवामारखे सत्त्वशील आहांत. मी परठिकाणीं असतां माझ्या मातेने मजकरितां जें केलें तें मला यत्किंचित्ही मान्य नाहीं. काय करूं ! माझी म तुःश्री पडली म्हणून मी धर्मबंधनानें बद्ध आहें. नाहीं तर या दुष्ट पापकारिणीस मीं तीव्र दड केला असता. दशरथ महाराजांनाही मी दोष देऊं शकत नाहीं. कारण वृद्ध व क्रियाशील असे ते माझे गुरु, माझे तात, माझे राजे, किंबहुना माझें दैवत आहेत. त्यांना मी कसा दोष लावूं ? परंतु अंतकाळीं मनुष्याची बुद्धि बिघडते, ही जी पूर्वीपासून म्हण ऐकतों, ती तातांनीं तुम्हास वनवासास धाडून सत्य केली. असो, पण पित्याचें जे जे बिघडलें असेल तेथें दुरुस्त करणें हेंच अपत्याचें कर्तव्य, आणि तरच त्याला अपत्य म्हणजे ' नरकांत पतन होऊं न देणारा ' हें नाव शोभतें. तरी तुम्ही आम्हां सर्वांची विनंति मान्य करा, आणि जो अन्याय झाला आहे तो दुरुस्त करून राज्याचें संरक्षण करा. आपल्या क्षत्रियत्वाला हें अरण्य उचित नाहीं. आपल्या प्रजापालनधर्मास ह्या जटा शोभत नाहींत; तर हें आपण अनुचित कर्म करूं नका. मी तुमच्याहून विद्येनें, वयानें व योग्यतेनें लहान आहे. आपण असतांना मी राज्यावर कसा बसूं ? रामा, माझा आणि माझ्या मातेचा हा अयशाचा डाग धुऊन टाका, आणि आपल्या पित्यालाही पातकांत टाकूं नका. मी आपल्या चरणीं मस्तक ठेवितों. माझ्यावर करुणा करा. अथवा माझें बोलणें अमान्य करून वनालाच आपण जात असाल तर मीही आपल्याबरोबर येतों. " असें म्हणून भरत रडूं लागला व त्यानें रामाच्या चरणांवर लोटांगण घेतलें ! रामानें सर्व ज्ञातींच्या समक्ष भरताचें पुनः असें समाधान केलें:–" भरता, ज्या वेळेस तुझ्या मातेशीं दशरथानें विवाह केला, त्या वेळेस तुझ्या मातामहाला म्हणजे अश्वपतीला सर्व राज्य शुल्क म्हणजे कन्याक्रय म्हणोन दशरथानें दिलें आहे. याशिवाय पूर्वी देवासुर युद्ध झालें, त्यावेळेस दशरथानें तुझ्या आईस आपले प्राण वांचविल्याबद्दल दोन वर दिले ते तिनें आतां मागून घेऊन मला चौदा वर्षें वनवासास पाठविलें आणि तुला यौवराज्य दिलें. अशा स्थितींत वडिलांना दोष देण्यास कोठेंच जागा नाहीं. आपलें वचन सत्य करण्याकरितां त्यांनीं प्राण खर्चून हें कृत्य केलें. आतां तुला पित्याची प्रतिज्ञा सत्य करणें असेल तर तूं आपल्याला शीघ्र अभिषेक करून घे. मी पित्याचें वचन पाळण्याकरितां चौदा वर्षें वनवासांत राहण्याचा निश्चय करून येथें येऊन राहिलों

आहे. पित्याच्या वचनांतून उत्तीर्ण होणें पुत्राचें कर्तव्य आहे." असें रामाचें भाषण ऐकून सर्वजण स्तब्ध झाले; कोणाचें कांहींच बोलणें चालेना. तेव्हां जाबाली ऋषींनीं मध्येंच नास्तिकाचें सोंग करून म्हटलें:—"बाप कोण आणि पुत्र कोण ? हे सर्व संबंध तात्पुरते आहेत. बापाची प्रतिज्ञा पुत्राला काय म्हणून लागू असावी ? अरे हीं श्राद्धादि कर्में द्रव्यलुब्ध भिक्षुकांनीं पैशासाठीं लावून दिलीं आहेत. नाहीं तर बाप मेल्यावर आणि तो पंचमहाभूतांला मिळाल्यावर त्याला पिंड कसे पोंचणार ! बाबा, जे पिंड मृत्युलोकीं दिले असतां मेलेल्या बापास स्वर्गांत पोंचतात तेच येथल्या येथें बाप परगांवीं गेला असतां त्याला दिले तर कां पोंचत नाहींत ? सारांश, पितापुत्र, भाऊबंद इत्यादि सर्व थोतांड आहे. जें आपल्यासमोर आलेलें आहे आणि जें आपल्या उपभोगास मिळत आहे, तें खुशाल घ्यावें. भरत तुला खुषीनें राज्य देत आहे, ते बापाच्या वचनाची पर्वा न करतां तूं खुशाल घे." जाबालींच्या या नास्तिक भाषणाचा रामचंद्रास राग आला व त्यांनीं उत्तर दिलें:— "जाबाले ! सत्य हें मला सर्वांहून अधिक प्रिय आहे. सत्याची सर कशासही येणार नाहीं. विशेषतः राजाला तर सत्य अवश्यमेव पाळलें पाहिजे. कारण राज्याची इमारतच सत्याच्या पायावर रचलेली आहे. ज्या तऱ्हेनें राजा वागतो त्या तऱ्हेनें प्रजाही वागतात. राजानेंच सत्य सोडलें तर प्रजा कशास तें मानतील ? मग सर्व लोक मिथ्यावृत्त होतील. मी सत्यापासून कधींही ढळणार नाहीं. जो मनुष्य असत्य बोलतो त्याचा लोक पाप्याप्रमाणें त्रास करितात. सत्य सर्व धर्मांचें मूळ आहे. सत्यापासून भूमि, कीर्ति, लक्ष्मी इत्यादि सर्व गोष्टी मनुष्याला प्राप्त होतात. लोभामुळें किंवा मोहामुळें सत्याचा सेतु मी कधींही सोडणार नाहीं. तर मी राजाला कैकेयीसमक्ष वचन दिल्याप्रमाणें चौदा वर्षें वनांत राहिल्यानंतर परत येईन आणि मग हें राज्य घेईन. भरत क्षमाशील व गुरुजनांचा सत्कार करणारा आहे. तो वडिलांची प्रतिज्ञा पार पाडील." ह्याप्रमाणें त्या दोघां उदार राजपुत्रांचें निर्लोभ व तेजस्वी चरित्र पाहून प्रेक्षकजन 'धन्य धन्य' म्हणोन सरोमांच झाले. भरतानें रामाचें निश्चयाचे भाषण ऐकून "मी हें राज्य एकटा कसें संभाळूं ? तुम्ही वडील आहां, तुम्ही समर्थ आहां, तुम्ही हें राज्य संभाळलेंच पाहिजे," असें म्हटलें व रामाचे पाय घट्ट धरिले. 'रामा, प्रिया, आर्या,' इत्यादि शब्दांनीं त्याची पुष्कळ काकळूत केली. शेवटीं

रामानें भरताला मांडीवर बसवून त्याचें समाधान करून सांगितलें:— "चंद्रापासून शोभा नाहींशी होईल, हिमालयाचें हिम नाहींसें होईल, समुद्र मर्यादा सोडून पुढें येईल, परंतु मी पित्याची प्रतिज्ञा मोडणार नाहीं." तेव्हां निरुत्तर होऊन भरत म्हणाला:—"रामा, तुमच्या नांवानें चौदा वर्षें मी राज्य करितों. ह्या पादुकांवर आपले पाय ठेवून नंतर त्या मला द्या. ह्या पादुका सर्व लोकांचें कल्याण करणाऱ्या आहेत." असें म्हणून व त्यांच्या पायीं पादुका घालून त्या भरतानें घेतल्या आणि मग प्रतिज्ञा करून सांगितलें:—"रामा, ह्या पादुका घेऊन त्यांच्या नांवानें मी राज्य करीन. अयोध्येच्या बाहेर राहून व जटावल्कलें धारण करून मी चौदा वर्षें आपली वाट पाहीन. चौदा वर्षें संपूर्ण झाल्यावर आपण परत न याल, तर मी आपल्यास चितेंत जाळून घेईन." तेव्हां रामानें भरताला आलिंगन देऊन सांगितलें:- "भरता, मी चौदा वर्षांनीं खचित परत येईन. तूं काळजी करूं नको. शत्रुघ्ना, तूंही परत जा." पुन्हां भरताला रामानें सांगितलें:—"भरता, कैकेयीचें यथाशास्त्र रक्षण कर बरें ! तिच्यावर मुळींच रोष करूं नकोस. तुला माझी व सीतेची शपथ आहे." असें म्हणून अश्रुपूर्ण नयनांनीं रामानें सर्वांना निरोप दिले. वसिष्ठ ऋषींच्या पायांवर डोकें ठेवून त्यांना, मंत्रिजनांना व लोकांना योग्यतेनुरूप सत्कारानें निरोप दिला. मग भरतानें पादुका हातांत घेऊन रामाला प्रदक्षिणा घातली व आपल्या प्रतिज्ञेचें पुन्हां एकवार त्याला स्मरण देऊन त्याला वंदन केलें व त्याचा शेवटचा निरोप घेतला. मातांना रामाच्यानें निरोप देववेना. त्यानें मोठ्या कष्टानें रुदन करीत करीत त्यांच्या पायांवर डोकें ठेविलें व डोळ्यांला पदर लावून आपल्या आश्रमांत प्रवेश केला. ( अयो० स० १०५—११२ ).

भरत सैन्यासह परत निघाला, तो पुन्हां भरद्वाजाश्रमीं येऊन भरद्वाज मुनींना सर्व हकीकत सांगून पुन्हां गंगा ओलांडून शृंगवेरपुरीं आला. नंतर गुहाचा निरोप घेऊन व अयोध्येस येऊन त्यानें आपल्या मातुःश्रींना यथापूर्व नगरांत ठेविलें. सर्व नगरी त्याला उदास दिसत होती व रामाविणें सर्व लोक हळहळत होते. त्या निरानंद नगरीला सोडून नंदिग्रामीं त्यानें आपला मुक्काम कायम केला. तेथें रामाच्या पादुकांना राज्याभिषेक करून सर्व राज्यकारभार पादुकांच्या नांवानें, त्यांना सर्व गोष्टी निवेदन करून, तो करूं लागला ! इकडे रामालाही चित्रकूटावर राहणें बरें वाटेना. "लक्ष्मणा,

येथें भरत मला भेटला; आईही येथेंच मला भेटली. लोक मला येथें भेटले. अशा प्रकारची ठिकठिकाणची स्मृति मला दुःख देते. याशिवाय हत्ती, रथ, घोडे, इत्यादि सैन्यानें या वनाचा फार उच्छेद केला आहे. याकरितां हें वन सोडावें, असें मला वाटते." असें म्हणून राम तेथून दक्षिणेकडे निघाले, ते प्रथम अत्रि महर्षींच्या आश्रमीं आले. अत्रि व त्यांची वृद्ध पतिव्रता पत्नी अनसूया यांनीं तिघांचा मोठा सत्कार केला! 'मी सीताबाई नमस्कार करत्यें' असें म्हणून सीतेनें आपलें डोकें अनसूयेचे पायांवर ठेविलें; तेव्हां सीतेला कुरवाळून ती म्हणालीः-"आपला जातिधर्म सोडून तूं पतीबरोबर अरण्यांत आलीस, तूं खरोखर धन्य आहेस! क्षात्रधर्म तुला पूर्ण अवगत आहे. पति वनांत असो किंवा नगरांत असो; चांगल्या स्थितींत असो किंवा वाईट स्थितींत असो; ज्या स्त्रियांना तो प्रिय असतो, त्यांना उत्तम लोक प्राप्त होतात. दुःशील किंवा कामवृत्त अथवा धनहीन पति असला, तरी आर्यस्वभावाच्या स्त्रियांना पति हेंच दैवत आहे. सीते, तुला पाहून तुझ्यावर माझें फार प्रेम बसलें आहे. मी आपल्या तपाच्या प्रभावानें तुला कांहीं वस्तु देत्यें." असें म्हणून दिव्य अंगराग, दिव्य माला, दिव्य वस्त्रें व दिव्य अलंकार अनसूयेनें तिला दिले. ते घालून व अनसूयेला वंदन करून सीता रामाकडे आली. तेव्हां तिचें तें मनोहर रूप पाहून रामास अत्यानंद झाला. ती रात्र तेथें राहून, दुसरे दिवशीं स्नानादि कर्में आटोपून व तापसजनांचा निरोप घेऊन तीं जाऊं लागलीं. तेव्हां तापसांनीं विनंति केलीः-"रामा, या अरण्यांत राक्षस, भयंकर व्याळ, वगैरे आहेत. जपून असावें. हा असा वनांतून जाण्याचा सुगम रस्ता आहे. तुमचें कुशल असो." अशा प्रकारें त्यांनीं स्वस्त्ययन केल्यानंतर राम, लक्ष्मण व सीता या तिघांनीं ऋषींनीं दाखविलेल्या रस्त्यानें महारण्यांत प्रवेश केला. (अयो० स० ११३-११९).

✿

# अरण्यकांड

वनांत प्रवेश केल्यावर रामचंद्र निरनिराळ्या ऋषींचे आश्रम पहात पहात चालले. वनांत राहणाऱ्या मुनिजनांना व तापसी लोकांना रामाचें अद्भुत रूप पाहून मोठें आश्चर्य वाटे. त्यांची रूपसंपदा, त्याची सिंहासारखी अंगयष्टि आणि त्याचा सुकुमारपणा, यामुळें रामचंद्रास कितीही वेळां पाहिलें तरी पहाणारा तृप्त होत नसे. याप्रमाणें सर्वांचे डोळे आणि मन हरण करीत व त्यांचें आदरातिथ्य घेत रामचंद्र वनांत चालले. एके दिवशीं घोर अरण्यांतून जात असतां एकाएकीं एक अक्राळविक्राळ राक्षस त्यांच्या दृष्टीस पडला. तो पर्वतासारखा मोठा व उंच असून आ पसरून येत होता. त्याच्या हातांत त्रिशूळ होता; त्या त्रिशूळाच्या टोंकांवर तीन-तीन सिंहांचीं डोकीं व हत्तीची एक मांडी अशीं लटकत होतीं. त्यानें त्यांस पाहतांच आनंदाचा मोठा शब्द करून त्यांच्या अंगावर चाल केली आणि सीतेला उचलून काखोटीस मारिली. नंतर तो मोठ्यानें हांसून म्हणाला:—" अरे मूर्खांनो, तुम्ही या माझ्या अरण्यांत कसे आलांत ? तुम्ही कोण आहां ? ही सुंदर स्त्री मलाच योग्य आहे; तुम्हांस तुमच्या जिवाची पर्वा असेल तर हिला सोडून येथून पलायन करा. " हे त्याचे शब्द ऐकून सीतेचें गर्भगळीत झालेलें रूप पाहून राम दुःखानें म्हणाले:—"कैकेयी, तूं मला वनात पाठविलेंस त्याची सफलता आज झाली ! ही निरुपद्रवी गरीब जनकदुहिता माझ्या नादीं लागून दुःखांत पडली ! " मग क्रोधानें ओरडून ते राक्षसास म्हणाले:—" अरे दुष्टा ! तूं इला सोड ! नाहीं तर आतांच तूं प्राणास मुकशील. मी दशरथाचा पुत्र रामचंद्र पित्याच्या आज्ञेनें वनवास करीत आहे. मी तुला भिणारा नव्हे; सोड, माझ्या प्रिय पत्नीला सोड. " रामाचें हें भाषण ऐकून तो राक्षस म्हणाला:—" अरे मूर्खांनो, मी विराध राक्षस आहें. मला ब्रह्मदेवाच्या वरदानानें कोणत्याही शस्त्रापासून मृत्यूचें भय नाहीं. तुमचा गर्व व्यर्थ आहे. प्रथम तुमचें रक्त

पिऊन मग मी इला बायको करीन." असें म्हणून, सीतेला ठेवून व हातीं शूल घेऊन तो रामलक्ष्मणांवर धांवला. रामलक्ष्मणांनीं बाणांनीं त्याचा त्रिशूळ तोडला; परंतु त्याच्या अंगावर जितके बाण त्यांनीं सोडलें तितके विफळ झाले. विराधानें नुसत्या दोन्हीं हातांनींच त्या दोघांस उचललें आणि तो धांवूं लागला. तेव्हां बिचारी सीता ओरडून म्हणाली:-"अरे राक्षसा, मलाच खा बाबा, यांना सोड." असें ओरडत सीता त्याच्या मागें धांवूं लागली. रामलक्ष्मणांनीं सीतेचा आक्रोश ऐकून दोघांनीं खड्गानें भराभर त्याचे बाहू तोडले व त्याच्या पायांवरही प्रहार केले. तेव्हां तो प्रचंड राक्षस खालीं पडला. मोकळे झाल्यावर त्यांनीं त्याच्या शरीरावर अनेक प्रहार केले, परंतु तो मरेना. तेव्हां रामानें म्हटलें:-"अरे लक्ष्मणा, यानेंच आपल्यास सांगितलें आहे कीं, हा शस्त्रांनीं वध्य नाहीं; तर याला एक युक्ति आहे. मी याला असाच दाबून धरतों. तूं त्याच्या शेजारीं एक मोठा खाडा खण म्हणजे आपण याला त्यांत पुरून टाकूं!" तेव्हां लक्ष्मणानें जलदीनें तो राक्षस पडला होता त्याच्या जवळच कुदळीनें खाडा खणला व लागलेंच त्या राक्षसाचें धूड त्यांनीं खाड्यांत लोटलें! त्या वेळेस तो अशा भयंकर आवाजानें ओरडला कीं, तें सर्व रान त्यानें दणाणून गेलें. तो खाड्यांत ओरडत धडपडत पडला असतां दोघांनीं त्याजवर माती लोटली! याप्रमाणें त्या भयंकर विराध राक्षसाचा नाश करून रामानें सीतेचें सांत्वन केलें व नंतर तीं तिघें त्या वनांतून बाहेर पडून शरभंग ऋषीच्या आश्रमापाशीं पोंचलीं. (अर० स० १—४).

त्या आश्रमाच्या समोर एक चमत्कार त्यांच्या दृष्टीस पडला. एक दिव्य रथ पृथ्वीला सोडून अधांत्रीं उभा असून त्याची प्रभा चोहींकडे पसरली आहे. त्याचे घोडे अत्यंत सुंदर आहेत, रथांत खुद्द इंद्राची स्वारी बसली आहे, सिद्ध, गंधर्व, ऋषि निरनिराळ्या विमानांतून चोहों बाजूंनीं इंद्राची स्तुति करीत आहेत, पंचवीस वर्षांच्या वयाचे, अति सुंदर, रक्तवस्त्र परिधान केलेले व दिव्य हार घातलेले, असे पुरुष तरवार घेऊन इंद्राभोंवतीं उभे आहेत, असा चमत्कार त्यानीं पाहिला. तेव्हां राम म्हणाला:-"जसें इंद्राच्या घोड्यांचें वर्णन आहे, त्याप्रमाणें हे घोडे दिसतात. हे शंभर तरुण पुरुष देवांसारखे दिसतात. हीं विमानें स्वर्गलोकींचीं वाटतात. तर लक्ष्मणा, जरा

थांब. मी पाहून येतों हें काय आहे तें." इतक्यांत इंद्राची स्वारी शरभंगाचा निरोप घेऊन अदृश्य झाली, तेव्हां शरभंगाच्या आश्रमांत जाऊन त्यांनीं महर्षीस साष्टांग नमस्कार घातला. शरभंगानें मोठ्या प्रीतीनें त्यांचें स्वागत केलें आणि म्हटलें:—" रामा, तूं आतां पाहिलेंच असशील कीं, इंद्र माझ्या तपानें संतुष्ट होऊन मला स्वर्गांत नेण्याकरितां स्वतः आला होता. परंतु तुझें येणें होत आहे, हें लक्षांत घेऊन तुझें आदरातिथ्य केल्यावर मी येईन असें मी इंद्रास सांगितलें. रामा, तूं प्रत्यक्ष श्रीविष्णु आहेस. तुझें आतिथ्य करण्याची संधि मला महाभाग्यानें लाभली आहे. तर आतां मी तुझें आतिथ्य करून कृतकृत्य झालों. तूं आतां येथून सुतीक्ष्णाच्या आश्रमाला जा. पण मी आपला देह चितेवर ठेवितों. तोंपर्यंत मजकडे कृपादृष्टीनें पाहून मग जा." असें म्हणून लागलेंच शरभंगानें अग्नीमध्यें हवन करून आपला देह अग्नींत अर्पण केला. तेव्हां त्याचा पूर्व देह दग्ध झाला. नंतर दिव्य शरीर धारण करून शरभंग ऋषि ब्रह्मलोकास गेले. आणि राम त्यांच्या सांगण्याप्रमाणें सुतीक्ष्णाच्या आश्रमास जाण्यास निघाला. ( अर०-स०—५ ).

शरभंगाश्रमांत अनेक तापसी व वालखिल्य मुनि, रामाला येऊन भेटले; व त्याला म्हणूं लागले:—" रामा, या दण्डकारण्यांत मुनींचे पुष्कळ आश्रम आहेत, परंतु त्यांना राक्षसापासून फार त्रास होतो. तूं आमचा नाथ येथें आला आहेस, तर आमचें अनाथांचें तुला रक्षण केलें पाहिजे. नरमांस भक्षण करणाऱ्या राक्षसांनीं मारून खाल्लेल्या तापसांचीं शरीरें तुला आम्ही दाखवितों, तूं आमच्या बरोबर चल. पंपेपासून तों थेट चित्रकूटापर्यंत हा राक्षसांचा त्रास आहे. आम्ही सर्व तुला शरण आलों आहों. आमचें राक्षसांपासून रक्षण कर." असें ऐकून रामानें म्हटलें:— " आपण ब्राह्मण, तपोनिष्ठ; आपण 'शरण आलों' असें म्हणूं नका. मला तुमचें रक्षण केलेंच पाहिजे. केवळ मी स्वतःच्या कारणाकरितां या गहन वनांत शिरलों नाहीं. मी पित्याची आज्ञा पालन करून तुमचेंही राक्षसांपासून रक्षण करीन; म्हणजे हा माझा वनवास मला महाफल देईल." रामाचें हें आश्वासन ऐकून ते तापसी संतुष्ट होऊन रामाबरोबर निघाले, आणि त्याजबरोबर सुतीक्ष्णाच्या आश्रमास येऊन पोंचले. रामानें सुतीक्ष्णाच्या आश्रमांत जाऊन व त्या महर्षींच्या पायांवर डोकें ठेवून

शरभंगानें आपल्याकडे मला पाठविलें आहे, म्हणोन सांगितलें. सुतीक्ष्णानें राम, लक्ष्मण व सीता यांचा अत्यादरानें सत्कार केला. त्याजला उत्तम उत्तम वन्य अन्नें खावयास दिलीं व तुम्ही येथेंच रहा, म्हणोन आग्रह केला. तेव्हां रामानें सांगितलें कीं, "समस्त आश्रममंडळ मी पाहून येतों. हे ब्राह्मण मला त्वरा करीत आहेत. त्यांचें राक्षसांपासून रक्षण करण्याचें मीं कबूल केलें आहे." तेव्हां सुतीक्ष्णानें रामास जाण्याला परवानगी दिली, आणि सांगितले कीं, सर्व आश्रम पाहून पुन्हां येथें यावें. त्याप्रमाणें कबूल करून राम, लक्ष्मण व सीता हीं दुसरे दिवशीं तेथून निघालीं. पुढे ऋषी-बरोबर निरानिराळ्या आश्रमांत कोठें चार महिने, कोठें सहा महिने, कोठें वर्ष, याप्रमाणें राहून रामानें राक्षसांचा बंदोबस्त केला. याप्रमाणें वनवासाचीं दहा वर्षे गेलीं. नंतर राम पुन्हा सुतीक्ष्णाच्या आश्रमांत येऊन तेथेंही कांहीं दिवस राहिले. पुढें "अगस्त्य ऋषींचा आश्रम कोठें आहे, त्या महर्षीचें दर्शन मला घेतले पाहिजे," असें रामानें सुतीक्ष्णास म्हटल्यावरून अगस्त्य ऋषींच्या बंधूचा आश्रम येथून चार योजनांवर आहे; तेथें जाऊन तेथून अगस्त्य ऋषींच्या आश्रमांत जावें, म्हणोन सुतीक्ष्णानें आज्ञा केल्यावरून राम तिकडे जावयास निघाला. ( अर० स० ६–११ ).

सुतीक्ष्णानें सांगितलेल्या मार्गानें जातां जातां संध्याकाळच्या सुमारास राम लक्ष्मणास म्हणाला:—" लक्ष्मणा, ज्याप्रमाणे सुतीक्ष्णानें वर्णन केलें, त्याप्रमाणें हे सहस्रावधि वृक्ष फळांच्या व फुलांच्या भारानें नमलेले दिसत आहेत, तसेंच या वनांतून पक्व झालेल्या पिंपळीफळांचा कटु वास एकदम येऊं लागला आहे. ठिकठिकाणीं काष्ठांचे संचय तोडून ठेविलेले दिसत आहेत व दर्भांच्या राशीही कापून ठेविल्या आहेत. या वनाच्या मध्भागांतून काळ्या ढगांसारखी धूमराशि निघत आहे. हे पहा, या एकांतांतील जला-शयांत ब्राह्मण स्नान करून स्वतः जमा केलेल्या फळांनीं उपाहार करीत आहेत. हीं वृक्षांचीं पानें ओलीं दिसत आहेत. हे मृग आणि पक्षी आप-ल्यास भीत नाहींत. तेव्हां बहुतकरून अगस्त्यांच्या भावाचा आश्रम जवळच आहे, असें मला वाटतें." असें म्हणत आहेत, तों परिश्रांताचे परिश्रम परिहार करणारा तो आश्रम दिसू लागला. आश्रमांत पोंचून रामानें ऋषींचें दर्शन घेतलें व त्यांनीही त्यांचा उत्तम प्रकारानें सत्कार केला. नंतर तेथेंच तो दिवस काढून दुसरे दिवशीं सकाळीं अगस्त्यांच्या भावाची आज्ञा घेऊन

त्यांनीं सांगितलेल्या रस्त्यानें रामलक्ष्मण निघाले. जातांना वाटेंत रामानें लक्ष्मणाला अगस्त्य ऋषींचा महिमा सांगितला. "अगस्त्य ऋषींनींच दक्षिण दिशा मृत्यूपासून सोडवून मनुष्यांकरितां मोकळी केली. ह्या ठिकाणीं पूर्वीं एके काळीं इल्वल आणि वातापी हे दोन भयंकर राक्षस रहात होते. इल्वलानें ब्राह्मणरूप धारण करून व संस्कृत भाषा बोलून द्विजांना श्राद्धाला निमंत्रण करावें, आणि मेषरूप धारण केलेल्या वातापीला श्राद्धाकरितां म्हणून मारून त्याचें मांस त्यानें ब्राह्मणांना खाऊं घालावें. ब्राह्मणांचे भोजन झालें म्हणजे इल्वलानें 'वातापी, लवकर ये,' म्हणून हाक मारावी, कीं लागलाच वातापी ब्राह्मणांचीं पोटें फाडून बाहेर निघे ! याप्रमाणें हजारों ब्राह्मणांना दोघांनीं फसवून मारून खाल्लें, तेव्हां सर्व ब्राह्मण अगस्त्य ऋषींना शरण गेले. अगस्त्य ऋषींनीं त्या राक्षसांचा नाश करण्याचें कबूल करून इल्वलाचें श्राद्धाचें निमंत्रण घेतलें. ठरावाप्रमाणें वातापीला मारून त्याचें मांस इल्वलानें त्यांस खाऊं घातलें. भोजनोत्तर इल्वलानें ' वातापी बाहेर ये,' म्हणून हाक मारिली, तेव्हां अगस्त्यांनीं शांतपणानें हंसून म्हटलें:—' बाबा, वातापी कसचा बाहेर येतो ! त्याला मी पोटांत जिरवला ! ' असें म्हणून पोटावर हात फिरवून त्यांनीं ढेंकर दिली. वातापी बाहेर येत नाहीं, हें पाहून इल्वल आपलें रूप प्रकट करून अगस्त्य ऋषींवर क्रोधानें धांवला. तेव्हां अगस्त्य ऋषींनीं त्याजला आपल्या नेत्राग्नीनें जाळून भस्म केलें ! याप्रमाणें अगस्त्य ऋषींनीं ब्राह्मणांवर दया करून हें दुष्कर कर्म केलें. तेव्हांपासून राक्षस यांना भिऊं लागले आहेत. जेव्हांपासून अगस्त्य येथें येऊन राहिले, तेव्हांपासून ह्या दक्षिण दिशेकडे राक्षस अत्यंत त्रासानें व अति भीतीनें पाहतात; व याचमुळें दक्षिण दिशेला अगस्त्य ऋषींचें नांव पडलें आहे. यांचीच वाट पहात विंध्याद्रि जो एकदां आडवा पडला आहे, तो अद्याप उठत नाहीं. पूर्वीं विंध्यपर्वत गर्वानें वाढूं लागला, तो इतका उंच झाला कीं, सूर्याचा रस्ता तो आडवतो कीं काय, अशी भीति द्विजांना पडली. तेव्हां विंध्यपर्वताचा बंदोबस्त अगस्त्य ऋषींनीं केला. जेव्हां हे दक्षिणेस येऊं लागले, तेव्हां विंध्यपर्वतानें यांना साष्टांग नमस्कार घातला. तेव्हां विंध्यपर्वताला अगस्त्य ऋषि म्हणाले:—' हे विंध्यपर्वत ! मी परत येईपर्यंत तूं असाच रहा. ' तेव्हांपासून विंध्यपर्वत आडवाच पडला आहे व अगस्त्य मुनि दक्षिणेंतच राहिले आहेत. अशा या अत्यन्त सामर्थ्यवान् मह-

र्षीच्या आश्रमाला आपण जात आहों. हा साधु पुरुष सज्जनांचें नेहमीं कल्याण करतो. यांचें आराधन करून वनवासाचे शेष दिवस आपण यांच्या सान्निध्यांत काढूं. येथें सर्व देव, सिद्ध, गंधर्व व महर्षि अगस्तींच्या दर्शनाकरितां नेहमीं येतात. येथें कोणी खोटें बोलणारा किंवा शठ, निर्दय किंवा पापी मनुष्य राहूं शकत नाहीं. कारण, हा मुनि तसाच आहे. हा पहा, या महर्षींचा आश्रम दिसूं लागला. तर आपण अशा पुण्य महामुनींचें दर्शन घेऊं.'' असें म्हणत राम आश्रमाच्या द्वारापाशीं पोहोचले. रामांनीं शिष्याहातीं महर्षींना असें सांगून पाठविलें:—" मी दशरथाचा पुत्र राम लक्ष्मण व सीता यांसह वनवासाकरतां दंडकारण्यांत आलों आहें. आपल्या दर्शनास येणें आहे. '' शिष्यानें अगस्ति ऋषींना वर्दी दिली. तेव्हां राम, लक्ष्मण, सीता यांना लवकर घेऊन ये, म्हणून आज्ञा होतांच शिष्यानें बाहेर घेऊन रामास आश्रमांत नेलें. आश्रमांत चोहींकडे शांत व रमणीय देखावा असून हरिणें स्वस्थ चरत आहेत, हें पाहून रामास मोठें कौतुक वाटलें. नंतर निरनिराळ्या देवांचीं आयतनें ( मंदिरें ) लागलीं. इंद्राचें, विष्णूचें, सूर्याचें, सोमाचें, भगाचें, कुबेराचें, ब्रह्मदेवाचें, वायूचें, वरुणाचें, गायत्रीचें, वसूंचें, नागराजाचें, गरुडाचें, कार्तिकेयाचें आणि यमाचें अशीं स्थानें पाहून राम पुढें गेले; तों अगस्ति ऋषि अग्नीला होम देऊन मुनिजनांसमवेत बाहेर आले. त्यांस पाहतांच रामानें पुढें होऊन त्यांच्या चरणांवर मस्तक ठेविलें; आणि नंतर हात जोडून राम त्यांच्यासमोर उभे राहिले. लक्ष्मण व सीता हींही मुनींचे चरणांवर मस्तक ठेवून रामाजवळ उभीं राहिलीं. तेव्हां अगस्ति ऋषींनीं आपण बसून सर्वांस बसण्यास सांगितलें. नंतर वन्य फळें, फुलें, पाणी, इत्यादिकांनीं रामाची त्यांनीं पूजा केली. पूजा करतांना ते म्हणाले:— " रामा, अतिथीचा असा सत्कार न केला तर खोटी साक्ष देणाऱ्या मनुष्याप्रमाणें यमलोकांत त्यास आपलेंच मांस खावें लागतें. त्यांत तूं अत्यंत प्रिय अतिथि आहेस. कारण, तूं आमचा राजा असून धर्मप्रिय व पराक्रमी आहेस. '' असा रामचन्द्राचा सत्कार केल्यानंतर अगस्ति ऋषि म्हणाले:— " हें विश्वकर्म्यानें निर्माण केलेलें व सुवर्ण व रत्न यांनीं सुशोभित केलेलें वैष्णव महाधनुष्य मी तुला देतों. हा महेंद्रानें मला दिलेला दिव्य अमोघ शर, अक्षय्य बाणांनीं भरलेले हे दोन भाते, सुवर्णानें मंडित केलेली व सुवर्णाच्या म्यानांत ठेवलेली ही मोठी तलवार, हींही तुला मी देतों. हा धनु-

ष्यानें विष्णूनें असुरांना जिंकून त्यांची लक्ष्मी देवाना दिली. हें धनुष्य आणि हा बाण, हे भाते व ही तलवार तूं जयप्राप्तीकरतां घे." असें म्हणून तीं सर्व आयुधें त्यांनीं रामास दिलीं. तीं रामानीं मोठ्या प्रीतीनें व सन्मानानें घेतलीं. नंतर अगस्त्य ऋषि म्हणालेः—"रामा, तूं माझ्या दर्शनाकरिता इतका दूर आलास, याजबद्दल मला फार आनंद झाला आहे. ही तुझी पत्नी तुझ्याबरोबर अरण्यांत आली आहे, तेव्हां हें मोठें दुष्कर कर्म तिनें केलें आहे. सृष्टीच्या उत्पत्तीपासून बहुतेक अनुभव असा आहे कीं, सुस्थितींत नवरा असला तर त्यास बायका मानतात व दुःस्थितींत तो आला तर त्या सोडून जातात. बायका म्हटल्या म्हणजे विजेसारख्या किंवा वाऱ्यासारख्या चंचल असतात. पण तुझी ही भार्या ह्या दोषानें रहित असून वसिष्ठांच्या अरुंधतीप्रमाणें ही महापतिव्रता आहे. हिला फार श्रम झाले आहेत. इला सुख वाटेल अशा ठिकाणीं रहा." तेव्हां रामांनीं राहण्यास सुंदर व योग्य ठिकाण कोणतें, म्हणून विचारल्यावरून अगस्त्यांनीं, "गोदावरीच्या कांठीं येथून दोन योजनांवर पंचवटी म्हणून स्थळ आहे ते फार उत्तम आहे, तेथें पर्णकुटी बांधून रहा," अशी आज्ञा केली. तेव्हां अगस्तिऋषींचा मोठा सन्मान करून व त्यांस नमस्कार करून राम पंचवटीस जाण्यास निघाले. ( अर० स० १२–१३ ).

राम, लक्ष्मण–सीतेसह पंचवटीस जात असतां, त्यांस धिप्पाड शरीराचा व अत्यंत बलिष्ठ असा एक गृध्र पक्षी दिसला. हा पक्षिरूप धारण केलेला कोणी राक्षस आहे, असें रामास वाटून रामानें त्यास, तूं कोण आहेस,' म्हणून प्रश्न केला. तेव्हां गृध्र शांत व मधुर वाणीनें म्हणालाः—" पूर्वकाळीं जे प्रजापति झाले त्यांचीं नावें ऐक. पहिला कर्दम, नंतर विकृत, नंतर शेष, संश्रय, स्थाणु, मरीची, अत्रि, क्रतु, पुलस्त्य, अंगिरा, प्रचेता, पुलह, दक्ष, विवस्वान् व अरिष्टनेमी. याप्रमाणें होऊन शेवटीं कश्यप झाला. यांतील दक्ष प्रजापतीला साठ मुली झाल्या. त्यांपैकीं ८ मुली म्हणजे अदिति, दिति, दनु, कालका, ताम्रा, क्रोधवशा, मनु आणि अनल अशा त्यानें कश्यपाला दिल्या. माझ्यासारखे पुत्र उत्पन्न होवोत अशी तुम्ही भावना धरा, असे कश्यपानीं स्त्रियांस सांगितलें. तें पहिल्या चौघींनीं मनावर घेतलें, बाकींनीं घेतलें नाहीं. तेव्हां आदितीच्या पोटीं ३३ देव उत्पन्न झाले. दितीपासून दैत्य झाले. तेच प्रथम पृथ्वीचे राजे होते. दनूपासून अश्वग्रीव उत्पन्न झाला व त्यांजपासून

पुढें दानव झाले. कालकेला दोन पुत्र नरक आणि कालक असे झाले. याप्रमाणें पहिल्या चार बायकांना सामर्थ्यवान् पुत्र झाले. दुसऱ्या चारांपैकीं ताम्रेला पाच मुली झाल्या—क्रौंची, भारवी, श्येनी, धृतराष्ट्री आणि शुकी. यांपासून सर्व पक्षिवर्ग उत्पन्न झाला. त्याचप्रमाणें क्रोधवशेला मृगी वगैरे दहा मुली उत्पन्न झाल्या; त्यापासून सर्व श्वापदें झालीं. मनूला कश्यपापासून मनुष्य झाले. आणि अनलेपासून सर्व वृक्ष उत्पन्न झाले. याप्रमाणें ही सर्व काश्यपी सृष्टि होय. ताम्रेची कन्या शुकी, तिची मुलगी श्वेता व तिची मुलगी विनता. त्या विनतेचे दोन पुत्र गरुड आणि अरुण. अरुणाचे दोन पुत्र संपाति आणि जटायु. संपाति माझा ज्येष्ठ बंधु आणि माझें नांव जटायु. मी तुझ्या बापाचा परमसखा आहे. मी तुझ्या आश्रमांत राहून तुला साह्य करीन. तूं व लक्ष्मण बाहेर गेला असतां मी सीतेचें रक्षण करीन.'' हें जटायूचें भाषण ऐकून तो दशरथाचा स्नेही असें पाहून रामांनीं गौरवानें जटायूस नमस्कार केला व नंतर ते चौघे पंचवटीस जाऊन पोहोंचले. पंचवटीची शोभा पाहून रामास फार आनंद झाला. ते म्हणाले:—"लक्ष्मणा, हा देश सपाट असून फुललेल्या वृक्षांनीं भरलेला आहे; येथें या चांगल्या ठिकाणीं आश्रम तयार कर. हें पहा येथून जवळच एका बाजूस सूर्यासारखा उज्ज्वल व सुगंधी कमलांनीं भरलेलें सरोवर दिसत आहे. दुसऱ्या बाजूस फार दूर नाहीं, फार जवळ नाहीं, अशी गोदावरी नदी वाहत आहे. तिच्या कांठीं हंस, कारण्डव, चक्रवाक् वगैरे पक्षी क्रीडा करीत असून हरिणांचे कळप पाणी पीत आहेत. हे लांबलांब दऱ्यांनीं भरलेले उंच डोंगर फुललेल्या झाडांनीं आच्छादिले असल्यामुळें व मोरांच्या आवाजामुळें सौम्य आणि रम्य दिसत आहेत. ह्या डोंगरांचे तुटलेले कडे सोनें, रुपें, तांबें इत्यादि धातूंनीं भरलेले आहेत, व अंगावर निरनिराळ्या रंगांच्या वेलबुट्टया काढलेल्या हत्तीप्रमाणें शोभिवंत दिसत आहेत. सारांश, हें पशुपक्ष्यांनीं भरलेलें स्थळ पुण्य व रम्य आहे. येथे आपण राहिल्यास आपणांस सुख होईल.'' असें म्हणतांच लक्ष्मणानें पर्णशाला बांधण्याची तयारी करून तेथें एक मोठीशी कुटी तयार केली. जमिनीचा मजबूत ओटा तयार करून, त्याजवर मोठे खांब उभे करून त्यांच्यावर आडवे बांबू टाकून व बळकट वेलींनीं ठिकठिकाणीं बंध बांधून घेऊन वरतीं शमीवृक्षाच्या फांद्या, कुश वगैरे गवत व पानें यांचें आच्छादन टाकिलें. याप्रमाणें तयार झालेलें ते सुंदर गृह पाहून रामाला मोठा

आनंद झाला व त्यानें लक्ष्मणाला प्रेमानें आलिंगन देऊन म्हटलें, ' लक्ष्मणा, या तुझ्या कामगिरीबद्दल मजजवळ द्यावयाला एवढेंच बक्षीस आहे. ' नंतर लक्ष्मणानें गोदावरीवर स्नान केलें व चांगलीं चांगलीं फुलें व फळें आणून तेथें ठिकठिकाणीं फलपुष्पांचे उपहार ठेविले; नंतर तीं तिघें त्या जटायूला पाहऱ्यावर ठेवून त्या पर्णशालेंत आनंदानें राहूं लागलीं. ( अ० स० १२—१९ ).

याप्रमाणें पंचवटींत राहूं लागल्यावर शीतकाळचे दिवस आले. चोहोंकडे थंडीचा कडाका पडला. आकाश नेहमीं धुक्यानें व्याप्त होऊं लागलें. जमिनीवरील धान्य, गवत, वगैरे सर्व पिकून गेलीं. पाणी नकोसें वाटावयास लागून विस्तव हवासा वाटूं लागला. सूर्य फार दाक्षिणेस गेल्यामुळें उत्तर दिशा तिलकहीन स्त्रीसारखी वाईट दिसूं लागली. दिवसाचें रमणीयत्व वाढलें; कारण, मध्यान्हींसुद्धां बाहेर फिरणें सुखकर होऊन उन्हांत बसणें गोड वाटूं लागलें व छायेंत अगर पाण्यांत जाणें नकोसें वाटूं लागलें. थंडीमुळें रात्री ज्यास्तच लांब व भयंकर वाटूं लागल्या. आकाश पांघरून घेऊन रात्रीं बाहेर पडणें अशक्य झालें. चंद्राचें आल्हादकत्व सूर्याकडे येऊन, चंद्र धुक्यांतून पांढरा, पुसट श्वास टाकलेल्या मलिन आरशाप्रमाणें दिसूं लागला. हिम आणि तुषार यांनीं आच्छादिल्यामुळें अगदीं थंड झालेल्या किरणांनीं युक्त असा सहस्ररश्मि उदयानंतरही चंद्रासारखा दिसूं लागला. वनांतील हत्ती तहान लागून नदीवर किंवा सरोवरावर पाणी पिण्यास आले असतां गार पाण्याचा स्पर्श होतांच सोंड माघारी ओढून घेऊं लागले. हंस, कारण्डव, इत्यादि पाण्यांत पोहणारे पक्षी पाण्याच्या कांठींच बसून राहिले. ज्याप्रमाणें शेंदाड शिपाई लढाईंत घुसण्याला मागें घेतात, त्याप्रमाणें हे पक्षी पाण्यांत घुसण्यास धजेनासे झाले. नद्यांच्या पाण्यावर सारखें धुकें पसरलें असल्यामुळें पाण्याच्या कांठीं बसलेले सारस केवळ त्यांच्या शब्दांवरून ओळखूं येऊं लागले. तुषार पडले असल्यामुळें व सूर्याचें ऊन मृदु झाल्यामुळें डोंगराच्या शिखरावरचेंसुद्धां पाणी अति थंड होऊन बरेंच चवदार झालें. सरोवरांतून कमलांचीं फुलें नाहींशीं होऊन त्यांचे नुसते नाल बाकी राहिलेले दिसूं लागले, व त्यांचीं पानें जीर्ण, केवळ शिरामय होऊन विशोभित दिसूं लागलीं. अशा त्या अत्यन्त हिमकालीं एके दिवशीं राम, लक्ष्मण व सीता नित्याप्रमाणें गोदावरीवर स्नानाकरितां उतरलीं. भरत या थंडीच्या दिवसांत शरयूतीरावर स्नान

करीत असेल, इत्यादि घरच्या आठवणी काढीत त्रिवर्गांनीं स्नान करून देवपितरांचें तर्पण केलें व पुन्हां वर चढून आश्रमांत येऊन तीं तिघें गोष्टी बोलत बसलीं. इतक्यांत कर्मधर्मसंयोगानें शूर्पणखा नांवाची एक राक्षसीण तेथें आली. रामाची विलक्षण तेजस्वी कांति, मदनासारखें सुंदर रूप आणि बलिष्ठ व सुश्लिष्ट शरीर यष्टि पाहून ती राक्षसीण मोहित झाली. रामाचें मुख किती तरी सुंदर आणि त्या राक्षसिणीचें तोंड किती हिडीस! त्याची कंबर सिंहासारखी बारीक, त्या राक्षसीचें पोट घागरीसारखें मोठें; रामाचे डोळे मोठे व पाणीदार, तिचे डोळे लहान व पिचके; रामाचे केंस काळे आणि बारीक, तिचे केंस तांबडे व राठ; रामाचें स्वरूप अत्यंत मोहक, तिचें स्वरूप किळसवाणें; रामाचा स्वर मधुर, तिचा कर्कश; राम तरुण, तर ती दारुण वृद्ध; राम मधुरभाषणी, तर ती ग्राम्य भाषण करणारी; राम न्याय्य वर्तन करणारा, ती वाटेल तसें दुष्ट वर्तन करणारी. सारांश, परस्परांशीं अगदीं विरुद्ध लक्षणांनीं युक्त अशा त्या स्त्रीपुरुषांची गांठ पडली, तेव्हां तिचें रामावर मन बसलें तें योग्यच म्हणावयाचें! असो, शूर्पणखा जवळ जाऊन त्यास विचारूं लागली, "तुम्ही येथें राक्षसांच्या अरण्यांत जटा–वल्कलें धारण करून कसे आलांत! तुम्ही कोण व कोठील आहां, तें मला सांगा." तेव्हां रामानें "मी दशरथाचा पुत्र आहे, ही माझी बायको सीता, हा माझा धाकटा भाऊ लक्ष्मण, बापाच्या आज्ञेनें मी या अरण्यांत वनवास करण्यास आलों आहें; व येथें येऊन राहिलों आहें. आतां, तूं कोण व येथें कां आलीस, हें मला सांग," असें म्हटलें. तेव्हां शूर्पणखा म्हणाली:—"तूं रावणाचें नांव ऐकिलें असल्यास त्या राक्षसांच्या राजाची मी बहीण शूर्पणखा आहें. सहा महिने झोंप घेणारा कुंभकर्ण आणि धर्मात्मा बिभीषण असे दोघे आणखी मला भाऊ आहेत. खर, दूषण हे माझे सख्खे भाऊ येथें राहतात. मी कामरूप धारण करून चोहींकडे या अरण्यांत फिरत्यें. तुझें हें अप्रतिम रूप पाहून मी तुझ्यावर मोहित झाल्यें आहें. ही तुझी बायको अगदीं कुरूप आहे; तुला मुळींच शोभत नाहीं. हिला व तुझ्या भावाला मी खाऊन टाकत्यें. तूं माझा नवरा झाल्यावर आपण दण्डकारण्याच्या निरनिराळ्या रम्य ठिकाणीं मन मानेल तसा विहार करूं." हें त्या राक्षसीचें चमत्कारिक भाषण ऐकून राम शांतपणानें व किंचित् थट्टेनें म्हणाले:—"शूर्पणखे, माझें लग्न

झालेलें असून माझी बायको जिवंत आहे, व ती मला अत्यंत प्रिय आहे. तुझ्यासारखी सवत तिला करणें म्हणजे तिला फार दुःख देणें होय. लक्ष्मणाला बायको नाहीं, तूं त्याला नवरा कर. म्हणजे तुला सवतीचीही भीति नको." हें भाषण ऐकून शूर्पणखा रामाला सोडून लक्ष्मणाकडे वळली. लक्ष्मणही रामाहून फारसा वाईट नव्हता. तेव्हां लक्ष्मणाला शूर्पणखा म्हणाली:—"तुझ्या रूपाला मी कांहीं अयोग्य बायको नाहीं. आपण आनंदानें ह्या दण्डकारण्यांत सचार करूं."तेव्हां लक्ष्मणानें तीच थट्टा लांबविली. तो म्हणाला:—" मी रामचंद्राचा धाकटा भाऊ, म्हणजे दास. माझी बायको होऊन तूं दासी कशाला होत्येस ? यापेक्षां रामानें ही कुरूप, हिडिस, ढेरपोटी बायको टाकून देऊन तुला बायको करावी, हें युक्त आहे." हें थट्टेचें भाषण शूर्पणखेला खरेंच वाटलें. ती पुन्हां रामाकडे वळून म्हणाली:— " खरोखरच या कुरूप बायकोच्या नादीं लागून तूं माझा अपमान करतो आहेस ! तेव्हां हिलाच प्रथम मी खाऊन टाकत्यें; मग मला सवत राहणार नाहीं आणि तुझ्याशीं मी आनंदानें दिवस काढीन." असें म्हणून जशी रोहिणीवर एकादी आकाशांतून पडणारी उल्का एकदम धांवावी, त्याप्रमाणें ती सीतेवर चालून गेली. तिला मध्यंतरींच पकडून रामानें लक्ष्मणास म्हटलें:—"लक्ष्मणा, ह्या मूढ अनार्यांना थट्टा समजत नाहीं. यांच्याशीं परिहास करूं नये. पहा सीतेचा जीव अगदीं भावांवून गेला आहे. या राक्षसीला योग्य शासन केलें पाहिजे. या हिच्या दुष्ट कृत्याकरितां हिला विद्रूप करून सोडून दे." अशी आज्ञा होतांच लक्ष्मणानें खड्ग घेऊन व तिला धरून तिचे नाक–कान कापून टाकिले ! तेव्हां मोठ्यानें किंकाळ्या फोडीत रक्तबंबाळ झालेलें आपलें तोंड घेऊन ती शूर्पणखा अरण्यांत जी पळाली, ती थेट जनस्थानांत आपल्या भावापाशीं गेली. जनस्थान नगरांत खर राक्षस सभेंत बसला होता. त्याच्यापुढें ती नाक–कान कापल्यामुळें रक्तबंबाळ झालेली बया किंकाळ्या फोडीत उभी राहिली! तेव्हां खरानें तिचें पुष्कळ सांत्वन करून, ही तुझी अपेष्टा कोणीं केली म्हणून विचारलें. तिनें रामलक्ष्मणांची सर्व हकीगत त्यांस सांगितली. तेव्हां क्रोधानें लाल होऊन चौदा बलाढ्य राक्षसांस खरानें अशी आज्ञा केली:—" वीरांनो, तुम्ही शूर्पणखेच्या बरोबर जाऊन ती दाखवील त्या मनुष्यांना ठार मारा व त्यांचें रक्त हिला पिऊं द्या."अशी आज्ञा होतांच चौदा वीर शूर्पणखेसह धांवले;

ते पंचवटींत रामाच्या आश्रमाजवळ आले. शूर्पणखेस व त्या राक्षसांस पाहतांच रामानें लक्ष्मणास सीतेस आश्रमांत घेऊन जाण्यास सांगून, स्वतः धनुष्यबाण हातीं घेतला; व ते राक्षस त्याच्यावर हल्ला करणार त्यापूर्वीच चौदा बाणांनीं त्यांना जमिनीवर पाडले. ते मेलेले पाहून शूर्पणखा ओरडत पुन्हां पळाली, ती खरापुढें येऊन थांबली; व निर्भर्त्सनायुक्त वाणीनें तिनें खराला म्हटलें:—" खरा, रामलक्ष्मण महान् पराक्रमी आहेत. तूं केवळ शौर्याच्या वल्गना करितोस. तुझ्या एकट्याच्यानें कांहीं होणार नाहीं; सर्व सैन्य घेऊन तूं नीघ. नाहीं तर तूंच मारला जाशील. " याप्रमाणें तिनें चिडाविल्यामुळें खर लढाईत मागें न फिरणारे, व नील मेघाप्रमाणें काळे-कुळकुळीत, असे चौदा हजार राक्षस घेऊन सेनापति दूषणासह निघाला. रामाला हें भाविष्य दिसून आलेंच होतें. सीतेला लक्ष्मणासह डोंगरांत पोंचवून, आपण कवच चढवून व दिव्यायुध घेऊन तो सज्ज होऊन वाट पाहातच होता. त्यानें त्या राक्षसांचें बाणांनींच आतिथ्य केलें. एकटा राम व चौदा हजार राक्षस यांमध्यें भयंकर संग्राम सुरू झाला; व अखेरीस एकट्या रामानें चौदा हजार राक्षस, खर, दूषण व त्रिशिरा यांसमवेत ठार केले ! हें रामाचें अमानुष कर्म पाहून देव, गंधर्व, सिद्ध, इत्यादिकांनीं आकाशांतून रामावर पुष्पवृष्टि केली,नंतर अगस्त्यादि ऋषि व तापसी यांनीं येऊन रामाचें अभिनंदन केलें आणि म्हटलें:—"रामा, याच कार्या-करितां तुला दण्डकारण्यांत लोकांनीं आणिलें होतें. आतां या अरण्यांत आम्ही आपल्या तपाचें आचरण निःशंक व निर्भयपणें करूं. " इतक्यांत लक्ष्मण सीतेस घेऊन आश्रमांत परत आला. तेव्हां सीतेनें हजारों राक्षसांचें निर्दालन करणाऱ्या रामाकडे आश्चर्य व प्रीति यांनीं भरलेल्या दृष्टीनें पाहून आनंदाच्या भरांत रामाला मिठी मारिली व हें भयंकर अरिष्ट टळून राम सुरक्षित राहिल्याबद्दल परमेश्वराची स्तुति केली. (अर० स० १६–३०).

चौदा हजार राक्षस एकट्या रामानें मारलेले पाहून शूर्पणखा भयभीत होऊन तेथून निघाली, ती लंकेंत रावणाकडे गेली. राजसभेत रावण सिंहा-सनावर बसला होता. चारी बाजूंला सचिव हात जोडून उभे होते. दहा मस्तकें व वीस भुजा,यामुळें त्याचें शरीर विलक्षण धिप्पाड व तेजस्वी दिसत होतें. त्याच्या रुंद छातीवर राजचिन्हें धारण केलेलीं होतीं. ज्यानें कैलास-पर्वतावर जाऊन व कुबेराला जिंकून पुष्पक विमान आणिलें होतें, ज्यानें

इंद्राचें उपवन जें नंदनवन तें क्रोधानें उध्वस्त करून टाकिलें होतें, ज्यानें चंद्रसूर्याला उगवत असतांना मध्येंच पर्वतावर उभें राहून थांबवून धरलें होतें, दहा हजार वर्षें तप करून व ब्रह्मदेवास आपलीं शिरकमळें अर्पण करून ज्यानें पिशाच्च, उरग, राक्षस, दैत्य, दानव व देव या सर्वांपासून मला मृत्यु नसावा असा वर मिळविला होता, अशा त्या बलाढ्य राक्षसराजापुढें उभी राहून भयानें त्रस्त झालेली शूर्पणखा म्हणूं लागली:–" अरे रावणा, तूं कामोपभोगांत होऊन धुंद पडला आहेस. तुझ्यावर अरिष्ट आलें आहे, हें तुला कसें कळत नाहीं ? अरे, राजाला बातमीदारांच्या दृष्टीनें सर्व दिसतें, म्हणून त्याला दीर्घदृष्टि म्हणतात. पण तुला झोंप लागली आहे, असें वाटतें. अरे, चौदा हजार भीमकर्मे राक्षस एकट्या रामानें ठार मारून खर, दूषण व त्रिशिरा, यांजलाही यमाचे घरीं पाठविलें आहे, हें तुला कळलें नाहीं काय ? जनस्थान उध्वस्त करून रामानें ऋषींना अभय दिलें आहे; आणि दंडकारण्य अगदीं मोकळें करून त्यांना क्षेमयुक्त केलें आहे. पण तूं चैनींत चूर होऊन पराधीन झाला आहेस. तुला आपल्या राज्यांत काय भय उत्पन्न झालें आहे, याची दादही नाहीं. " हें तिचें भाषण ऐकून रावणानें विचारलें:—" अगे शूर्पणखे, तुझी अवस्था अशी कोणीं व कां केली ? हा राम कोण आहे ? त्याचें सामर्थ्य काय आहे ? तो कोणत्या आयुधानें लढतो, मला सर्व हकीगत सांग तर खरी. " शूर्पणखेनें लबाडीनें उत्तर दिलें:—" महाबाहु राम हा मदनासारखा सुंदर, विशालाक्ष, महान् पराक्रमी, धनुष्यानें लढणारा व जटावल्कलें धारण करणारा आहे. त्याचा बंधु लक्ष्मणही तसाच आहे. पण रामाची बायको सीता अत्यंत लावण्यवती आहे. तिच्यासारखी स्त्री मी देवलोकीं किंवा दैत्यासुरगंधर्वलोकींही पाहिली नाहीं. ज्याची सीता भार्या होईल, तो खरोखरच धन्य आहे, असें मला वाटलें, म्हणून तुझ्याकरितां मी सीतेचें हरण करण्यासाठीं गेल्यें; तेव्हां त्या लक्ष्मणानें माझें असें विद्रूप तोंड केलें. त्या सीतेचें तूं हरण करणार नाहींस आणि त्या रामलक्ष्मणास तूं ठार मारणार नाहींस, तर तुझें हें त्रैलोक्याच्या राज्याचें वैभव नष्टच झालें, असें समज. " रावणानें तिचें भाषण ऐकून तिचें समाधान केलें, आणि आपल्या मनाशीं, पुढें काय करावयाचें तें ठरवून तो रथ–शाळेंत गेला. तेथें त्यानें गुप्त रीतीने सारथ्याला रथ जोडण्याविषयीं आज्ञा केली. सारथ्यानें सुवर्णाच्या रत्नखचित रथाला सुवर्णभूषणांनीं अलंकृत केलेलीं पिशाच्चमुखीं खेचरें जोडून रथावर

रावणाला बसविलें आणि तो रथ वायुवेगानें आकाशांतून हांकिला. रावण आकाशांतील विमानांची दिव्य शोभा पहात चालला असतां समुद्राच्या किनाऱ्यावरील चंदन, अगरु, कंकोळ वगैरे सुगंधि-वृक्षांच्या वनांचा सुवास घेत समुद्र ओलांडून पलीकडच्या तीरावर एका पुण्य आणि रम्य आश्रमांत थोड्याच वेळानें उतरला. या ठिकाणीं मारीच नांवाचा राक्षस कृष्णाजिन व जटामंडल धारण करून तप करीत असे. मारीचानें रावणाचें योग्य आतिथ्य केल्यावर रावणानें भाषणास आरंभ केला. तो म्हणाला:—" मारीचा, तुला ठाऊक आहे कीं, माझा चुलत बंधु खर, दूषण व शूर्पणखा यांसह माझ्या आज्ञेनें जनस्थानांत रहात असे. तेथें चौदा हजार राक्षस त्याच्या मदतीला रहात असत. ते सर्व व खर-दूषण यांस रामानें एकट्यानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं ठार मारिलें. एका मनुष्यानें—बापानें हांकून दिलेल्या एका राजपुत्रानें—केवळ एका पादचारी पोरानें—रथाश्वगजादि वाहनांवरून लढणाऱ्यांचा नाश केला ! त्या क्षणिक जीविताच्या मनुष्यानें माझ्या बहिणीचे विनाकारण नाक व कान कापले. याकरितां त्या रामाची देवकन्येप्रमाणें सुंदर भार्या सीता हरण करण्याचा मीं निश्चय केला आहे. या कामांत मला तुझें साहाय्य पाहिजे आहे. सीतेला हरण करण्याची मीं एक युक्ति योजिली आहे. तूं सोन्याचा हरिण होऊन सीतेच्या दृष्टीस पड, म्हणजे बहुधा तिला तुझी इच्छा उत्पन्न होईल. मग राम—लक्ष्मण तुला धरण्याकरितां सीतेला आश्रमांत सोडून गेले म्हणजे, मी तिचें सहज हरण करीन. सीतेच्या विरहानें क्षीण झालेल्या रामाचा मला मागून नाश करण्यास मुळींच वेळ लागणार नाहीं. " रामाचें नाव ऐकतांच मारीचाच्या हृदयांत भीतीचें कांपरें भरलें. तत्रापि तो शांतपणानें म्हणाला:—" रावणा, अप्रिय परंतु सत्य असें बोलणारे व तसें बोलणें ऐकणारे फार थोडे असतात. मी अप्रिय बोलतों, याची क्षमा कर. रामाला अद्याप तूं ओळखिलें नाहींस. तूं दूतांकडून चोहोंकडची बातमी आणवीत नाहींस, असें वाटतें. राम महान् पराक्रमी व इंद्रासारखा वीर्यवान् आहे. राक्षसांचें सर्वथा कल्याण असो. कारण राम क्रुद्ध झाला, तर पृथ्वीवरून सर्व राक्षस नाहींसे करून टाकील. तुझ्या जीविताचा नाश करण्याकरितांच तर ही सीता उत्पन्न झाली नाहीं ना ? सीतारूपानें राक्षसांनानें हेंमोठे भयच उपस्थित झालें आहे. तुझ्यासारखे कामवृत्त, दुःशील आणि पापविचार करणारे राजे आपला, आपल्या लोकांचा व आपल्या राष्ट्राचा

नाश करितात. त्या ओजस्वी पुरुषाची बायको हरण करून आणणें तुला शक्य नाहीं. कारण, दिव्याच्या ज्योतीप्रमाणें ती तुझा हात भाजील. रामाचा प्रभाव माहीत नसल्यामुळे, हा मूल आहे अशा कल्पनेनें मी विश्वामित्राच्या यज्ञावर हल्ला करावयास गेलों; पण रामाने एका बाणानें मला समुद्रात शंभर योजनें दूर फेंकून दिलें. माझें म्हणणे एकीकडे टाकून तूं रामाशीं विरोध माडशील, तर कुलासहित तुझा नाश होईल. **परदाराभिलाषासारखें घोर पातक नाहीं.** तर आपल्या स्त्रियांच्या ठिकाणीं प्रेम ठेवून आपल्या कुलाचें रक्षण कर." हा मारीचाचा उपदेश, मरणाराला जसें औषध अप्रिय होतें, त्याप्रमाणें रावणाला आवडला नाहीं. त्यानें क्रोधाने लाल होऊन उत्तर केलें:—"राजानें सल्ला विचारला असता शाहण्या सचिवानें हात जोडून अनुकूल सल्ला द्यावा. अरे, खर—दूषणांचा वध करणाऱ्या रामाची भार्या सीता ही अवश्य हरण केली पाहिजे; आणि तूं या कामास सहाय होणार नाहींस तर प्रथम तुझेंच पारिपत्य करून मग मी आपलें इष्ट कार्य करीन." मारीचानें रावणाचें म्हणणे ऐकून निरुपायानें, "आपण सांगाल तें काम करण्यास मी तयार आहें," अशी हात जोडून विनंति केली. तेव्हां ते दोघे रथावर बसून निघाले, ते दंडकारण्यांत जेथें रामाचा आश्रम होता तेथें पोंचले. नंतर मारीचानें सुवर्ण—मृगाचें रूप धारण करून रामाच्या आश्रमाच्या समोर चरण्यास आरंभ केला. इतक्यांत फुलें वेंचण्याकरिता सीता आश्रमाच्या बाहेर आली. तेव्हां तिला तो अत्यंत आश्चर्यकारक मृग दिसला. त्याचीं शिंगें रत्नांचीं होतीं; तोंडावर काळे व पांढरे पट्ट होते. ओंठ अगदीं लाल रक्तकमलाप्रमाणे होते. कान इंद्रनीळ मण्याप्रमाणे निळे होते. पोटही इंद्रनीळाप्रमाणें निळें होते. दोन्ही बाजूंला मधुकपुष्पाप्रमाणें पिवळे मोठाले डाग होते. पाय अगदीं बारीक असून खूर वैडूर्यमण्याचे होते. इंद्रधनुष्याप्रमाणें चित्रविचित्र रंगानें भरलेली शेपटी त्यानें वर केलेली होती. याप्रमाणें नाना रत्नांनीं भरलेला व सर्व अंगावर चांदीसारखे लहान लहान पांढरे शुभ्र ठिपके असलेला तो मृग मोठ्या ऐटीनें मान ताठ करून इकडून तिकडे फिरून झाडांचे कोंवळे पल्लव खात होता. त्यास पाहून सीतेस फारच कौतुक वाटलें, व मोठ्या हर्षानें तिनें नवऱ्यास व लक्ष्मणास हाक मारिली. "या लवकर या, हा सुंदर मृग पहा." असें म्हणत त्या मृगाकडे पहात पहात ती त्याच्यामागें लागली. इतक्यांत राम—लक्ष्मण सीतेपाशीं येऊन पोहोंचले; तेव्हां सीतेनें मोठ्या हर्षानें व उत्सुकतेनें

म्हटलें:—" आर्यपुत्र, हा सुंदर मृग मला आणून द्या. अहो, याचें रूप किती तरी मनोहर आहे! हा चित्रविचित्र रंगाचा मृग माझें मन हरण करून नेत आहे. हा जर जिवंत तुमचे हातास लागला तर फारच चांगलें होईल; कारण, वनवास संपल्यावर अयोध्येस आपण परत जाऊं, तेव्हां आपण याला अंतःपुरांत नेऊं आणि भरताला व सासूबाईंना हा मृग पाहून मोठें आश्चर्य वाटेल. हा जिवत हातीं नाहीं लागला तर मारून आणा. याचें सुवर्ण-केशांनीं भरलेलें चर्म बसावयास फार चांगलें आहे." असें तें सीतेचें हर्षो-त्सुक्याचें भाषण ऐकून राम लक्ष्मणास म्हणाला:—" लक्ष्मणा, माझें धनुष्य घेऊन ये. सुवर्णासारख्या कांतीचा हा मृग कोणाचें मन हरण करणार नाहीं ! मला वाटतें कोणत्याही अजाचें किंवा कदलीचें किंवा प्रियकीचें चर्म याच्या चर्मासारखें सुख—स्पर्श नसेल. तूं येथेंच राहून मैथिलीचें रक्षण कर. मी लवकरच या मृगाला जिवंत किंवा मारून आणतों." असें म्हणून आपलें केवळ भूषणच, असें तीन ठिकाणीं लवलेलें धनुष्य घेऊन राम त्या मृगा-मागें निघाले. कधीं त्या मृगाला पळवीत, कधीं त्याला तृणाच्या मुष्टीनें लोभवण्याचा प्रयत्न करीत, ते त्याच्या मागून चालले. शेवटीं तो मृग शंकित होऊन आकाशांत उंच उंच उड्या मारीत सुटला. तेव्हां आतां हा आपल्या हातून पक्का जाईल असें वाटून रामानें धनुष्यास शर लावून संधान केलें आणि जोरानें बाण मारिला, तो त्या मृगाच्या हृदयात घुसला. त्याबरोबर त्याचें मृगरूप नाहींसें होऊन तो मारीच राक्षस मृत्यु-वेगानें आकाशांत ताडभर उंच उडाला व खालीं पडून गतप्राण झाला ! पण उडतां उडतां त्यानें रावणाशीं संकेत केल्याप्रमाणें, " हा सीते, हा लक्ष्मणा," असा, रामाच्या आवाजाचें अनुकरण करून, मोठ्यानें आक्रोश केला ! तो शब्द ऐकून व मृगाचे ठिकाणीं राक्षस मरून पडलेला पाहून रामाचे पोटांत धस्स झालें; व ही राक्षसांची माया आहे, येथें कांहीं तरी दगा आहे, असें त्यास वाटलें. हा शब्द ऐकून लक्ष्मणाची व सीतेची काय अवस्था होईल, या कल्पनेनें त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले; परंतु तसाच धीर धरून व आणखी एक मृग मारून तो बरोबर घेऊन राम जनस्थानाकडे मोठ्या त्वरेनें फिरला.

इकडे आश्रमांत सीतेनें तो रामाचा आर्त स्वर ऐकला; त्याबरोबर ती उत्कंठेनें लक्ष्मणास म्हणाली:—" लक्ष्मणा, धांव. रामाचा आर्त स्वर ऐकूं येत

आहे,त्यांजवर कांहीं तरी संकट आलें,असें वाटतें.तर त्यांचें जाऊन रक्षण कर." परंतु रामाची आज्ञा लक्षांत आणून लक्ष्मण आपल्या जागेवरून उठला नाहीं. तेव्हां क्रोधानें संतप्त जानकी त्यास म्हणाली:--" लक्ष्मणा, तुझ्या मनांत बहुतकरून माझ्याविषयीं पाप आलें आहे, असें वाटतें. म्हणून तूं रामाचें रक्षण करण्यास जात नाहींस.रामावर आलेलें संकट तुला प्रिय वाटत आहे; आणि म्हणूनच तूं असा स्वस्थ बसला आहेस. तो सुरक्षित राहावा अशी तुझी इच्छा दिसत नाहीं; मग रामाला आपला गुरु समजून त्याची शुश्रूषा करण्याकरितां तूं येथें कां आलास ? त्याचा जीव धोक्यांत पडल्यावर मला तरी जगून काय करावयाचें आहे ? " असें सीतेचें चमत्कारिक भाषण ऐकून लक्ष्मणाला फार दुःख झालें. त्यानें हात जोडून विनंति केली:--"सीते, तुझ्या भर्त्याला जिंकण्याचें सामर्थ्य पन्नग, असुर, गंधर्व, देव, दानव, राक्षस, यापैकीं कोणासही नाहीं. मी तुला एकटी येथें सोडून जाऊं शकत नाहीं. राक्षस महामायी असतात. ते निरनिराळ्या आवाजांचें अनुकरण करून मनुष्यास फसवितात; आणि मग त्याची हिंसा करतात. तर या शब्दांवर तूं फसूं नको. " हें लक्ष्मणाचें म्हणणें ऐकून सीतेला अधिकच क्रोध आला व ती लक्ष्मणाला कठोर वचन बोलली:- "अनार्या, दुष्टा, कुलपांसना, तुझ्या मनांत खचित रामानें मरावें असें आहे, आणि म्हणूनच तूं असल्या विचित्र गोष्टी सांगतो आहेस. पण यांत आश्चर्य काय ? सावत्र बंधु असेंच वरवर गोड बोलून पाठीमागून गळा कांपतात ! माझा गुप्त अभिलाष पोटांत धरून किंवा भरताशीं संगनमत करून तूं रामाच्या मरणाचीच वाट पाहात आहेस. पण हा तुमचा हेतु मी सिद्धीस जाऊं देणार नाहीं. तुझ्या समक्ष येथेच मी आपला प्राण देत्यें. कारण, रामाविरहित या पृथ्वीवर एक क्षणभरसुद्धां मी जिवंत राहणार नाहीं."हें तिचें निश्चयाचें कठोर भाषण ऐकून लक्ष्मणानें दुःखानें हात जोडून म्हटलें:--" याचें उत्तर मी देऊं शकत नाहीं; आणि तूं माझें दैवत असल्यामुळें, तुझी अवज्ञा करणेंही शक्य नाहीं; पण हें तुझें वाक्य स्त्री-स्वभावाला योग्य असून माझ्या कानांला तापलेल्या बाणाप्रमाणें भाजून टाकीत आहे. हे वनचरदेवतांनो, मी योग्य सल्ला देत असतां सीता काय बोलली हें तुम्हीं ऐकलें आहे; तर आतां रामाची आज्ञा मोडून मी हिला सोडून जात आहे, हिचें तुम्ही रक्षण करा. ज्येष्ठ बंधूंची आज्ञा पालन करीत

असतांही मजवर खोटा आरोप स्त्रीस्वभावानुरूप करीत आहेस; तेव्हां तुजवर कांहीं तरी संकट येणार आहे. असो, ह्या वनदेवता तुझें रक्षण करतील; हा मी रामाच्या रक्षणाकरितां जातों. ''. असें म्हणून धनुष्यबाण घेऊन लक्ष्मण निघून गेला. ( अर० स० ३१–४५ ).

लक्ष्मण बाहेर गेल्याची संधि साधून रावण आश्रमांत शिरण्यास सिद्ध झाला.त्यानें त्रिदंडी संन्याश्याचें रूप धारण केलें,काषाय वस्त्रें परिधान करून डोक्यावर केसांची गांठ बांधली आणि हातांत छत्री घेऊन व पायांत जोडा घालून डाव्या खांद्याला त्रिदंड व कमंडलु लटकाविले. याप्रमाणें थाट करून ज्याप्रमाणें सूर्यचंद्ररहित संध्या अंधकारानें ग्रस्त करावी,त्याप्रमाणें रामलक्ष्मण-विरहित झालेल्या सीतेस ग्रासण्याकारितां रावण आश्रमद्वारांत येऊन उभा राहिला. त्या वेळेस त्याचें उग्र रूप पाहून जनस्थानांतील वृक्षसुद्धां सरोमांच झाले. गोदावरी नदी शीघ्र चालणारी तीसुद्धां भीतीनें मंद झाली.संपूर्ण पक्षी आणि मृग जागच्या जागीं स्तिमित झाले.रावण आश्रमद्वारांत शिरून पाहतो तों सीता आश्रमांत शोक करीत व अश्रू गाळीत बसली आहे,असें त्याच्या दृष्टीस पडलें. तिचें पूर्ण-चंद्रासारखें वदन पाहून रावण आश्चर्य करून सीतेला बोलूं लागला:—" हे स्त्रिये, तुझी ही सुंदर कांति व तुझें हें रतीसारखें रूप पाहून मला मोठें कौतुक वाटत आहे. तूं स्त्री आहेस किंवा लक्ष्मी आहेस किंवा कोणी अप्सरा आहेस ? तूं या निर्जन अरण्यात कशी आलीस ? तूं कोणाची कोण आहेस ?'' सीतेनें ओटीवर संन्यासी आला आहे, असें पाहून उठून त्याचें स्वागत केलें; व त्या तृणानें झाकलेल्या कूपाप्रमाणें बाहेरून शांत वेष केलेल्या भयंकर राक्षसांस ती म्हणाली:–" मी दशरथराजाची स्नुषा आणि जनकराजाची कन्या आहें. माझा पति राम आपल्या सापत्न मातेच्या आग्रहानें व पित्याच्या आज्ञेनें चौदा वर्षें वनवास काढण्याकरितां या दण्डकारण्यांत आला आहे. मी भर्त्याबरोबर खुषीनें आलें आहें; व माझा धाकटा दीर लक्ष्मण हाही बरोबर आहे. राम–लक्ष्मण बाहेर गेले आहेत. पुष्कळ वन्य मांस घेऊन ते लौकरच येतील व तुमचें आदरातिथ्य करतील. तुम्ही कोण, तुमचें गोत्र व कुल काय, तें सांगा. ''रावणानें उत्तर दिलें:– " ज्याला चराचर सृष्टींतील जड पदार्थ व देव,असुर, मनुष्यादि सर्व प्राणी थरथर कांपतात, तो राक्षसांचा अधिपति रावण मी आहें. कौशेय धारण केलेल्या तुझ्या या सुवर्णतनूला पाहून मी कामानें मोहित झालों आहें. तर

सर्व जगांतून उत्तम उत्तम अशा पाहून जबरदस्तीनें धरून आणलेल्या माझ्या हजार स्त्रियांमध्यें तूं माझी पट्टराणी हो. समुद्रानें वेष्टिलेली माझी राजधानी लंका डोंगराच्या शिखरावर वसलेली आहे; त्या ठिकाणीं सुंदर सुंदर उपवनांत माझ्यासहवर्तमान तूं रममाण होशील, तेव्हां तुला अयोध्येचें अथवा या जनस्थानाचें स्मरणसुद्धां होणार नाहीं. " हें ऐकतांच सीता क्रोधानें संतप्त होऊन त्याचा धिक्कार करून म्हणाली:—" पर्वताप्रमाणें निष्कंप, इंद्राप्रमाणें पराक्रमी व सागराप्रमाणें अक्षोभ्य अशा रामाची मी पतिव्रता भार्या आहें. सर्व लक्षणांनीं संपन्न, सर्वांना मोठ्या वटवृक्षाप्रमाणें आश्रय देणारा व सत्यसंध असा जो राम त्याची मी पतिसेवापरायण भार्या आहे; सिंहासारखी ज्याची गति, सिंहासारखा ज्याचा पराक्रम, सिंहासारखा ज्याचा क्रोध, त्या महाबाहू पूर्णचंद्रानन रामाची मी प्रियपत्नी आहें. असें असतां तूं केवळ कोल्हा, तूं सिंहाच्या बायकोची इच्छा करितोस, तुला लाज वाटत नाहीं काय? माझी इच्छा धरणें म्हणजे भुकेल्या सिंहाच्या दाढेत शिरण्याप्रमाणे भयंकर आहे; मंदरपर्वताला हातांनीं उचलण्याचा प्रयत्न करण्यासारखें आहे; कालकूट विष पिऊन शंभर वर्षें जगण्याची इच्छा करण्यासारखें आहे; मूर्खा, राघवाच्या भार्येला हरण करूं पाहतोस, म्हणजे तूं गळ्यात मोठी धोंड बांधून समुद्र ओलांडूं पहात आहेस; सिंह व कोल्हा, किंवा हत्ती आणि मांजर, अथवा गरुड आणि कावळा, अगर चंदनाचें गंध आणि चिखल, किंवा सोनें आणि शिसें, किंवा समुद्र आणि डबकें, यांमध्यें जें अंतर, तें रामांत आणि तुझ्यांत आहे. " हें ऐकून रावण म्हणाला:—" सीते, माझा पराक्रम तुला ठाऊक नाहीं. मीं माझा बंधु कुबेर याचें विमान हरण करून आणलें आहे; मीं सर्व देव पादाक्रांत केले आहेत. वायु, सूर्य, चंद्र, वगैरे ग्रहगण हे सर्व माझे अंकित आहेत. राम म्हणजे यःकश्चित् बापाने हाकून दिलेला एक मनुष्य, तो माझ्या करंगळीबरोबरही नाहीं. तुझ्या भाग्यानें तुझ्यापुढें आलेलें हें सुखाचें ताट ढकलून देऊं नको. माझी स्त्री होऊन सर्व त्रैलोक्याचें राज्य कर. " हें ऐकून सीतेचा क्रोध तिच्या अंतःकरणांत मावेनासा झाला. तिचें अंग थरथर कांपूं लागलें. तिचे नेत्र क्रोधानें लाल झाले आणि ती त्वेषानें म्हणाली:—" दुष्टा, तूं वैश्रवणाचा भाऊ म्हणवतोस आणि परस्त्रीवर अशी नजर ठेवतोस ! तुझ्या दुर्वर्तनानें सर्व राक्षसांचा उच्छेद होईल. इंद्राची भार्या शची ही जशी अप्राप्य आहे,

त्याप्रमाणें रामाची भार्या ही तुला अप्राप्य आहे. " तिचें हें धिक्कारयुक्त भाषण ऐकून रावणानें क्रोधानें हातावर हात आपटून आपलें मूळचें उग्र स्वरूप धारण केलें. त्याबरोबर एक दहा तोंडांचा व वीस हातांचा पर्वतप्राय राक्षस सीतेपुढें उभा राहिला आणि म्हणालाः—" माझा पराक्रम आणि माझें वीर्य तूं जाणत नाहींस. मी समुद्र पिऊन टाकीन, खुद्द यमाला रणांगणांत ठार करीन, सूर्याला तीक्ष्ण शरांनीं जर्जर करीन, किंवा ही पृथ्वी फोडून टाकीन. उन्मत्ते सीते, माझा पराक्रम पहा, " असें म्हणून पुढें सरसावून त्यानें एका हातानें सीतेचे केस धरिले व दुसऱ्यानें तिच्या मांडीस वेंघ मारून व तिला उचलून तो आश्रमाच्या बाहेर आला. तेव्हां त्याचें उग्र स्वरूप पाहून समस्त वनदेवता भयभीत होऊन पळून गेल्या. इतक्यांत त्याचा खरयुक्त रथ तेथें आला. त्यानें त्यांत सीतेला ठेवून नंतर तो त्याजवर चढला. तो रथ आकाशमार्गानें निघाला त्या वेळेस सीतेनें मोठ्यानें आक्रोश केला. " हे रामा, हे लक्ष्मणा, धांवा, मला हा कामरूपी राक्षस घेऊन चालला ! हे राघवा, तुम्ही सर्व दुष्टांचें पारिपत्य करणारे, तुम्हांला हें दुष्ट कृत्य कसें दिसत नाहीं ? धांवा हो धांवा. आतां मात्र कैकेयी आणि तिचे बंधुवर्ग यांचे मनोरथ पूर्ण झाले; कारण धर्मशील रामाची धर्मपत्नी रावण घेऊन चालला. हे लतावृक्षांनो, रामाला माझी हकीकत सांगा. आई गोदावरी, रामाला सांग कीं, सीतेला हरण करून रावण घेऊन गेला. आतां माझ्या ही पंचवटी कसची दृष्टीस पडते ! वनदेवतांनो, मी तुमचा निरोप घेत्यें. रामाला माझी खबर सांगा. " इत्यादि प्रकारें सीतेचा विलाप चालला होता. आश्रमापासून थोड्या अंतरावर एका महावृक्षावर वृद्ध जटायु पेंगत बसलेला सीतेच्या दृष्टीस पडला. तेव्हां जटायु तरी रामाला सर्व हकीकत सांगेल या आशेनें सीतेनें ओरडून जटायूला हाक मारिली. " मामंजी जटायो, हा पहा दुष्ट पापी राक्षस मला अनाथेला घेऊन चालला आहे. तुम्ही वृद्ध आहांत, तुमच्यानें कांहीं होणार नाहीं; पण रामाला तरी ही हकीकत सांगा." हे शब्द ऐकून जटायूनें डोळे उघडून तो सर्व प्रकार पाहिला. तेव्हां तो ओरडून म्हणाला, ' हे दशग्रीवा, मी जरी वृद्ध आहें आणि तूं तरुण, रथारूढ, कवच–खड्ग–धनुष्य धारण केलेला आहेस, तरी मी तुला वैदेहीला अशी सहज घेऊन जाऊं देणार नाहीं. ' असें म्हणून त्यानें रावणाच्या

रथावर झडप घातली, आपल्या तीक्ष्ण चोंचीनें व पायाच्या नखांनीं त्याचीं खेचरें मारलीं; व रावणाच्या भुजांवर अनेक जखमा केल्या. तेव्हां रावणानें सीतेला रथाखालीं ठेवून त्याच्याशीं झगडण्यास प्रारंभ केला. कांहीं वेळ दोघांचें दारुण युद्ध होऊन अखेरीस रावणानें खड्गानें जटायूचे पंख व पाय तोडले. तेव्हां तो गृध्र निरुपाय होऊन जमिनीवर धाडकन पडला. तें पाहून सीतेनें त्या गृध्राबद्दल अत्यंत शोक केला. "रामा, पक्षी–सुद्धां माझ्याकरितां धांवत आहेत. तुम्हांला अजून कसें कळलें नाहीं ? हा बिचारा वृद्ध गृध्र माझ्याकरितां झगडून मारला जाऊन जमिनीवर पडला आहे. हे काकुत्स्था, हे लक्ष्मणा, मज अनाथाचें रक्षण करा." असें म्हणत सीता इकडे तिकडे पळूं लागली व झाडाना बिलगूं लागली. 'सोड, दुष्टा, सोड.' असें ती ओरडत असतां वेगानें जाऊन रावणानें तिचे केस जोरानें धरिले. त्या वेळेस चराचर सृष्टि अंधकारानें ग्रस्त झाली. सीतेचे केस एका हातानें धरून दुसऱ्या हातानें रावणानें तिला उचलिलें व आकाशांत उड्डाण केलें. त्या वेळेस तिच्या डोक्यांत घातलेलीं फुलें खालीं पडून गेलीं. तिच्या पायांतून रत्नांनीं भूषित केलेलीं नूपुरें धरणीवर पडलीं. हातांतून कंकण गळून गेलें व गळ्यांतून हार तुटून पडला. वनांतील सिंह व वाघ रावणाची छाया वेगानें चाललेली पाहून रागानें त्या छायेच्या मागें धांवले. पर्वतसुद्धा शृंगरूपी हात वर करून जलप्रवाहाच्या मिषानें रडूं लागले. सूर्य रजोध्वस्त होऊन दीन झाल्याप्रमाणें दिसूं लागला. भूतमात्र दुःखग्रस्त होऊन रडूं लागले. हरिणांचीं पोरें ओरडूं लागलीं; सीतेला कोणीही त्राता दिसेना. तेव्हां एका पर्वताच्या शिखरावर पांच वानर बसलेले पाहून कदाचित् हे तरी रामाला आपली खबर सांगतील, असें वाटून सीतेनें आपलें कौशेयाचें उत्तरीय आंत कांहीं आपले अलंकार बांधून वरून त्यांचेकडे टाकून दिलें; रावण आपल्या वेगात व विचारांत मग्न असल्यामुळें त्याच्या ध्यानांत ही कृति आली नाहीं. याप्रमाणें रावण वेगानें पंपासरोवरास ओलांडून नदीपर्वत मागें टाकीत चालला. तो धनुष्यापासून सुटलेल्या बाणाप्रमाणें लवकरच समुद्र उल्लंघून लंकेंत पोहोंचला. प्रथम आठ बलाढ्य राक्षसांस जनस्थानास जाऊन रामावर नजर ठेवण्याविषयीं आज्ञा देऊन नंतर रावण नंदनवनापेक्षांही अत्यंत सुंदर व सुखकर असें आपलें सर्व अंतःपुर सीतेला दाखवून म्हणालाः—"सीते, मी बत्तीस कोट राक्षसांचा अधिपति आहें. तिन्ही लोक

मला वश आहेत. त्रिभुवनांतील रत्नें माझ्या हस्तगत आहेत. तुझ्यावर मोहित झालेल्या मला वरून तूं माझी मालकीण हो; आणि त्रिभुवनावर सत्ता चालव. ही लंका सुवर्णाच्या कोटानें चारी बाजूनें वेष्टिली असून या बेटाच्या भोंवतालीं समुद्र आहे. राम एकटा, पादचारी व त्यांतून मनुष्य असल्यामुळें तुला येथून सोडवू शकणार नाहीं. करितां तूं त्याचा नाद सोड आणि मला वश हो; मी तुझ्या पायां पडतों. हा रावण आपलीं शिरें कोणापुढेंही नमवीत नाहीं." हें ऐकून सीतेनें तोंडास वस्त्र लावून दुःखानें उत्तर दिलें:—"रावणा, तुझा अंतकाळ जवळ आला असेंच मला वाटतें. अरे, तूं जरी देवासुरांना अवध्य असलास, तरी तुला राम आपल्या अमोघ बाणांनीं यमलोकास पाठविल्याशिवाय राहणार नाहीं. तुझे हे कोट्यावधि राक्षस युद्धांत गतप्राण होऊन जमिनीवर धूळ खात पडतील. चोरा, तूं जर मला रामासमक्ष हरण केलें असतेंस तर तुझीं हीं शिरें रामानें सुवर्णमंडित शरांनीं तेव्हांच तोडलीं असतीं." हें तिचें कठोर भाषण ऐकून रावण क्रोधानें संतप्त होऊन म्हणालाः— "सीते, तुला एक वर्षाची मुदत देतों, एवढ्या अवधींत मला वश न झालीस, तर माझे स्वयंपाकी तुझे तुकडे तुकडे करून तुझें मांस शिजवतील, आणि मला सकाळच्या फराळास देतील! राक्षसिणींनो, हिला अशोक वनांत नेऊन ठेवा आणि हिच्यावर सक्त पहारा करा. हिला कोणाशीं बोलूं देऊं नका व कोणाला हिच्याजवळ येऊं देऊं नका." याप्रमाणें आज्ञा होतांच शेंकडों राक्षसिणी सीतेला अशोकवनांत घेऊन गेल्या. निराशेनें व दुःखानें सीता कदाचित् प्राण देईल तर हें एक विघ्नच होईल, असें मनांत आणून स्वतः ब्रह्मदेवानें इंद्राहातीं तिजकडे दिव्य पायस पाठविलें व निद्रेच्या साह्यानें तिच्यावर पहारा करणाऱ्या राक्षसिणींस मोहित करून व तिचें समाधान करवून तिला तें पायस खाऊं घातलें. त्यामुळें ती क्षुधारहित झाली व तशा स्थितींतही राम येऊन मला सोडवतील या आशेवर आपली कष्टमय स्थिति भोगण्यास तयार झाली. (अर० स० ४६–५७).

इकडे राम मारीच राक्षसास मारून त्याच्या मायावी ओरडण्यानें त्रस्त होऊन मोठ्या त्वरेनें निघाले; तें कोल्ह्याचें क्रूर ओरडणें मागें ऐकून अधिकच भयभीत झाले. हा अपशकुन झाला नाहीं, तोंच त्यांस दीनवदन व शून्यदृष्टि लक्ष्मण भेटला. त्यांनीं त्यास उत्सुकतेनें, 'माझ्या आज्ञेविरुद्ध सीतेला आश्रमांत टाकून कसा आलास!' म्हणून विचारलें; तेव्हां लक्ष्मणानें मोठ्या

दुःखानें त्यांना सर्व हकीकत सांगितली. तेव्हां तर रामाची भीति अधिकच वाढली व ते अधिकच त्वरेनें आश्रमांत परत आले. तो आश्रम शून्य पाहून राम शोकानें व्याकुल होऊन रडूं लागले. " लक्ष्मणा, दंडकारण्यातही मजबरोबर येणारी वैदेही कोठें गेली ? मला राज्यभ्रष्टाला जिनें अरण्यांतही सोडलें नाहीं, ती माझी प्रिय सीता कोठे आहे ? वीरा लक्ष्मणा, सीतेवांचून माझा प्राण एक क्षणभरही राहणार नाहीं. लक्ष्मणा, सीता जिवंत तरी आहे काय? अरे, कैकेयीनें मला वनांत हद्दपार केले तें सफल तर झालें नाहींना ? माझी सीता कोठे आहे ?" असें म्हणत सीतेची बसण्याची आश्रमांतली व आश्रमाजवळची, सर्व ठिकाणें त्यांनीं धुंडाळिलीं. " हाय ! सीता मेली असेल, बहुधा राक्षसानें खाल्ली असेल, छे छे, कोठें फुलें वेंचायला गेली असेल; किंवा सरोवरावर गेली असेल, अथवा नदीवर पाणी आणण्यास गेली असेल."

असें म्हणत राम इकडेतिकडे धांवूं लागले! शोकानें त्यांचे डोळे लाल होऊन ते उन्मत्तासारखे दिसूं लागले. त्यांच्या चित्तावर शोकाचा पूर्ण पगडा बसला. कदंबवृक्षाला कवटाळून रामचंद्र म्हणूं लागले, " कदंबा, तूं सीतेचा प्रिय वृक्ष आहेस. माझी सीता कोठें आहे ? सांग. हे बिल्ववृक्षा, पिंवळा पाटाव नेसलेली ती माझी सीता तूं पाहिली असल्यास ती कोठें आहे तें साग. हे अर्जुनवृक्षा, सीता तुला रोज पाणी घाली. सीता जिवंत आहे काय ? हें ककुभा, हे प्रियका, तुम्हांस ठाऊक असेल तर सांगा. जनकदुहिता सीता कोठें गेली ? हे अशोका, माझी प्रिया मला दाखवून तूं आपलें नाव अन्वर्थक करशील काय ? हे कर्णिकारा, तुझीं फुलें ती नेहमीं कानांत घालीत असे. साग, माझी सखी तूं पाहिलीस काय ? " याप्रमाणें पनस, जंबू, बकुल, पुन्नाग, चंदन वगैरे वृक्षाजवळ जाऊन राम वेड्यासारखे त्यांना विचारूं लागले. कोणी कांहीं बोलेना. तेव्हां मृगांच्या पाठीमागें उन्मत्ताप्रमाणें ते धावूं लागले. " हे मृगांनो, माझी मृगछावाक्षी तुमच्या येथें आहे काय ? हे सिंहा, माझी सिंहकटी प्रिया कोठें आहे ? हे गजा, माझी गजगामिनी कांता त्वां पाहिलीस काय ? " अशा प्रकारचा विलाप करीत राम सैरावैरा धावूं लागले. " प्रिये, परिहास पुरे कर; मला दर्शन दे. या वृक्षामागे लपली आहेस; माझी करुणा येऊं दे. तूं अधिक हास्य करणारी नव्हेस. दिसली, दिसली माझी जानकी, ही येथें आहे; हे सीते, तूं कोठें गेलीस ? अरे, राक्षसांनीं तर ती भक्षिली नाहीं ना ? " असें म्हणून व

निराश होऊन राम खालीं बसले. “ हे प्रिये, हे सीते, ” याप्रमाणें ओरडून ओरडून रामचंद्रांनीं अतिशय विलाप केला. त्यांचे राजीव लोचन पुनःपुनः अश्रू गाळून लाल झाले. लक्ष्मणानें हात जोडून पुष्कळ प्रकारें त्यांचें सांत्वन करण्याची खटपट केली. पण तिजकडे लक्ष न देतां, “ हे सीते, हे जानकी, हे प्रिये, कोठें गेलीस ? कैकेयी, तुझे मनोरथ पूर्ण झाले; सीतेसहवर्तमान अयोध्येंतून बाहेर पडलों तों मी सीतेविरहित परत कसा जाऊं ? मला अयोध्येस जाऊन तरी काय करावयाचें आहे ? मला सीतेशिवाय स्वर्गही तुच्छ आहे. लक्ष्मणा, तूं परत जा, आणि भरताला दृढालिंगन देऊन सांग कीं, ‘ आतां माझी परवानगी आहे, तूंच राज्य कर. अंबा, कौसल्या व सुमित्रा यांचें तूं पालन कर. ’ जा, लक्ष्मणा, जा. मी येथेंच मरेन. ” असें म्हणून रामचंद्र दीन स्वरानें रडत जमिनीवर लोळूं लागले. पुष्कळ वेळ शोक झाल्यावर लक्ष्मणानें रामचंद्राचे पाय धरिले आणि विनंति केली कीं, “ आपण जर असा शोक करून धैर्य सोडाल, तर मग प्राकृतजनांनीं काय करावें ? आपण जरा शांत व्हा, प्रसंग कोणावर येत नाहींत ? सर्व जगताचे नेत्र व धर्मांचे प्रवर्तक जे सूर्यचंद्र त्यांनाही ग्रहण लागतें. दैव कोणासही सुटलें नाहीं. बुद्धिवान् मनुष्यें दुःखाचा बुद्धीनें प्रतिकार करितात. आपण शेंकडों वेळां मला ज्ञान सांगितलें आहे. मी आपणांस काय उपदेश करूं ? आपणच आपल्या ठिकाणीं धीर धरून शांत होऊन विचार करा. ” शेवटीं रामानें म्हटलें:—“ लक्ष्मणा, माझी मति चालत नाहीं; मी काय करूं ? कोठें जाऊं ? कोठें तपास करूं ? तूंच मला सांग. ” तेव्हां लक्ष्मणानें म्हटलें, “ आपण हेंच सर्व जनस्थान प्रथम शोधूं या. ” असें म्हणून दोघेही चहूंकडे फिरूं लागले, तों एका रथाचे तुकडे तुकडे झालेले त्यांच्या दृष्टीस पडले, व जवळच रक्तबंबाळ झालेला व पंख कापून टाकलेला जटायु त्यांचे दृष्टीस पडला. त्यांस जटायु दीन वाणीनें तोंडानें रक्त ओकत बोलूं लागला:—“ रामा, जिला औषधीप्रमाणें तूं शोधतो आहेस, ती तुझी प्रिय कांता माझ्या प्राणांसह रावण हरण करून घेऊन गेला. तुम्ही दोघे आश्रमांत नाहीं, असें पाहून लंकेचा राजा रावण आश्रमांत शिरला आणि सीतेला जबरदस्तीनें उचलून घेऊन रथांत घालून चालला. त्यावेळेस मी त्याच्यावर झडप घालून त्याचा रथ मोडला, त्याचे घोडे मारिले, त्याचें धनुष्य तोडलें; परंतु त्यानें माझे पंख खड्गानें कापले, तेव्हां माझा नाइलाज

झाला. शेवटीं तो सीतेला उचलून आकाशमार्गानें उड्डाण करून घेऊन गेला. '' त्या गृध्रापासून ही हकीगत ऐकून राम दुःखानें आर्त होऊन धरणीवर मूर्च्छा येऊन पडले. कांहीं वेळाने शुद्धीवर येऊन ते म्हणाले:— ''लक्ष्मणा, माझें दुर्भाग्य किती वर्णन करूं ? राज्यापासून भ्रष्ट झालों; सीता वनांत सुख देत होती तीही नष्ट झाली; हा पक्षी माझा सखा व सहाय पण तोही मारला गेला. मी समुद्र तरावयास गेलों तर समुद्रसुद्धां, मला वाटतें माझ्या दुर्भाग्यानें कोरडा पडेल ! अरे, हा आपल्या वडिलाचा स्नेही माझ्याकरितां झगडून अखेरीस मारला गेला !'' असें म्हणून स्नेहानें त्या गृधाच्या पाठीवरून त्यांनीं हात फिरविला. तों त्यानें मान पसरून व पाय लांब करून रामाच्या पायांशीं प्राण सोडला ! '' लक्ष्मणा, हजारों वर्षे या दंडकारण्यात सुखानें राहून माझ्याकरितां हा शेवटीं प्राणास मुकला. याचे और्ध्वदेहिक आपल्यास केलें पाहिजे. हा पितृसखा आपल्यास पूज्य व मान्य आहे; आण, काष्ठें आण; याला आपण गति देऊं. '' अशी रामाची आज्ञा ऐकून लक्ष्मणानें वाळलेलीं लाकडें गोळा करून आणलीं आणि त्या दोघां बंधूंनीं अग्नि पेटवून जटायूस गति दिली. नंतर त्यांनीं गोदावरीतीरीं जाऊन व स्नान करून जटायूस उदक दिलें.

याप्रमाणें जटायूची व्यवस्था लावल्यावर सीतेचा शोध लावण्याकरितां ते दोघे बंधू निघाले; ते कांहीं वेळ पश्चिमेस जाऊन नंतर त्यांनीं दक्षिण दिशा धरिली. जनस्थानापासून तीन कोस गेल्यावर त्यांस क्रौंचारण्य लागलें. त्यांतूनही पार पडून पूर्वेस गेल्यावर आणखी एक घोर वन लागलें. त्या वनांतून ते बाहेर पडले; इतक्यांत एक भयंकर दरी लागली. तीही दरी ओलांडून रामलक्ष्मण पुढें गेलें. पुढें एका महारण्यांतून चालले, तों त्यांस एक भयंकर आवाज ऐकूं येऊं लागला. पुढें पाहतात तों एक भयानक राक्षस रस्ता आडवून बसलेला त्यांचे दृष्टीस पडला. त्याच्या पर्वतप्राय शरीरास डोकें नव्हते. त्या भयंकर कबंध राक्षसास छातीवर एकच आक्राळविक्राळ डोळा होता, व पोटाच्या ठिकाणीं 'आ' पसरलेला व दंष्ट्रांनीं भरलेला असा जबडा होता. त्याच्या मांड्या तुटक्या होत्या; व म्हणून तो जागच्याजागीं बसला होता. परंतु त्याचे हात एक योजन लांब होते! त्या हातांच्या तडाक्यांत जें श्वापद येईल मग तें हरीण, वाघ अगर हत्तीही असो, तें पकडून तो राक्षस आयतें तोंडांत टाकीत होता. अशी ती भयंकर कबंधाची स्वारी पाहतांच लक्ष्मणाचा

धार सुटला, आणि तो रामास सावध रहा, म्हणून ओरडूं लागला. इतक्यांत त्या कबंधाचे योजन लांबीचे हात त्या दोघांवर पडले आणि त्यांस त्यानें आपल्या तोंडाकडे ओढलें. तेव्हां रामांनीं लक्ष्मणांस म्हटलें:—"बाबा, लक्ष्मणा, घाबरूं नकोस. याचे हात तोडले पाहिजेत." तेव्हां त्या दोघांनीं तीक्ष्ण खड्गांनीं चराचर त्याचे हात तोडले. तेव्हां तो कबंध राक्षस भयंकर किंकाळी फोडून उलथून पडला; त्यानें 'तुम्ही कोण' म्हणून विचारिलें; तेव्हां लक्ष्मणानें त्यास हा दाशरथी राम पित्याच्या आज्ञेने वनवासास आला आहे, असें सांगितलें. ते ऐकताच त्यास अतिशय आनंद झाला व तो म्हणाला:—"मी तुमच्या दर्शनानें शापमुक्त झालों. मी दनूचा पुत्र आहें. मी पूर्वी भयंकर रूप धारण करून ब्राह्मणाना भेवडावीत असे. तेव्हां महर्षि स्थूलशिरा मला रागावून म्हणाले:—'तुझे हें असेंच रूप असो.' यामुळें माझें असे हें भयंकर रूप झालें. नंतर मी तप करून ब्रह्मदेवापासून दीर्घायुष्य मिळविलें. तेव्हां गर्वानें मतिभ्रष्ट होऊन मीं इंद्रावर चाल केली. त्याने मला वज्र मारिलें त्यामुळें माझें डोके पोटात शिरलें व मांड्याही तुटल्या. मी इंद्राची प्रार्थना केली; तेव्हा त्यानें माझा चरितार्थ चालून ब्रह्मदेवाच्या वराप्रमाणें माझें दीर्घायुष्य रहावें, म्हणोन मला हे लांब हात दिले व सांगितलें कीं, जेव्हां राम तुझे बाहु तोडून तुझें शरीर जाळतील, तेव्हा तुला आपलें पूर्वरूप प्राप्त होईल. रामदर्शन झाल्यानें मी आज मुक्त झालो आहें. मला खड्ड्यांत टाकून माझा देह जाळून टाका, म्हणजे मला सद्गति मिळेल." लक्ष्मणानें त्यास रावणास सीता नेताना तूं पाहिलेस का, म्हणून विचारिलें. तेव्हां त्यानें सांगितलें:—"दक्षिणेकडे पंपासरोवराच्या कांठीं ऋष्यमूक पर्वतावर सुग्रीव म्हणून एक वानर राहतो, त्याला विचारा म्हणजे तो तुम्हांस सर्व हकीकत सांगेल. आणि तुम्ही त्याचे कार्य कराल तर तो तुम्हांस उत्तम साह्यही करील." हें ऐकून रामलक्ष्मणास आनंद झाला. त्या दोघांनीं खाडा खणून त्या कबंधास त्यात लोटून व त्यावर लांकडें टाकून चिता पेटविली, तेव्हां तो कबंध जळून त्यांतून एक दिव्य देह निर्माण होऊन ना आकाशांत निघून गेला. ( अर० स० ५८-७२ ).

तो दिव्यवपु धारण करणारा दानव जातांना रामास म्हणाला:—"रामा, ह्या पश्चिमेच्या रस्त्याने जांबूळ, फणस, अशोक वगैरे फुलांनीं व फळांनीं भरलेलीं नाना प्रकारचीं झाडे दिसत आहेत, त्या रस्त्यानें त्यांचीं गोड फळें

खात खात एका डोंगरावरून दुसऱ्यावर, अशा रीतीनें जातां जातां तुम्हांला पंपासरोवर लागेल. पंपेचें निर्मळ, स्फटिकासारखें अ[illegible] स्वच्छ जळ पाहून तुम्हांस आनंद होईल. त्या ठिकाणीं हंस, सारस, वगैरे सरोवराच्या कांठीं बसलेले पक्षी तुम्हांला पाहून उडणार नाहींत. कारण त्यांना कधींच कोणी मारीत नाहीं. त्या सरोवराचें पाणी कमळांच्या पानांच्या द्रोणानें पिऊन तुम्हास फार आल्हाद होईल. संध्याकाळच्या वेळीं बैलासारख्या डुरकण्या फोडणारे, मोठ्या शरीराचे पिवळे वानर पाणी पिण्याकरितां पंपेवर येतील तें पाहून तुम्हांस मोठें कौतुक वाटेल. तसेंच मोठमोठाले हत्ती व हत्तींचीं पिल्लें तेथें क्रीडा करीत असतात. त्यांची मौज पाहूनही तुझा शोक कमी होईल. पंपेच्या कांठीं कित्येक माल्यें, पुष्पें व कमलें अशीं आहेत कीं, तीं कधींही सुकून जात नाहींत किंवा तुटत नाहींत. पूर्वी तेथें मतंग ऋषि तपश्चर्या करीत होते; त्यांचे शिष्य वनांतून वन्य पदार्थांचे भार घेऊन येताना त्यांचे अंगांतून घर्मबिंदु पडलेल्या ठिकाणीं हीं दिव्य फुलें उत्पन्न झालीं आहेत. तीही पाहून तुझा शोक कमी होईल. मतंग ऋषींची वृद्ध परिचारिका शबरी अजून तेथें रहात आहे. ती तुझीच वाट पाहात आहे. पंपेच्या पश्चिम तीरावर मतंग ऋषींचा आश्रम आहे, तेथें कोणी हत्ती अगर वाघही जाऊं शकत नाहीं. यामुळें तें मतंगाचें वन नंदनवनासारखें रमणीय असून नानाप्रकारच्या मृगांनीं व पक्ष्यांनीं भरलेलें आहे. ते वन पाहून तुला फार आनंद होईल. पंपा सरोवराच्या पूर्वेस ऋष्यमूक पर्वत आहे. तो इतका उंच आहे कीं, त्याजवर चढणें कठीण आहे. त्याचें शिखर फुल-लेल्या वृक्षांनीं भरलेलें आहे. त्या शिखरांवर रात्रीं निजलें असतां स्वप्नांत जें द्रव्य दिसेल तें सकाळीं मनुष्याला मिळतें. असो. त्या पर्वताच्या एका मोठ्या गुहेंत सुग्रीव रहातो. त्याला त्याचा भाऊ किष्किंधेचा राजा वाली यानें राज्यांतून हांकून दिलें आहे. तो सदोदित गुहेच्या तोंडावर शिळा लावून बसतो. त्या गुहेच्या तोंडापाशीं एक थंड पाण्यानें भरलेला डोह आहे. कधीं कधीं पर्वताच्या शिखरावरही सुग्रीव बसत असतो. त्याला जाऊन तुम्ही भेटा.'' याप्रमाणें सविस्तर माहिती देऊन तो दानव दानवलोकीं निघून गेला. कबंधानें दाखविलेल्या रस्त्यानें राम-लक्ष्मण निघाले. ते जातां जातां पंपासरोवरावर पोहोंचले. तेथें पश्चिम

किनाऱ्यावर शबरीचा आश्रम होता. ते तेथें जातांच शबरी हात जोडून उठून पुढें धांवली व तिनें दोघांच्याही पायांवर मस्तक ठेविलें. नंतर त्या दोघांना तिनें उदक, अर्घ्य देऊन वनांतील उत्तम उत्तम फळें त्यांजपुढें ठेविलीं आणि ती म्हणाली:—"तुम्ही चित्रकूटाला आलां, तेव्हांच मला तुमची बातमी लागली. तेव्हांपासून मी तुमची वाट पाहात आहें. तुमचें दर्शन घेऊन मी उत्तम लोकास जाईन. माझे गुरु मतंग ऋषि यांचा हा आश्रम आहे. ते अनेक तपें करून दिव्य लोकास गेले." असें म्हणून तिनें त्यांस सर्व आश्रम व तीं न कोमेजणारीं फुलें दाखविलीं. मग शबरीनें स्वतः चिता तयार करून व ती पेटवून आपला देह तींत ठेविला आणि अग्निप्रमाणें तेजस्वी देह धारण करून ती उत्तम लोकास गेली. नंतर राम व लक्ष्मण पंपासरोवराच्या पूर्वतीराला आले.



# किष्किंधाकाण्ड

पंपा सरोवराची शोभा पाहून रामाचा शोक दुणावला. हेमन्त ऋतु जाऊन वसंत ऋतु आला होता. जिकडे तिकडे सुगंधी पुष्पें फुलून त्यांचा वास झुळझुळ वाहणाऱ्या वाऱ्याबरोबर चोहोंकडे पसरत होता. त्या सुगंधि शीतल वाऱ्यानें रामाचा विरहशोक पुनः पेटला. तेव्हां राम लक्ष्मणाला म्हणाले, " लक्ष्मणा, ही तरूंची शोभा पाहिलीस काय ? हे पुष्पांनीं भरलेले वृक्ष, मेघ जशी जलाची वृष्टि करितात त्याप्रमाणें चारी बाजूंनीं पुष्पांचा सारखा वर्षाव करीत आहेत आणि जमिनीवर फुलांची केवळ बिछायत झाली आहे. हा वायु पुष्पांशीं जणूं काय खेळतो आहे. कांहीं पुष्पें पडत आहेत, कांहीं पडलीं आहेत व कांहीं झाडांवरच अडकलीं आहेत. ह्या डोंगराच्या दऱ्यांतून वारा जणूं काय गायनच करीत आहे ! कारण याच्यामुळेंच मत्त कोकिलांचा आवाज दूरवर पसरत आहे; आणि त्या गायनाबरोबर हीं झाडें नाचत आहेत असें वाटतें. अरे लक्ष्मणा, ह्या कर्णिकार वृक्षांवर पिंवळीं फुलें इतकीं फुललीं आहेत कीं, त्यामुळें पिंवळीं वस्त्रें नेसलेला व सोन्याचे दागिने घातलेला हा मनुष्यच आहे, असें दिसतें. हे अशोकाच्या फुलांचे गुच्छ अंगाराप्रमाणें लाल दिसत आहेत; भृंगांचा मृदु स्वन ' गुं ' असा आवाज करीत आहे; आणि वृक्षांचे नवीन फुटलेले पल्लव अग्नीच्या ज्वाळांसारखे दिसत आहेत. लक्ष्मणा, हा वसंतरूपी अग्नि मला जाळून टाकील असें वाटतें. हे मयूर पंख विस्तारून इकडून तिकडे नाचत फिरत आहेत. ही मयूरी आपल्या पतीला नाचतांना पाहून त्याच्याबरोबर नाचूं लागली आहे, आणि मयूर तिच्या मागें पंख विखरून धांवत आहे. लक्ष्मणा, मयूराची कांता राक्षसानें हरण केली नाहीं, म्हणोन हा मयूर आपल्या प्रियेबरोबर इतका नाचत आहे. लक्ष्मणा, ही तिलक–मंजरी वाऱ्यानें हलल्याबरोबर भृंग मोठ्या जोरानें तिच्यावर झडप घालीत आहे. लक्ष्मणा, हे

आम्रवृक्ष मोहोर आल्यामुळें अंगाला अंगराग लाविलेल्या पुरुषांप्रमाणें दिसतात. ह्या डोंगराच्या उतरणीवरील पळसाचीं झाडें अगदीं पर्णहीन होऊन त्यांजवर सर्व फुलें मात्र भरलीं आहेत; त्यामुळें हा डोंगर पेटल्या-सारखा दिसत आहे. हा वसंताचा वायु एका झाडावरून दुसऱ्या झाडावर, एका डोंगरावरून दुसऱ्या डोंगरावर, निरनिराळ्या रसांच्या आस्वादानें जणूं काय मत्त होऊन फिरत आहे. तसाच हा भ्रमर. हें फूल गोड, हें फूल चांगलें, हें फूल साधें अशा प्रकारच्या चिकित्सा करीत फुलांवरून बाहेर निघतच नाहीं. लक्ष्मणा, हे मृग आपल्या मृगींसहवर्तमान आनंदानें चरत फिरत आहेत. लक्ष्मणा, माझी सीता कोठें आहे? पित्यानें मला वनाला हांकलून दिलें असतांही जिनें माझा संग सोडला नाहीं, ती माझी प्रिया कोठें आहे? तिचें तें कमलपत्रासारख्या विशाल नेत्रांनीं सुशोभित झालेलें वदन मला दिसत नाहीं, यामुळें माझें मन भ्रांत होऊं लागलें आहे. लक्ष्मणा, थोडें, स्मितयुक्त आणि मधुर असें तिचें भाषण मला ऐकावयास सांपडेल काय? लक्ष्मणा, मला माझी धडगत दिसत नाहीं. मी एक पाऊलही पुढें टाकूं शकत नाहीं. माझी प्रिया मला मिळेल असें वाटत नाहीं. लक्ष्मणा, मी प्राण कसा धारण करूं!" इत्यादि प्रकारानें विलाप करीत राम खालीं बसले. तेव्हां लक्ष्मणाने पुन्हां मोठ्या काकुळतीनें त्यांची विनंति केली:—"रामा, तुम्ही आपल्या मनाला धीर द्या, शोकाधीन होऊं नका. आपल्यासारख्या थोर पुरुषाची बुद्धि कलुषित होत नाहीं. रामा, रावण जरी पाताळाला गेला असला तरी तो आतां वाचणार नाहीं. तर त्याचा पत्ता लावण्याची खटपट केलीच पाहिजे. आपण उत्साह धरा. उत्साहासारखें बल नाहीं. उत्साह-वान् लोकांना या जगांत दुर्लभ असें कांहींच नाहीं. उत्साहयुक्त पुरुष कधींही खिन्न होत नाहींत." याप्रमाणें लक्ष्मणाचें उत्साहजनक भाषण ऐकून राम शोक व मोह टाकून उठून उभे राहिले, आणि सुग्रीवाला भेटण्याकरितां ऋष्यमूक पर्वताकडे लक्ष्मणासह निघाले. (कि० स० १).

पंपासरोवराच्या कांठानें ऋष्यमूक पर्वताकडे येतांना त्या दोघां तरुण धनुर्धर राजपुत्रांसह सुग्रीवानें पाहिलें; त्यांस पाहतांच त्याच्या मनांत शंका उत्पन्न झाली. हे कोण असावेत? शत्रु आहेत किंवा मध्यस्थ आहेत? हे वालीनें तर पाठविले नाहींत ना? असें वाटून त्यानें आपल्या चार मित्रांपैकीं हनुमानास आपल्या मनांतील शंका सांगितली. तेव्हां हनुमान म्हणाला,

" हा मलयगिरीचा भाग आहे, येथें वालीचें भय नाहीं. " परंतु सुग्रीव त्यास पुन्हां म्हणाला, " राजलोकांना अनेक स्नेही मिळतात, तेव्हां हे वालीचे दोस्त नसतील कशावरून ? नाहींतर धनुष्य,बाण,तलवार बांधून हे बलाढ्य दिसणारे देवासारखे तरुण पुरुष या आपल्या ऋष्यमूक पर्वतावर कशास येतील ? तर तूं पुढें जाऊन त्यांच्या भाषणांवरून व त्यांच्या चर्येवरून यांच्या अंतःकरणाची परीक्षा कर." याप्रमाणें सुग्रीवाची आज्ञा ऐकून हनुमानानें पर्वतावरून उड्डाण करून,रामलक्ष्मण येत होते तेथें येऊन,कपि–रूप टाकून भिक्षूचें रूप धारण केलें आणि रामलक्ष्मणांसमोर जाऊन व त्यांस नमस्कार करून बोलण्यास आरंभ केलाः–" देवासारखे सुंदर परंतु तापस वेष धारण करणारे,या देशांत तुम्ही कसे आलांत ? तुमच्या येण्याने हे वन्य मृग आणि इतर प्राणी भय पावले आहेत.सुग्रीव नांवाचा एक वानर या ठिकाणीं राहतो.त्याला त्याच्या भावानें स्वदेशांतून हाकून दिल्यामुळें तो अति दुःखित होऊन परदेशीं भ्रमण करीत आहे. त्या सुग्रीवाच्याच आज्ञेनें मी तुम्हांस सामोरा आलों आहें.तुमच्याशीं सख्य करावें अशी त्याची इच्छा आहे. मी पवनाचा पुत्र हनुमान् असून सुग्रीवाचाच सचिव आहें. " हें त्याचें भाषण ऐकून राम लक्ष्मणास म्हणालेः–" लक्ष्मणा, याचा चेहरा आनंदित दिसतो आहे,आणि ज्या सुग्रीवाला आपण भेटण्याची इच्छा करीत आहों,त्याच्याचकडून हा आला आहे. याचें हें शुद्ध आणि सरळ भाषण ऐकून कोणाचें चित्त प्रसन्न होणार नाहीं ?" लक्ष्मणानें हनुमानास उत्तर दिलेंः–"सुग्रीवाचे गुण आम्हीं पूर्वींच ऐकिले आहेत आणि सुग्रीवालाच भेटण्याकरिता आम्ही येथें आलो आहों. तुझ्या म्हणण्याप्रमाणें आम्ही सुग्रीवाशीं सख्य करण्यास तयार आहों. " हनुमानाने पुन्हां विचारिलेंः–"ही गोष्ट चांगली आहे.पण तुम्ही या काननांत कां आलांत तें मला अद्याप समजलें नाहीं. " तेव्हां लक्ष्मणानें उत्तर केलेंः–"अयोध्येचा धर्मवत्सल राजा जो दशरथ त्याचा हा ज्येष्ठ पुत्र राम होय. याला पित्यानें राज्यांतून काढून दिल्यामुळें माझ्यासह तो या वनांत आला आहें. याच्याबरोबर त्याची पतिव्रता भार्या सीता ही सूर्याबरोबर जशी प्रभा जाते त्याप्रमाणें होती. मी त्याचा धाकटा भाऊ लक्ष्मण आहे. आम्ही पंचवटींत रहात असतां रावण नांवाच्या राक्षसानें आम्ही बाहेर मृगयेस गेलों असतां आमच्या आश्रमांतून सीता हरण करून नेली. त्या राक्षसाचा पत्ता लावण्याकरितां आम्ही इकडे

आलों आहों. याप्रमाणें आमची थोडक्यांत हकीकत आहे. सुग्रीव आम्हांस मदत करील, असें आम्हांस एकानें सांगितल्यावरून आम्ही सुग्रीवास भेटण्यास या पर्वतावर आलों आहों.आम्ही सुग्रीवाला शरण आलों आहों.दशरथ राजाचा पुत्र सर्व लोकांचा शरण्य आहे,तो सुग्रीवाच्या प्रसादाची इच्छा करीत आहे. राम, भार्येच्या विरहानें शोकाकुल झाला आहे,त्याच्यावर सुग्रीवानें दया करावी, हीच माझी प्रार्थना आहे.'' असें म्हणतांना लक्ष्मणाच्या डोळ्यांतून अश्रु पडूं लागले.तेव्हां हनुमान् मोठ्या प्रेमानें म्हणाला:-''असे बुद्धिमान् पुरुष वानराचा राजा सुग्रीव याच्या भेटीस योग्य आहेत.आपली जरूर भेट मी करवतों. त्यालाही भावानें राज्याबाहेर हाकून देऊन त्याची बायको हरण केली आहे.यामुळें दुःखानें तो वनांत रहात आहे. तो रामाचा समदुःखी आहे. तो तुमचें खचित साहाय्य करील, आणि सीतेचा शोध लावील. '' असें म्हणून हनुमानानें आपलें कपिरूप धारण केलें; आणि त्या दोघां वीरांना पाठीवर बसवून जें उड्डाण केलें तें ऋष्यमूक पर्वत ओलांडून मलय पर्वतावर नेऊन तेथें उतरविलें; आणि सुग्रीवाला जाऊन त्यांची सर्व हकीकत सांगितली. तेव्हां सुग्रीवानें अत्यंत रमणीय रूप धारण करून रामाची भेट घेतली,व मोठ्या प्रेमानें म्हटलें:-''रामा, माझें सख्य तुम्हीं इच्छितां तेव्हां हा मी आपला हात पुढें केला.'' असें म्हणतांच रामानें आपलाही हात पुढें करून त्याचें पाणिग्रहण केलें.तेव्हां दोघांना परस्पर अत्यानंद झाला,व त्यांनीं एकमेकांस आलिंगन दिलें.इतक्यांत हनुमानानें काष्ठें आणून अग्नि प्रज्वलित केला.त्याला त्या दोघांनीं हातांत हात घालून प्रदक्षिणा घातली, आणि अग्निसाक्षिक आपलें सख्य कायम केलें.तेव्हां त्या परस्परांना परस्परांस पाहून तृप्ति होईना. तुम्ही माझे प्रियकर वनस्थ आहां,असें सुग्रीवानें अनेक वेळां प्रेमानें रामाला म्हटलें. नंतर सुग्रीव रामास आणखी म्हणाला:-''माझा सेवक हनुमान् यानें मला सांगितलें कीं, तुमची प्रिय भार्या सीता रावणानें जटायूला मारून हरण करून नेली. तुम्ही शोक करूं नका, मी सीतेचा शोध लावून तिला आणून देतों. मी अनुमानानें म्हणतो कीं,रावणानें सीतेस नेतांना मीं पाहिलें आहे.ती मोठ्यानें रामा, लक्ष्मणा, म्हणोन हांका मारीत होती. रावण तिला आकाशांतून घेऊन चालला होता.तिनें आम्हां पांचांस पर्वतावर बसलेले पाहून आमच्या अंगावर आपलें उत्तरीय आणि कांहीं अलंकार टाकिले. आम्हीं ते उचलून ठेवून दिले आहेत. ते तुम्हांस ओळखले तर पहा .ते मी

आणतों." असें म्हणून गुहेंत प्रवेश करून त्यानें तें उत्तरीय व अलंकार आणून रामाला दाखविले. ते हातांत घेऊन राम पाहूं लागले, तों त्यांच्या डोळ्यांतून अश्रु येऊं लागले; व धुक्यानें जसा चन्द्र मलिन होतो, तसें त्यांचें वदन निस्तेज झालें; शेवटीं त्यांचें धैर्य खचून, "हा प्रिये" असें म्हणून त्यांनीं धरणीवर अंग टाकलें. ते अलंकार हृदयावर घेऊन व दीर्घ उच्छ्वास टाकून राम म्हणाले:—"लक्ष्मणा, हे पहा बिचाऱ्या सीतेनें अलंकार टाकिले. हे बहुधा हिरव्या जमिनीवर पडले असावेत; कारण यांना हिरवा रंग लागला आहे." त्या वेळेस लक्ष्मण म्हणाला:—" मी हे केयूर ओळखीत नाहीं व कानांतलीं हीं कुंडलेंही ओळखीत नाहीं. फक्त हे पायांतले नूपुर माझ्या ओळखीचे आहेत. मी नित्य सीतेच्या पायांचें वदन करीं, तेव्हां हे माझ्या दृष्टीस पडत." रामानें सुग्रीवास विचारलें:—" सुग्रीवा, कोणत्या बाजूनें तो राक्षस कोणत्या देशाला गेला ? ज्या राक्षसाला सीतेला नेतांना तुम्हीं पाहिलें, तो राक्षस कोठें राहतो ?" तेव्हां सुग्रीवानें उत्तर दिलें:—" त्या दुष्ट व पापी राक्षसाचें नांव, कुल किंवा राहण्याचें ठिकाण मला माहीत नाहीं. पण रामा, तुम्ही सर्वथा शोक टाकून द्या. मी प्रतिज्ञा करून सांगतों कीं, मी तुमच्या भार्येचा शोध लावून ती तुम्हांस परत आणून देईन. मी सर्व राक्षसगणांसह रावणाला ठार मारून आपल्या पराक्रमाची सार्थकता करीन, आणि लौकरच आपलें इष्टकार्य सिद्धीस नेईन. तर तुम्ही आपलें नेहमींचें धैर्य धारण करा, आणि ही आगंतुक आलेली शिथिलता टाकून द्या. तुमच्यासारख्यांच्या बुद्धीला कधींही हीनता येत नाहीं. मलाही भार्याविरहाचें दुःख होत आहे; पण मीं धीर सोडला नाहीं. शोक केल्यानें सुख नाहींसें होतें, इतकेंच नव्हे तर तेजही कमी होतें. याकरितां शोक करूं नका. मी मित्र—भावानें तुम्हांस सांगत आहे. मला तुम्हांस उपदेश करण्याचा अधिकार नाहीं. माझ्या मित्रत्वाचा सत्कार करून आपण शोक सोडून द्या." याप्रमाणें सुग्रीवाचें सांत्वनाचे मधुर भाषण ऐकून राम वस्त्रानें डोळे पुसून पूर्ववत् चित्तवृत्ति स्थिर झाल्यावर सुग्रीवाला आलिंगन देऊन म्हणाले:—" प्रेमळ आणि हिततत्पर अशा मित्रानें जें करणें योग्य आहे, तें त्वां या वेळेस केलें आहे. माझी पूर्वीप्रमाणें आतां बुद्धि शांत व स्थिर झाली आहे. या जगांत तुझ्यासारखे मित्र—विशेषतः संकटकाळीं—मिळणें दुष्कर आहे. माझी तुला इतकीच विनंति आहे कीं, सीतेच्या

शोधाकरितां तुला यत्न केला पाहिजे. यासाठीं तुझ्याकरितां मी काय करूं, तें मला आतां निःशंक मनानें सांग." हें ऐकून सुग्रीव आनंदानें म्हणाला:—"माझी हकीकत तुम्हांस ठाऊक आहेच. माझा वडील बंधु वाली यानें माझी भार्या हरण करून मला हाकून दिले आहे. तेव्हांपासून या ऋष्यमूक पर्वतावर मी भयानें त्रस्त असा नेहमीं फिरत असतों. मला या वालीच्या भयापासून मुक्त करा." तेव्हां रामानें उत्तर केलें:—"सुग्रीवा, मित्रत्वाचें फल उपकार आणि शत्रुत्वाचें फल अपकार; तुझी भार्या हरण करणाऱ्या वालीचा मी आजच नाश करितों. हे माझे दिव्य सुवर्णभूषित बाण वालीला एखादा डोंगराचा कडा तुटून पडावा त्याप्रमाणें आतांच जमिनीवर लोळवतील." सुग्रीवानें रामाच्या आवेशयुक्त भाषणाचा गौरव करून म्हटलें:—"तुम्ही अगोदर वालीचा पराक्रम ऐका आणि मग जें युक्त दिसेल तें करा." असें म्हणून एक चंदनाची फुललेली खांदी तोडून सुग्रीवानें रामास बसावयास दिली व आपण फुलानें भरलेली दुसरी मोठी खांदी तोडून तिजवर बसला. (कि० स० २—८).

सुग्रीव म्हणाला:—"रामा, वाली माझा सहोदर व शुक्राचा पुत्र आहे. तो इतका बलवान् आहे कीं, पहाटेस पूर्व, पश्चिम, उत्तर व दक्षिण या चारी समुद्रांचे दर्शन करून सूर्योदयापूर्वी परत येतो आणि दमल्याचा उसासासुद्धां टाकीत नाहीं दुंदुभि नांवाचा असुर ब्रह्मदेवाच्या वरानें नऊ हजार हत्तींचें बळ मिळवून समुद्रापाशीं कुस्ती खेळण्याकरितां गर्वानें धांवला. समुद्रानें त्यास नमस्कार करून हिमालयाकडे पाठविलें. हिमालयानेंही त्यास नमस्कार केला व वालीकडे बोट दाखविलें. तेव्हां महिषाचें रूप धारण करून तो माजलेला असुर किष्किंधेच्या दरवाजावर येऊन, डुरकण्या फोडून शिंगांनीं शहरचा दरवाजा उलथून पाडूं लागला. तें पाहून वाली मोठ्या क्रोधानें त्याच्यावर धावला. तें महिष-वानरांचें युद्ध पाहण्यास देव, राक्षस व गंधर्व जमले. सरतेशेवटीं वालीनें त्याला उचलून जमिनीवर आपटलें; तेव्हां तो रक्त ओकून गतप्राण झाला. वालीनें त्याच्या प्रेताला एका हातानें उचलून तें इतक्या जोरानें फेंकून दिलें कीं, तो मृतदेह या पंपावनांत येऊन पडला. त्याच्या हाडांची ही सफेत रास समोर दिसत आहे. त्या वेळेस त्या महिषाच्या नाकातोंडांतले रक्ताचे बिंदु मतंग ऋषींच्या आश्रमांत उडाले. तेव्हां मतंग ऋषींनीं वालीस शाप दिला कीं, तूं जर या पंपा वनांत येशील तर

प्राणास मुकशील. त्यामुळें वाली या मतंग वनांतील ऋष्यमूक पर्वतावर येत नाहीं. तो येऊं शकता तर मला येथेंही येऊन ठार करता. असो; दुंदुभीचा पुत्र मायावी ह्याचें व वालीचें स्त्रीसंबंधानें वैर उत्पन्न होऊन, तोही एकदां वालीशीं युद्ध करण्यास येऊन नगराच्या द्वारांत गर्जना करूं लागला. तेव्हां वाली रोषाने बाहेर पडला. त्याच्या साहाय्याकरितां मीही पडलों. त्या वेळेस आमचा पिता मरण पावला असून वाली राज्य करीत होता व मी त्याच्यापाशीं आनंदानें त्याची सेवा करून रहात होतों. आम्हां दोघांस पाहून मायावी एकाएकीं घाबरून पळूं लागला तेव्हा आम्ही त्याचा पाठलाग केला. मायावी एका गुहेंत शिरला. तेव्हां वाली मला म्हणाला कीं, "तूं या गुहेच्या द्वारावर उभा रहा, मीं गुहेंत शिरून मायावीला मारून येतों." असें सांगून वाली गुहेंत शिरला आणि मी गुहेच्या तोंडीं कदाचित् मायावी बाहेर पडेल या कल्पनेनें पाहारा करीत राहिलों. याप्रमाणें मी एक वर्षभर येथें उभा राहिलों. परंतु त्यांचा कांहींच पत्ता लागेना. तेव्हां राज्यांतील सर्व सचिवांच्या सल्लयानें गुहेच्या द्वारावर एक पर्वतशिखर लावून मी तेथून निघून आलों आणि सचिवांनीं मला राज्यावर बसविलें. कांहीं दिवस गेल्यानंतर एके दिवशीं क्रोधानें संतप्त झालेला वाली माझ्या समोर येऊन एकाएकीं उभा राहिला ! तेव्हां मी उठून उभा राहून साष्टांग नमस्कार करून त्यास सर्व हकीकत सांगितली. तेव्हां त्यानें माझी निर्भर्त्सना करून म्हटलें:—" मीं त्या गुहेंत मायावीचा पुष्कळ तपास केला, परंतु मला तो सांपडेना. शेवटीं तो सांपडला, तेव्हां त्याजला ठार मारून आलों, तों गुहेच्या दरवाजावर तूं शिळा लोटली होतीस ती मीं पाहिली. मोठ्या प्रयासानें ती काढून मीं आलों, तों तूं राज्याचाही उपभोग घेत आहेस ! तुला धिक्कार असो ! " मीं त्याची पुष्कळ विनवणी केली, परंतु ती न मानतां त्याने मला राज्यांतून हाकून देऊन माझी बायको रुमा हिला आपल्या घरांत घातलें. याप्रमाणें त्या वालीचा पराक्रम आहे, आणि त्याचें व माझें वैर याप्रमाणें उत्पन्न झालें आहे ही ऋष्यमूक पर्वताची जागा वालीला झालेल्या मतंगाच्या शापामुळें मला निर्भय झाली आहे. म्हणोन मी येथें रहात आहें. बलाढ्य वालीचा नाश करणें फार कठीण आहे. तुम्ही सामर्थ्यवान् व पराक्रमी आहां. परंतु मला अद्याप तुमच्या सामर्थ्याची माहिती नाहीं. वालीनें हा महिष कित्येक योजनें हातानें फेंकला होता. ह्या अस्थींच्या राशी तुम्ही

उचलून फेकाल तर मला तुमच्या व त्याच्या सामर्थ्याचा अंदाज लागेल." हें ऐकून रामांनीं हंसून म्हटलें:-" सुग्रीवा, तुला विश्वास येण्याकरितां मी तुझी खात्री करितों." असें म्हणून रामांनीं आपल्या पायाच्या अंगठ्यानें सहज लीलेनें ती हाडांची मोळी दहा योजनें लांब फेंकून दिली! तत्रापि सुग्रीवाची खात्री पटेना. हीं हाडें पुष्कळ दिवसांचीं पडलेलीं हलकीं झाली आहेत; वालीनें दुंदुभीचा देह फेंकला, त्या वेळेस तो मांसानें भरलेला आणि वजनदार होता, अशी शंका येऊन त्यानें रामास पुनः म्हटलें:-" रामा, हे सात ताल वृक्ष पहा. या वृक्षांना वालीनें गदगदा हालवून त्यांचें पानन्-पान पाडून टाकलें होतें. या वृक्षाना जर तुम्हीं एका बाणानें उलथून पाडलें तर तुमच्या सामर्थ्याचा मला चांगला प्रत्यय येईल." हें भाषण ऐकून रामानें, 'बरें, हीही तुझी खात्री होऊं दे,' असें म्हणून धनुष्यास बाण लावून तें खेंचलें आणि बाण सोडला; तो सातही वृक्षांना फोडून त्यांस उलथून पाडून पुनः रामाच्या भात्यांत येऊन शिरला. हे रामाचें अद्भुत कर्म पाहून सुग्रीव भीतीनें एकदम रामाच्या पायांवर साष्टांग नमस्कार घालून डोकें ठेवून व हात जोडून म्हणाला:-"रामा, तुम्हीं इंद्रादि देवांस-सुद्धां समरांगणांत बाणांनीं जर्जर कराल; मग वालीची काय कथा? तुमच्यासमोर रणांत कोण वीर उभा राहील! आतां माझी हात जोडून हीच प्रार्थना आहे कीं, माझा वैरी वाली याला आज-आजच-मारून मला निर्भय करा." रामानें सुग्रीवाची विनंति मान्य केली व ते सर्व लागलेच किष्किंधेस गेले. सुग्रीवानें एक मोठी भयंकर आरोळी मारून वालीस युद्धास आव्हान केलें; त्याबरोबर वाली क्रोधानें किष्किंधेच्या बाहेर पडला. तेव्हां त्या दोघां भावांचें बाहु-युद्ध सुरू झालें. राम दूर उभे राहून त्यांचें युद्ध पहात होतें. परंतु ज्या वेळेस सुग्रीव युद्धांत पराभव पावूं लागला, त्या वेळेला त्यास सुग्रीव कोणता व वाली कोणता, हें उमगेना. दोघांचीं स्वरूपें सारखींच दिसत होतीं. त्यामुळें कदाचित् सुग्रीवास बाण लागेल या भीतीनें त्यांना बाण सोडतां येईना. शेवटीं सुग्रीव पराभव पावून जो पळाला तो ऋष्यमूक पर्वतावर येऊन त्यानें दम घेतला.

हनुमान् वगैरे सुग्रीवाचे सचीव व रामलक्ष्मण ऋष्यमूक पर्वतावर परत आले; तेव्हां सुग्रीव दीन वदनानें रामाच्या पुढें उभा राहिला, व म्हणाला:-" रामा, अशी माझी फजिती करावयाची होती, तर मला पूर्वीच कां सांगि-

तलें नाहीं ! " तेव्हां रामांनीं त्याचें सांत्वन करून म्हटलें:—" तुमचीं रूपें इतकीं सारखीं आहेत कीं, हेंच मला समजेना, कीं मीं बाण कोणावर टाकावा ! जर चुकून बाण तुला लागून तूं मरतास तर तुझेंच नुकसान होतें; इतकेंच नाहीं तर माझाही सर्व हेतु निष्फळ होता. तेव्हां या वेळेस तूं मला क्षमा कर. लक्ष्मणा, ही पिंवळ्या फुलांनीं भरलेली गजवेल दिसत आहे, ही घे बरें. " असें म्हणून त्या गजवेलीची माळ रामांनीं सुग्रीवाच्या गळ्यांत घातली आणि म्हटले, " आतां या चिन्हानें मी तुला निश्चयानें ओळखीन, चल, आपण पुन्हां जाऊं. आतां तुझ्या शत्रूचा नाश झालाच असें समज." याप्रमाणें आश्वासन मिळाल्यावर सुग्रीव पुन्हां लढाईस जाण्यास तयार झाला. ते वानर व रामलक्ष्मण ऋष्यमूकाहून निघाले ते अनेक सरोवरांची व डोंगरांची शोभा पाहात किष्किंधेस येऊन पोंचले. राम, लक्ष्मण व हनुमानादि चार वानर एका झाडींत पूर्वीप्रमाणें लपून बसले आणि सुग्रीवानें पुन्हां शहरच्या दरवाजांत जाऊन जोरानें बुभुःकार करून वालीस हाक ठोकली. वाली आपल्या रंगमहालांत तारेशीं गोष्टी करीत बसला होता. त्यास सुग्रीवाचा आवाज ऐकूं येतांच पुन्हां त्वेष चढला; व त्यानें एकदम पलंगाखालीं उडी मारली. तारेनें त्याचे पाय धरिले आणि विनंति केली कीं, " ज्या अर्थी पराजित झालेला शत्रु पुन्हां उलटला आहे आणि त्याचा आवाज पहिल्यापेक्षां भयंकर येत आहे, त्या अर्थी येथें कांहीं तरी दगा आहे. आपण युद्धास जाऊं नये; मी पायां पडत्यें. दशरथाचे पुत्र रामलक्ष्मण दण्डकारण्यांत आले आहेत, म्हणोन अंगदाला हेरांनीं पूर्वीच सांगितलें आहे. सुग्रीवानें त्यांचें साहाय्य मिळविलें असेल, तर माझें ऐका, युद्धास जाऊं नका. सुग्रीव आपला बंधु आहे. त्याजला अपराध माफ करून आपल्यापाशीं ठेवा. या वेळेस मला अपशकुन होत आहेत. माझा उजवा डोळा लवतो आहे; आपण जाऊं नका." इत्यादि अनेक प्रकारें तारेनें वालीची विनवणी केली. परंतु तिला न जुमानतां वाली गर्जना करीत किष्किंधेच्या बाहेर पडला. तेव्हां त्या भावाभावांचें पुन्हां बाहुयुद्ध सुरू झालें. त्यांनीं एकमेकांना बुक्यांनीं, लाथांनीं, थापडांनीं, व झाडांच्या फांद्यांनीं यथेच्छ मारिलें, परंतु कोणी कोणास हार जाईना. बराच वेळ झाल्यावर सुग्रीवाची बाजू पडलेली दिसूं लागली; तेव्हां रामानें पूर्वी संकेत व प्रतिज्ञा केल्याप्रमाणें धनुष्यास बाण लावून तो वालीवर सोडला. तो बाण वर्मी लागून वाली धाडकन् जमिनीवर विव्हळ होऊन पडला. (कि० स० ९–१६).

आश्विन मासाच्या पौर्णिमेच्या दिवशीं उभारलेला इंद्रध्वज जसा पडतो, त्याप्रमाणे ग्रीष्माच्या अंतीं वाली रामाच्या बाणानें विद्ध होऊन पडला; पण इंद्रानें दिलेला सुवर्णकंठा त्याच्या गळ्यात असल्यामुळें त्याचा प्राण गेला नाहीं, किंवा त्याच्यावर मेल्याची कळाही आली नाहीं. त्याजला पाहण्याकरितां रामलक्ष्मण पुढें आले. तेव्हां रामाला दोष देऊन वाली म्हणाला:—"रामा, तुम्ही सत्यपराक्रम, धर्मशील, तेजस्वी व सन्मार्गवर्ती म्हणवितां; आणि मी दुसऱ्याशीं युद्ध करीत असतांना एकीकडे आड उभे राहून तुम्हीं मला बाण मारिला, ही गोष्ट न्याय्य झाली काय? राम प्रजांचें हित करणारे आहेत, राम समय जाणणारे आहेत, इत्यादि प्रकारें तुमची स्तुति सर्व लोक गातात; मग तुम्हीं हें धडधडीत अधर्म—कृत्य कसे केलें? मला वाटतें धर्मध्वजा उभारून अधर्म आचरण करणारे, सौम्य गोष्टी बोलून पापाचरण करणारे, तुम्ही गवतानें झांकलेल्या कुव्याप्रमाणें वरून चांगले दिसतां. मीं तुमच्या राज्यांत किंवा नगरांत येऊन तुमचा कांहीं अपराध केला नाहीं. मला निरपराध्याला तुम्हीं कां मारलें, हें सांगा. आडून मारणें किंवा आपल्याशीं जो कोणत्याही प्रकारें युद्ध करीत नाहीं त्यास मारणे, हें सर्व सज्जन लोक अत्यंत अयशस्कर समजतात. तें कर्म करून तुम्ही सज्जनामध्यें आपलें तोंड दाखवाल काय? माझ्यासमोर तुम्हीं आलां असतां, निदान माझ्या दृष्टीस जरी पडता, तरी मी तुम्हास स्वर्गाचा रस्ता दाखविल्याशिवाय राहिलों नसतों. असो; आतां जी गोष्ट झाली ती झाली; परत येत नाहीं. सुग्रीवाला माझ्या मागें राज्य द्या; तुम्हीं ज्या कर्मानें मला यमसदनाला पाठविलें आहे, तें कर्म जरी निंद्य आहे, तरी आतां माझ्या पश्चात् सुग्रीवाला गादी मिळणें वाजवी आहे." याप्रमाणें वालीनें केलेली निंदा ऐकून रामांनीं शांतपणानें उत्तर दिलें:—"वाली, युक्तायुक्त, धर्म्याधर्म्य न जाणून तूं मला केवळ बालिशपणानें दोष देत आहेस. हें पहा; ह्या समस्त पृथ्वीचें सार्वभौमत्व इक्ष्वाकुवंशाकडे आहे. हल्लीं त्या वंशांत अयोध्येस धर्मकामार्थांचा यथाशास्त्र निवाडा देणारा भरत राजा राज्य करीत आहे. त्याच्या आज्ञेनें आम्ही व दुसरे सर्व राजे धर्माचरण कायम करण्याकरितां पृथ्वीवर फिरत आहों. हल्लीं तूं केवळ कामांध होऊन व धर्माचरण सोडून निंद्य कर्म करीत होतास, आणि सन्मार्ग व राजमार्ग सोडून चालत होतास. बाप, ज्येष्ठ बंधु आणि जो आपल्यास विद्या देतो तो हे तिघे धर्मानें वागणारास जसे पितृस्थानीं आहेत, त्याचप्रमाणें धाकटा बंधु, पुत्र

आणि शिष्य हे तिघे पुत्र होत. तर सज्जनांचा धर्म सोडून तूं सुग्रीव जिवंत असतांना त्याच्या बायकोशीं म्हणजे स्नुषेशीं रममाण होतास, हें केवढें मोठें पातक करीत आहेस ? अरे, असलें निंद्य कर्म करणाऱ्या तुला हीच शिक्षा योग्य आहे. असल्या पातकाला वध हीच शिक्षा सांगितली आहे. वाली, मनूनें सद्धर्माला वाढविणारे असे दोन नियम घालून दिले आहेत;ते सर्व धर्म-कुशलांनीं पसंत केले आहेत व त्याप्रमाणेंच माझें आचरण आहे. मनुष्यांनीं पाप केलें असेल तर त्यांना राजदंड झाला असतां ते पापमुक्त होऊन पुण्यवान् लोकांप्रमाणें स्वर्गास जातात. तसेंच चोर अथवा अन्य पापी, राजाकडून शासन होऊन किंवा राजानें सोडून दिला असतां पापापासून मुक्त होतो. पण राजा पापाबद्दल शासन न देईल,तर त्यालाच त्या पापाचें फळ भोगावें लागतें. या नियमाप्रमाणें कित्येक पापाचरण करणारे राजे देखील स्वतः दंड भोगून पापापासून मुक्त झाले आहेत. तुझ्या पातकाबद्दल योग्य शासन झालें आहे व असें शासन झाल्यामुळें तूं त्या पातकापासून मुक्त झाला आहेस. आतां तूं माझ्यासमोर युद्ध करीत नसतांना मी तुला आडून मारिलें, याजबद्दल तूं दोष देतो आहेस. तर याविषयीं माझें म्हणणें ऐक; म्हणजे तूं मला दोष देणार नाहींस. वन्य पशूंना जाळी लावून, फास टाकून व इतर अनेक उपायांनीं मनुष्यें मारतात. समोर दृश्य होऊन मारतात किंवा लपूनही मारतात.हा मृगयेचा नियम सर्वत्र मानिला गेला आहे कीं,मृगाला तो धांवत असतांना किंवा त्रासवून किंवा फसवून, विश्वासास गुंतवून किंवा स्वस्थ बसला असतांही मारावे.धर्मिष्ठ राजर्षीही याच नियमाप्रमाणे मृगया करतात.तेव्हां ज्या अर्थी तूं शाखामृग आहेस,त्या अर्थी तुला समोर किंवा लपून युद्ध करीत असतां किंवा नसता, बाणानें मारण्यांत मला दोष लागत नाहीं.''

असें रामाचें भाषण ऐकून वालीनें आपली चुकी कबूल केली आणि रामाला दोषांतून मुक्त केलें. त्यानें हात जोडून म्हटलें:-" रामा, तुम्ही न्यायी व सत्यपराक्रम आहां; तुम्ही म्हणतां तें युक्त आहे. आतां मी मारिला गेलों याचें मला दुःख नाहीं. मात्र माझी एक विनंति आहे तेवढी ऐका. माझा लहानपणापासून प्रेमानें वाढविलेला, प्रिय पुत्र तरुण अंगद माझ्यावाचून पाणी सुकलेल्या तटाकाप्रमाणें म्लान होईल,त्याची काळजी आतां तुम्हांला आहे. माझा पुत्र हा एकटाच माझी प्रिय भार्या तारा हिच्या पोटीं झालेला असून अद्याप त्याला शहाणपण आलेलें नाहीं. त्याला सांभाळणें हें

तुमचें ब्रीद होय. तुम्ही समर्थ आहां, योग्य, अयोग्य आणत आहां व सर्व राज्याचे मालक आहां; जसें सुग्रीवाचें कल्याण करणें तुम्हीं मनावर धरिलें आहे, तसें याचेंही धरा. " हें ऐकून रामांनीं वालीस आश्वासन देऊन सुग्रीवास अंगदाला यौवराज्याचा अभिषेक करण्याविषयीं आज्ञा केली. तेव्हां वालीनेंही सुग्रीवाला जवळ बोलावून सांगितलें कीं, " बाबा, तुझें माझें प्रथम सख्य असून पुढें वैर व्हावें आणि मीं राज्य करून तूं अरण्यांत राहावें ही दैवाचीच आज्ञा होय.असो;आतां हें राज्य सांभाळून अंगदाचा सांभाळ करावा. ही इंद्रानें दिलेली कांचनी–माला जोंपर्यंत माझ्या कंठात आहे तोंपर्यंत माझा प्राण जावयाचा नाहीं. याकरिता ही मी तुला देतों, तूं हिच्या योग्य आहेस. " असें म्हणून वालीनें आपल्या गळ्यांतून माला काढून ती सुग्रीवाच्या गळ्यांत घातली. एका क्षणानें वालीची मुखकांति म्लान होऊन त्याचा प्राण देह सोडून गेला. तेव्हां सुग्रीवादि सर्व वानरांनीं मोठ्यानें रुदन करून आक्रोश केला.

रामानें बाणानें वालीला मारिलें,ही बातमी तारेस समजतांच ती मोठ्या दुःखानें ग्रस्त होऊन आपल्या पुत्रास घेऊन किष्किंधेच्या बाहेर धांवत आली. समरांतून कधींही परत न येणाऱ्या आपल्या शूर पतीनें रणांगणांत ठेवलेला देह पाहून तारा त्याजवर पडून शोकानें आक्रोश करूं लागली. तिला व अंगदाला पाहून सुग्रीवाच्या शोकालाही भरतें आलें व तो मोठ्यानें रुदन करूं लागला. पतीच्या मुखाचे चुंबन घेऊन तारा पतीला म्हणूं लागलीः— " राया, तुम्हीं माझें म्हणणें ऐकिलें नाहीं, आणि आतां या दगडांनीं भरलेल्या जमिनीवर शय्या करून निजलां आहां.माझ्यापेक्षां तुम्हांला ही पृथ्वी प्रिय आहे, असें वाटतें. राया, माझ्याशीं एक शब्द तरी बोला हो ! तुम्हीं पृथ्वीला आलिंगन दिलें आहे;पण माझ्याकडे पहा तरी ! तुम्हीं मला अभागीला एकटी टाकून स्वर्गाला कसे हो गेलांत ! शूराला मुलगी देऊं नये म्हणून म्हणतात, त्याची सत्यता आज मला कळली. ही पहा मीं शूराची भार्या एकाएकीं विधवा झाल्यें. माझे सर्व मनोरथ भग्न झाले व माझी कायमची विटंबना झाली.पतिराया,मला शोकसागरांत ढकलून तुम्ही कसे गेलां! या तुमच्या मुलाकडे तरी पहा ! हा पहा तुम्हांला नमस्कार करितो आहे, याला ' दीर्घायु हो ' असा आशीर्वाद आज आपण कां देत नाहीं ! राया, मी आतां तुमच्याबरोबर येत्यें; मला बरोबर घेऊन चला. " असें म्हणून

वालीच्या प्रेतावर ती गडबडां लोळूं लागली. थोड्या वेळानें उठून व रामचंद्राला पाहून तारा म्हणाली:–" तुम्ही त्रैलोक्यनाथ आहां, अनाथाचे त्राते आहां. ज्या बाणानें वालीला मारलेंत तोच बाण मारून मलाही परलोकाला पाठवा. वाली माझी वाट पहात असेल; तो वीर स्वर्गींच्या अप्सरांना एकीकडे टाकून माझ्या विरहानें शोक करीत असेल! महाराज! वियोगाचें दुःख तुम्हांला ठाऊक आहे; तर रामा, माझ्यावर दया करा, आणि मला वाली-बरोबर परलोकाला पाठवा." याप्रमाणें तिचें भाषण ऐकून रामचन्द्र गहिं-वरले; त्यांच्याही डोळ्यांतून पाणी येऊं लागले. ते स्वतः शोकाकुल झाले असू-नही तारेचें सांत्वन करून म्हणाले:—" तारे, शोक केल्यानें मृताला सद्गति प्राप्त होत नाहीं, किंवा त्याचें कांहीं हितही होत नाहीं. काळ प्रत्येकाच्या मागे लागला आहे; कर्माचें फळ तरी काळच देतो; कर्त्यास बुद्धिही काळच देतो. कोणी कोणाला कोणतीही गोष्ट करीत नाहीं; तर स्वभावानें मनुष्य प्रवृत्त होऊन काळानुरूप त्यास फळ मिळतें. काळ हा कोणाला सुटला नाहीं. यम-सुद्धां काळाचें उल्लंघन करूं शकत नाहीं. काळाला सोडून कोणीही चालूं शकत नाहीं. काळाचा कोणीही बंधु नाहीं; काळ पराक्रमावर नजर देत नाहीं; शेंकडों मित्र किंवा संबंधी असले तरी काळ थांबत नाहीं. सारांश, शहाण्या मनुष्यानें हा काळाचा परिणाम व महिमा लक्षांत घेतला पाहिजे. धर्मार्थकामसुद्धां काळक्रमापासून सुटले नाहींत. वानरराजा वाली याचा उत्तम काळ झाला आहे, हें लक्षांत घेऊन तूं शोक करूं नको; आणि आतां जी गोष्ट प्राप्त झाली आहे, ती करावयास सादर हो." इतक्यांत कर्तव्यमूढ झालेल्या सुग्रीवाला लक्ष्मणानें वालीचें यथासांग उत्तरकार्य करण्यास सुचाविलें, आणि तार नांवाचा वानरांचा सरदार होता त्याला म्हटलें:—" तारा! तूं ताबडतोब नगरांत जाऊन शिबिका घेऊन ये. अशा प्रसंगीं त्वरा करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे." तें ऐकून तार ताबडतोब शहरांत जाऊन शिबिका घेऊन आला, तों हजारों वानर वालीच्या उत्तरकार्याकरितां जमले. त्यांनीं वालीला उचलून त्या शिबिकेंत बसविलें. मोठमोठाले शूर वानर शिबिका वाहण्यास लागले. कारण शूराचें प्रेतकार्य शूरांनींच करावें हें युक्त आहे. अंग-दाला हातांत धरून तार पुढें झाला; व सुग्रीवादि सर्व वानर मागून चालले. त्याचप्रमाणें ताराप्रभृति वानरस्त्रिया मागून मोठ्यानें आक्रोश करीत चालल्या. त्यांच्या आक्रोशाने तें सर्व वन शोकमय झालें. चंदनकाष्ठाच्या चितेवर सुग्रीव

व अंगद यांनीं वालीचा देह उचलून ठेविला, आणि त्याला यथाशास्त्र अग्नि दिला. नंतर दोघांनीं चितेला प्रदक्षिणा घातली. याप्रमाणें रामांनीं आपल्या समक्ष सुग्रीवाकडून वालीचें उत्तरकार्य करविलें. प्रेतकार्य संपल्यावर सर्व वानर-सरदारांना घेऊन सुग्रीव रामापाशीं आला; तेव्हां हनुमानानें विनंति केली:—"तुमच्या प्रसादानें सुग्रीवाला वानरांचें हें बलिष्ठ व संपन्न राज्य मिळालें आहे. आपली आज्ञा झाली म्हणजे नगरांत जाऊन राज्यारोहणाचा समारंभ करूं व आपली, माल्यें, वस्त्रें, रत्नें, इत्यादिकांनीं यथाशक्ति पूजा करूं; आपण बरोबर चलावें." तेव्हां रामांनीं उत्तर केलें:—"हनुमाना, चौदा वर्षेंपर्यंत कोणत्याही नगरांत किंवा ग्रामांत जाणें पित्याच्या आज्ञेमुळें मला उक्त नाहीं. तुम्ही सर्व या समृद्ध किष्किंधा गुहेत जाऊन सुग्रीवाला यथासांग राज्याभिषेक करा, आणि या अंगदालाही यौवराज्याचा अभिषेक करण्यास विसरूं नका. हा सुग्रीवाच्या ज्येष्ठ बंधूचा ज्येष्ठ पुत्र सर्व गुणांनीं युक्त असून युवराज होण्याला योग्य आहे हनुमाना, आता हा वर्षाऋतूंतील पहिला महिना श्रावण सुरू झाला आहे. हल्लीं आमच्या उद्योगास आरंभ करण्याचा हा काल नव्हे; तुम्ही किष्किंधेंत हा वर्षाऋतु सुखानें काढा. आम्हीही या गिरीवर चातुर्मास राहतों." असें सांगून सुग्रीवास सर्व वानरांसह रामांनीं निरोप दिला. नंतर सुग्रीवाला सर्व सचिवांनीं नगरांत नेऊन सिंहासनावर बसविलें व त्याजला साष्टांग नमस्कार केला. तेव्हां सुग्रीवानें प्रत्येकास उठवून त्याचा योग्य सत्कार केला. नंतर सुग्रीवानें रामाच्या आज्ञेप्रमाणें अंगदाला यौवराज्याचा अभिषेक केला. तेव्हां सर्व वानरांनीं सुग्रीवाची "साधु साधु" अशी स्तुति केली. या वेळेस गिरिकंदरांतील ती पताकांनीं सशोभित केलेली किष्किंधा नगरी आनंदोत्सवानें भरून गेली होती. (किष्किं० स० १७–२६).

सुग्रीव किष्किंधेस निघून गेल्यावर राम प्रस्रवण अथवा माल्यवान् पर्वतावर गेले. त्या पर्वताची शोभा पाहून त्यांस फार कौतुक वाटलें. चंदन, तिलक, ताल, तमाल, अतिमुक्त, पद्मक, अशोक, वानीर, तिमिंद, बकुल, केतक, हिंताल, तिनिश, नीप, वेतस, इत्यादि अनेक प्रकारच्या वृक्षांनीं तो भरलेला होता. मालती, कुंद, मोगरा, शिरस, कदंब, अर्जुन, वगैरे फुलझाडेंही फुललेलीं होतीं. ठिकठिकाणीं अंजनराशीप्रमाणे काळेकुळकुळित मोठमोठे दगड दिसत होते. कित्येक ठिकाणीं तुटलेल्या कड्यांतून पांढरे व तांबडेही पाषाण दिसत होते. निरनिराळ्या रंगांचे मधुर स्वरानें गाणारे पक्षी या झाडावरून

त्या झाडावर उड्या मारीत होते. अशा त्या रम्य पर्वतावर फिरतां फिरतां एक खोल गुहा रामाचे दृष्टीस पडली; तिचें तोंड ईशान्येकडे होतें.ती पाहून रामांनीं लक्ष्मणास म्हटलें:—" लक्ष्मणा, आपल्यास रहावयास ही गुहा अत्यंत योग्य आहे. या गुहेच्या तोंडाशीं हें लहानसें गोड पाण्यानें भरलेलें तळेंही आहे. या गुहेची पाठ पश्चिमेकडे असल्यामुळें तीमध्यें वारा फारसा येणार नाहीं. येथून सर्व डोंगराची व अरण्याची शोभा दृष्टीस पडत आहे. किष्किधाही येथून फार दूर नाहीं. किष्किंधेतून हा पहा, मृदंगादि वाद्याचा ध्वनि ऐकूं येत आहे.मला वाटतें सुग्रीवाच्या किंवा अंगदाच्या अभिषेकाचा समारंभ वानर मोठ्या आनंदानें करीत आहेत. लक्ष्मणा, आपणांस वर्षाकाळ काढण्यास हें ठिकाण चांगलें आहे. " रामाची आज्ञा ऐकतांच लक्ष्मणानें गुहा साफ केली व ते त्या गुहेंत राहूं लागले. ग्रीष्म ऋतु संपून वर्षाकाळ चालू झाला. चोहोंकडून मेघ उठूं लागून पर्जन्यवृष्टि होऊं लागली. त्या वेळची शोभा लक्ष्मणास दाखवून राम म्हणाले:—" लक्ष्मणा, सूर्याच्या किरणांनीं वर शोषून घेतलेल्या समुद्राच्या पाण्याचा गर्भ आकाशांत नऊ महिने वाढत राहून आता आकाश रसरूपी गर्भाला प्रसव देत आहे. हे पहा मेघ पर्वतावर एकावर एक रचलेले कसे दिसत आहेत ! असें वाटतें कीं, या मेघांच्या पायऱ्यांनीं चढून,पर्वतावरील कुडा,अर्जुन,वगैरे झाडांच्या फुलांच्या माळा सूर्याच्या कंठाभोंवतीं घालतां येतील. संध्याकाळच्या वेळीं तांबडे लाल झालेले हे मेघ अंतर्यामीं पांढरे असल्यामुळें आकाशाला जखम झाली असून त्याजवर हे कापडाचे पट्टे बांधले आहेत कीं काय, असें वाटतें.या मेघाच्या उदरांतून आलेले ओले वारे कर्पूरदलासारखे थंड आहेत. हे वारे केतकीचा गंध वाहून आणीत असल्यामुळें असें वाटतें कीं,ते ओंजळी भर-भरून पिऊन जावे ! हे पहा,समोरच्या डोंगरावर अर्जुन वृक्ष फुललेले असून त्यांजवर मेघांतून धारा पडत आहेत. यामुळें तेथील पेटलेला दावाग्नि शांत होऊन वैरी शांत झाल्यानें पुष्पमालांनीं अलंकृत केलेल्या सुग्रीवाप्रमाणें याजवर अभिषेक होत आहे कीं काय,असें वाटतें.ह्या मेघोदरांत वीज लवून मागून धडधड आवाज येत आहे; यामुळें जणूं काय सोन्याच्या चाबकानें फटका बसल्यामुळें आकाश वेदनेनें ओरडत आहे कीं काय,असा भास होतो ! चोहींकडील धूळ नाहींशी झाली आहे, व वाऱ्यांत शीतता आली आहे. चक्रवाक, हंस इत्यादि पक्षी मानस सरोवराला परत गेले आहेत. पावसानें रस्ते तुटल्यामुळें खेड्यांतील

गाड्या बाहेर फिरतांना क्वचितच दृष्टीस पडतात. आकाशांत कोठें उजेड पडला आहे, कोठें काळोख आहे; त्यांत ढग इकडून तिकडे विस्कळित फिरत आहेत; आणि पर्वतावर अगदीं आदळल्यासारखे दिसत आहेत. यामुळें आकाश खवळलेल्या समुद्रासारखें दिसत आहे. या डोंगरांतील नद्यांतून तांबडें झालेलें व नानाप्रकारच्या कदंबादि वृक्षांच्या फुलांनीं भरलेलें पाणी मोठ्या जोरानें वाहत आहे, व त्यांच्या काठानें मयूर टाहो फोडीत धांवत आहेत. जांभळीचीं रसानें भरलेलीं काळींमोर फळें जितकीं खावीं तितकीं थोडींच वाटतात. आम्रवृक्षाचीं ही परिपक्व झालेलीं पिंवळीं, तांबडीं फळें धडाधड खालीं पडत आहेत. या सायंकाळच्या वेळीं वनभूमि फारच मनोरम दिसत आहे. तींतील मैदानें पाणी पिऊन आतां नव्या हरळीनें हिरवीगार झालीं आहेत. जिकडेतिकडे मयूरपक्षी आनंदानें नाचत आहेत आणि बगळ्यांची पंक्ति अगदीं भिजून चिंब झाली, तरी आकाशांत उडत आहे. हे मोठमोठाले मेघ पाण्याचीं ओझीच्या ओझीं घेऊन आकाशांतून जातांना आवाज करीत व प्रत्येक पर्वताच्या शृंगावर विश्रांति घेत घेत जात आहेत! नवीन उत्पन्न झालेल्या इंद्रगोप किड्यांच्या चित्रविचित्र रंगानें भरलेली हिरवीगार जमीन पाहून असें वाटतें कीं, पृथ्वी लाक्षा रंगाची झांक मारणारी पोपटी रंगाची शाल पांघरली आहे कीं काय! लक्ष्मणा, या वेळेस नद्या वाहत आहेत, मेघ वर्षाव करीत आहेत आणि मस्त झालेले हत्ती चीत्कार आहेत. वनप्रदेश शोभूं लागले आहेत; मयूर नाचत आहेत व वानर उड्या मारीत आहेत. केतकी पुष्पांच्या सुगंधानें मत्त होऊन वन्य गज पाण्यांत खेळून ओरडत आहेत आणि त्यांच्या आवाजांस वरून पडणाऱ्या धबधब्यांचे आवाज मिश्रित होत आहेत. परिपक्व झालेल्या फळांनीं भरलेले जांबळीचे वृक्ष जणूं काय भ्रमरांनीं भरलेले आहेत, असे दिसत आहेत. हा पहा डोंगरावरील अरण्यांत जाणारा हत्ती मेघांचा गंभीर ध्वनि ऐकून त्याच्या मागें लागला, पण मागें प्रतिध्वनि ऐकून मागें कोणी शत्रु आला आहे, असें वाटून पुन्हां ता परत फिरला. कमळांच्या पानांवर पडलेलें मोत्यासारखें स्वच्छ जल, पावसानें चिंब भिजल्यामुळें अगदीं विवर्ण झालेले पक्षी तृषार्त होऊन मोठ्या आनंदानें पिऊं लागले आहेत. भृंगांच्या आवाजाची वीणा, वानरांनीं केलेल्या आवाजाचा आणि मेघांच्या गडगडाटाचा मृदंग, याप्रमाणें जणूं काय वनात संगीत सुरूं झाले आहे, असें वाटतें. कांहीं मोर नाचत आहेत, कांहीं मधून मधून टाहो फोडीत आहेत व कांहीं

वृक्षांवर बसून शांतपणें पाहत आहेत, यामुळें जणूं काय नाचण्याची बैठक वनांत होऊन राहिली आहे, असें वाटतें! मेघांच्या गडगडाटानें निजलेले वानर एकाएकीं जागे होऊन नव्या पावसाच्या धारा अंगावर घेत ओरडत इकडून तिकडे उड्या मारूं लागले आहेत. पाण्यानें भरलेले काळे मेघ एकावर एक नाचूं लागून वणव्यानें दग्ध झालेल्या काळ्या डोंगरांच्या पंक्तीप्रमाणें भासूं लागले आहेत." थोड्याच दिवसांनीं समुद्रनादासारखे नाद करणारे मेघ मोठमोठे पाण्याचे भार घेऊन आकाशांत लोंबूं लागले. नद्या, सरोवरें, तळीं, विहिरी यांत किंबहुना सगळया पृथ्वीवर जळ भरून वर वाहूं लागलें. आकाश संपूर्ण व्याप्त होऊन दोन दोन चार चार दिवस नक्षत्रें, ग्रह, चंद्र, सूर्य, दिसेनासे झाले. धरणी जलानें तृप्त झाली. दिशा अंधःकारानें व्याप्त होऊन दिसेनाशा झाल्या. डोंगरांचे मोठमोठे कडे स्वच्छ धुतले जाऊन उंचावरून पडणाऱ्या जलप्रवाहामुळें त्यांच्या गळ्यांत मोठमोठे मोत्यांचे हार लोंबत आहेत, असें दिसूं लागलें. कित्येक ठिकाणीं वरून पडणारे प्रवाह डोंगराच्या मोठमोठ्या शिलांवर आपटून जणूं काय मोत्यांचे हार तुटत आहेत, असे त्याचे पांढरे जलबिंदु उडतांना दिसूं लागले. पावसाच्या मोठमोठ्या जलबिंदूंच्या धारा पडूं लागल्या. तेव्हां तर सुरस्त्रियांचे हार तुटून पडत आहेत कीं काय, असे भासूं लागले. पक्षी घरट्यांत जाऊं लागले आणि कमळे मिटूं लागलीं, म्हणजे सूर्य अस्तास जातो आहे, असें वाटे. हीच सूर्यास्ताची खूण राहिली. पावसाळ्यानें रस्ते आणि राजांचे तटे हे बरोबरच सपाट करून टाकिले. तेव्हां राम म्हणाले, "लक्ष्मणा, या वर्षाऋतूंतील नद्यांच्या काठांप्रमाणें माझें धैर्य खचत चाललें आहे. या वर्षाऋतूंतील जलप्रलयाप्रमाणें मला रावण अपार वाटूं लागला आहे. तथापि सुग्रीवाच्या आणि नद्यांच्या प्रसादाची वाट पहात आपणांस या डोंगरावरच राहिले पाहिजे!!" (कि० स० २७–२८).

चार महिने गेल्यावर वर्षाकाळ संपला, आणि शरदृतु प्राप्त झाला. आकाश स्वच्छ होऊन क्वचित् क्वचित् पांढरे मेघ आकाशांत शिल्लक राहिले. रात्रीच्या प्रहरीं आकाश विमल झाल्याकारणानें चंद्राची ज्योत्स्ना स्वच्छ पांढरी व तेजस्वी पडूं लागली. दीर्घ आणि गंभीर आवाज करणारे मेघ चार महिने काम करून थकून स्वस्थ बसले आणि मदस्राव बंद झालेल्या हास्तिप्रमाणें शांत झाले. डोंगर अगदीं धुऊन स्वच्छ झाल्यामुळें चांदण्यारात्रीं

फारच शोभायमान दिसूं लागले. सृष्टीची शोभा आतां तारे आणि चंद्र यांच्या प्रकाशांत, तसेंच मस्त झालेल्या वृषभांत व निर्मळ झालेल्या नदीच्या प्रवाहांत उत्कट दिसूं लागली. मोर मात्र आपले पिसारे टाकून आपल्या प्रियांविषयीं निष्काळजी होऊन उत्सवरहित ध्यानस्थ बसल्यासारखे दिसूं लागले. सुंदर कमलांनीं भरलेल्या, व चक्रवाकांनीं व हंसांनीं सुशोभित झालेल्या सरोवरांत हत्ती दोघांनाही त्रास देऊन सोंडांनीं आंतील पाणी हलवून हलवून पिऊं लागले. वर्षाकाळ सुरू झाल्यामुळें सर्प बिळांत शिरले होते ते तीन महिन्यांनीं आतां भुकेनें व्याकुळ व भयंकर विषारी होऊन बिळांतून बाहेर पडूं लागले. नवीन तयार झालेलें धान्य खाऊन पुष्ट झालेली सारसांची ओळच्या ओळ आकाशांत उडणाऱ्या मालेप्रमाणें दिसूं लागली. मोठ्या खोल डोहांतील काळेंभोर पाणी आंतील फुललेल्या लहान लहान कमळामुळें दुरून नक्षत्रांनीं भरलेल्या आकाशासारखें भासूं लागलें. बैलांच्या डुरकण्यांचा शब्द एकमेकांच्या चढाओढीनें जास्त फैलावूं लागला. वारा मृदु वाहूं लागला, कमळें फुलूं लागलीं, क्रौंच पक्षी बोलूं लागले, साळ पिंवळी पडली, पाणी निर्मळ झालें व चंद्राचीं किरणें तेजस्वी झालीं. सारांश, वर्षाकाळ संपून शरदृतूचा पूर्ण प्रादुर्भाव झाला. तत्रापि सुग्रीव आपली कांहींच खबर घेत नाहीं, असें पाहून राम मोठ्या चिंतेनें लक्ष्मणास म्हणाले:— "लक्ष्मणा, सीतेचा विरह मीं आज चार महिने पुढच्या आशेवर सहन केला, परंतु सुग्रीव माझ्यावर अद्याप कृपा करीत नाहीं. माझी भार्या नष्ट झाली, माझें राज्य गेलें. सुग्रीवास भार्या मिळाली व राज्यही मिळालें. तो माझी कशास आठवण काढील? तर तूं किष्किंधेस जाऊन सुग्रीवाला भेट, आणि त्याला सांग कीं, "शुभ किंवा अशुभ जी गोष्ट आपण कबूल केली ती जो पार पाडतो तोच खरा वीर होय. जे मित्र कृतकार्य होऊन आपल्या अकृतकार्य मित्राची ओळख विसरतात, त्या कृतघ्नाला राक्षस फाडून खातात. ज्या रस्त्यानें वाली मरण पावून स्वर्गाला गेला, तो रस्ता अद्याप संकुचित झालेला नाहीं. तर कृपा करून वालीच्या रस्त्याला जाऊं नको." याप्रमाणें शांत पण कठोर असा रामाचा निरोप घेऊन लक्ष्मण निघाला तो रामाच्या आज्ञेने किष्किंधेत शिरला. ती रत्नांनीं भरलेली रम्य गुहा पाहून लक्ष्मणास फारच आश्चर्य वाटलें. त्यांत हजारों मोठमोठाले वाडे नानाप्रकारच्या रत्नांनीं शोभिवंत केलेले होते. सर्व प्रकारचीं फुलझाडें व फळझाडें चोहींकडे लागलेलीं होतीं. देव

आणि गंधर्व यांजपासून उत्पन्न झालेले कामरूपी वानर, सुंदर पोषाख करून इकडून तिकडे फिरत होते. चंदन, अगरु आणि कमळें यांनीं सुगंधित केलेलें मैरय व मधु ठिकठिकाणीं बाजारांत विकावयास ठेवलेलें त्यांच्या दृष्टीस पडलें. शेवटीं एका मोठ्या पांढऱ्या पहाडानें चारी बाजूंनीं वेष्टिलेलें, आंत पांढऱ्या पाषाणांनीं तयार केलेल्या प्रासादशिखरांमुळे कैलास पर्वतासारखें दिसणारें व सर्व प्रकारच्या पुष्पवृक्षांनीं सुशोभित केलेलें असें सुग्रीवाचें मंदिर लागलें. त्यांत लक्ष्मण बेधडक शिरला; त्यास कोणी मज्जाव केला नाहीं. सात चौक ओलांडून आंत लक्ष्मण गेला तों त्याला तंत्रीचा मधुर आवाज ऐकूं आला. ताल सारखा चालूं आहे, अक्षरेंही सौम्य आहेत आणि गोड आवाजानें कोणी गात आहे, असें त्यास दिसलें. सुंदर स्त्रिया इकडून तिकडे फिरतांना त्यांच्या दृष्टीस पडल्या. नाचणाऱ्या बायकांच्या नूपुरांचा व कांचीचा शब्द ऐकून लक्ष्मण लज्जायमान होऊन क्रोधाविष्ट झाला व त्यानें आपल्या धनुष्याचा जोरदार टणत्कार केला. तेव्हां त्या भयंकर ध्वनीनें बाकीचे सर्व आवाज एकदम बंद झाले आणि सुग्रीवानें भयभीत होऊन तारेला म्हटलें:—" तारे, मृदु अंतःकरणाचा रामाचा बंधु लक्ष्मण हा कां रागावला आहे व येथें कां आला आहे, तें तूं स्वतः जाऊन पहा; आणि त्याला प्रसन्न कर. " ही आज्ञा ऐकून ती रूपैश्वर्यवती अंगावर मोठमोठे दागिने घातलेली व मधुपानानें किंचित् आरक्तनयन झालेली तारा लाजत लक्ष्मणाकडे आली. आपल्याकडे स्त्री येत आहे, हें पाहून कोप शांत होऊन लक्ष्मणानें अवरोधानें मान खालीं घातली. तारा त्यास प्रणयानें म्हणाली: -" राजपुत्रा, तुम्हांस कोप येण्याचें कारण काय ? तुमची कोणीं अवज्ञा केली ? वाळलेल्या वनाला आग लावण्यास कोण तयार झाला आहे ? मला सांगा, मी त्याचें पारिपत्य आतांच करवित्यें. हे राजपुत्रा, स्वजनांविषयीं तुम्हांला कधींही कोप येणार नाहीं. माझ्या प्रिय पतीला, वानरवंशाच्या नाथाला, माझ्या सहवासांत लुब्ध होऊन निश्चिंत पडलेल्या तुमच्या भावाला तुम्ही क्षमा करा. हे महाबाहो, मी तुमच्या मित्राची बायको आहे, माझ्याबरोबर तुम्ही आपल्या मित्रास भेटण्यास चला. " असें तिचें नम्र भाषण ऐकून लक्ष्मण तिच्याबरोबर अंतःपुरांत शिरला. त्यास पाहतांच सुग्रीव सुवर्णाचें आसन सोडून एकदम पुढें आला. त्याला लक्ष्मण म्हणाला:—" सत्त्ववान्, जितेंद्रिय, दयाशील, कृतज्ञ व सत्यवादी असा पुरुष जगतांत लोकादरास पात्र होतो.

अश्वाच्या देवघेवींत कोणी खोटें बोलेल तर त्याच्या शंभर मनुष्यांचा नाश होतो. गाईच्या संबंधानें खोटें बोलेल तर हजार मनुष्यांचा नाश होईल. मनुष्यांच्या व्यवहारांत खोटें बोलेल तर त्याचा व त्याच्या सर्व जनांचा नाश होईल. गाय मारणारा किंवा दारू पिणारा अथवा चोर अथवा वज्रघात करणारा, यांना प्रायश्चित्त आहे. परंतु **कृतघ्नाला प्रायश्चित नाहीं,** असें ब्रह्मदेवानें सांगितलें आहे. रामानें तुझें कार्य करून दिल्यास चार महिने झाले. त्याचा उतराई होण्याकरितां सीतेचा शोध लावण्यासाठीं तूं कधीं येणार ? सुग्रीवा, वाली मारला जाऊन ज्या रस्त्यानें स्वर्गास गेला तो रस्ता अद्याप बंद झाला नाहीं. वालीच्या मार्गाला तूं लागूं नकोस, तर आपलें दिलेल वचन पार पाड. " हे शब्द ऐकून सुग्रीवाचा मद एकदम उतरला; त्यानें आपल्या गळ्यांतील चित्रविचित्र पुष्पांचा हार तोडून टाकिला आणि मोठ्या विनयानें तो लक्ष्मणास म्हणाला:—" लक्ष्मणा, गेलेली स्त्री आणि हें कपिराज्य मला रामाच्या प्रसादानें मिळालें आहे. त्या पराक्रमी रामचंद्राचे अंशतः तरी उपकार फेडण्याचें सामर्थ्य कोणास आहे ? राम आपल्याच तेजानें सीतेला परत आणून रावणाचा नाश करील. मी केवळ साहाय्य केल्याच्या निमित्ताचा अधिकारी आहें; त्याप्रमाणें रामाच्या युद्धाची सामुग्री तयार करून ताबडतोब देतों. " असें सुग्रीवाचें नम्र भाषण ऐकून लक्ष्मण संतुष्ट होऊन सुग्रीवास म्हणूं लागला:—" माझ्या प्रियबंधूला तुझी खरोखर मदत पाहिजे. तूं धर्मज्ञ आहेस, कृतज्ञ आहेस, युद्धांत मागें फिरणारा नाहींस, त्या तुझें साहाय्य मोठें महत्त्वाचें आहे. तर आतां तात्काळ माझ्याबरोबरच चल, आणि शोकानें पीडित झालेल्या रामाचें सांत्वन कर. " सुग्रीव लागलाच उठला; त्यानें प्रथम हनुमानाला आज्ञा केली कीं, पृथ्वीवरील सर्व वानर सामदामदण्डादि उपायांनीं तत्काल एकत्र करावे. त्या आज्ञेप्रमाणें हनुमानानें चारी दिशेला दूत पाठविले. त्याबरोबर चारी दिशेचे वानर सुग्रीवाची आज्ञा शिरसावंद्य करून धांवले. तीन कोटी वानर त्याच प्रदेशांतून जमा झाले; पश्चिमेकडील अस्तागिरीवर राहणारे दहा कोटी वानर एका मुहूर्तांत आले; कैलासपर्वताच्या प्रदेशांतून सिंहव्याघ्रासारखे बलाढ्य असे हजार कोटी वानर आले; हिमालयाच्या प्रदेशांतून सहस्र सहस्र कोटी वानर आले; विंध्यपर्वताहून तांबड्या रंगाचे भयंकर वानर हजारों कोटी येऊन पोंचले. क्षीरसमुद्राच्या किनाऱ्यावर राहणारे तमाल वनांतले, व नारळीच्या वनांतले

वानर किती आले याची तर संख्याच नाहीं. गिरिगव्हरांतून व निरानिराळ्या नद्यांच्या किनाऱ्यांवरून, इतकी वानरसेना आली कीं, तेणेंकरून सूर्य आच्छादित झाला; त्या वानरांनीं दिव्य वनस्पती व फळें आपल्याबरोबर सुग्रीवास अर्पण करण्यास आणलीं होतीं, तीं त्यांनीं सुग्रीवास आदरानें नजर केलीं. ( कि० स० २९-३७ ).

नंतर अनेक सहस्र वानररक्षकांनीं वेष्टित व श्वेत छत्र, चामर इत्यादि राजचिन्हांनीं विराजित असा सुग्रीव लक्ष्मणासह एका रत्नखचित शिबिकेंत बसून प्रस्रवण पर्वतावर येऊन पोंचला. सुग्रीव व इतर सर्व वानर रामापुढें हात जोडून उभे राहिले, तेव्हां सर्वांच्या अंजली एकाद्या विस्तीर्ण तटाकांतील कमलांच्या कळ्यांप्रमाणें शोभूं लागल्या. सुग्रीवास पाहून रामास अत्यंत आनंद झाला. सुग्रीवानें रामास साष्टांग नमस्कार घातला, तेव्हां त्यास रामांनीं उठवून व प्रेमानें आलिंगन देऊन आपल्याजळ बसविलें आणि म्हटलें:—" धर्म, अर्थ आणि काम हे यथावकाश व यथाकाल जो राजा सेवन करितो, तो सर्वत्र विजयी होतो. जो केवळ कामाच्याच मागें नेहमीं लागतो त्याचा नाश होतो. सुग्रीवा, आतां हा आपल्या उद्योगाचा समय आला आहे; याचा विचार केला पाहिजे. " तेव्हां सुग्रीव हात जोडून म्हणाला:—"रामा, तुमच्या प्रसादानें मला ही सर्व संपत्ति आणि हें राज्य मिळालें आहे. **उपकार फेडण्यास जो तयार होणार नाहीं, तो अधम पुरुष होय.** मीं वानराना पृथ्वीवरील सर्व ठिकाणांहून बोलाविलें आहे. कांहीं आले आहेत व कांहीं येत आहेत. विंध्य, हिम, मन्दर, मेरु, समुद्रतीर इत्यादि सर्व ठिकाणांहून क्रोडों काय, अर्बुद, शंकु, मध्य, समुद्र, परार्ध गणतीचे वानर तुमच्या कार्यासाठीं येतील आणि त्या राक्षसाधमाचा विध्वंस करतील." हें ऐकून रामास आनंद झाला; व त्यांनीं सुग्रीवाला आलिंगन देऊन म्हटलें:— "इंद्र पर्जन्याचा वर्षाव करतो, किंवा सूर्य तमाचा नाश करितो यांत आश्चर्य नाहीं. तुझ्यासारखे उत्तम मित्र असे उपकार न करतील तर मात्र आश्चर्य आहे." राम असें म्हणत आहेत तों एकदम काळोख पडला, चोहोंकडे धुरळा उधळला, पृथ्वी थरथर कांपूं लागली. लाखों, क्रोडों वानरसेना आपआपल्या सरदारांसह जमूं लागली. दशसहस्रकोटि वानर घेऊन शतबली दृष्टीस पडला. कांचनाप्रमाणें दैदीप्यमान असा तारेचा पिता कोट्यावधि वानर घेऊन आला. त्याचप्रमाणें रुमेचाही पिता आला. हनुमानाचा पिता केसरी अनेक कोटि

वानर घेऊन हजर झाला. गाईच्या शेंपटींप्रमाणें पुच्छ असणारे वानर घेऊन गवाक्ष पातला. कोट्यावधि अस्वलें घेऊन धूम्र येऊन पोंचला. तीन कोटि वानर घेऊन पनस उभा राहिला. काळे वानर दहा कोट घेऊन नील येऊन ठाकला. पांच कोटी वानर घेऊन गवयाने मुजरा केला. कोटिसहस्र वानरांसहित दरीमुख सुग्रीवासमोर उभा राहिला. कोटि कोटिसहस्र वानरसैन्याचे अधिपति अश्विनीचे पुत्र मैंद आणि द्विविद दृष्टिगोचर झाले. तीन कोटि ऋक्षसैन्य घेऊन जांबवान सज्ज झाला. दहा कोटि वानर बरोबर घेऊन तेजस्वी रुमण धांवला. बळवानाची शतकोटि वानरसेना दिसूं लागली. अकराशें कोटिसहस्र वानर घेऊन गंधमादन सेवेस तयार झाला. एक पद्मसहस्र व एकशत शंख एवढें प्रचंड वानरसैन्य बरोबर घेऊन खुद्द युवराज अंगद समोर येऊन रामास प्रणिपात करून सन्निध स्थित झाला. पांच कोटि वानर घेऊन तार उभा राहिला. अकरा कोटि वानर घेऊन इंद्रजानु उतरला. दहाहजार अकराशें वानर घेऊन रंभयूथप सामील झाला. दोन कोटींचा अधिपति दुर्मुख उभा राहिला. कैलास शिखरासारखे उंच व मोठे असे एक हजार कोटि श्वेत वर्णाचे वानर घेऊन हनुमान हा कंबर बांधून तयार झाला. शतकोटि व शतसहस्र वानर घेऊन नील येऊन पोंचला. शरभ, कुमुद, वन्हि, रंभ, इत्यादि अनेक वानरसरदार व पथकदारही आपआपल्या सैन्यांसह येऊन मिळाले. त्यांनीं सर्व डोंगर व सर्व सपाट जमीन भरून टाकिली. त्या सर्वांनीं सुग्रीवाला नमस्कार करून यथावकाश आपआपलें सैन्य उतरविलें, आणि सुग्रीवानें त्या सर्वांची वर्दी नावांसहित रामाला दिली. या सर्व वानरसैन्याचें आधिपत्य सुग्रीवानें रामाला अर्पण करून म्हटलें:—"रामा, तुम्ही या अपरंपार सेनेचे मालक आहां, या सेनेनें काय करावें ती आज्ञा करा." तेव्हां रामानीं सांगितलें:—"मी सैन्याचा अधिपति तुला समजतों. तूं यथायोग्य बंदोबस्त ठेवून जी व्यवस्था करणें असेल ती कर; आणि सीतेचा शोध लावण्याकरितां व रावणाचें ठिकाण शोधून काढण्याकरितां ज्या ज्या गोष्टी करणें असतील त्या कर." हे रामाचे भाषण ऐकून सुग्रीवानें चारी दिशांला वानरांच्या चार टोळ्या पाठविल्या. विनतानामक यूथपाला पूर्व दिशेकडे पाठविलें. बहुधा सीता लंकेंत सांपडेल या आशेनें मोठमोठे सरदार म्हणजे अग्नीचा पुत्र नील, वायूचा पुत्र हनुमान्, पितामहाचा पुत्र जांबवान् तसेंच सुहोत्र, शरारि, शरगुल्म, गज, गवाक्ष, गवय, सुषेण, सुप्रभ, मैंद, द्विविद,

गंधमादन, उल्कामुख, अनद, आणि अंगद यांस दक्षिणेकडे पाठविलें. तारेचा बाप आपला श्वशुर सुषेण याजला पश्चिम दिशेला जाऊन शोध करण्याविषयीं हात जोडून विनंति केली. पश्चिमेकडे सुषेणाला पाठवून उत्तरेकडे शतबळ नामक वानरसरदारास पाठवून दिलें व प्रत्येकास त्या त्या दिशेकडील देशांची, प्रांतांची व नद्यांची माहिती सांगून आज्ञा केली कीं, "फार बारकाईनें सर्व नद्या, पर्वत, देश, नगरें तपासून एक महिन्याच्या आंत परत यावें. जो सीतेची बातमी प्रथम आणून देईल त्याला मी अमर्याद बक्षीस देईन. जो एक महिन्यावर वेळ लावील, त्याचें मी पारिपत्य करीन." याप्रमाणें सर्वांना आज्ञा देऊन त्या त्या दिशेला रवाना केलें. विशेषतः हनुमानाला सुग्रीवानें सांगितलें कीं, "तूं महान् पराक्रमी, बुद्धिमान्, तेजस्वी व आपल्या बापाप्रमाणें वेगवान् असून माझा अत्यंत जिवलग मित्र आहेस. तुला दक्षिणेकडे मुद्दाम पाठवीत आहे, बहुधा लंकेंत तुला सीता सांपडेल; हरप्रयत्नानें सीतेचा शोध लावून ये." तेव्हां हनुमानानें सुग्रीवाला व रामाला नमस्कार केला. रामानें मोठ्या उत्सुकतेनें व प्रेमानें त्यास निरोप दिला, आणि आपल्या हातांतील अंगठी काढून देऊन सांगितलें, "हनुमाना, सीतेचा शोध लागला तर तिला ही अंगठी दे, म्हणजे तिला तूं माझा दूत आहेस, याचा भरंवसा पटेल. मी लवकरच येऊन तुला सोडावितों अशी तिची खातरी कर." याप्रमाणें रामाची आज्ञा व अंगठी घेऊन हनुमान अंगद वगैरे सर्व बरोबर दिलेल्या सरदारांस घेऊन दक्षिणेकडे निघाला. नंतर इतर वानरही आपआपल्या निर्दिष्ट दिशेला गेले. पूर्व, पश्चिम व उत्तर दिशांना गेलेले वानर एक महिन्यांत परत येऊन त्यांनीं सीतेचा शोध लागत नाहीं म्हणोन प्रस्रवण पर्वतावर येऊन सुग्रीवास वर्दी दिली. ( कि० स० ३८–४७ ).

हनुमान्, अंगद वगैरे वीर दक्षिण दिशेकडे निघाले, ते प्रत्येक नद, नदी, पर्वत, वन, नगर, ग्राम पहात चालले. जातां जातां सर्व पृथ्वीचा दक्षिणभाग शोधून ते थकले. कोठेंही सीतेचा किंवा रावणाचा पत्ता लागेना. त्यांनीं विंध्य पर्वताच्या सर्व शाखा शोधून पालथ्या घातल्या, पण सीता सांपडेना. जातां जातां श्रांत होऊन एके ठिकाणीं तहानेने ते अगदीं व्याकुळ झाले; तों एक विस्तीर्ण भुयार त्यांच्या दृष्टीस पडलें. त्यातून हंस, सारस इत्यादि पक्षी पाण्यानें भिजलेले व स्वच्छ पंख झालेले

असे बाहेर आलेले पाहून त्यांना आश्चर्य वाटलें; आणि या बिळांत बहुधा पाणी असेल या कल्पनेनें ते सर्व त्या बिळांत शिरले; तेथें चोहोंकडे अंधार होता, कोणास कांहीं दिसेना. तसेंच धैर्य धरून पुढें चालले; इतक्यांत त्यांस प्रकाश दिसूं लागला व एक सुंदर उपवन त्यांच्या दृष्टीस पडलें. उत्तम उत्तम प्रकारचीं फळें व फुलें लागलेले वृक्ष त्या उपवनाला शोभा देत होते. त्या उपवनांत जागजागीं लहानमोठीं तळीं सुवर्णकमलांनीं भरलेलीं व सुवर्णाच्या पायऱ्यांनीं चारी बाजूंनीं बांधून काढलेलीं दृष्टीस पडलीं. पुढें पाहतात तों मोठमोठाले सोन्याचे वृक्ष दिसूं लागले. पाण्यांतील मासेहीं सुवर्णाचे ! याप्रमाणें जिकडे तिकडे दैदीप्यमान प्रभा पाहून व विस्मित होऊन या उपवनाचा मालक कोण आहे, त्याचा शोध करूं लागले. तों एक तापसवेष धारण करणारी स्त्री त्यांच्यासमोर आसनावर बसलेली दिसली. तिला पाहतांच सर्वांनीं तिला साष्टांग नमस्कार घातले, आणि पाणी पिण्याविषयीं तिची परवानगी मागितली. तिनें त्याचा मोठ्या प्रेमानें सत्कार केला, व त्यांस फळेही खावयास दिलीं. मग तिनें विचारिल्यावरून त्यांनीं आपली सर्व हकीकत तिला सांगितली व म्हटलें, "या बिळांत शिरल्यापासून किती दिवस गेले याचा आम्हांस अंदाज नाहीं, यामुळें एक महिन्याची मर्यादा उलटून गेली असल्यास कदाचित् आम्ही राजाचे अपराधी झालों असूं. ह्या बिळातून तूं आम्हांला बाहेर पोंचीव. तुझ्याशिवाय हे काम होणार नाहीं. तसेंच तूं कोण आहेस ? हें उपवन कोणाचे आहे? हें आम्हांस सांग. आम्ही तुला शरण आलों आहों." हें त्याचें भाषण ऐकून ती तापसी म्हणाली:—

"हें दिव्य उपवन मयासुरानें उत्पन्न केलें आहे. येथें तो हेमा नांवाच्या अप्सरेसह रहात असे. इंद्रानें त्याला वज्रानें ठार मारलें, तेव्हांपासून हें उपवन ब्रह्मदेवानें मला दिले आहे. मी मेरुसावर्णीची मुलगी आहें. मी येथें तपश्चर्या करून राहत्यें. तुम्हाला या बिळाच्या बाहेर पडावयाची त्वरा असल्यास डोळे मिटा. मी तुम्हांस बाहेर नेऊन पोंचवित्यें." असें म्हणतांच त्या वानरांनीं डोळे मिटले; तेव्हां त्या तापसीनें त्यांस एकदम त्या भुयाराचे बाहेर नेऊन ठेविलें ! विंध्यपर्वताच्या एका टेकडीवर त्यांना ठेवून तिनें त्यांस डोळे उघडण्यास सांगितले आणि ती म्हणाली, "हा पहा, विंध्यपर्वत, ह्या बाजूला हा प्रस्रवण पर्वत दिसतो आहे, आणि हा तुमच्या समोर समुद्र आहे; आतां मी जात्यें." असें म्हणून ती तापसी आपल्या भुया-

रांत निघून गेली. ती गेल्यावर वानर त्या विंध्यपर्वताच्या टेकडीवर बसून चोहोंकडे पाहूं लागले, तों समोर अफाट व उंच उंच लाटांनीं गर्जना करणारा असा समुद्र त्यांस दिसला. त्यांनीं डोंगरावर वसंत ऋतूंत फुलणाऱ्या नाना प्रकारच्या वेली पाहिल्या, तेव्हां त्यांस मोठी भीति उत्पन्न झाली. अंगद मोठ्या दुःखानें म्हणालाः—" अरे, आम्ही आश्विन महिन्यानंतर थोड्याच दिवसांनीं निघालों, आणि एक महिन्याचा वायदा केला; आतां तर वसंताचीं चिन्हें दिसत आहेत. भुयारांत आपलें किती दिवस गेले, याचें आपल्यास भान नाहीं. सीतेचा अद्याप ठिकाणा नाहीं. हा समुद्र पुढें अपार पसरला आहे. आतां परत जावें यापेक्षां येथें मरणें बरें. सुग्रीवाचा कोप मोठा तीव्र आहे. तो आज्ञा मोडल्याबद्दल आपल्याला देहान्तशासन दिल्यावांचून राहणार नाहीं. सीतेची खबर न आणतां आपण परत गेलों तर रामसुद्धां आपली कींव करणार नाहीं. तर मला असें वाटतें कीं, येथेंच प्रायोपवेशन करून प्राण द्यावा." असें म्हणून अंगदानें दर्भ टाकून प्रायोपवेशनानें म्हणजे श्वास कोंडून प्राण देण्याच्या इराद्यानें त्यांजवर बसून जमिनीला तोंड लावलें; त्याची ती दीन दशा पाहून इतर वानरही त्याचप्रमाणें प्रायोपवेशनाचा निश्चय करून निश्चल बसले. ते शेंकडों वानर ओळीनें निश्चल बसलेले पाहून एक मोठा गृध्र त्या पर्वतावर रहात होता तो हळूहळू त्यांच्याजवळ आला; आणि आपल्याशींच म्हणूं लागलाः—" परमेश्वरानें आयतीच माझ्या क्षुधेची तरतूद करून ठेविली आहे. हे वानर मेले म्हणजे यांचें मांस मी आनंदानें खाईन." हे घोर शब्द ऐकून अंगद हनुमानास म्हणालाः—" जटायूसारखे गृध्र सीतेकरतां प्राणसुद्धां देण्यास तयार झाले, आणि हा गिधाड आपण सीतेकरितां मरत आहोंत त्या आमच्या मरणाची वाट पहात उभा आहे." जटायूचें नांव ऐकतांच त्या गृध्राची चमत्कारिक स्थिति झाली. तो म्हणालाः—" हे वानरांनो, जटायु माझा सख्खा भाऊ होता. माझें नांव संपाति. जटायु कसा व कां मेला, त्याची मला समग्र हकीकत सांगा. तो मरण पावला हें ऐकून मी फार कष्टी झालों आहें. तुम्ही सीतेकरितां मरणार असाल तर मरूं नका. मी तुम्हांस सीता कोठें आहे तें सांगतों. मला सीता येथून दिसते आहे. आम्हां गृध्रांस परमेश्वरानें फार दीर्घ दृष्टि दिली आहे. समुद्राच्या पार रावणाच्या लंकेंत अशोकवनांत सीता राक्षसिणींच्या पहाऱ्यांत असलेली मला दिसते आहे." हे शब्द ऐकतांच ते

सर्व वानर एकदम आनंदानें उड्या मारूं लागले; व त्या गृध्राच्या भोंवतीं जमून त्यांनीं त्याला राम, लक्ष्मण व सीता यांची सर्व हकीकत सांगितली. शेवटीं त्यांनीं त्यास विचारिलें, " तूं येथें कसा आलास ? रावणाची तुला माहिती आहे काय ? तूं सीतेला नेतांना पाहिलेंस काय ? " तेव्हां संपाति म्हणालाः—" मी व जटायु या दोघां बंधूंनीं आपल्या वेगाच्या आणि शक्तीच्या गर्वानें एकदां सूर्याबरोबर हिमालयावरून आकाशांत उड्डाण केलें. ते वेळेस माझा धाकटा भाऊ जटायु सूर्याजवळ आल्यानें घाबरूं लागला. तेव्हां मीं त्याला आपल्या पंखाखालीं घेतलें. परंतु कांहीं वेळानें माझे पंख जळून जाऊन मी येथें या विंध्यपर्वतावर पडलों. जटायु पूर्वीच जनस्थानांत पडला होता. मला मुळींच उडतां येईना, तेव्हां मी क्षुधेच्या वेदनेनें अगदीं दीन होऊन प्राण देण्याचा बेत केला. इतक्यांत एक ऋषि मला भेटले. त्यांनीं मजकडे दयार्द्र दृष्टीनें पाहून माझी सर्व हकीकत विचारली तेव्हां मीं त्यांस ती सांगितली; नंतर ते ऋषि मला म्हणालेः—' संपाति, तूं जिव देऊं नको; ज्यावेळेस रामाचें कार्य करशील, तेव्हां तुला पख पुन्हां फुटतील. तोंपर्यंत तूं जीव धरून ऐस तुझा चरितार्थ कोणत्याना कोणत्या तरी प्रकारानें होईल.'' तेव्हांपासून मी या विंध्यपर्वतावर त्या ऋषींच्या वचनाची आठवण करीत राहिलों आहें. मला माझा पुत्र खायला आणून देत असतो. याप्रमाणें मी आजतागाईत येथें त्या प्रसंगाची वाट पहात आहे. रावणाला सीता नेतांना मीं पाहिलें. "रामा, रामा," म्हणून मोठ्यानें ती आक्रोश करीत होती. या समुद्रापलीकडे शंभर योजनें दूर लंका नांवाचें द्वीप आहे. तेथें रावण राज्य करीत आहे. त्याच्या अंतःपुरांत सीता मला दिसते आहे. तर तुम्ही प्रयत्न करा आणि समुद्राचें उल्लंघन करून सीतेचा शोध करा. " असें म्हणतां म्हणतां संपातीला पंख फुटले. तेव्हां तो आनंदानें म्हणालाः—" दाशरथी रामाच्या कार्याला मदत केल्यावर मला पंख येतील म्हणोन ऋषींनीं सांगितल्याप्रमाणें मला हे पंख फुटले आहेत. तेव्हां मी सांगतों याजवर तुम्ही भरंवसा ठेवून सीतेचा शोध लावून मग परत जा. येथें प्राण देऊं नका. " याप्रमाणें त्या वानरांस आश्वासन देऊन आपणास उडण्याचें सामर्थ्य आलें आहे किंवा नाहीं हें पाहण्याकरितां तो तेथून उडून पर्वताच्या एका शृंगावर जाऊन बसला. ( कि० स० ४८–५२ ).

संपातीच्या आश्वासनानें रावणाचे अन्तःपुरांत सीता आहे याजविषयीं

खात्री पटून सर्व वानर आनंदानें सिंहासारख्या उड्या मारीत, समुद्रकिनाऱ्यावर आले. पण समुद्राचें ते भयंकर व अपार स्वरूप पाहून ते पुनः निराश झाले. कांहीं ठिकाणीं शांत, तर कांहीं ठिकाणीं पर्वतप्राय लाटा उसळत आहेत, याप्रमाणें भयंकर स्वरूपाचा, नक्र—सर्प—दानवादिकांनीं भरलेला व आकाशासारखा अनंत दिसणारा तो महासागर पाहून, आता काय करावें, हा विचार करण्याकरिता सर्व वानर अंगदाभोंवतीं जमा झाले. अंगदानें त्याचें समाधान करून हताश होण्यानें मनुष्य निरुत्साही व निर्वीर्य होतो; याकरितां, विषाद टाकून देऊन कोणास किती योजनें उड्डाण करण्याची शक्ति आहे, म्हणोन प्रश्न केला. गज, गवाक्ष, गवय, शरभ, गंधमादन, मैन्द, द्विविद, सुषेण, जांबवान्, हनुमान्, इतके वानरसरदार अंगदाभोंवतीं बसले होते. गजानें दहा योजनें उडण्याची आपली शक्ति आहे, म्हणोन सांगितलें. गवाक्षानें वीस, गवयानें तीस, शरभानें चाळीस, गंधमादनानें पन्नास, मैन्दानें साठ, द्विविदानें सत्तर, सुषेणानें ऐंशी, याप्रमाणें जबाब दिले. जांबवान् म्हणालाः-" मी आतां म्हातारा झालों आहें. ज्या वेळेस बलीच्या येथें यज्ञ झाला व वामनानें त्रिविक्रमरूप धारण केलें त्या वेळेस मीं त्याला प्रदक्षिणा घातली होती. पण आतां मीं वृद्ध झाल्यानें माझ्या ताकतीचा मला अंदाज नाहीं, तरी पण नव्वद योजनें मी उडून जाईन." अंगद म्हणालाः—"तुम्हीं भिऊं नका. शंभर योजनें समुद्र ओलांडून मीं जातो, आणि सीतेची खबर आणतों." तेव्हां जांबवान् म्हणालाः—" आमचा अधिपति अंगद यास विरेस घालणें योग्य नाहीं. सेनेच्या नायकास कलत्राप्रमाणें सांभाळलें पाहिजे. अद्याप आमचा सर्वांचा अग्रणी वीर हनुमान् हा कांहींच बोलत नाहीं. हनुमानाची शक्ति विलक्षण आहे. तो आम्हास या संकटांतून पार पाडील. तो आम्हांस सुग्रीवाच्या तडाक्यातून वाचवील. आमच्या बायकापोरांची भेट तो आम्हास करून देईल. आम्हास कृतार्थ करून रामलक्ष्मणांच्या दर्शनास घेऊन जाईल. हनुमानाचें सामर्थ्य समुद्राहूनही अपरंपार आहे. मी हनुमानाची प्रार्थना करून त्याजकडून हें कार्य करवितों." असें म्हणोन जांबवान् हनुमानाकडे वळला. हनुमान् एका बाजूला बसला होता. त्याचा स्वभाव असा असे कीं, आपण होऊन आपली तारीफ करावयाची नाहीं; परंतु दुसऱ्यानें त्याची प्रशंसा केली असतां तो आनंदित होऊन कार्यभार उचलण्यास तयार व्हावयाचाच. जांबवानास

त्याचा स्वभाव ठाऊक होता. तो म्हणालाः–"हे वीरवानरा हनुमाना, तूं सर्व शास्त्र जाणणारांमध्यें श्रेष्ठ आहेस. तूं एका बाजूला मौन धारण करून बसला आहेस हें ठीक नाहीं. तूं आपला पराक्रम आपल्या तोंडानें सांगणार नाहींस, हें मला ठाऊक आहे. पण हनुमाना, तूं वानरांचा राजा सुग्रीव याच्या बरोबरीचा वीर आहेस. किंबहुना तुझा पराक्रम रामलक्ष्मणांप्रमाणें आहे. अरिष्टनेमीचा पुत्र गरुड आकाशांतून समुद्रांत बुडी मारून मोठ्या सर्पांना बाहेर काढतो, त्या गरुडाच्या पंखांत जें बळ आहे तें तुझ्या भुजांमध्यें आहे. अरे, तुझी बुद्धि, तुझे बळ आणि तुझें तेज सर्व प्राणिमात्रांहून अधिक आहे. तूं पुढें कां होत नाहींत ? अप्सरांत श्रेष्ठ जी पुंजिकस्थला ती शापामुळें अंजनी नामक वानरी होऊन केसरीची बायको झाली. तिच्या पोटीं वायूपासून तूं उत्पन्न झाला आहेस. वायु अंजनीच्या रूपास मोहित होऊन तिला त्यानें मनांत आलिंगन दिलें. तेव्हा ती पतिव्रता त्याजवर संतापली. तेव्हां त्यानें तिचें सांत्वन करून म्हटलें कीं, ' मी तुझें पातिव्रत्य भंग करीत नाहीं. तथापि तुला माझ्यासारखा महान् पराक्रमी व तेजस्वी पुत्र होईल. ' त्याप्रमाणें तूं अंजनीच्या पोटीं सूर्योदयीं उत्पन्न झालास. तेव्हांच तूं सूर्य हें एक तांबडें फळ आहे असें समजून त्याजवर उडी टाकलीस तों तीनशें योजनें आकाशांत गेलास तरी तुला कांहीं झालें नाहीं ! इंद्रानें कोपानें तुझ्या तोंडावर वज्र मारिलें; यामुळें तुझी हनुवटी तुटली. तेव्हांपासून तुला हनुमान् म्हणतात. तुझ्यावर इंद्रानें प्रहार केलेला पाहून, वायूस कोप येऊन तो वाहत नाहींसा झाला; यामुळें सर्व लोक त्रस्त झाले तेव्हा ब्रह्मदेवानें तुला, कोणत्याही शस्त्रानें तूं वध्य नाहींस, असा वर दिला. इंद्रानेंही तूं स्वेच्छामरण आहेस, असा तुला वर दिला. असा तू महान् पराक्रमी वायूचा पुत्र असून वायूप्रमाणें बलवान् व वेगवान् आहेस. तूं आम्हांस या संकटांतून मुक्त कर. अरे, मी ज्या वेळेस तरुण होतों, तेव्हां त्रिविक्रम वामनाला मीं एकवीस वेळ प्रदक्षिणा घातली. परंतु मी वृद्ध झालों, म्हणून हा शतयोजन विस्तीर्ण समुद्र उल्लघून जाण्याची माझी शक्ति नाहीं. तूं तरुण आहेस, तुझ्यावर आतां हा भार येऊन पडला आहे; तर कपिश्रेष्ठा हनुमाना, ऊठ. आमचें सर्वांचें तारण कर, आणि त्रिविक्रम विष्णूप्रमाणें या वेळेस पराक्रम करून या समुद्राचें उल्लंघन कर. हे सर्व वानर तुझ्याकडे पहात आहेत. " असें जांबवान् स्तवन करीत असतां हनुमान् वाढूं लागला तो मोठ्यानें बुभुःकार

करून शेंपटी हापटूं लागला. जसा सिंह हत्तीला पाहून फुरफुरून फुगूं लागतो, याप्रमाणें मारुती आवेशानें वाढूं लागला तेव्हां ते सर्व वानर आनंदित होऊन त्याच्याकडे मोठ्या विस्मयानें पाहूं लागले. वृद्ध वानरांनीं स्तुति केल्यामुळें मारुतीचें तेज वाढत जाऊन त्याचें स्वरूप दर्शनीय झालें; व तो म्हणालाः—" मी शतयोजन विस्तीर्ण समुद्र उल्लंघून सीतेचा शोध लावून आणतों, तुम्ही भिऊं नका. मी सागरालासुद्धां पिऊन टाकीन, किंवा पर्वताला चूर्ण करीन. एका निमिषांत आकाशांत गरुडाप्रमाणें जाऊन सीतेचा शोध लावतों. माझी बुद्धि आणि मन मला सांगत आहे कीं, मला वैदेही सीता दृष्टीस पडेल. याकरितां तुम्ही घाबरूं नका. वाऱ्यासारखा किंवा गरुडासारखा वेग धारण करून शतयोजन समुद्र सहज उल्लंघून जाईन अशी माझी खात्री आहे. या उड्डाणाचा प्रहार सहन करण्यास हा पर्वत समर्थ आहे. या पर्वताग्रावर उभा राहून मी उडी घेतों. असें म्हणून मारुती एका पर्वताग्रावर गेला. सर्व वानर आनंदानें नाचत बागडत त्याच्या बरोबर गेले. त्याची स्तुति करून शेवटीं जांबवान् म्हणालाः—" हे केसरीच्या पुत्रा, हे मारुतात्मजा, तूं आपल्या सर्व ज्ञातिबांधवांचा शोक नाहींसा केला आहेस. तुझें आम्ही सर्वजण या वनस्पतींच्या फुलांनीं मंगल करितों; तुझ्यावर ऋषींची, सर्व वृद्ध कपींची व सर्व गुरुजनांची कृपा असो! त्यांच्या कृपेनें हें महत्कार्य करून तूं परत येशील. तूं परत येईपर्यंत आम्ही येथें एका पायावर उभे राहून तपश्चर्या करितों. आमचे सर्वांचे जीव तुझ्या येण्यावर अडकून राहतील. " असें म्हणतांच मारुतीला अधिकच आनंद झाला व त्यानें त्या पर्वताग्रावरून उडी मारण्याचा निश्चय केला. इतकेंच नव्हे तर त्याचें मन लागलीच लंकेंत सीतेच्या पायापाशीं जाऊनही पोंचलें.

(कि० स० ६४–६७)

# सुंदरकाण्ड

शतयोजन रुंदीचा समुद्र उल्लंघण्याचें महत्कर्म करण्याकरितां हनुमानानें कंबर बांधिली. मान आणि डोकें उंच करून त्यानें समुद्राकडे प्रथम अवलोकन केलें, नंतर पूर्वेकडे तोंड करून वायूला त्यानें नमस्कार केला, आणि दक्षिण दिशेकडे उड्डाण करण्याच्या इराद्यानें त्यानें आपलें शरीर वाढविण्यास आरंभ केला. सर्व वानर त्याच्याकडे टक लावून पाहूं लागले. ज्याप्रमाणें पर्वकाळीं समुद्र वाढूं लागतो, त्याप्रमाणें रामाच्या उत्तम सेवेचें पर्व साधण्याकरितां इतकें लांब उड्डाण करण्याच्या हेतूनें त्यानें आपला देह मोठा केला. नंतर उड्डाण करण्याच्या अवसानानें त्यानें आपल्या पर्वतप्राय शरीराच्या हातांनीं व पायांनीं पर्वतावर जोर दिला. त्याबरोबर तो एवढा मोठा डोंगर पण थरथर हालूं लागून त्यावरील सर्व झाडांवरचीं फुलें तुटून पडलीं. माती ढांसळून पर्वतावरील सोन्याचांदीचे, अंजनाचे व पत्थरांचे कडे दिसूं लागले. शिलाजितानें भरलेल्या विशाल शिला धडधड तुटून खालीं पडूं लागल्या. तो पर्वत एकदम हालूं लागल्यामुळें पर्वतावरील सर्व श्वापदें ओरडूं लागलीं. मोठमोठाले सर्प बिळांतून बाहेर पडून दहाच्या आंकड्यांनीं स्पष्टचिन्हित झालेल्या आपल्या फणा उभारून त्या त्वेषानें दगडावर हापटूं लागले, व तोंडांतून गरळ टाकूं लागले. हा पर्वत फुटत आहे कीं काय, अशा भीतीनें तपस्वी, मुनि, यक्ष, विद्याधर वगैरे देवयोनि लोक डोंगरावरून आकाशांत उडाले, व आकाशांतून त्या पर्वतप्राय झालेल्या मारुतीकडे मोठ्या विस्मयानें पाहूं लागले. मारुतीनें आपलें अंग हलवून केस पिंजारले व मेघगर्जनेसारखा मोठ्यानें बुभुःकार केला. मोठमोठ्या जाड व लांब सोटांसारखे आपले बाहु ताठ केले, मागचे पाय अगदीं पोटाशीं धरिले आणि मान ताठ करून सत्त्व व तेज यांचें स्फुरण केलें. आकाशांतील रस्त्याकडे नजर लाविली, हृदयांत क्षणभर दम कोंडून धरिला, कान समोर व संकुचित केले व पाय दाबून उड्डाणाची बैठक पक्की

केली; आणि "हे कपींनो, रामानें सोडलेल्या बाणाप्रमाणें मी सरळ लंकेला जातों," असें म्हणून पर्वतावर हातानें व पायानें थाप मारून एकदम उडी घेतली. त्या थापेबरोबर शेंकडों वृक्ष वेलींसह जमिनींतून उडून मारुतीबरोबर आकाशांत उसळले ! त्या पुष्पित वृक्षासहित मारुती उडाला तेव्हां असें वाटलें कीं, पर्वताला पंख फुटून पर्वतच उडाला कीं काय ! ते वृक्ष थोड-क्याच वेळानें खालीं समुद्रात पडले, त्या वेळेस मारुतीचें पर्वतप्राय शरीर आकाशांत जातांना स्पष्ट दिसूं लागलें. त्याचे बाहु पुढें पसरलेले असल्यामुळें पांच डोक्यांचे भयंकर सर्प त्या पर्वताबाहेर पडले आहेत कीं काय असें वाटूं लागलें. त्याचे लाल डोळे दुरून डोंगरावर वणवा पेटल्याप्रमाणें भासूं लागले. त्याचा मोठा थोरला लाल कटिपश्चाद्भाग डोंगराच्या तुटलेल्या तांबड्या कड्याप्रमाणें शोभूं लागला. लांब पसरलेली व लोंबत असलेली त्याची शेंपटी जणूं उचलून नेलेल्या सर्पाप्रमाणें दिसूं लागली. त्याच्या वेगानें उत्पन्न झाले-ल्या वाऱ्यानें ज्या ज्या समुद्राच्या प्रदेशावरून तो जाऊं लागला त्या त्या प्रदेशाचें पाणी एकदम बाजूला होऊन आंतील तिमि, नक्र, मासे, वगैरे उघडे पडूं लागले. त्याची दहा योजनें रुंद आणि तीस योजनें लांब अशी छाया समुद्राच्या पाण्यावरून धावूं लागली, तेव्हां तो एक विलक्षण देखावा दिसला. याप्रमाणें तें त्याचें अद्भुत कर्म पाहून देवदानवगंधर्वांनीं आका-शांतून त्याजवर पुष्पवृष्टि केली.

रामाच्या पूर्वजांनीं मला निर्माण केलें आहे; तेव्हां रामाच्या कार्याला आपणही मदत केली पाहिजे, व हें दुष्कर कर्म करणाऱ्या मारुतीला मध्यें विश्रांति दिली पाहिजे. असा विचार मनात आणून समुद्रानें मैनाक पर्वत आपल्या पोटात लपला होता, त्याला बाहेर पडण्याविषयीं विनंति केली. तेव्हां एकाएकीं समुद्रामधून मैनाक पर्वत बाहेर आला. परंतु हें एक मध्यंतरीं विघ्न आलें असें मारुतीला वाटून त्यानें एक हाताची थाप मारून त्या पर्वताला खालीं टाकून तो हासतच पुढें निघून गेला. हें त्याचें दुसरें महत्कर्म पाहून देव, सिद्ध, महर्षि वगैरे सर्व चकित झाले. त्यांनीं सुरसा मातेला मारुतीचें बळ तरी किती आहे, याची परीक्षा घेण्याविषयीं विनंति केली. तेव्हा सुरसेनें एका भयंकर राक्षसाचें रूप धारण करून मारुतीच्या रस्त्यावर दशयोजनें रुंद 'आ' पसरून उभें राहून म्हटलें:—"मारुती, मी तुला निश्चयानें खाणार. माझ्या तोंडांत गेल्यावाचून कोणीही प्राणी सुटावयाचा नाहीं, असा मला वर

आहे.'' हें दुसरें अरिष्ट उत्पन्न झालेलें पाहून मारुतीनें आपलें रूप अधिक वाढविलें. सुरसेनेंही आपला 'आ' पंचवीस योजनें केला. तेव्हां मारुतीनें विचार केला कीं, हिच्याशीं शक्ति लढवून उपयोग नाहीं; बुद्धि लढविली पाहिजे. तेव्हां त्यानें आपलें रूप एकदम संकुचित करून एका अंगठ्याएवढें केलें आणि त्या राक्षसीच्या तोंडांत जाऊन तो पुन्हां बाहेर पडला आणि तिला आकाशांतून म्हणाला:—" हे माते, राक्षसिणी, तुझें म्हणणें मीं खरें केलें. तुझ्या तोंडात जाऊन बाहेर पडलों आहे. '' याप्रमाणें सुरसेच्या तडाक्यांतून सुटून मारुती पुढें निघाला, त्या वेळेस सुरासुरांनीं मारुतीच्या बुद्धिमत्तेची, बलाची व सत्त्वाची प्रशंसा केली. शेवटीं पलीकडचा किनारा मारुतीस दिसूं लागला. किनाऱ्यावरील झाडांची रांग व निरनिराळ्या नद्या, खाड्या व त्या समुद्राला येऊन मिळतात तीं त्यांचीं तोंडें पाहून मारुतीला अत्यानन्द झाला. नंतर माझें हें मोठें शरीर पाहून राक्षस भितील व सावधही होतील असा विचार करून त्यानें आपलें नेहमींचें रूप धारण केलें व तो लंबगिरीच्या एका सुंदर शृंगावर खालीं उतरला. ( सुं० सर्ग १. )

शतयोजन समुद्र उल्लंघन करून आलेल्या त्या महान् पराक्रमी वानरावर त्याच्या उतरण्याच्या आघातानें कंपित झालेल्या लंबगिरीवरील वृक्षांनीं पुष्पांचा वर्षाव केला. कोणत्याही प्रकारची ग्लानि अथवा श्रम त्याच्या मुखावर दिसत नव्हता, किंवा त्याला श्वास अथवा दमही लागला नव्हता. त्यानें प्रसन्न वदनानें चोहोंकडे दृष्टि फेंकली. तों त्रिकूट पर्वताच्या शिखरावर वसलेली सुवर्णाची लंका जणूं काय आकाशांत तरंगत आहे अशी त्याच्या दृष्टीस पडली. लागलींच त्यानें हिरवींगार मैदानें, नानाप्रकारच्या सुगंधांनीं भरलेलीं वनें व मधानें भरलेले डोंगरांचे कडे यांच्यामधून लंकेचा रस्ता आटोपण्यास प्रारंभ केला. पुष्पित वनराजी व वृक्षांनीं आच्छादलेले पर्वत मागें टाकून सुवर्णतटानें वेष्टिलेल्या लंकेपाशीं तो लवकरच येऊन पोंचला. शहरच्या बाहेर उत्तम उत्तम फुलझाडें, फळ-झाडें, विहिरी, तळीं इत्यादिकांनीं भरलेल्या बागा पाहून मारुतीस मोठा संतोष झाला. यानंतर राक्षसांच्या नगरात कसा प्रवेश करावा, याचा विचार मारुती करूं लागला. ज्यायोगें माझे कार्याची हानि होणार नाहीं, ज्यायोगें शतयोजन समुद्र उल्लंघून येण्याचे परिश्रम व्यर्थ जाणार नाहींत, ज्यायोगें रावणासारख्या बलाढ्य राक्षसाच्या तावडींत सांपडून सीतेचा शोध लावण्याचे कामास व्यत्यय येणार नाहीं, अशी युक्ति योजिली पाहिजे, असा बराच वेळ विचार

करून मारुतीनें लहान मांजराएवढें रूप धारण केलें आणि तशा स्वरूपानें नगरांत रात्र पडल्यावर प्रवेश करण्याचा त्यानें निश्चय केला. कृत्रिम रूप घेतलें तर राक्षस तेव्हांच आपल्यास ओळखतील, असें वाटून त्यानें लहान वानराचें रूप धारण करून संध्याकाळचा वेळ एका बागेंत घालविला. सूर्यास्त झाल्यानंतर मारुती निघाला. तो वृक्षांनीं भरलेलीं उपवनें ओलांडीत लंकेच्या सुवर्णतटाशीं येऊन पोंचला. उंच व मजबूत बांधलेल्या त्या तटाला लागून पाण्यानें भरलेला खंदक होता. त्यांत अनेक सुंदर कमळें, कांहीं फुललेलीं, कांहीं मुकुलित झालेलीं, दिसत होतीं. सीतेला आणल्यापासून रावणानें नगराच्या तटाचा बंदोबस्त फारच कडक ठेविला होता. तटावर थोडथोड्या अंतरानें बुरूज असून त्या बुरुजांवर व दरवाज्यावर बलाढ्य राक्षसांचा पाहरा रात्रंदिवस जय्यत उभा असे. त्या पाहरेकऱ्यांना न्याहाळीत व तटापलीकडील शहराची शोभा पाहात मारुती या वृक्षावरून त्या वृक्षावर हळूहळू जात चालला. शहराच्या आंतही रम्य उपवनें असून विपुल पाण्याच्या प्रवाहानें उचंबळलेली लंकानगरी फारच रमणीय दिसत होती. शरदृतूंतील मेघपंक्तीप्रमाणें पांढऱ्या रंगांचीं उंच उंच घरें एकाला एक लागून दिसत होतीं; समुद्रावरील स्वच्छ व थंड वारा सर्व शहरांत सारखा पसरत असून समुद्राचा घोषही मंद व मधुर ऐकूं येत होता. शहरांत ठिकठिकाणीं सुंदर दरवाजे बांधलेले असून त्याजवर तोरणें उभारलेलीं होतीं व एक एक, दोन दोन हत्ती दरवाज्यावर खोदलेले होते. तटाच्या बुरुजांवरही लहान घंटा बांधलेल्या पताका उडत होत्या. बहुतेक सर्व प्रासादाचे दरवाजे सोन्याचे असून त्यांच्या बाहेर वैडूर्य मण्याच्या बैठकी बांधलेल्या होत्या. आतल्या फरशा स्फटिकांच्या केलेल्या असून रत्नें व मोतीं यांनीं त्यांजवर चित्रविचित्र वेली काढलेल्या होत्या. प्रासादाचे जिने योग्य ठिकाणीं काढलेले असून ते वैडूर्याचे केलेले होते. स्फटिकाच्या जमिनी असल्यामुळें घरांत कोठेंही केरकचरा होण्याचा संभवच नव्हता. प्रत्येक प्रासादांत मोठमोठालीं भव्य व सुशोभित दालनें असून वर गच्च्या होत्या; व त्यांजवरून राजहंस, मयूर इत्यादि पक्ष्यांचे मनोरम शब्द ऐकूं येत होते. सारांश, सर्वप्रकारची मणिरत्नादि संपत्ति जेथे समुद्रजलाप्रमाणें अगाध एकवटली होती, अशी ती लंका नगरी पाहून मारुतीस विस्मय वाटला, व आपणासारख्याचाही प्रवेश या ठिकाणीं होणें किती कठीण आहे, हें त्याचे डोळ्यापुढें उभें राहिलें. याप्रमाणें शहराची शोभा

पाहात व तटावर उडी मारण्यास निर्भय जागा शोधीत जातां जातां एके ठिकाणीं, कोणी आपल्यास पहात नाहीं असें वाटून मारुतीनें तटावर उडी मारली. येथून आपण शहरांत बिनहरकत शिरलोंच असें त्यास वाटतें न वाटतें तों एक भयंकर राक्षसी त्याच्या समोर उभी राहिली, आणि 'तूं कोण आंत शिरतो आहेस' म्हणून त्यास दरडावून तिनें प्रश्न विचारला. 'रामाच्या आज्ञेनें सीतेचा शोध लावण्याकरितां व नगरी पाहण्याकरितां मी आंत जातों आहें,' असें मारुती बोलतांच तिनें त्यास एक चपराक लगावली. तेव्हां मारुतीनेंही आपला पराक्रम एका मुष्टिप्रहारानेंच तिला दाखविला, व तिला त्या मुष्टीनें जमीनदोस्त केलें. तेव्हां ती राक्षसी मारुतीच्या पायां पडून म्हणालीः—"बाबारे, तूं शहरांत खुशाल प्रवेश कर; मी खास लंकानगरी आहें. ब्रह्मदेवानें मला वर दिला, तेव्हां सांगितलें कीं, ज्या वेळेस एक वानर तुला जिंकील, त्या वेळेस राक्षसांचा नाश होऊन तूं उध्वस्त होशील. तो समय आज येऊन ठेपला आहे. सीतेच्या निमित्तानें रावणाच्या हातून राक्षसकुळाचा लवकरच विध्वंस होईल, असें आतां निश्चित दिसतें." असें म्हणून ती राक्षसी तेथेंच गुप्त झाली.

(सुं० स० २–३).

मारुतीनें अद्वारानें प्रवेश करून शहरांत उडी मारली, किंबहुना शत्रूच्या मस्तकावर पाय दिला; आणि एका उपवनांतून एका प्रासादाच्या शिखरावर चढून शहराच्या एका मोठ्या रस्त्यानें तो जाऊं लागला. हजारों राक्षस रस्त्यांतून जातां येतां त्याच्या दृष्टीस पडले. कोणी घोड्यावर, कोणी हत्तीवर, कोणी रथांत व कोणी पायीं जात होते. कोणी उत्तम पोषाख केलेले होते, कोणी जटा व रुद्राक्षांच्या माळा धारण केलेले होते, कोणी सुस्वरूप होते, कोणी कुरूप होते. कोणाच्या हातांत शस्त्रें होतीं, कोणाच्या हातांत कमंडलु होते. कोणी आपल्या प्रासादांत आनंदानें खेळत बसले होते. अशी लोकांची मौज पाहात पाहात मारुती वाड्यांच्या गच्च्यांवरून जाऊं लागला. रस्त्यांत जागजागीं गुल्म म्हणजे पोलिसांच्या चौक्या होत्या. तेथें सशस्त्र व बलाढ्य राक्षस पाहरा करीत होते. मोठमोठाल्या प्रासादांच्या आंत मारुतीनें सीतेकरितां प्रवेश करून पाहावें. राक्षसांच्या हजारों सुंदर व कुरूप स्त्रिया त्यानें निःशंक पण निष्पाप मनानें न्याहाळून पाहिल्या; परंतु त्याला अमुक सीता आहे, अशी कल्पनाच होईना. रावणाच्या प्रधानादिकांचे मोठ-

मोठाले वाडे व बगीचे पाहून मारुती थकला. मध्यरात्रीच्या सुमारास जिकडे तिकडे सामसूम झालें. इतक्यांत एक विस्तीर्ण मैदान त्यास लागलें. व पुढें मोठा टोलेजंग राजवाडा त्याचे नजरेस पडला. अर्धयोजन रुंद आणि एक योजन लांब अशा परिघाच्या आंत अनेक सुंदर प्रासाद त्याच्या दृष्टीस पडले. निधींचा अधिपति कुबेर याच्या भवनांत अथवा देवांचा राजा इंद्र याच्या प्रासादांत जी लक्ष्मी वास करिते ती रावणाच्या गृहांत सदोदित अखंड विराजमान होती. असो. त्या प्रासादांच्या मध्यभागीं एक उंच जागा होती. तेथें सर्व रत्नांनीं सुशोभित केलेलें पुष्पक विमान ठेवलेलें त्याचे नजरेस पडलें. हें विमान कुबेरानें मोठें तप करून ब्रह्मदेवापासून मिळविलें होतें व तें रावणानें कुबेराला जिंकून लंकेंत आणलें होतें. त्या विमानाचे सर्व खांब सोन्याचे असून त्या खांबाच्या बैठकी लांडग्याच्या तोंडाच्या आकृतीच्या होत्या. त्या विमानाचीं शिखरें मेरुमंदारासारखीं उंच, सुंदर व निरनिराळ्या तऱ्हेच्या कारागिरीचीं केलेलीं होतीं. खिडक्या जाळीदार असून स्फटिकाच्या केलेल्या होत्या. त्याची बैठक इंद्रनील मण्यांची होती. त्यांतील जमीन हिरे, मोत्यें, पोंवळीं, यांनीं चित्रित केलेली होती. त्याला रक्तचंदनाचे सुगंधि लांकूड, दरवाजे वगैरेकरितां जरूर त्या ठिकाणीं लाविलेलें असून त्याजवर सोन्याचें काम केलेलें होतें. अशा प्रकारचें तें दिव्य विमान त्या लहान मार्जाराएवढ्या वानरानें मोठ्या कौतुकानें न्याहाळून पाहिलें. त्याजवर चढून त्यानें चोहोंकडे दृष्टि फेंकली. तेव्हां राजवाड्याचा सर्व भाग त्याच्या नजरेस पडला. त्या राजवाड्याभोंवतीं चार चार दांतांचे बलाढ्य हत्ती बांधलेले होते. ठिकठिकाणीं राक्षसांच्या पहारेचौक्या बसल्या होत्या. राजवाड्याच्या हद्दींत अनेक मंदिरें एकाहून एक सुंदर होतीं. तेथें आकाशांत मध्यावर चंद्र नेहमीं प्रकाशमान होता. मणिरत्नादिकांचे केलेले अनेक सुंदर पक्षी व मृग ठिकठिकाणीं शोभेकरितां बसविले होते. मोठमोठाले राजमार्ग पुष्पांच्या उपहारांनीं सुशोभित केलेले होते. याप्रमाणें त्या राजवाड्याची सर्व शोभा पाहून मारुतीला अत्यंत आश्चर्य वाटलें. रावणाच्या अंतःपुरांतून मनाला आल्हाद देणारा सुगंध येत होता व तेथें सोन्याचे दिवे लखलख जळत होते. सीतेचा शोध बहुधा येथेंच लागेल असें वाटून मारुती प्रथम तिकडे वळला. उत्तम उत्तम भक्ष्यें व पानद्रव्यें सुवर्णपात्रांतून ठेविलेलीं पहिल्या दालनांत त्याच्या दृष्टीस पडलीं. तीं ओलांडून तो एका रत्नांच्या खांबांच्या दालनांत गेला. तेथें रत्नांच्या पायऱ्या

केलेले सोपान होते; सोन्याच्या कुसरीचें काम केलेल्या जाळीच्या खिडक्या होत्या; जमीन स्फटिकाची केलेली होती व मधून मधून हस्तिदंताचीं चित्रें काढलेलीं होतीं. त्या चित्रांतून मोत्यें, हिरे व सोने भरलेलें होतें मधून मधून स्वच्छ व उत्तम वस्त्रांनीं आच्छादिलेले पलंग ठेवले होते. व अगरुचंदनाच्या धूपानें सुवासिक केलेली हवा त्या दालनांत खेळत होती. सुवर्णाच्या दीपांच्या प्रभावान, मणिरत्नादिकांच्या तेजानें व रावणाच्या प्रतापानें तें दालन जणूं काय प्रदीप्त झालें होतें. त्यांत रावणाच्या हजार स्त्रिया अस्ताव्यस्त निद्रिस्त पडलेल्या त्याच्या दृष्टीस पडल्या. नानाप्रकारच्या अलंकारांनीं भूषित झालेल्या, नानाप्रकारच्या वेषांच्या व नानाप्रकारच्या सौंदर्यानें मन मोहित करून टाकणाऱ्या, नानादेशांतून व लोकांतून आणलेल्या त्या निद्रावश झालेल्या स्त्रिया मारुतीनें न्याहाळून पाहिल्या. परंतु त्यांत सीता अमुक आहे, अशी त्यास शंकाही आली नाहीं. प्रफुल्लित पद्मांनीं भरलेल्या सरोवराप्रमाणें दिसणारें तें नारीसहस्र—मंडित दालन सोडून मारुती पुढें गेला. तों एक मोठें रत्नांचें शयनासन त्याच्या दृष्टीस पडलें. त्या पर्यंकाची शोभा, हस्तिदंत, सुवर्ण, हिरे, व मोत्यें यांचें अनुपम कारागिरीचें काम त्यावर केलेलें असल्यामुळें, दिव्य दिसत होती. एका बाजूला त्यावर पांढरें, रेशमी, मोत्यांच्या झालरीनें शोभणारें छत्र, पूर्ण चंद्राप्रमाणें प्रकाशमान होतें. त्या शयनावर कृष्णमेघाप्रमाणें प्रचंड, कानांत उज्ज्वल कुंडलें धारण केलेला, पांढरें वस्त्र परिधान केलेला, सुगंधि रक्तचंदनानें चर्चित झालेला व त्यामुळें संध्याकाळच्या प्रकाशानें कांहींसा आरक्त झालेला व मधून मधून विद्युत् पाजळणारा काळा मेघ जसा दिसतो, त्याप्रमाणें सुंदर पण भयंकर दिसणारा रावण त्याच्या दृष्टीस पडला. तेथून जवळच एका उंच वेदिकेवर चढून तो लहानसा वानर रावणास न्याहाळून पाहूं लागला. त्याच्या प्रचंड व पीळदार बाहूंवर सुवर्णाचीं अंगदें चढविलेलीं होतीं. त्याच्या पुष्ट खांद्यांवर ऐरावताशीं झगडतांना त्यांच्या दांतांनीं झालेल्या जखमांच्या खुणा स्पष्ट दिसत होत्या. त्याच्या डोक्यावरून किंचित् बाजूला सरलेला त्याचा रत्नजडित मुकुट, तोंडाला फारच शोभा देत होता. त्याच्या रुंद व मजबूत छातीवर एक मोत्यांचा हार रुळत होता. त्याच्या नाकांतून श्वासोच्छ्वास जोरानें बाहेर पडत होता. त्याला सुगंधित मद्याचा वास येत होता. याप्रमाणें त्या रावणाचें समग्र स्वरूप मारुतीनें कांहींसें भीतीनें व कांहींसें आश्चर्यानें पूर्ण अवलोकन केल्यावर त्यानें आजूबाजूस दृष्टि फेंकली. तों रावणाच्या आणखी दहापांच लाव-

ण्यशाली स्त्रिया मारुतीच्या दृष्टीस पडल्या. त्यांत एका बाजूस महामौल्यवान् पलंगावर निजलेली एक अत्यंत रूपवती स्त्री त्यानें पाहिली. त्या कनकगौर रूपवती मंदोदरीस पाहतांच मारुतीच्या मनांत कल्पना आली कीं, हीच सीता असावी. त्या कल्पनेबरोबर त्याजला जो आनंद झाला, तो त्याच्यानें दाबून टाकवेना. वानरस्वभावास अनुसरून त्यानें आपल्या लहान पुच्छाचें पुन:पुन: चुंबन घेतलें. त्यानें कनकस्तंभावरून खालीं उडी मारली व तो पुन्हां कनकस्तंभावर चढला व त्यानें तोंडानें चीत्कार कित्येकदां केला.इकडे जा, तिकडे जा, त्या निजलेल्या स्त्रियेकडे पाहून पुन:पुन: पुच्छ जमिनीवर हापट, याप्रमाणें आनंदाच्या भरांत मारुतीचें भान क्षणभर नाहींसें झालें. परंतु मारुतीसारखा शहाणा मारुतीच होता.त्यानें थोड्या वेळानेंच आपल्या या झालेल्या कल्पनेस फांटा दिला. रामाशीं वियोग पावलेली सीता कोणत्याही प्रकारचे भोग भोगणार नाहीं,अंगावर अलंकार घालणार नाहीं, मधुपान करणार नाहीं, किंबहुना शोकानें झोंपसुद्धां घेणार नाहीं; आणि ही निजलेली स्त्री तर आनंदांत दिसते. हिनें व्यक्त मधुपान केलेलें आहे, व अंगावर अलंकार घातलेले आहेत; अर्थात् ही सीता नव्हे, ही रावणाची पट्टराणी असावी; असा तर्क करून तो मोठ्या दुःखानें व वेगानें त्या अंत:-पुरांतून बाहेर पडला. बाहेर पडतांना निद्रिस्त झालेल्या परदारांचें मीं अवलोकन केलें हें पातक तर केलें नाहींना, अशी त्यास शंका आली.परंतु माझें मन निश्चल व निष्पाप आहे, सीतेच्या शोधासाठींच रावणाच्या अंत:पुरांत मीं प्रवेश केला, इतर कारणासाठीं केला नाहीं, असा आपल्याशीं विचार करून आलेल्या शंकेचें त्यानें स्वत:च्या मनाशीं निराकरण केलें.

( सुं० स० ५–११. )

रावणाच्या अंत:पुरांतून बाहेर पडल्यावर मारुतीनें राजवाड्यांतील विस्तीर्ण बागा शोधून पाहिल्या; परंतु त्यास सीता सांपडली नाहीं. राजवाड्याची सर्व जागा शोधल्यावर सीता सांपडेना, तेव्हां त्यास मोठें दुःख झालें. समुद्र उल्लंघन केल्याचा सर्व प्रयत्न व्यर्थ गेला कीं काय, असें वाटूं लागलें. रावणाच्या त्रासानें सीता मरून तर गेली नाहींना ! कदाचित् त्याच्या मनाप्रमाणें न वागल्यामुळें त्यानें क्रोधानें तिचा वध तर केला नसेल ना ! कदाचित् रावणानें अन्यस्थलीं तिला नेऊन छपवून ठेविलें नाहींना ! इत्यादि अनेक तरंग त्याच्या मनांत उठले. संपातीच्या वचनाची त्यास

आठवण होऊन, ‘ मला लंकेंत सीता येथून दिसत आहे ’ हें त्याचें वचन निःसंशय खरें असलें पाहिजे, असा पुन्हां विचार करून आणि ‘ प्रयत्नांतीं परमेश्वर ’ या वाक्यावर भरंवसा ठेवून त्यानें राहिलींसाहिलीं सर्व ठिकाणें शोधिलीं. शेवटीं त्यास एक अशोकवन लागलें, यांत बहुधा सीता सांपडेल, असें वाटून मोठ्या उत्सुकतेनें त्यानें रामाला व सर्व देवांना नमस्कार केला; व धनुष्यापासून बाण सुटतो त्याप्रमाणें ताडकन् त्या अशोकवनाच्या प्राकारावर त्यानें उडी मारिली. आंत पाहतो तों निरनिराळ्या अनेक जातींचे वृक्ष त्याच्या दृष्टीस पडले. तो झाडांवरून उड्या मारीत गेल्यामुळें त्या वृक्षांवर सुखानें निजलेले पक्षी जागे झाले. त्या पक्ष्यांच्या हालचालीनें व मारुतीच्या उड्डाणानें झाडांचीं निरनिराळ्या रंगांचीं हजारों फुलें खालीं पडूं लागलीं व ही एक पुष्पवृष्टिच होत आहे कीं काय, असा भास झाला. त्या वनात ठिकठिकाणीं चांदी-सोन्याची व रत्नाची केलेली फरशी त्याच्या दृष्टीस पडली. उत्तम सुगंधिजलानें भरलेल्या नाना आकाराच्या वापी त्यानें पाहिल्या. त्यांना चारी बाजूंनीं उतरण्यास मौल्यवान् रत्नांच्या पायऱ्या केलेल्या होत्या. त्यांची वाळू मुक्ताप्रवाळांची होती. पाण्याखालील फरशी स्फटिकाची केलेली होती, व त्यांच्या कांठांवर चित्रविचित्र सोन्याचे कृत्रिम वृक्ष लाविले होते. अशा दिव्य वापी पहात पहात एका कृत्रिम पहाडापाशीं तो आला. त्याजला कित्येक उंच शिखरें होतीं. त्यांत त्या पहाडावरून एक नदी खालीं पडत होती; तिच्या कांठचे वृक्ष इतके लवले होते कीं, त्यांच्या कांहीं फांद्या पाण्यापर्यंत पोहोंचल्या होत्या. बंधुजन निवारण करीत असतांही जशी एखादी स्त्री क्रोधानें प्राण देण्याकरितां कड्यावरून पडावी, त्याप्रमाणें ती नदी त्या वृक्षामुळें दिसत होती. नदीच्या बाजूला लतामंडप असून ते पानांनीं अगदीं झांकलेले होते. तेथें एके ठिकाणीं कांचनाचा एक उंच शिंशपावृक्ष होता. त्या वृक्षावर मारुतीनें चढून पाहिलें तों चोहोंकडे कांचनमय वृक्ष असल्याकारणानें त्यांच्या प्रभेनें मारुतीला आपलें शरीरही पिवळें कांचनमय भासूं लागलें. पर्वताची शोभा सीतेला प्रिय आहे, सीता बहुतकरून प्रातःकाळीं या नदीवर स्नानसंध्यादि-कर्मासाठीं येईल, तर आपण येथेंच बसून राहूं, असा विचार करून त्या शिंशपावृक्षावर पर्णपुष्पांनीं आपल्यास आच्छादित करून घेऊन मारुतीनें बैठक मारिली, व तेथून चोहींकडे तो बारकाईनें पुनः न्याहाळूं लागला. तों अनेक अशोकवृक्षांनीं वेष्टिलेली एक

रत्नस्तंभाची शाला त्याच्या दृष्टीस पडली;व तेथें भयंकर राक्षसिणींनीं घेरून टाकिलेली,एक पीत,मलिन वस्त्र परिधान केलेली, उपवासानें कृश झालेली, वारंवार सुस्कारे टाकणारी, शुक्लपक्षाच्या चंद्ररेखेप्रमाणें कृशतेनें शोभणारी अलंकाररहित, डोळ्यांतून सारखे अश्रू टाकणारी, प्रियजन समोर न दिसतां उलट नेहमीं भयंकर राक्षसिणी डोळ्यापुढें असल्यामुळें व्याघ्रापुढें बांधलेल्या मृगीप्रमाणें अत्यंत त्रस्त झालेली, काळीभोर वेणी मागें सुटलेली, नुसत्या जमिनीवर बसलेली अशी राममहिषी सीता त्याच्या दृष्टीस पडली! तिचे सुंदर व विशाल डोळे, कनकासारखी अप्रतिम कांति व पूर्णचंद्रासारखें मुख, तिचा बारीक कंठ, व सरळ नासिका,इत्यादि सौंदर्याचीं लक्षणें पाहून हीच सीता असावी, असा त्यानें तर्क केला. " अरे, हीच ती सीता, जिच्या-करितां राम सारखा शोक करीत आहे. रामाचें रूप जसें अप्रतिम आहे तसें हिचेंही आहे. त्याची हिजवर जशी प्रीति आहे तशी हिचीही त्याजवर दिसते. खरोखर सीतेविरहित राम आपला जीव धारण करून आहे, हेंच आश्चर्य आहे. कारण असें स्त्रीरत्न सर्व पृथ्वीतलावर दुर्मिळ आहे."इत्यादि विचार करीत मारुती मनानें रामाचा स्तव करूं लागला. इतक्यांत कुमुद-खण्डासारखा चंद्राचा शुभ्र खंड क्षितिजावर आला; तेव्हां जणूं काय हंस निळ्याभोर पाण्यांत पोहण्यास शिरतो आहे, असा भास झाला. हळुहळू चंद्राचे स्वच्छ किरण मारुतीला मदत करण्याकरितां चोहोंकडे पसरले. त्या किरणांनीं तर सीतेचें स्वरूप मारुतीला अधिकच स्पष्ट दिसूं लागलें. दुःख-भरानें शोकसमुद्रांत बुडते आहे कीं काय,अशाप्रमाणें तिचें तें खिन्न स्वरूप पाहून मारुतीला हर्ष आणि शोक एकदम झाले, व त्याच्या डोळ्यांतून खळखळ पाणी वाहूं लागलें. ते हर्षाचे अश्रु होते किंवा दुःखाचे होते हें सांगतां येईना. तिच्याभोंवतीं असलेल्या राक्षसिणींचीं स्वरूपेंही चंद्रप्रकाशानें सीतेप्रमाणें अधिक स्पष्ट दिसूं लागलीं. तीं पाहून तर मारुतीचें दुःख दुणावलें. कोणाला एकच डोळा, कोणाला कान मुळींच नाहींत, कोणाचे कान सुपाएवढे,कोणाचें डोकें अति मोठें, कोणाची मान अति जाड व अति लांब, कोणाचें पोट जमिनीवर लोंबतें आहे, कोणाचे ओठ अति लांब, कोणाची हनुवटी लोंबकळते आहे, कोणी अति उंच, कोणी अति ऱ्हस्व, कोणी कुब्जा, कोणी एकपायाची, कोणी हत्तीच्या पायाची, कोणी गाढवा-सारख्या कानाची,कोणी गाईच्या,तर कोणी शेळीच्या व डुकराच्या तोंडाची,

कोणाचें नाक, कोणाचे कान, कोणाचें डोकें, कोणाचीं बोटें प्रमाणाबाहेर मोठीं,अशीं एक ना दोन अनेक प्रकारच्या भयंकर स्वरूपांच्या राक्षसिणी हातांत तीक्ष्ण शस्त्रें घेऊन तिच्याभोंवती बसल्या होत्या. त्यांना पाहून तर मारुतीला अतिशय वाईट वाटलें. ( सुं० स० १२–१७ ).

त्या किळसवाण्या राक्षसिणींवरून दृष्टि काढून, मारुती पुढें काय करावें याचा विचार करूं लागणार,इतक्यांत त्यास दूर मशालीच्या उजेड पडल्याचा भास झाला. तिकडे पाहतो तों कित्येक सुंदर स्त्रियांनीं हातांत सोन्याच्या दीपिका धरल्या आहेत,कित्येक हातांत पंखा घेऊन मधून चालणाऱ्या त्या भव्याकृतीस वारा घालीत आहेत,कित्येक थंड पाण्यानें भरलेल्या सुवर्णाच्या झाऱ्या घेऊन पुढें चालत आहेत,एका स्त्रीनें पांढरें शुभ्र छत्र त्याच्या डोकीवर मागून धरलें आहे, त्याच्या कित्येक अनुरक्त स्त्रिया त्याच्या मागें चालल्या आहेत, अशा थाटानें रावणाची स्वारी इकडेसच येत आहे,असें मारुतीच्या नजरेस पडलें. पहाटेच्या वेळेस जागा होऊन सीतेविषयीं कामानें संतप्त झालेला रावण तिला पाहण्याकरितां अशोकवनांत आला होता.त्याला पाहतांच झंझावातानें जशी एखादी कर्दळी कांपूं लागते, त्याप्रमाणें ती बिचारी सीता कांपूं लागली. तिनें पाय पोटाशीं घेतले आणि आपले हात मांडीबाहेरून बांधून घेतले ! याप्रमाणें पोटाशीं पाय घेऊन जमिनीवर राक्षसिणींच्यामध्यें बसलेली, धुळीनें सर्व अंग भरलेली, चिखलांत पडलेल्या कमलिनीप्रमाणें दिसणारी, अनाथ सीता पाहून रावणाला अधिकच मोह उत्पन्न झाला. सीता मात्र मनोरूप रथानें रामापाशीं तितक्यांतल्या तितक्यांत सहस्र वेळ जाऊन आली असेल! रामावर भक्तीनें परिपूर्ण प्रेम करणारी सीता आपल्या दुःखमय स्थितीचा अंतच दिसत नाहीं,असें वाटून रडूं लागली.पौर्णिमेच्या रात्रीं चंद्र ढगांनीं व्याप्त झाल्यामुळें चोहींकडे जसें निस्तेज होतें;किंवा एकादी सेना, नायक मेल्यामुळें शून्य भासूं लागते; किंवा एखाद्या नदीचें पाणी जसें प्रवाह तोडून बाहेर काढून दिल्यामुळें नदी शुष्क पडून रूक्ष दिसूं लागते; त्याचप्रमाणें पतिशोकानें व रावणाच्या भयानें क्षीण झालेली सीता अत्यंत अनुकंपनीय दिसूं लागली.ती तिची दुःखमय स्थिति लक्षांत आणून तिचें होईल तितकें दुःख कमी व्हावें,या हेतूनें रावणानें तिच्या समोर हळूंच येऊन मोठ्या गोड शब्दांनीं बोलण्यास प्रारंभ केला:—“ हे सुंदर स्त्रिये, मला पाहतांच भीतीनें व त्रासानें तूं आपल्या शरीराला संकुचित करून

पोटाशीं पाय आंखडून बसलीस, जणूं काय माझ्या दृष्टीस सुद्धां तूं पडूं नयेस असें तुला वाटतें. अशा प्रकारचा व्यर्थ त्रास तूं कां करून घेतेस ! मी तुझ्यावर अत्यंत प्रीति करतों. मी तुला दुःख देऊं इच्छित नाहीं. माझ्यापासून तुला कोणतीच भीति नाहीं. तुझ्या मनांत माझ्याविषयीं प्रीति नसेल तर मी तुला स्पर्शही करणार नाहीं. हे देवि, तूं येथें कोणत्याच प्रकारचें भय बाळगूं नकोस. माझें तुला येवढेंच सांगणें आहे कीं, तूं असा व्यर्थ शोक करूं नकोस. माझ्यावर विश्वास ठेव. तुझ्याइतकें सुंदर रूप परमेश्वरानें दुसरें निर्माण केलेंच नाहीं, असें मला वाटतें. सर्व पृथ्वी जिंकून तुझा बाप जो जनक राजा याला ती मी अर्पण करीन. माझ्यासारखा बलाढ्य राजा या जगांत दुसरा नाहीं. कोणी शत्रु माझ्यासमोर उभा राहील असें मला वाटत नाहीं. तर माझ्या सहवर्तमान सर्व त्रैलोक्याचें तूं राज्य कर, व यथेष्ट भोग्य वस्तूंचा उपभोग घे, वाटेल त्याला वाटेल तितकें द्रव्य किंवा पृथ्वीही दे. माझ्यावर विश्वास ठेवून, मला वाटेल तो हुकूम कर. अरण्यांत हांकलून दिलेला, राज्यापासून भ्रष्ट झालेला, तपस्व्याचें व्रत घेतलेला राम आतां जिवंत असेल कीं नसेल, याचीच शंका आहे आणि असला तरी माझ्या हातांतून तुला तो कधींही सोडवूं शकणार नाहीं." हें त्या भयंकर राक्षसाचें भाषण ऐकून बिचारी सीता अत्यंत दुःखानें व्याप्त होऊन डोळ्यांतून अश्रु गाळूं लागली. कांहीं वेळ विचार करून ती महापतिव्रता आपल्या समोर गवताची काडी धरून बोलूं लागली:—"रावणा, तूं परस्त्रीवर मन ठेविलें आहेस हें वाईट आहे. तें मन तेथून काढून तूं आपल्या स्त्रियांच्या ठिकाणीं लाव. जशा तुझ्या भार्या तुला रक्षण कराव्याशा वाटतात, त्याप्रमाणेंच दुसऱ्यांनाही आपल्या स्त्रिया रक्षण कराव्याशा वाटतात. **आपल्या मनाच्या स्थितीवरून दुसऱ्याच्या मनाचा विचार कर आणि आपल्या स्त्रियांच्या ठिकाणीं संतुष्ट रहा.** ज्याप्रमाणें पापी मनुष्यानें सिद्धीच्या प्राप्तीची आशा करणें व्यर्थ आहे, त्याचप्रमाणें तूंही माझी धरणें व्यर्थ आहे. हें माझें बोलणें तुला गोड लागणार नाहीं; पण तें तूं न मानलेंस तर सर्व राक्षसकुळाचा संहार होईल. राजा जर आत्मसंयमन सोडून अन्यायास प्रवृत्त होईल तर त्याजबरोबर त्याचें समृद्ध राष्ट्रही लयास जातें. मला वाटतें, तुझ्या एकट्याच्या अपराधामुळें ह्या रत्नांनीं भरलेल्या लंकानगरीचा लवकरच उच्छेद होणार आहे. धनाच्या किंवा ऐश्वर्याच्या लोभानें मोहून जाणारी

मी नव्हे. जशी सूर्याची प्रभा सूर्याला सोडून राहत नाहीं, त्याचप्रमाणें राघवावांचून मी दुसऱ्या ठिकाणीं राहणार नाहीं. तर रावणा, हेंच तुला कल्याणकर व युक्त आहे कीं, ह्या दुःखानें ग्रस्त झालेल्या अभागिनीला राघवाला नेऊन भेटव. रामचंद्र शरणागत-वत्सल आहे. त्याला तूं शरण जा. आणि प्रसन्न कर. जर तुला आपल्या जिवाची परवा असेल तर शुद्ध मन करून मला लवकर रामाकडे पोंचीव; नाहीं तर रामाच्या धनुष्याचा घोर शब्द लवकरच तुला ऐकूं येईल. रामलक्ष्मणाचे तीक्ष्ण बाण जळणाऱ्या तोंडाच्या सर्पाप्रमाणें या नगरीवर पडूं लागतील. हजारों, लाखों राक्षसांचे प्राण घेणारे रामाचे बाण ही सर्व नगरी दणाणून सोडतील. रामलक्ष्मणांच्या शून्य आश्रमांत शिरून राक्षसाधमा ! तूं मला जबरदस्तीनें घेऊन आलास ! जसा कुत्रा सिंहाचा वास आला म्हणजे त्याच्या समोर उभाही रहात नाहीं, त्याचप्रमाणें तूं लढाईच्या वेळेस त्यांच्या समोरही उभा राहणार नाहींस. तर वेळींच उमज आणि रामाला तूं शरण जा." हें सीतेचें कठोर भाषण ऐकून रावण क्रोधानें म्हणाला:—
"बायकांचा हा स्वभावच आहे कीं जसें जसें त्याचें सांत्वन करावें, तसतशा त्या अधिक डोक्यावर बसतात. जितकें आपण प्रिय बोलावें तितक्या त्या आपला अधिक अपमान करितात. तुझ्याविषयीं माझ्या मनात प्रीति नसती, तर या वेळच्या माझ्या क्रोधानें तुला ग्रासूनच टाकिलें असतें. कामाचा असा चमत्कारिक परिणाम आहे कीं, त्यामुळें काम्य वस्तूविषयीं स्नेह व प्रेम उत्पन्न होतें. तुला तुझ्या प्रत्येक शब्दाबद्दल वधच योग्य आहे. परंतु, तुझ्या प्रीतीमुळें मला ही शिक्षा तुला करवत नाहीं." असें म्हणून क्रोधानें डोळे लाल करून रावण पुनः म्हणाला:—"मैथिली, मीं तुला जी अवधि दिली आहे, तीस फक्त आतां दोनच महिने उरले आहेत. दोन महिन्यांत जर तूं मला वरिलें नाहींस, तर माझे आचारी तुझे तुकडे तुकडे करून तुझें मांस मला सकाळच्या न्याहारीस देतील; लक्षांत ठेव." तेव्हां सीता आपल्या पातिव्रत्याच्या आवेशानें त्यास म्हणाली:—"रावणा, तुझा कोणीच असा शाहणा आप्तसंबंधी नाहीं काय, कीं जो तुला या पापकृत्यापासून परावृत्त करण्याचा यत्न तरी करील! परमधर्मात्मा रामाच्या बायकोवर वांकडी नजर करणारा तुझ्याशिवाय या त्रिभुवनात दुसरा कोणी मूर्ख मनुष्य नाहीं. तेजस्वी रामाच्या भार्येस जो तूं असले पापी शब्द बोलतोस, तो तूं कोठें पळून त्याच्या तडाख्यांतून वांचशील !

राक्षसाधमा,माझ्याकडे तूं पापी भावानें पहात आहेस,तर तुझे हे क्रूर विकृत नेत्र जमिनीवर गळून कसे पडत नाहींत ! मी त्या धर्मात्म्याची बायको व दशरथाची सून आहें; मला हे असे शब्द बोलतांना तुझी जीभ कशा झडत नाहीं ! मी आपलें तप खर्चूं इच्छित नाहीं, आणि रामाची मला आज्ञाही नाहीं. नाहीं तर मी तुला कधींच भस्म करून टाकिलें असतें.तूं आपल्याला शूर म्हणवितोस, कुबेराचा भाऊ म्हणवितोस, लाखो सैन्याचें बल मजजवळ आहे, अशी फुशारकी मारतोस, मग रामाला फसवून हें परदारचौर्य तूं कसें केलेंस !'' हे कठोरतर शब्द ऐकून रावणाच्या पायांची आग मस्तकाला गेली, व तो सीतेकडे लाल डोळे फाडून पाहूं लागला.काळ्या पहाडासारखा प्रचंड दीप्त नेत्रांनीं भयंकर दिसणारा,मोठ्या जबड्याचा व भुजांचा तो राक्षस स्मशानात असणाऱ्या एकाद्या महान् वृक्षाप्रमाणे भयंकर दिसूं लागला; व क्रोधानें लाल झालेले डोळे वटारून तो सीतेला म्हणाला:–" त्या भिकारड्या रामावर लुब्ध होऊन जे हे कठोर शब्द तूं बोललीस,त्याचें तुला मी आतांच प्रायश्चित्त देतों.'' असे म्हणून त्या राक्षसिणींकडे वळून रावण म्हणाला:—" राक्षसिणींनो, हिला भेवडावून व दंड उगारून अशी जर्जर करा, कीं हिची मकडी वळून ही मला लौकर वश होईल.'' इतक्यांत धान्यमालिनी नांवाची रावणाची स्त्री रावणाला आलिंगन देऊन म्हणाली:—" प्रभो, महाराज, आपण सीतेच्या नादाला लागून व्यर्थ आपल्या मनाला त्रास करून घेत आहां. ही गरीब बिचारी पिकुटलेली मानुषी आहे, हिच्या कपाळीं ऐश्वर्य नाहीं. तुमच्या त्रैलोक्याधिपतीच्या भाग्याची वाटेकरीण होणें परमेश्वरानें हिच्या नशिबीं लिहिलें नाहीं.असल्या स्त्रीची कामना करण्यापासून संताप होतो. प्रीति करणाऱ्या स्त्रीवर काम ठेविला असतां आनंद होतो. तर हिला जाऊं द्या, आपण मजबरोबर क्रीडा करा. '' असे म्हणून रावणाचा हात धरून धान्यमालिनी त्याला तेथून घेऊन निघून गेली. ( सुं० स० १८—२२ ).

रावण अंतःपुरांत परत गेल्यावर सीतेभोंवतीं रक्षणास ठेवलेल्या त्या राक्षसिणींनीं एकदम तिच्यावर हल्ला करून तिला 'दे माय धरणी ठाय' करून सोडलें. कोणी दंड घेऊन धांवली, कोणी ' आ ' पसरून ' आतां खाऊन टाकत्यें,' असें ओरडत धांवली, कोणी म्हणाली:—"सर्व राक्षसांचा राजा रावण तुला बायको करीत असतां तूं त्याची कां बायको होत नाहींस ! '' दुसरी एक राक्षसीण क्रोधानें लाल झालेले डोळे वटारून

म्हणाली:—" हे अधमे, ज्याच्या आज्ञेंत सूर्यचंद्र सुद्धां चालतात, त्या रावणाची तूं कां बायको होत नाहींस ? तो आपल्या सहस्र बायका टाकून तुला पट्टराणी करितो आहे, तरी तुला एवढा गर्व कोठून आला ? " इत्यादि नानाप्रकारच्या भाषणें बोलून व भेवडावण्याची कृत्यें करून त्यांनीं सीतेला त्रस्त करून सोडलें. तेव्हां बिचारी सीता रडूं लागली; तिच्या डोळ्यांतून खळखळ पाणी पडूं लागलें. पण ती धैर्यानें त्यांना म्हणाली:—"राक्षसिणींनो, मला एकदांची खाऊन टाका; म्हणजे मी सुटल्यें. मी रामाला सोडून रावणाला कधींही वरणार नाहीं. राम जरी राज्यहीन असला, तरी तो माझा भर्ता आहे, आणि मजला गुरूप्रमाणें वंद्य आहे. सूर्याची पत्नी सुवर्चला किंवा इंद्राची शची अथवा वसिष्ठाची अरुंधती अथवा चंद्राची रोहिणी किंवा अगस्त्याची लोपामुद्रा अथवा च्यवनाची सुकन्या अथवा सत्यवानाची सावित्री किंवा कपिलाची श्रीमती किंवा नैषधाची दमयंती या जशा पतिव्रता व पतिपरायणा आहेत, तशी मी पतिपरायणा आहें. मी रामाशिवाय इतराला कधींही वरणार नाहीं. तुम्हीं मला खाल्लें तरी चालेल!" असे सीतेचें भाषण ऐकून त्या राक्षसिणी अधिकच चवताळल्या, आणि त्यांनीं तिच्याभोंवतीं अधिकच गलका मांडला. तेव्हां अत्यंत त्रस्त होऊन सीता तेथून उठून त्या शिंशपा वृक्षाखालीं येऊन उभी राहिली; त्या राक्षसिणीही तिच्याभोंवतीं येऊन उभ्या राहिल्या. तेव्हां विनता नांवाची एक भयंकर स्वरूपाची व जमिनीवर पोट लोळणारी राक्षसी तिला म्हणाली:—"सीते, पुरे झाला तुझा हट्ट! तूं आपले नवऱ्यावर प्रेम पुष्कळ दाखविलेंस, पण 'अति सर्वत्र वर्जयेत्.' कोणतीही गोष्ट अति केली म्हणजे दुःख होतें. तर माझी गोष्ट ऐक. राक्षसांचा राजा रावण याची तूं बायको हो. म्हणजे तूं सर्व जगताची मालकीण होशील. हें माझें म्हणणें तूं न ऐकशील तर मी आतांच तुला खाऊन टाकत्यें." अशा प्रकारें त्या सर्व राक्षसिणी तिला बोलूं लागल्या. कोणी म्हणूं लागल्या. 'रावणानें तुला आणिलें त्याच वेळेस तुझें हृदय खाण्याचा मीं निश्चय केला आहे. तूं जर रावणाचें न ऐकशील तर तुला मारून तुझें हृदय मी खाईन.' असें म्हणून तिनें आपल्या हातांतला त्रिशूल तिच्यापुढें केला ! त्याप्रमाणें त्यांनीं तिला बोलून बोलून खाल्लें; तेव्हां ती बिचारी सीता अशोकवृक्षाची एक खांदी हातांनीं पोटाशीं धरून अश्रुपूर्ण नयनांनीं 'हा रामा, हा लक्ष्मणा, हा कौसल्ये,' असा धांवा करूं लागली. तिचें सर्व शरीर थरथर कांपूं लागलें,

तेव्हां तिची पाठीवर पडलेली काळी वेणी कृष्णसर्पासारखी हालूं लागली. कोपानें आणि शोकानें आर्त होऊन ती म्हणाली:--" लोक म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. स्त्रीला काय किंवा पुरुषाला काय, मृत्यु यायचा तेव्हांच येतो; ये म्हटल्यानें तो कांहीं येत नाहीं. रामावांचून मी क्षणभर तरी जिवंत राहत्ये हेंच आश्चर्य. आणि त्यात या क्रूर राक्षसिणी मला असा हा भयंकर त्रास देत असूनही मला मृत्यु येत नाहीं. मला आतां राम कसचे दृष्टीस पडणार ! ते त्यांचे विशाल नेत्र व सिंहासारखी गति ही जे धन्य असतील त्यांच्याच आता पुनः दृष्टीस पडतील. मागच्या जन्मीं मीं कोणतें पातक केलें होतें कोण जाणें, कीं मला हें असलें भयंकर दुःख भोगावें लागत आहे. मला आतां हा शोक सहन करवत नाहीं. मी प्राण देत्यें; रामा, तुमचें मला आतां दर्शन होणें कठीण आहे. ह्या राक्षसिणींचा त्रास चुकविण्याचा हाच मार्ग आहे. रामा, माझी तुम्हांला ही स्थिति ठाऊक नसावी. ठाऊक असती तर तुम्हीं मला सोडविण्याकरितां खचित प्रयत्न केले असते किंवा माझ्या शोकानें राम हा लोक सोडून देवलोकाला तर गेले नाहींत ना ? कदाचित् धर्मशील रामाला माझ्यासारख्या मंदभागी स्त्रियेची जरूरीही नसेल. कारण दृष्टीसमोर सृष्टि असते. दृष्टि आड झाली म्हणजे प्रेम कमी होतें. माझ्या अंगीं दुर्गुणच तसे असतील किंवा माझें भाग्य फुटलें असेल. कसेंही असो, प्राण देणें हाच मार्ग मला उरला आहे, म्हणजे निदान मी या दुष्ट रावणाच्या त्रासांतून सुटेन. "

तिचे हे त्राग्याचे शब्द ऐकून त्या राक्षसिणी घाबरल्या व त्यांपैकीं कित्येकजणी रावणास खबर देण्याकरितां निघून गेल्या. बाकीच्यांपैकीं त्रिजटा नांवाची राक्षसीण इतरांना म्हणाली:--"अगे राक्षसिणींनो, तुम्ही हिला त्रास देऊं नका. उलट हिच्या पाया पडून हिची क्षमा मागा. मला एक स्वप्न आज रात्रीं पडलें, तें मी तुम्हांला सांगत्यें. मला स्वप्नात रामलक्ष्मण एका चार दांतांच्या हत्तीवर बसून येतांना दृष्टीस पडले. त्यांनीं सीतेला उचलून हत्तीच्या गंडस्थळावर घेतलें. तेव्हां तो गगनांतून जाणारा हत्ती राम, लक्ष्मण, सीता यांना फारच शोभूं लागला. इतक्यांत सीतेनें सूर्यचंद्र आपल्या हातांत घेतले. रावण समोरून पुष्पक विमानांतून येत होता, तो धाडकन् खालीं पडला. त्याचें डोकें मुंडलेलें असून अंग तेलानें माखलेलें होतें. त्याला भयंकर स्वरूपाची काळी देवी

दक्षिणेकडे फरफरा ओढीत घेऊन गेली. याप्रमाणें मला स्वप्न पडलें. यावरून रामलक्ष्मण खास लंकेस येऊन रावणास मारून सीतेला घेऊन जातील असें दिसतें. त्या वेळेस आपल्यास सीतेवाचून दुसरें कोणी सोडवणारें भेटणार नाहीं. तर राक्षसिणींनो, तुम्हीं आतां हिला त्रास देऊं नका. किंबहुना हिला संतुष्ट राखा. हिला येथेंच बसूं द्या आणि हिच्यापासून दूर व्हा. '' सीतेनें ' तुझ्या तोंडांत साखर पडो ' असें मोठ्या उत्सुकतेनें म्हटलें आणि त्या राक्षसिणींनीं सीतेला त्रास देण्याचें सोडून दिलें, तेव्हां तिनें त्यांचेही उपकार मानिले. ( सुं० स० २३-२९ ).

मारुती त्या शिंशपा वृक्षावर बसून तें सर्व वृत्त लक्ष लावून पाहात होता. सीतेला भेटण्याची उत्तम वेळ हीच आहे, असें त्याच्या मनांत आलें. पण आपण राक्षसांपैकींच एक मायारूपी नाहीं, हें सीतेच्या प्रत्ययास कसें आणावें याजबद्दल त्याला मोठी चिंता पडली. शेवटीं येथूनच रामाचें संक्षिप्त चरित्र गाऊन सीतेच्या कानावर घालावें, असा निश्चय करून मारुतीनें बोलण्यास सुरवात केली. " अयोध्येंत इक्ष्वाकुवंशांत महाकीर्ति, रथअश्व, गज, इत्यादि पत्तीनें युक्त, असा पुण्यशील दशरथ नांवाचा राजा होता. त्याचा सर्वांत ज्येष्ठ व प्रियपुत्र राम सर्व धनुर्धारी वीरांमध्यें श्रेष्ठ आहे. त्यानें आपल्या सत्यवचनी वृद्ध पित्याच्या आज्ञेनें भार्येसह व भावासह वनांत प्रवेश केला. त्यानें अरण्यांत अनेक कामरूपी राक्षस मारिले. विशेषतः जनस्थानांतील खर व दूषण या राक्षसांचा त्यानें वध केला. तें ऐकून क्रोधानें प्रेरित होऊन रावणानें त्याला मृगाच्या मायेनें फसवून त्याची भार्या जानकी हरण केली. त्या देवीचा शोध करीत असतां रामाला सुग्रीव नांवाचा वानर भेटला. त्याशीं सख्य संपादन करून व त्याचा भाऊ वाली याचा वध करून त्यास त्यानें वानरांचें राज्य दिलें. मग सुग्रीवानें सीतेचा शोध लावण्याकरितां चारी दिशांना हजारों वानर पाठविले. मी हनुमान् त्यांपैकींच एक असून संपातीनें सांगितल्यावरून शंभर योजनें समुद्र ओलांडून सीतेचा शोध लावण्याकरितां येथें आलों आहें. जशा रूपाची, जशा वर्णाची, जशा लक्षणाची रामानें मला सीता सांगितली तशा रूपाची, वर्णाची व लक्षणाची मला सीता येथें सांपडली आहे. '' इतकें बोलून मारुती थांबला. तें भाषण ऐकून सीतेला, हा काय चमत्कार आहे, मी स्वप्नांत तर नाहींना, असें झालें. स्नेहानें, आश्चर्यानें व शंकेनें तिनें तोंड वर करून त्या शिंशपा वृक्षावर न्याहाळून पाहिलें तों एक अशोकाच्या फुलांच्या झुबक्याप्रमाणें दिसणारा, सोन्यासारख्या

लखलख करणाऱ्या डोळ्यांचा व नम्र झालेला असा वानर तिच्या दृष्टीस पडला. त्या नम्र झालेल्या वानरास पाहून सीतेला अतिशय विस्मय वाटला. त्याच्याकडे पाहतां पाहतां भीति वाटूं लागून तिला पाहवेनासें झालें. तेव्हां तिला कांहींशी मूर्च्छा आली, व 'रामा,' 'रामा,' म्हणोन रामाचा धांवा करीत भयानें ग्रस्त होऊन तिनें आपले डोळे मिटले. इतक्यांत मारुती झाडावरून खालीं उतरून, करुणापूर्ण मुद्रेनें व विनयानें तिला साष्टांग नमस्कार घालून व हात जोडून म्हणालाः—"देवि, मी रामाचा दूत असून त्याच्या आज्ञेनें तुझ्याकडे आलों आहे. वैदेहि, राम कुशल आहे; आणि त्यानें तुला कुशल विचारलें आहे. चारी वेद आणि ब्रह्मास्त्र जो जाणतो त्या दाशरथि रामानें तुला कुशल सांगितलें आहे. त्याचा धाकटा भाऊ व प्रिय अनुचर तेजस्वी लक्ष्मण यानें शोकसंतप्त होऊन तुला शिरसावंदन केलें आहे." याप्रमाणें त्या दोघां राजपुत्रांचें कुशल ऐकून सीतेच्या अंगावर आनंदानें रोमांच उभे राहिले, व ती म्हणाली:—"लोक जें म्हणतात कीं मनुष्य जिवंत राहील तर त्याला शंभर वर्षांनीं तरी आनंदाचा दिवस येईल; तें कांहीं खोटें नाहीं." हें सीतेचे समाधानाचे शब्द ऐकून मारुती आणखी पुढें आला; पण जसजसा तो पुढें येऊं लागला, तसतसा सीतेला हा रावण आहे, असा संशय येऊं लागला. भयानें त्रस्त होऊन तिनें त्याच्याकडे पाहणें सोडून दिलें, व ती म्हणाली:—"जर तूं मायेचें रूप घेऊन माझ्या समोर रावणच आला असशील, तर अशा प्रकारानें मला पुन्हां त्रास देणें तुला शोभत नाहीं. स्वतःचें रूप टाकून देऊन व संन्याशाचें रूप धारण करून माझें हरण केलेंस; तेव्हां तूं केव्हां काय करशील याचा मला नेम लागत नाहीं. तूं खचित रावणच आहेस, तर मी आतां तुझ्याशीं एक शब्दही बोलणार नाहीं." असें म्हणून अशोकाची धरलेली खांदी सोडून तिनें पुन्हां पूर्ववत् धरणीवर धरणें घेतलें व आपल्या तोंडाला कुलूप लाविलें. ती तिची निश्चयाची मुद्रा पाहून मारुतीला फार वाईट वाटलें व त्यानें हात जोडून मधुर भाषेनें विनंति केली देवी, "वैदेहि, तूं समजतेस तसा मी तो दुष्ट मायावी रावण नाहीं. मी आपल्या पराक्रमाच्या जोरावर तुला भेटण्यास आलेला रामाचा दूत आहें. तुला रावण नेत असतां जे तूं अलंकार टाकून दिलेस, ते मींच उचलून घेतले व रामाची भेट झाली तेव्हां त्यास दिले. त्या वेळेस रामानें

जो शोक केला, तो मला वर्णन करितां येत नाहीं. फार वेळपर्यंत त्या अलंकारास पोटाशीं घेऊन राम रडून रडून जमिनीवर लोळत पडले. राम तुझ्यासाठीं रोज शोकानें संतप्त होत आहेत. तुझें दर्शन न झाल्यामुळें नाना अरण्यें, गिरिकंदर व नदीप्रवाह ते भटकत फिरतात; परंतु त्यांचा शोक थांबत नाहीं. लवकरच बंधुजनासहित रावणाचा नाश करून राम तुला सोडवतील, यांत शंका नाहीं. हे महाभागे, मी वानर असून रामाचा दूत आहें. याचा तुला विश्वास येण्याकरितां ही अंगठी रामानें पाठविली आहे ही पहा. तुला ओळख पटावी, म्हणूनच त्यांनीं ही अंगठी पाठविली आहे. ही पाहून तूं माझ्यावर विश्वास ठेव. आणि आतां तुझें दुःख संपलें असें तूं समज." असें म्हणोन तिच्या समोर मारुतीनें ती अंगठी टाकली. आपल्या भर्त्याच्या अंगुलींतील ती अंगठी घेऊन तिजकडे पाहतांच सीतेला जो आनंद झाला, तो गगनांत मावेना. प्रत्यक्ष भर्त्याचीच भेट झाली, असें वाटून तिचें तें सुंदर वदन व तिचे ते आरक्त, शुभ्र व विशाल नेत्र प्रफुल्लित होऊन राहूपासून मुक्त झालेल्या चन्द्राप्रमाणें शोभूं लागलें. नवऱ्याच्या निरोपानें आनंदित झालेली ती लज्जावती बाला आपलें अत्यंत प्रिय करणाऱ्या त्या मारुतीची आदरानें प्रशंसा करूं लागलीः—"ह्या राक्षसांच्या दुर्भेद्य किल्ल्यांत तूं एकटा निःशंक शिरलास, तेव्हां तुझी खरोखर धन्य आहे. तुझा पराक्रम, तुझें सामर्थ्य, तुझी बुद्धि, हीं अवर्णनीय आहेत. भयंकर नक्रांनीं भरलेला शंभर योजनें रुंद समुद्र तूं उल्लंघन करून आलास. हा तुझा पराक्रम केवळ अलौकिक आहे. एवढा मोठा समुद्र पण तुझ्यापुढें गाईच्या पावलाएवढा खळगा झाला. वानरश्रेष्ठा हनुमंता, तुला रावणाची यत्किंचित्‌-सुद्धां भीति वाटत नाहीं; तेव्हां तूं कांहीं प्राकृत वानर नव्हेस. रामानें ज्या अर्थी समजून उमजून तुला मजकडे निरोप घेऊन पाठविलें आहे, त्या अर्थी माझ्याशीं भाषण करण्यास तूं सर्वथैव योग्य आहेस. दुर्धर्ष राम तुझ्या पराक्रमाची परीक्षा केल्यावांचून तुला पाठविणारच नाहीं. परमेश्वराच्या कृपेनें धर्मात्मा सत्य-संगर राम खुशाल आहे. तसेंच सुमित्रेला आनंद देणारा तेजस्वी लक्ष्मणही खुशाल आहे. दोघे खुशाल आहेत. तर सागरानें वेष्टिलेल्या या सर्व पृथ्वीला ते जाळून कां टाकीत नाहींत ? ते देवांचा सुद्धां निग्रह करण्यास समर्थ आहेत; पण मला वाटतें, माझें दुःख अजून सरलें नाहीं. रामाला माझ्या संबंधानें दुःख होतें काय ? त्याला रावणाचा संताप येतो काय ?

राहिलेलें कार्य तो सोडणार नाहींना ? वनवासाच्या क्लेशांमुळें माझ्यावरचें रामाचें प्रेम कमी तर झालें नाहींना ? या माझ्या भयंकर बंदिवासातून मला राम सोडवील काय ? माझ्याकरितां भ्रातृवत्सल भरत शूर सेनापतींनीं युक्त अशी एक अक्षौहिणी सेना पाठवील ? वानरांचा अधिपति श्रीमान् सुग्रीव दंतनखांनीं लढणाऱ्या आपल्या वानरवीरांना घेऊन मला सोडवण्यास येणार आहे काय ? माझे शूर लक्ष्मण भावोजी या दुष्ट राक्षसांना आपल्या शर-जालांनीं जर्जर करून सोडतील काय ? या अधम रावणाला आपल्या सुहृज्जनांसह रामाच्या भयंकर अस्त्रानें ठार झालेला लवकरच पाहण्याचें माझ्या नशिबीं आहे काय ? सुवर्णासारखें कांतिमान् व कमलासारखें सुगंधि असें रामाचें वदन माझ्या विरहानें सुकून तर गेले नाहींना ! " इत्यादि अनेक प्रश्न कल्पनातरंगाच्या भरांत एकामागून एक करून तिनें मारुतीस गांगरून सोडलें. त्या एकामागून एक येणाऱ्या प्रश्नांवरून सीतेच्या मनाची काय स्थिति झाली होती, हें मारुतीच्या लक्षात आलें. त्यानें आपल्या शिरावर दोन्ही हाताची अंजलि जोडून उत्तर केलें:—" वैदेहि, रामाला जर तूं येथें आहेस हें ठाऊक असतें, तर येथून तुला त्यांनीं कधींच सोडविलें असतें. आतां मी त्यांना तुझी हकीकत सांगेन, आणि मग वानरांची प्रचंड सेना घेऊन रामचंद्र तात्काळ येतील व समुद्राला बांधून काढून या लंकापुरींतील सर्व राक्षस नाहींसे करतील. मी मंदर पर्वताची, मैनाक पर्वताची, हिमालय पर्वताची, विंध्य पर्वताची शपथ घेऊन सांगतों कीं, रामाचें मुखकमल लवकरच तुझ्या दृष्टीस पडेल. राम झोंप घेण्यास पडले तरी त्यांना झोंप येत नाहीं. सीते, सीते, असे मधुर शब्द उच्चारीत उठून बसतात. एकादें सुंदर फूल किंवा फळ किंवा दुसरी कोणतीही स्त्रियांना प्रिय असणारी वस्तु त्यांनीं पाहिली म्हणजे 'हा प्रिये !' असें म्हणून ते मोठ्यानें सुस्कारा टाकतात. " हें भाषण ऐकून सीतेला आनंदानें व दुःखानें एकाच वेळीं ग्रासून टाकलें; व ती म्हणाली:—" हनुमाना, तुझें भाषण विष कालवलेल्या अमृता-सारखें मला लागत आहे. कारण, दुसऱ्या कोणावर रामाची प्रीति नाहीं, हें ऐकून मला अमृततुल्य आनंद होत आहे. पण राम शोकानें पीडित झाला आहे, हें ऐकून विषासारखें दुःख होत आहे. मनुष्य मोठ्या ऐश्वर्याच्या शिखरावर असो किंवा दारुण संकटांत सांपडलेला असो, त्याच्या गळ्यांत दोरी बांधून त्याला दैव इकडून तिकडे खेंचीत असतें. पहा, दैव खरोखर

दुस्तर समजलें पाहिजे; त्याच्या फेऱ्यांतून रामाला, लक्ष्मणाला किंवा मला बाहेर पडतां येत नाहीं! असो; राक्षसांचा नाश करून, रावणाला यमसदनास पाठवून व लंकेला उलथी घालून राम मला केव्हां भेटेल तो सुदिन होय. रामाला माझा निरोप सांग कीं, हें वर्ष पुरें होईपर्यंतच माझें जीवित आहे. कारण त्या राक्षसाधमानें मला एक वर्षाची अवधि दिली आहे. त्यांपैकीं हल्लीं दहावा महिना चालू आहे. दोन महिने बाकी आहेत. एवढ्या अवधींत मला येऊन सोडवा. नाहीं तर माझे तुकडे तुकडे करून तो दुष्ट मला खाऊन टाकणार आहे. त्याचा भाऊ बिभीषण यानें त्याला पुष्कळ सांगितलें कीं, 'सीतेला रामाकडे पोहोचवून दे;' परंतु त्याचा सल्ला रावणाला पसंत पडत नाहीं. बिभीषणाच्या ज्येष्ठ कन्येनें आईच्या सांगण्यावरून हें मला स्वतः येऊन सांगितलें. राघवाच्या ठिकाणीं उत्साह, पौरुष, सत्य, अनृशंस्य, कृतज्ञता, पराक्रम, प्रभाव हीं सर्व आहेत. चौदा हजार राक्षस एकट्या रामानें लक्ष्मण साहाय्य नसतां जनस्थानात मारिले. त्याच्या समोर कोण उभा राहील? परंतु सर्व गोष्टी दैवाधीन आहेत; दोन महिन्यांत सर्व कांहीं झालें पाहिजे." सीतेचें हें आतुरतेचें भाषण ऐकून हनुमान् म्हणाला:—"देवि वैदेहि, तुझी काळजी मी आतांच नाहींशी करून टाकतो. आणि या राक्षसांच्या त्रासापासून तुला आतांच सोडवितों. तूं माझ्या पाठीवर बैस, मी एका क्षणांत समुद्र उल्लंघून ऋष्यमूक पर्वतावर रामापाशीं तुला घेऊन जातों." सीतेच्या मनांत आपल्या लहान आकाराकडे पाहून शंका आली, असें वाटून मारुती म्हणाला:—"मी लहान आहें असें समजूं नकोस. लंकेचें सबंध उच्चाटन करून समुद्रापलीकडे मी तुला घेऊन जाईन." असें म्हणून मारुतीनें प्रचंड रूप धारण केलें. तें त्याचें पर्वताकार रूप पाहून सीता सांत्वनपूर्वक म्हणाली:—"हनुमाना, तुझें तेज व तुझें बळ मी जाणत्यें. एवढा विस्तीर्ण समुद्र उल्लंघन करून येण्याचें सामर्थ्य प्राकृत वानराचें नव्हे. परंतु तुझ्या पाठीवर बसून जाणें मला योग्य वाटत नाहीं. एक तर तुझ्या वायुवेगानें मी मूर्च्छा पावेन. कदाचित् आकाशांतून समुद्रावरून तूं जात असतां मला घेरी येऊन मी समुद्रांत खालीं पडेन. तूं मला नेलीस हें ऐकून रावण तुझ्यामागें कनेक राक्षस सोडील. त्याच्याशीं तुला युद्ध करावें लागेल. त्या वेळेस मी भीतीनें खालीं पडेन आणि मरून जाईन. माझ्यावर रामाचें जीवित अवलंबून आहे. तुझेंही जीवित, लक्ष्म-

णाचें जीवित, राजकुलाचें जीवित माझ्यावर अवलंबून आहे. याशिवाय राघवाच्या भक्तीनें मी इतकी बांधली गेल्यें आहे कीं, मला राघवाशिवाय इतर पुरुषाच्या अंगाला स्पर्श करावासा वाटत नाहीं. रावणानें जबरदस्तीनें माझ्या अंगाला स्पर्श केला, त्यांत माझा अपराध नाहीं. त्या वेळेस माझे नाथ रक्षण करणारे जवळ नव्हते,त्यामुळें माझा नाइलाज झाला.सर्वांत मुख्य गोष्ट म्हटली तर रामानें येथें येऊन रावणाला जिंकून मला घेऊन जावें यांतच रामाचा लौकिक व पुरुषार्थ आहे. '' हें सीतेचें भाषण ऐकून मारुतीला मोठा संतोष वाटला, व तो म्हणाला:—"देवि जानकी, तूं म्हणतेस तें सर्वथैव योग्य आहे. तें तुझ्या स्त्रीस्वभावाला आणि साध्वीशीलाला शोभा देतें. राम लवकर येऊन तुला सोडवतील. तुझी व माझी भेट झाल्याची कांहीं खूण तूं मला देशील तर बरें होईल.'' तेव्हां सीतेनें आपल्या वस्त्राच्या पदराला एका बाजूला बांधलेला दिव्य चूडामणि मारुतीला काढून दिला; आणि ती म्हणाली:—"हा माझ्या डोक्यात घालण्याचा मणि रामाला दे, म्हणजे त्याला तिघांची आठवण होईल. माझी, दशरथ मामंजींची आणि माझ्या आईची. हनुमाना, तूं रामाला हरतऱ्हेनें प्रोत्साहन देऊन मला येथून सोडविण्याचा प्रयत्न कर बरें ! माझी सर्व चिंता आतां तुला आहे.'' तेव्हां मारुतीनें तसे करण्याचें वचन देऊन जाण्यापूर्वी तिला साष्टांग नमस्कार घातला. मारुती जाऊं लागला हें पाहून सीतेला रडण्याचा हुंदका आला, व अश्रूंनीं कोंदलेल्या कंठानें ती म्हणाली:—" रामलक्ष्मणांस माझें कुशल सांग, त्याचप्रमाणें सर्व अमात्य व वृद्ध वानर यासहित सुग्रीवाला कुशल सांग बरें ! आणि माझी सर्व हकीगत त्यांना सांग, आणि महाबाहु राम मला या दुःखसागरापासून मुक्त करील, अशी तूं तजवीज कर. मी जिवंत आहें, तोंपर्यंत राम माझी सुटका करील, अशी खटपट करीव.माझ्या तर्फेनें जें तुला योग्य दिसेल तें तें आणखी सांग.'' असें म्हणून सीता पुनः प्रेमानें म्हणाली:—" तुला सवड असल्यास एक दिवस येथेंच विश्रांति घे. या अशोकवनांत राहून कंदमुळें भक्षण कर. तुला पाहून मला एक दिवस तरी आपल्या दुःखांचा विसर पडेल. पण तुला घाई असेल तर जा. '' असे सीतेचे शब्द ऐकून मारुतीनें तिला प्रदक्षिणा घालून पुनः नमस्कार केला, व 'मी येतों, तूं किंचित्‌हि काळजी करूं नको,' असें पुनः आश्वासन देऊन

मारुती तेथून निघाला व दूर एका झाडावर जाऊन,पुढें काय करावें याचा विचार करूं लागला. ( सुं० स० ३०-४० ).

मारुतीनें असा विचार केला कीं, आपला कार्यभाग तर झाला, पण मुख्य कार्यभाग साधून आणखीही स्वामीचीं इतर कार्यें साधल्यास दूताची विशेष तारीफ आहे. या राक्षसाना आपला कांहीं तरी प्रभाव दाखविला पाहिजे. हे दुष्ट, सामाला भीक घालणारे नाहींत, हें उघड आहे.यांचेजवळ इतकें द्रव्य आहे कीं, दानाचीही येथें गति नाहीं. ह्या राक्षसांच्या गर्वापुढें भेदाची डाळ शिजेल असेंही वाटत नाहीं. येथे चवथा उपाय जो दण्ड त्याचाच उपयोग केला पाहिजे. त्या राक्षसाधमाचें हें नंदनवनासारखें शोभणारें प्रमदावन विध्वंसून टाकलें म्हणजे साहाजिकच रावणाला खबर लागून त्याचे डोळे उघडण्यास ठीक पडेल. असा मनाशीं निश्चय करून त्यानें तें अन्तःपुरांतील उपवन उध्वस्त करण्यास प्रारंभ केला. त्यानें पर्वतप्राय रूप धारण करून तेथील सोन्यारुप्याचे वृक्ष काडकाड मोडून टाकिले, सुंदर दीर्घिका व वापी फोडून टाकिल्या व तो कृत्रिम पर्वत जमीनदोस्त केला. तेव्हां त्या वनांतील मृग व पक्षी मोठमोठ्यानें ओरडूं लागले; त्यामुळें त्या निद्रावश झालेल्या राक्षसिणी जाग्या झाल्या व तो भयंकर प्रकार व मारुतीचें तें भयप्रद स्वरूप पाहून भयभीत होऊन त्यांनीं पळ काढला; व सर्व हकीकत रावणाला जाऊन त्यांनीं कळविली.त्या म्हणाल्याः--"राजा,एक मोठा प्रचंड वानर अशोकवनांत येऊन सीतेशीं कांहीं भाषण करून अशोक वन उध्वस्त करीत आहे. तुझ्या आज्ञेवांचून सीतेशीं संभाषण करून आपल्या जीवाची आशा बाळगील असा उन्मत्त कोण आहे ? तरी त्या धृष्ट वानराला उग्र दण्ड केलाच पाहिजे." त्या राक्षसिणींचें तें भाषण ऐकून रावणाचे डोळे क्रोधानें लाल झाले. जसा स्मशानांतील चितेचा अग्नि पेट घेतो,त्याप्रमाणें तो कोपानें जळूं लागला.पेटलेल्या दिव्यांतून जळत्या तेलाचे थेंब ज्याप्रमाणें टप टप खालीं पडतात, त्याप्रमाणें त्याच्या लाल डोळ्यांतून क्रोधाश्रु खालीं पडूं लागले. त्यानें आपल्यासारख्या बलाढ्य अशा ऐंशी हजार राक्षसाना मारुतीला पकडण्याची आज्ञा केली. त्याबरोबर ते राक्षस, मुद्गल, पट्टिश, त्रिशूल, दोरखंड, इत्यादि घेऊन धावले. अशोकवन उध्वस्त करून मारुती राजवाड्याच्या तोरणावर येऊन बसला होता. त्यानें राक्षसांस पाहतांच मोठ्या जोरानें पुच्छ जमिनीवर आपटून एवढा भयंकर बुभुःकार केला

की, त्याबरोबर सर्व लंकानगरींतील लोक भयभीत झाले. तोरणावर एक लोखंडी परिघ होता, तो घेऊन आणि 'जय राजाधिराज राम' असें म्हणून मारुतीनें त्या किंकरांवर हल्ला केला; व बहुतेक ते सर्व राक्षस यमसदनास पाठविले. जे बाकी राहिले त्यांनीं रावणास जाऊन ही हकीकत सांगितली, तेव्हां तर क्रोधानें रावणाचे डोळे अगदीं उरफाटले आणि त्याने सेनापति प्रहस्ताचा पुत्र जम्बुमाली यास मारुतीवर पाठविलें. मारुती अशोकवनाचा भंग करून स्वस्थ बसला नव्हता; त्यानें रावणाच्या राजवाड्याचाही विध्वंस करण्यास सुरवात केली होती. प्रथम रावणाच्या चैत्यप्रासादाचा त्यानें विध्वंस केला. इतक्यांत जम्बुमालीनें त्याजवर हल्ला करून अनेक बाणांनीं त्याजला जर्जर केलें. तेव्हां मारुतीनें रागानें तोरणाचा आश्रय करून पूर्वीचा परिघ भिर्र फिरवून जम्बुमालीवर इतक्या जोरानें फेंकला कीं, जम्बुमाली, त्याचा रथ, त्याचे घोडे व त्याचा सारथि यांचा मागमूसही राहिला नाहीं! याप्रमाणें जम्बुमालीचा नाश झालेला ऐकून रावणानें सात अमात्य–पुत्र त्याजवर पाठविले, व त्याजबरोबर मोठें सैन्य दिलें; त्यांचाही मारुतीनें नाश केला. त्याचप्रमाणें रावणाचा मुलगा अक्ष त्याजवर चालून आला, त्यालाही त्यानें यमसदनाला पाठविलें. शेवटीं रावणानें आपला ज्येष्ठ पुत्र खास इंद्रजित याला आज्ञा केली, तेव्हां तो मारुतीला पकडण्याकरितां आला. त्याला पाहून मारुतीनें बुभुःकार करून आपले शरीर वाढविलें. इंद्रजिताचें व मारुतीचें मोठें भयंकर युद्ध लागलें. इंद्रजितानें रथावरून बाणांनीं मारुतीला जर्जर केलें. शेवटीं हा अवध्य आहे, असें जाणून व ब्रह्मास्त्राचा प्रयोग करून त्यानें (अस्त्रानें) मारुतीला बांधलें. अस्त्राने बद्ध झालेला मारुती निश्चेष्ट होऊन खालीं पडला. तेव्हां हजारों राक्षस धांवले व त्यांनीं मोठमोठ्या दोरखंडांनीं मारुतीला बांधून त्याला मुष्टिप्रहार करीत करीत रावणासमोर ओढीत आणलें. सर्व लोकांना रडवणारा तो रावण पिंवळ्या व लखलखणाऱ्या डोळ्यांच्या त्या वानराकडे अत्यंत क्रोधानें व निरनिराळ्या शंका मनांत येऊन निरखून पाहूं लागला. " हा प्रत्यक्ष नंदी तर नसेलना; पूर्वी कैलास पर्वतावर वानराचें रूप त्यानें घेतलें होतें, तेव्हां त्याला मी हंसलों होतों, तेव्हां त्यानें मला शाप दिला होता. तोच हा वानररूप धारण करून आला तर नसेल ना ? किंवा हा बाणासुर तर नसेल ना ?" असा रावण विचार करीत आहे तों हनुमानानें रावणास म्हटलें:–" मी हनुमान् सुग्रीवाच्या आज्ञेनें तुझ्याकडे

आलों आहें. राक्षसांचा राजा जो तूं त्या तुला वानरांचा राजा सुग्रीव यानें कुशल विचारिलें आहे; व निरोप सांगितला आहे कीं, तूं धर्माधर्म जाणतोस. पुष्कळ तपश्चर्याही तूं केली आहेस, दुसऱ्याच्या स्त्रियेस अडकवून ठेवणें हें तुला योग्य नाहीं. रामलक्ष्मणांच्या शरांपुढें उभें राहण्याची देवासुरामध्येंसुद्धां कोणाची शक्ति नाहीं. तिन्ही लोकांमध्यें असा कोणीही बलवान् नाहीं, कीं जो रामाचा अपराध करून सुखानें राहील. तर हा वानर राजाचा न्याय्य, धर्म व अर्थ दोन्हींसही अनुकूल असा निरोप मान्य करून, राक्षसश्रेष्ठा, जानकीला रामाकडे परत पाठीव. जनस्थानांत झालेला खरदूषणांचा वध, किष्किंधेंतील वालीचा वध आणि राम व सुग्रीव याचें झालेलें सख्य, यांचा विचार कर आणि आपलें हित कशांत आहे, तें ओळख; आणि त्याप्रमाणें आचरण कर." हें मारुतीचें तेजस्वी भाषण ऐकून रावणानें या वानराला ठार मारून टाका अशी सचिवास एकदम आज्ञा केली. तेव्हां बिभीषणानें विनंति केली, " हा दूत आहे, दूताचा वध करूं नये, अशी नीति आहे. " तें ऐकून रावणानें हुकूम केला कीं, " याला मारूं नका; पण वानरांना आपल्या पुच्छाचें मोठें भूषण वाटतें; तें याचें पुच्छ जाळून मग याला सोडून द्या. याचें अंग विरूप झालें म्हणजे याच्या मित्रांना यानें केलेल्या आगळकीची माहिती होईल. " असा हुकूम सुटतांच राक्षसांनीं मारुतीच्या शेपटीच्या भोंवतीं जुनीं कापसाचीं वस्त्रें गुंडाळून तीं तेलानें भिजविलीं. जसजसे राक्षस शेपटीभोंवतीं कापड गुंडाळून वर तेल टाकीत, तसतसें मारुतीचें शेंपूट अधिकाधिक वाढे ! तेव्हां सर्व शहरांतील जुनीं वस्त्रें व तेल उपयोगांत आणिलें ! नंतर त्या क्रुद्ध झालेल्या राक्षसांनीं मोठ्या आनंदानें व उत्सुकतेनें चिंध्यांस आग लावली; व तें मारुतीचें भयंकर शेंपूट जळूं लागलें. तेव्हां सर्व राक्षस आनंदानें नाचूं लागले; व मोठ्या दिमाखानें राक्षसांनीं त्या मारुतीची सर्व शहरभर धिंड काढली. सीतेच्या पाहऱ्यावर ठेविलेल्या दुष्ट राक्षसिणींनीं सीतेला ती गोष्ट सांगितली, तेव्हां तिला फार वाईट वाटलें. तिनें आपल्या मनानें अग्निनारायणाची प्रार्थना करून म्हटलें, "देवा अग्निनारायणा, माझ्याकरितां या मारुतीची अशी दुर्दशा होत आहे, तरी याचें पुच्छ तूं जाळूं नकोस; किंबहुना मारुतीला अगदीं शीतस्पर्श हो. " सीतेनें करुणा भाकल्यामुळें मारुतीच्या शेंपटीला कांहींच झालें नाहीं; तथापि मारुतीनें शेंपटीच्या जळण्याचें आपल्यास दुःख होत आहे असें दाखवून एकदम अंग फुगवून, त्याला पकडून चालणाऱ्या

राक्षसांना हिसका दिला. त्यासरसे ते धक्का खाऊन खालीं पडले. तेव्हां मारुतीनें उड्डाण करून या घरावर बैस, त्या घरावर बैस, याप्रमाणें सर्व लंकाशहरास आग लावण्यास प्रारंभ केला. हजारों सुंदर वाड्यांना आग लागून आंतले राक्षस व राक्षसिणी बाहेर पळूं लागल्या. कोणाला अग्नींतून बचावण्यास वाव सांपडेना, तेव्हा ते भडाभड वाड्यांतून रस्त्यांत उड्या टाकूं लागले. शेंकडों लोकांचे, सेनापतींचे व प्रधानांचे वाडे जाळून खुद्द रावणाच्या राजवाड्यावर मारुतीनें उडी मारली, आणि अनेक रत्नांनीं बनविलेल्या त्या प्रासादास त्यानें आग लाविली. सुवर्ण, मोतीं, हिरे, माणकें, यांनीं बनविलेलीं तीं मोठमोठीं मंदिरें, अग्नीनें तडातड फुटून जळून जाऊं लागलीं आणि पुण्यक्षय झाल्यामुळें सिद्धांचीं विमानें जशीं आकाशांतून खालीं पडतात, त्याप्रमाणें जमिनीवर कोसळून पडूं लागलीं. अग्नि विझविण्याकरितां व आपापले वाडे बचावण्याकरितां चोहोंकडे राक्षस धावूं लागले, व मोठमोठ्यानें ओरडूं लागले; तेव्हां त्या लंकापुरींत भयंकर गोंधळ माजून गेला. "आला रे आला, हा वानररूपी अग्नीच आला." याप्रमाणें जिकडे तिकडे ओरडाओरड सुरूं झाली. सारांश, ज्याप्रमाणें शंकरानें त्रिपुर जाळलें, त्याप्रमाणें त्या वेगवान् व बलवान् वानरानें त्या सर्व लंकेला आग लावून दिली. नंतर आपलें कार्य सिद्ध झालें, सीतेचा शोध लावला व शत्रूलाही आपला पराक्रम दाखविला, तर आतां रामाकडे परत जावें, असा विचार करून मारुतीनें रामाकडे मन लावलें; आणि लंकेंतून बाणाप्रमाणें निघून समुद्रावर येऊन समुद्रांत आपलें पेटलेलें शेंपूट विझवून अग्नीला शांत केलें. (सुं० स० ४१–५४).

कार्य सिद्ध झाल्यामुळें कार्यसिद्धीची खबर मी रामाला केव्हां देईन, असें मारुतीला झालें. तो लागलींच किनाऱ्यावरील अरिष्ट नांवाच्या डोंगरावर समुद्रावरून उडी मारण्याच्या इराद्यानें चढला. त्या डोंगरावर वृक्षांची दाट गर्दी असल्यामुळें जणूं काय त्यानें हिरवें वस्त्र परिधान केलें आहे, असे वाटत होतें. उंच उंच शृंगांवर पांढरे ढग बसले असल्यामुळें त्यानें डोक्यावर उत्तरीय वस्त्र घेतलें आहे, असें वाटे. तुटलेल्या कड्यांतून लाल धातु बाहेर दिसत होत्या, त्यामुळें जणूं काय त्यानें डोळेच वटारले होते. निरनिराळे झऱ्यांचे शब्द ऐकूं येत होते, यामुळें तो गात आहे कीं काय असें वाटे. वनातल्या वेळूंतून वाऱ्यामुळें आवाज निघे, तेव्हां तो शीळ घालतो आहे कीं काय, असा भास होई. मोठमोठाले सर्प तेथें

फूत्कार करीत असल्यामुळें हा पर्वत श्वासोच्छ्वास सोडतो आहे, असें भासे. अशा त्या उंच वृक्षांनीं भरलेल्या, सर्पव्याघ्रादिकांनीं भयाण झालेल्या व मोठमोठ्या शिलांमुळें वर जाण्यास दुष्कर झालेल्या डोंगरावर मारुति भराभर चढला. आनंदाच्या भरांत जात असतां त्याच्या पायांच्या आघातानें मोठाले दगड चूर होऊन जात; डोंगरावर चढून गेल्यावर शतयोजन समुद्र पुन्हां उल्लंघन करण्यासाठीं मारुतीनें आपला देह आणखी वाढविला; तेव्हां त्याच्या पर्वतप्राय झालेल्या शरीरामुळें तो डोंगर हालूं लागला. मग 'जय रामचंद्र' म्हणून मारुतीनें हातापायांची थाप मारून त्या पर्वतावरून उडी घातली. त्या थापेच्या तडाक्याबरोबर तो पर्वत सपाट झाला! मारुतीनें इतक्या मोठ्या जोरानें व आकारानें आकाशांत उड्डाण केलें कीं, तो जणूं काय चंद्राला घसटून जातो असा भास झाला. सूर्यनक्षत्रादि ग्रहांना धरण्याकरितां तो उडी घेत आहे कीं काय असें वाटलें. अभ्रांनीं कधीं आच्छादिलेला, कधीं अभ्रांतून बाहेर, याप्रमाणें जातां जातां त्याला समुद्राच्या मध्यभागीं पुन्हां सुनाम पर्वत लागला. तेव्हां त्यानें मोठ्यानें गर्जना केली व त्या पर्वताला न शिवतां त्यावरून तो पलीकडे निघोन गेला. त्या वेळच्या त्याच्या भयंकर गर्जनेनें दाही दिशा दणाणून गेल्या; आणि आतां हें आकाश फुटून पडतें कीं काय असें भासलें. तो मारुतीचा भयंकर शब्द उत्तर किनाऱ्यावर बसलेल्या त्याच्या सोबत्यांस ऐकूं आला. तेव्हां हा कृतकार्य मारुतीचा शब्द आहे, असा त्याचा निश्चय होऊन जांबवान, अंगद वगैरे वीर मारुतीचें स्वागत करण्यास अत्यंत उत्सुक होऊन पर्वताच्या शिखरावरून पाहूं लागले. मारुतीचें तें भयंकर स्वरूप पाहून त्यांनीं मारुतीला नमस्कार करून हात जोडले. उत्तर किनाऱ्यावर मारुतीची उडी पडतांच सर्व वानर त्याच्या भोंवतीं जमून त्यांनीं त्याला उत्तम उत्तम फळें अर्पण केलीं. मारुतीनें प्रथम सर्व वृद्ध कपि व राजपुत्र अंगद यांस नमस्कार करून इतरांचेंही अभिनंदन केलें. व 'सीता देवी मीं लंकेंत पाहिली' असें एकाच वाक्यांत आपल्या कामगिरीचें वर्णन केलें. तें ऐकतांच सर्व वानरांना जो आनंद झाला, तो कोठवर वर्णन करावा! कित्येक गर्जना करून उड्या मारूं लागले. कित्येक किल् किल् शब्द करून पुच्छ हापटूं लागले, कित्येक नाचूं लागले, कित्येकांनीं शेंपट्या उंच करून आपणांस झाडांवर टांगून घेतलें, कित्येकांनीं प्रेमभरानें मारुतीच्या अंगाला हस्तस्पर्श

केला, याप्रमाणें त्या वानरांनीं आपल्या स्वभावानुरूप आनंद व्यक्त कल्यावर जांबवत्प्रभृति वृद्ध मंडळींनीं हनुमानास प्रश्न विचारून त्याजकडून लंकेची समग्र हकीकत ऐकली. तेव्हां त्यांस मारुतीच्या पराक्रमाचें अधिकच आश्चर्य वाटलें. नंतर ते सर्व वानर उड्डाण करीत निघाले ते थोडक्याच वेळांत ऋष्यमूक पर्वताजवळ आले. तेथें सुग्रीव राजाचें मधुवन त्यांस लागलें. तेव्हां त्यांनीं आनंदाच्या भरांत त्या वनातील फुलें, फळें, मध वगैरे सर्व पदार्थ अंगदाच्या परवानगीनें खाऊन टाकिले. मधुवनाच्या रखवालीकरितां सुग्रीवानें दधिमुख नांवाचा आपला मामा तैनात केला होता. त्यानें त्या वानरांनीं केलेला तो विध्वंस पाहून सुग्रीवाला जाऊन हकीकत सांगितली; पण सुग्रीवानें क्रोध न करितां उलट आनंद मानला, आणि तो म्हणाला:— "ज्याअर्थीं अंगदप्रभृति वानर निःशंक माझ्या मधुवनांत शिरले आहेत त्याअर्थीं ते कृतकार्य झाले आहेत, यांत शंका नाहीं. **जो कार्य करून येतो त्याचा प्रसंगोपात झालेला अपराध क्षम्य आहे.** हनुमान पराक्रमी, उत्साही व बुद्धिमान् आहे. त्यानें सीतेचा शोध दक्षिण दिशेकडून खचित आणला आहे." सुग्रीवाचे वाक्य ऐकून रामलक्ष्मणांस पराकाष्ठेचा आनंद झाला, व हनुमान् आपल्यास केव्हा भेटेल असें त्यांस झालें. सुग्रीवानें दधिमुखास, अंगद वगैरे वीरांस आपण बोलाविलें आहे म्हणोन सांगण्यास आज्ञा केल्याप्रमाणें त्यानें सुग्रीवाची आज्ञा वानरांस कळाविली. तेव्हां मधूने उन्मत्त झालेले वानर लागलेच शुद्धीवर येऊन व यंत्रानें फेंकलेल्या दगडाप्रमाणें एकदम उड्डाण करून राम, लक्ष्मण व सुग्रीव ऋष्यमूक पर्वतावर होते, तेथें आले; आणि त्यांनीं त्यांच्या पायावर डोकें ठेवून, सीतेचा शोध लाविला, अशी आनंदाची बातमी सांगितली. रामानें मोठ्या उत्सुकतेनें हनुमानाला विचारलें:—"हनुमाना, तूं सीता कोठें पाहिलीस ? सीता काय म्हणाली ? सीतेची स्थिति काय आहे ?" तेव्हां हनुमानानें सर्व हकीकत सांगण्यास प्रारंभ केला. तो म्हणाला:—"शंभर योजनें रुंद समुद्र उल्लंघन करून मी पलीकडे गेलों. तेथें समुद्राच्या दक्षिण किनाऱ्यावर डोंगरावर रावणाची लंकापुरी वसलेली आहे. तेथें रावणाच्या अन्तःपुरांत अशोकवनामध्यें सीतेला मीं पाहिलें. तिच्याभोंवतीं भयंकर राक्षसिणींचा पाहरा असून त्या तिला वारंवार धाक दाखवितात. धरणीवर बसलेली, सारखा निःश्वास टाकणारी, रावणाविषयीं अत्यंत क्रोध व अनादर असलेली,

व मरणास तयार झालेली, अशी सीता मीं पाहिली. तेव्हां मी युक्तीनें तिला आश्वासन देऊन आपली सर्व हकीकत सांगितली; व तुम्हीं दिलेली अंगठी तिला दिली. तेव्हां तिला किती आनंद झाला ! ! तिच्या केवळ जिवांत जीव आला व तिनें माझ्याशीं संभाषण केलें व आपलें सर्वांचें कुशल विचारलें. ''

मी सांगितलें, तेव्हां ती दुःखानें म्हणाली:—'' राम जर कुशल आहेत तर मला कां सोडवीत नाहींत ? चित्रकूटावर एका कावळ्यानें मला थोडासा त्रास दिला, तेव्हां त्यांनीं क्रोधानें त्याजवर ब्रह्मास्त्र सोडलें; व त्याचा एक डोळा फोडला. मग रावणाला बंधुजनांसहित ते कां ठार मारीत नाहींत ? किंवा माझें दुर्भाग्य माझ्या आड येत आहे यामुळें सत्यसंगर रामाला माझी कींव येत नाहीं ? मारुती, तूं माझ्याविषयीं खटपट कर. राम मला सोडवून घेऊन जातील, अशी तजवीज कर.रावणानें मला एका वर्षाची मुदत दिली आहे,त्यापैकीं दोन महिने उरले आहेत, पण तुम्ही एक महिन्यांतच मला न सोडवाल तर तुम्हांला सीता जिवंत सांपडणार नाहीं. '' तेव्हां मीं तिला आश्वासन देऊन म्हटलें:—''रामाला तूं कोठें आहेस, हें ठाऊक असतें तर ते तुला केव्हांच सोडवून घेऊन जाते ! मी आतां रामाला तुझी सर्व हकीकत सांगतों, मला कांहीं एखादी खूण द्यावी. '' असें म्हणतांच सीतेनें हा मणि आपल्या वस्त्रांतून काढून दिला, आणि म्हटलें, ''हा मणि पाहून रामाला तिघांची आठवण होईल. '' असें म्हणून हनुमानानें रामाला तो मणि दिला. तो मणि पाहतांच रामांचा शोक दुणावला; व त्यांच्या डोळ्यांतून खळखळ अश्रुधारा वाहूं लागल्या.त्या मण्याला आपल्या हृदयाशीं धरून राम सुग्रीवाला म्हणाले:—'' सुग्रीवा, ज्याप्रमाणें वत्स पाहताच धेनूला पान्हा फुटतो, त्याप्रमाणें या रत्नास पाहून माझें हृदय वाहूं लागलें आहे.हा मणि माझे सासरे जनक यांनीं सीतेला लग्नाच्या वेळेस दिला. तो तिच्या डोकीवर नेहमीं शोभा देत होता.तो मणि आज मला दिसतो आहे,पण मला सीता दिसत नाहीं. एक महिनाभर तरी सीता जिवंत राहते आहे, हें मोठें दुष्कर कर्म सीता करीत आहे. माझ्यानें तर आतां सीतेविण क्षणभरही जिव धारण करवत नाहीं. मारुती,जेथें सीता आहे तेथें मला घेऊन चल. ''असें म्हणत असतां रामचंद्र मूर्च्छा येऊन खालीं पडले. तेव्हां लक्ष्मण, सुग्रीव व हनुमान् यांनीं त्यांस सांवरून धरिलें. राम शुद्धीवर येऊन पुनः म्हणाले:—'' हनुमाना,

सीता अत्यंत भीरु आहे. त्या भयंकर राक्षसिणींच्या दरडावण्यामुळें तिची काय स्थिति झाली असेल! तिचें मुख अगदीं म्लान व निस्तेज झालें असेल. हनुमाना, सीता आणखी काय म्हणाली? तिचे ते मधुर व अमृततुल्य शब्द मला आणखी सांग.'' तेव्हां हनुमान् म्हणाला:-"मी येऊं लागलों तेव्हां सीता प्रेमानें म्हणाली:-"मारुती, एक दिवस येथें विश्रांति घे, तुझ्या येथें राहण्यानें माझ्या अपार शोकाला एक दिवस तरी विसांवा मिळेल. ह्या राक्षसिणींच्या त्रासांतून एक दिवस तरी मी सुटेन. मारुती, तूं धन्य आहेस. तुला रामाचें मुखकमल उद्यां पाहावयास मिळेल.'' तेव्हां मला सीतेच्या दुःखानें कळवळा येऊन मीं म्हटलें:-"देवि सीते, माझ्या पाठीवर बैस. मी तुला आतांच या दुःखांतून सोडवून रामाचें दर्शन करवितों.'' तेव्हां ती साध्वी म्हणाली:-"मारुती, मी परपुरुषाला जाणून स्पर्श करीत नाहीं. रावणानें जबरदस्तीनें माझ्या अंगाला स्पर्श केला, त्याला माझा काय इलाज? माझे नाथ माझ्याजवळ नव्हते; त्या दुष्ट रावणाला या त्याच्या अपराधाचें शासन करून मला सोडवून रामांनीं घेऊन जावें, यांतच माझी व त्यांची धन्यता आहे. पण हनुमाना, शंभर योजनें समुद्र ओलांडून राम, लक्ष्मण व सुग्रीव येथें कसे येतील, याची मला चिंता पडली आहे.'' तेव्हां मीं सीतेचे समाधान केलें कीं, "वानरांचा राजा सुग्रीव अत्यंत बलाढ्य आहे. माझ्यासारखे पराक्रमी वीर त्याच्याजवळ शेंकडों आहेत. सुग्रीवाच्या साहाय्यानें एका महिन्याच्या आंत रामलक्ष्मण वानरसैन्यासह येऊन पुत्र-मित्र-बंधु-जनांसहित रावणाचा नाश करून तुला सोडवून घेऊन जातील. हा तूं निश्चय समज.'' याप्रमाणें सीतेला आश्वासन देऊन मी आलों आहें. तिनें आपल्या सर्वांस-लक्ष्मणांस, सुग्रीवास, सुग्रीवाच्या सरदारांस-कुशल सांगितलें आहे; व मला सोडवून न्या अशी तिनें काकुळतीनें प्रार्थना केली आहे.''

☆

# युद्ध-कांड

मारुतीची समग्र हकीकत ऐकून रामचंद्रांस अत्यंत आनंद झाला. त्यांनीं मारुतीची स्तुति करून म्हटलें:—"मारुती, तूं जें काम केलें आहेस, तें दुसरा कोणीही करूं शकला नसता. शंभर योजनें समुद्र ओलांडून जाण्याची शक्ति तुझ्याशिवाय किंवा गरुडाशिवाय दुसऱ्या कोणास आहे ? तुझ्या या कामगिरीबद्दल योग्य बक्षीस देण्यास मजजवळ कांहींच नाहीं, याविषयीं मला राहून राहून दुःख वाटतें. असो; सर्व वस्तूंहून अधिक किंमतीचा असा हा माझा हृदय-प्रदेश मी तुला देतों." असें म्हणून श्रीरामांनीं मोठ्या प्रेमानें मारुतीस आलिंगन दिलें. तेव्हां मारुतीला आपल्या कामगिरीबद्दल धन्यता वाटली. कांहीं वेळानें रामचंद्र सुग्रीवाकडे पाहून म्हणाले:—"मारुतीनें सर्वांत अत्यंत महत्त्वाचें काम केलें, पण आतां एक नवीन काळजी मला उत्पन्न झाली आहे. मारुती समुद्र ओलांडून जाईल, पण ही वानरसेना कशी जाईल, हा एक कठिण प्रश्न येऊन पडला आहे." असें म्हणून राम चिंताग्रस्त झाले. तेव्हां सुग्रीवानें विनंति केली:—"या वेळेस शोक सोडून तुम्ही क्रोधाचा अवलंब कराल, तर चांगलें होईल. कारण हालचाल न करणारे शूर पुरुषही निस्तेज होऊन जातात. याच्या उलट जे रागाचें स्वरूप धारण करतात, त्यास सर्व लोक भितात. याकरितां व्यर्थ काळजींत पडूं नका. जें जें जरूर पडेल तें तें मेहनत घेऊन करण्यास तयार व्हा. मग आपल्यास कोणतीच अडचण पडणार नाहीं. तर आतां सेनेचें प्रयाण केव्हां करावें, याची मला आज्ञा द्या." हें सुग्रीवाचें उत्साह देणारें भाषण ऐकून रामचंद्र म्हणाले:—"ही ऐन दोन प्रहरची वेळ आहे, आज उत्तराफाल्गुनी नक्षत्रही आहे; हीच वेळ निघण्यास उत्तम आहे; सैन्याचें प्रयाण याच मुहूर्तावर करावें, असें मला वाटतें. मला शकुनही चांगले होत आहेत." याप्रमाणें रामचंद्राची आज्ञा होतांच सर्व वानरसेना तयार झाली. पुढें बिनीवर नीळ, वृषभ वीर

व कुमुद हे सरदार लाखों वानर घेऊन रस्ता काढीत चालले. मागून वानरांचा राजा सुग्रीव चालला. त्याच्या मागें हनुमानाच्या खांद्यावर राम व अंगदाचे खांद्यावर लक्ष्मण असे बसून चालले. त्यांच्या बरोबर हत्तीसारखे बलवान् व मदोन्मत्त असे कोट्यावधि वानर निघाले. सैन्याच्या डाव्या बाजूवर ऋषभ व उजव्या बाजूवर गंधमादन हे सरदार होते. केसरी, पनस, गज व अर्क हे शतकोटी वानरांसहित रामाच्या पाठीवर होते. सैन्याची पिछाडी जांबवान् व सुषेण यांनीं आपल्या अस्वलांच्या सैन्यानें सांभाळली. याप्रमाणें ती अस्वलवानरांची प्रचंड सेना चालूं लागली, तेव्हां तिच्या चालण्यानें उठलेल्या धुळीनें सूर्य आच्छादित होऊन गेला. जमिनीवरून झाडांवर व झाडांवरून जमिनीवर उड्या मारीत, नानाप्रकारच्या गर्जना करीत, फुललेल्या मंजिरींचीं झाडें उपटून खांद्यावर घेत, एकमेकांना धक्के देत व हापटीत, वन्यफळें व मध खाऊन वनाचा नाश करीत; सारांश, वानरस्वभावाप्रमाणें नानाप्रकारच्या चेष्टा करीत ती कोट्यावधि वानरांची सेना चालली असतां विलक्षण देखावा दिसत होता. सह्याद्रि पर्वत ओलांडून मलय पर्वतावरून दक्षिणेकडे जातां जातां ती सेना महेंद्र पर्वतावर जाऊन पोहोंचली. तेव्हां तेथून भयंकर व अगाध समुद्र त्यांच्या दृष्टीस पडला. हजारों लाटा दगडांच्या रांगेवर येऊन धडाधड हापटत आहेत, अशा समुद्रकिनाऱ्यावर थोड्याच वेळानें ती सेना येऊन थडकली. तेव्हां रामचंद्र सुग्रीवास म्हणाले:—"सुग्रीवा, आपण शेवटीं समुद्रावर येऊन पोहोंचलों; व पूर्वी दिसलेली अडचण आतां आपल्यापुढें येऊन उभी राहिली. असो; आपल्यास येथें कांहीं दिवस मुक्काम केला पाहिजे." अशी आज्ञा होतांच सुग्रीवानें लष्करी रिवाजाप्रमाणें सैन्याचा तळ समुद्राच्या किनाऱ्यावर दिला; तेव्हां एका काळ्या पाण्याच्या समुद्राजवळ पांढऱ्या व पिंवळ्या पाण्याचा उचंबळणारा दुसरा समुद्रच उत्पन्न झाला कीं काय असें भासूं लागलें. असो; वानरसैन्याचे निरनिराळे सेनापति आपआपल्या छावणींतून किनाऱ्यावर बसून त्या अपरंपार समुद्राकडे मोठ्या काळजीनें पाहूं लागले. वर आलेल्या फेंसामुळें तो समुद्र हांसतो आहे कीं काय, असें त्यांस वाटे; व उंच उंच उसळणाऱ्या लाटांमुळें तो नाचतो आहे, असा भास होई. वर आकाश व खालीं समुद्र यांची अपरंपार जोडीच लागली होती. सागराला आकाशाची उपमा साजत होती, व आकाशाला सागराची; दोहोंचाही पार दिसत नसून दोन्ही एकमेकांना लागलीं आहेत असें दिसे. रात्रीच्या वेळीं आकाशांत तारे दिसत तर समुद्रांत

रत्नें चमकत. आकाशांत मेघांची गडबड दिसे तर समुद्रांत लाटांची दिसे; व मोठमोठ्या लाटा उठून एकमेकांवर हापटत, तेव्हां आकाशांतल्या मेघ-गर्जनेप्रमाणें भयंकर गडगडाट होई! सारांश, समुद्राचें स्वरूप आकाशासारखें दुस्तर व दुष्पार दिसे, व ते वानर किनाऱ्यावर बसून भेरीसारखा सतत नाद करणाऱ्या लाटांनीं निरंतर उचंबळणाऱ्या त्या समुद्राकडे विस्मयानें पाहात असत. (युद्ध० सर्ग १-४).

इकडे मारुती लंकेला आग लावून निघून गेल्यावर रावण सर्व प्रधानांस बोलावून, आतां पुढें काय करावें याचा विचार करूं लागला. वानरसैन्य घेऊन रामचंद्र लंकेवर स्वारी करण्याकरितां निघाले, ही खबर त्याच्या गुप्त दूतांनीं त्यास कळविलीच होती. सभेंत जमलेल्या सर्व राक्षससरदारांस रावण म्हणालाः—"सरदारहो, राम लंकेवर चालून येत आहे. तेव्हां आतां मीं काय करावें, याजबद्दल योग्य सल्ला मला द्या. या जगांत उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे तीन प्रकारचे लोक असतात. जो मनुष्य सर्वांशीं सल्ला करून दैवानुकूल्य पाहून सर्वांच्या सल्ल्यानें यत्न करितो तो उत्तम पुरुष होय. जो स्वतःच आपल्या ठिकाणीं पूर्ण विचार करून व धर्म्याधर्म्य पाहून कार्याला उद्युक्त होतो, तो मध्यम होय. जो गुणदोषांचा विचार न करितां केवळ अभिमानानें एकाद्या कार्यांत उडी घालतो, तो अधम मनुष्य होय. याकरितां मी तुमची सर्वांची सल्ला विचारतों. सल्लाही तीन प्रकारची असते. सर्वांची एकमताची सल्ला उत्तम; बहुमतानें दिलेली मध्यम; राजाची मर्जी पाहून केवळ गोड वाटण्याकरितां थोड्या लोकांनीं दिलेली सल्ला कनिष्ठ होय. तर या कठिण प्रसंगीं मला तुम्ही योग्य सल्ला द्या." हें रावणाचें भाषण ऐकून प्रहस्त—वज्रदंष्ट्र वगैरे सरदारांनीं हात जोडून, गर्जना करून व रावणाच्या पूर्व पराक्रमाची त्यास आठवण देऊन म्हटलें:—"महाराज, आपल्यास भीतीचें काय कारण आहे? प्रत्यक्ष इंद्रास जिंकून बांधून आणणारा आपला पुत्र इंद्रजित रामलक्ष्मणांचा नाश करण्यास समर्थ आहे. इंद्रजित तरी कशाला पाहिजे? आम्हांस आज्ञा व्हावी, म्हणजे आम्ही पृथ्वींतून एकूणएक वानर नाहींसे करून टाकितों." याप्रमाणें सर्वांनीं रावणास लढाईची भर दिली, पण बिभीषणानें मात्र दिली नाहीं. त्यानें त्याचे डोळे उघडण्याविषयीं प्रयत्न केला. तो म्हणालाः—"गाफिल, दुर्दैवी किंवा शत्रूंनीं ग्रस्त झालेल्या शत्रूवर पराक्रमाचा कांहीं तरी परिणाम होईल. पण जो नेहमीं

जागृत आहे, ज्याचें दैव अनुकूल आहे, ज्याला सुग्रीवासारखे बलवान् सहाय्य आहेत, त्या रामापुढें तुमचें कांहीं चालणार नाहीं. याशिवाय, जिकडे धर्म तिकडे जय. राम धर्मानें लढतो आहे तेव्हां त्याजवर तुमच्या शौर्याचा मुळींच उपयोग व्हावयाचा नाहीं. याकरितां अधर्मानें आणलेली सीता परत द्यावी आणि अनर्थाचें व कलहाचें मूळच काढून टाकावें, हें मला योग्य दिसतें. जोंपर्यंत रामाचे बाण या संपन्न व सुखी नगरीवर येऊं लागले नाहींत, तोंच रामाची सीता त्याला परत देऊन सर्वांनीं निर्भय व्हावें, हेंच श्रेयस्कर आहे, असें माझें स्पष्ट मत आहे." हें स्वार्थरहित, नीतियुक्त दूरदर्शित्वाचें बिभीषणाचें भाषण ऐकून रावण स्तब्ध झाला, व किंचित् विचार करून सभा बरखास्त करून तो अंतःपुरांत निघून गेला. दुसरे दिवशीं बिभीषणानें पुनः राजवाड्यांत जाऊन रावणाचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. तो म्हणालाः--"सभेंत मला आग्रहानें सांगतां आलें नाहीं. परंतु बंधु या नात्यानें मी हात जोडून प्रार्थना करितों कीं, आपण दुराग्रह सोडा. या दुराग्रहानें सर्व राक्षसांचा नाश होईल. सामोपचारानें सीता रामास परत द्यावी, हेंच मला योग्य दिसतें." रावणानें त्याचें भाषण मनावर घेतलें नाहीं, व राम म्हणजे यःकश्चित् मनुष्य तो माझ्यापुढें उभासुद्धां राहूं शकणार नाहीं, असें सांगून बिभीषणास परत पाठविलें. तथापि रावण काळजींत पडला व दिवसेंदिवस कृश होऊं लागला. शेवटीं त्यानें पुनः एकदां सर्व राक्षसांची सभा बोलाविली. सुवर्णाच्या खिडक्यांनीं व रत्नांच्या भूषणांनीं सुशोभित केलेल्या रथांत बसून तो सभेंत आला. तेव्हां हजारों नगाऱ्यांच्या आवाजानें दिशा भरून गेल्या. सभेंत येऊन रत्नखचित सिंहासनावर बसून रावणानें बोलण्यास आरंभ केलाः—"धर्म, अर्थ, काम यासंबंधीं जेव्हां कठिण प्रसंग मजवर येनात, तेव्हां माझें सुखदुःख, लाभहानि, प्रियाप्रिय पाहणें तुमच्याकडे आहे. सुदैवानें माझा प्रिय बंधु कुंभकर्ण सहा महिन्यांच्या झोपेंतून जागा होऊन आज येथें आला आहे. तुमच्या सर्वांच्या साहाय्यानें मीं देवांनासुद्धां जिंकलें आहे. मग रामलक्ष्मण वानरांचें सैन्य घेऊन येत आहेत, त्यांची मला भीति काय ? तथापि एक यःकश्चित् वानर समुद्र ओलांडून, लंकेंत येऊन, सीतेशीं संभाषण करून, येथें प्रळय करून गेला. तेव्हां केव्हां काय होईल, याचा नेम नाहीं. तर या प्रसंगीं मीं काय करावें याचा मला योग्य सल्ला द्या. दंडकारण्यांतून मीं सीता हरण करून आणिली,

तो परत न देतां रामलक्ष्मणांचा पराभव कसा करतां येईल, याजविषयींचा विचार करा.'' हें भाषण ऐकून कुंभकर्ण क्रोधानें म्हणाला:—“राजा, हें दुष्ट कर्म करण्यापूर्वी तूं आमची सल्ला घेतली असतीस, तर बरें झालें असतें. जो राजा न्यायाने वर्तन करतो त्याजला कधींही संताप व पश्चात्ताप करण्याचें कारण पडत नाहीं. हें निंद्य कर्म करीत असतां रामानें तुझा वध केला नाहीं, हेंच तुझें नशीब समज.'' याप्रमाणें नीतीचें भाषण करून कुंभकर्ण किंचित् थांबून म्हणाला:—“असो, आतां जें झालें तें झालें; आतां तूं निष्काळजी ऐस; तुझ्या शत्रूचा मी नाश करतों. मग प्रत्यक्ष इंद्र असो अगर सूर्य असो. माझ्या या प्रचंड हातानें मारलेल्या त्रिशूळापुढें उभें राहण्याची या जगांत कोणाचीही छाती नाहीं.'' कुंभकर्णाचे हे वीरश्रीचे शब्द बिभीषणास आवडले नाहींत; त्यानें हात जोडून रावणास पुनः म्हटलें:—“ महाराज, तुम्ही उगीच भ्रमांत पडूं नका. मी आपणांस पुनः विनंति करतों कीं, राम धर्मानें लढत आहे. तेव्हां त्यापुढें कुंभकर्णाचेंही कांहीं चालावयाचें नाहीं. याकरितां हा युद्धाग्नि पेटण्यापूर्वी रामाची धर्मपत्नी त्यास परत देऊन टाकावी हें बरें.'' हे ऐकून इंद्रजित् क्रोधानें व गर्वानें म्हणाला:—“ मीं प्रत्यक्ष इंद्राला बांधून आणलें आहे, हें तुला ठाऊक आहे. आम्हां सर्वांचा पराक्रम माहीत असून, आम्हांस एका क्षुद्र मनुष्याच्या पराक्रमानें तूं भिववूं पाहातोस हें मोठें आश्चर्य आहे!'' बिभीषणाने इंद्रजिताचा धिक्कार करून उत्तर दिलें:—“ मूर्खा, तूं अद्याप मूल आहेस. तुला सभेंत सल्ला देण्याची अद्याप योग्यता आली नाहीं. पुत्ररूपानें तूं रावणाचा शत्रूच उत्पन्न झाला आहेस, असें मला वाटतें. अरे, ब्रह्मदण्डासारखे किंवा अंतकासारखे प्राण हरण करणारे रामाचे बाण सहन करण्याचें कोणाचें सामर्थ्य आहे? खर, दूषण, मारीच, सुबाहु, यांची काय गत झाली याचा विचार करा आणि रत्नादिकांनीं सत्कार करून रामाची सीता रामास परत द्या; यांतच तुमचें कल्याण आहे.'' रावण केवळ काळाच्या जबड्यांत सांपडला होता; त्याला हें बिभीषणाचें भाषण कोठून रुचणार? तो निर्भर्त्सनायुक्त वाणीने बिभीषणास म्हणाला:— “ सापाप्रमाणें क्रुद्ध झालेल्या शत्रूंशीं सहवास करणें शक्य आहे, परंतु बाहेरून मित्र व आंतून शत्रु अशा मनुष्याचा सहवास कठिण आहे. राक्षस जातीचें हें शील सर्वत्र प्रसिद्ध आहे कीं, एकाला संकट आलें म्हणजे दुसऱ्याला आनंद

वाटते ! एकमेकांच्या संकटानें आनंद पावणारे, वाटेल तें कर्म करण्यास प्रवृत्त होणारे, हृदयांतील गुप्त भाव चोरून ठवणारे, असे ज्ञातिबंधूच नेहमीं भयंकर असतात. हातांत दोरखंडाचे फास घेऊन येणाऱ्या मनुष्याकडे पाहून पद्मवनांतील हत्तींनीं गाइलेले श्लोक मला या वेळेस आठवतात. ते म्हणाले:— "आम्हांला अग्नीची भीति नाहीं, शस्त्रांची भीति नाहीं, किंवा या दोऱ्याच्या फासांचीही भीति नाहीं. परंतु घोर हृदयाच्या व स्वार्थाकरितां दुसऱ्याचा नाश करण्यास प्रवृत्त होणाऱ्या या आमच्या ज्ञातिबंधूंचीच आम्हांस भीति वाटते." अनार्यावर केलेले उपकार कमलाच्या पानावर पडलेल्या जलाप्रमाणें सहज गळून पडतात. बिभीषणा; तूं बोललास हे शब्द जर दुसरा कोणी बोलला असता, तर त्याचा तात्काळ मीं शिरच्छेद केला असता. परंतु तूं माझा बंधु आहेस. 'तूं कुलकलंक आहेस,' एवढ्याच शब्दांनीं मी तुझा धिक्कार करतों." हें रावणाचें कठोर भाषण ऐकतांच बिभीषण आपल्या हातांतल्या गदेसह आपल्या चार मित्रांसहित आकाशांत उड्डाण करून तेथून रावणास म्हणाला:—" राजा, तूं भ्रमिष्ट होऊन मला वाटेल तसें बोलतो आहेस, तर बोल. तूं माझा ज्येष्ठ बंधु आहेस, तेव्हां मला पित्याप्रमाणें तूं पूज्य आहेस. परंतु तूं धर्माचा मार्ग सोडून दिला आहेस. ज्यावर काळाची छाया पडते त्यास नीतीचें व हिताचें भाषण गोड लागत नाहीं. प्रिय बोलणारीं मनुष्यें पुष्कळ मिळतात, परंतु कडू पण हिताची गोष्ट सांगणारे दुर्लभ असतात व तशी गोष्ट ऐकणारे तर त्याहून दुर्लभ असतात. असो; आतां सर्व उपायांनीं तूं आपलें राक्षसांनीं भरलेल्या या नगराचें रक्षण कर. मी तुझ्या म्हणण्याप्रमाणें तुला सोडून जाऊन तुला सुखी करतों." असें म्हणून बिभीषण तात्काळ आकाशमार्गानें ज्या ठिकाणीं रामचंद्र समुद्राच्या किनाऱ्यावर उतरले होते, तेथें आला. (युद्ध० स० ५-१६.)

उत्तम अलंकार घातलेले व गदा, खड्ग इत्यादि आयुधें घेतलेले पांच प्रचंड राक्षस आकाशांत आलेले पाहतांच वानरसैन्यांत गडबड उडाली. सर्व वानरवीर त्यांजकडे क्रोधानें पाहूं लागले. तेव्हां बिभीषण आकाशांतून ओरडून म्हणाला:—"वानरांनो, राक्षसांचा दुराचरणी राजा रावण याचा मी धाकटा भाऊ बिभीषण आहें, व हे चार राक्षस माझे मित्र व अनुयायी आहेत. रामाची हरण करून आणलेली सीता रामास परत द्यावी, अशी मीं वारंवार

रावणास विनंति केली. परंतु मरणाऱ्याला जसें औषध रुचत नाहीं, त्याप्रमाणें ती गोष्ट त्याला रुचली नाहीं; इतकेंच नाहीं तर त्यानें माझा धिःकार करून अपमान केला. याकरितां मी आपल्या चार अनुचरांसह घरदार व बायकापोरें वगैरे सर्व सोडून रामाला शरण आलों आहें. रामाला माझी हकीकत लवकर कळवा." हें भाषण सर्वांनीं ऐकलें. तेव्हां सुग्रीव रामास म्हणाला:–" हा आपल्या शत्रूकडील मनुष्य अतर्कित रीतीनें येथें आला आहे. याला आपल्या सैन्यांत विश्वासानें घेतल्यास जसा कावळ्यांत घुबड शिरून त्यांचा नाश करितें, तसा हा आपला नाश करील. हे राक्षस पाहिजे तेव्हां अदृश्य होतात. पाहिजे तेव्हां पाहिजे ते रूप धरतात. हे महाक्रूर असतात. तर यांजवर विश्वास ठेवूं नये." सुग्रीवाचें हें भाषण ऐकून रामचंद्र म्हणाले:— " यांत एक सूक्ष्म गोष्ट आहे, ती मला वाटतें, मीं तुला सांगितली पाहिजे. हा बिभीषण माझ्याकडे मित्रभावानें आलेला आहे, सबब मला हा ग्राह्य वाटतो." तेव्हां सुग्रीवानें उत्तर केलें:–" हा मित्रभावानें आलेला दिसत नाहीं. कारण असा कोणता दुष्ट बंधु असेल, कीं, जो आपल्या भावाला संकटसमयीं सोडून देईल. आणि असा जर हा दुष्ट असेल तर ज्याचा हा आश्रय करील त्यालाही वाटेल त्या वेळीं हा सोडून जाईल. " सुग्रीवाचें हें बुद्धिमत्तेचें भाषण ऐकून रामचंद्र म्हणाले:–"सुग्रीवा, तूं म्हणतोस तें खरें आहे. पण याहूनही एक सूक्ष्म विचार आहे. या जगांत मुख्यतः दोन प्रकारचे शत्रु असतात. एक आपले ज्ञातिबंधु व एक आपले शेजारी. दोघांचाही स्वभाव हाच कीं, आपल्यावर संकट आलें कीं, त्या वेळेस हे आपल्यावर प्रहार करितात. याच न्यायाला अनुसरून बिभीषण येथें आला आहे. आम्ही रावणाचे ज्ञातिबंधु नाहीं व बिभीषण राज्याकांक्षी असून बुद्धिमान् दिसतो, म्हणून तो येथें आला आहे. याशिवाय जोंपर्यंत ज्ञाति एकमत आहेत, तोंपर्यंत त्या दक्ष व आनंदांत असतात. परंतु परस्परांस परस्परांचें भय उत्पन्न झालें, म्हणजे त्यांच्यांत कलह होतो व मग त्यांच्यांत फुटाफूट होते. याच स्थितींत बिभीषण येथें आला आहे. तें कसेंही असो, बिभीषण दुष्ट असो किंवा सुष्ट असो, तो माझें यत्किंचितही नुकसान करूं शकणार नाहीं. मी एका अंगुलीनें त्याचा नाश करीन. पण कण्वपुत्र कंडु महर्षि यांचें असें वचन आहे:–"हात जोडून व दीन होऊन शरण आलेल्या मनुष्यास—मग तो प्रत्यक्ष शत्रु का असेना-प्रहार करूं नये. यांतच कारुण्य आहे. निश्चयी व पराक्रमी लोक आपला प्राणही

खर्च करून आर्त किंवा गर्विष्ठ अशा आपल्या शरण आलेल्या शत्रूचेंही रक्षण करितात. " शिवाय शरणागताचें रक्षण न करणें हें महादोषाचें स्थान असून यशाला कलंक आणणारें व वीर्याची हानि करणारें आहे. तर सुग्रीवा, शरणागताला मीं अभय दिलें आहे; त्याचा त्याग करूं नको, मग तो बिभीषण असो किंवा प्रत्यक्ष रावणही असो. " हे शब्द ऐकून सुग्रीवानें रामचंद्राला सुहृत्प्रेमानें उचंबळलेल्या अन्तःकरणानें म्हटलें:—" रामचंद्रा, आपण सर्व लोकनाथांचें शिरोभूषण आहां तेव्हां आपलें या प्रकारचें उदात्त आचरण आहे, यांत आश्चर्य तें कोणतें ? माझाही अंतरात्मा बिभीषण शुद्ध आहे, असेंच सांगतो; आणि अनुमानावरून व बिभीषणाच्या प्रसन्न मुद्रेवरून हेंच दिसतें. तेव्हां माझी मुळींच हरकत नाहीं. बिभीषणाला आपण आमच्या बरोबरीनें आपल्या मित्रगणांत जागा द्या. " नंतर सुग्रीवामार्फत अभय मिळतांच बिभीषण आपल्या अनुयायांसह आकाशांतून खालीं उतरला व नम्रतेनें रामाच्या पायांवर डोकें ठेवून म्हणाला:—" मी रावणाचा धाकटा बंधु आहे. त्यानें माझा अपमान केल्यामुळें सर्व भूतांचें शरणस्थान, अशा तुम्हांस मी शरण आलों आहें. मीं लंका, मित्र, धन वगैरे सर्व कांहीं सोडून दिलें आहे. आतां यापुढें माझें जीवित, माझें सुख, माझें राज्य, सर्व तुमच्या हातांत आहे. " तेव्हां रामचंद्रांनीं बिभीषणाकडे पूर्ण दृष्टीनें—जणूं काय ते त्याला नेत्रद्वारें पिऊनच टाकीत आहेत अशा तऱ्हेनें—पाहून म्हटलें:—" बिभीषणा, राक्षसांचें बल काय आहे, तें मला सांग. " तेव्हा बिभीषणानें उत्तर केलें:— " रामा, रावण हा देव, दानव, पिशाच्च, पक्षी यांना अवध्य आहे. त्याला ब्रह्मदेवाचा असा वरच मिळाला आहे. त्याचा धाकटा बंधु कुंभकर्ण हा इंद्रासारखा प्रतापी आहे. रावणाचा सेनापति प्रहस्त तुम्हीं ऐकलाच असेल. त्यानें कैलासपर्वतावर कुबेराचा सखा मणिमान् याचा पराभव केला. रावणाचा पुत्र इंद्रजित् हातांत अंगुलित्राण घालून, अवध्य कवच अंगावर चढवून व धनुष्यबाण घेऊन अदृश्य होतो; आणि शत्रूंस जर्जर करितो. संग्राम सुरू झाला असतां अग्नीला होम दिला म्हणजे इंद्रजित् अदृश्य होतो आणि मग शत्रूंवर बाणांचा असह्य भडिमार करतो. याशिवाय महोदर, महापार्श्व, अकंपन, अनीकपा इत्यादि रावणाचे लोकपालांसारखे बलाढ्य सरदार आहेत. यांशिवाय १० सहस्र कोटि, पाहिजे तें रूप धारण करणारे व रक्त, मांस खाणारे राक्षस लंकानगरींत राहतात. या सर्वांच्या साहाय्यानें रावणानें लोकपालां-

सहित देवांना जिंकिलें आहे." राम म्हणाले:-" बिभीषणा, रावणाचें जें सामर्थ्य तूं वर्णन केलेंस तें मला माहीत आहे. ह्या अशा रावणाला प्रहस्त-इंद्रजितांसह ठार मारून मी तुला लंकेच्या राज्यावर बसवीन, ही गोष्ट निश्चित समज. यांत तिलप्राय असत्य होणार नाहीं." हें ऐकून बिभीषणानें रामाच्या चरणांवर पुनः मस्तक ठेऊन नमस्कार केला आणि म्हटलें:—"मी तुम्हांस लंकेवर हल्ला करून राक्षसांचा नाश करण्याच्या कामीं जिवापाड साह्य करीन; आणि समरांगणांत शत्रुसैन्याशींही लढेन." असे म्हणत असतां रामानें बिभीषणास आलिंगन दिलें, आणि प्रेमानें लक्ष्मणास म्हटलें:— " लक्ष्मणा, आण, आतांच समुद्राचें जल आण. मी या वेळेस बिभीषणावर पूर्ण प्रसन्न झालों आहें. याला लंकेच्या राज्याचा अभिषेक आतांच करतों." रामाच्या आज्ञेप्रमाणें लक्ष्मणानें सुवर्ण कलशांत समुद्राचें जल आणिलें आणि रामानें बिभीषणास राज्याभिषेक केला. तेव्हां सर्व वानर, 'धन्य राजा रामचंद्र' असें म्हणून रामाच्या औदार्याची स्तुति करूं लागले. नंतर राम, लक्ष्मण, सुग्रीव, बिभीषण, अंगद, हनुमान इत्यादि वानरसरदारांसह समुद्र कसा ओलांडावा या गोष्टीचा विचार करण्यास बसले. (युद्ध० सर्ग १७-१९).

रामाच्या पूर्वजांनीं समुद्राला खणून उत्पन्न केलें आहे, तेव्हां समुद्र रामास सेतु बांधण्यास ठाव देईल; रामानें समुद्राची प्रार्थना करावी अशी बिभीषणानें सल्ला दिली. ती सर्वांस पसंत पडून रामचंद्रांनीं पूर्वाभिमुख होऊन जमिनीवर पूर्वाभिमुख दर्भ पसरून, त्यांजवर समुद्रास नमस्कार करून शयन केलें. याप्रमाणें तीन रात्री गेल्या; परंतु समुद्रानें दर्शन दिलें नाहीं. व्रत धारण करून तीन दिवस प्रार्थना केली, तरीही हा उन्मत्त सागर दर्शन देत नाहीं, तेव्हां सामाला कोणीच भीक घालीत नाहीं, उग्र दंड धारण करणाऱ्याचाच सर्व लोक सत्कार करितात, हेंच खरें. असा विचार करून रामचंद्रानें धनुष्यास दोरी लावून तें ओढलें, व बाण योजून ब्रह्मास्त्रानें तो अभिमंत्रित करून समुद्राचें शोषण तेणेंकरून करून टाकलें म्हणजे हे वानर पायींच जमिनीवरून पलीकडे जातील, असें म्हणून त्यानें समुद्रावर बाणाचा नेम धरिला. त्या वेळेस आकाश व पाताळ हीं फुटतात कीं काय, असें वाटूं लागलें. पर्वत कांपूं लागले. सूर्यचंद्र आतां पडतात असें भासलें. चोहोंकडे अंधकार झाला. इतक्यांत समुद्राच्या मध्यांतून एक देदीप्यमान् पुरुष बाहेर पडला. त्याच्या अंगावर रत्नांचे अलंकार होते; तोंड फाडलेले भयंकर सर्प

त्यांच्या चोहों बाजूंना पाण्याच्या बाहेर दिसत होतें. त्या सागरानें रामास हात जोडून म्हटलें:—"रामा, पृथ्वी, जल, अग्नि, वायु व आकाश हीं महाभूतें परमेश्वरानें लावून दिलेल्या मार्गानें जात असून तीं आपला स्वभाव टाकीत नाहींत. माझाही हाच स्वभाव आहे कीं, माझा ठाव लागावयाचा नाहीं. जेथें ठाव लागतो, तो माझा विकार आहे. रामा, हें मीननक्रादिकांनीं भरलेलें जल मीं क्रोधानें, लोभानें, भीतीनें किंवा प्रीतीनें नाहींसें करून टाकूं शकत नाहीं. तथापि दुःख सोसूनही मी तुझी पलीकडे जाण्याची व्यवस्था करतों. माझे नक्र वानरसेनेला त्रास देणार नाहींत. या सैन्याला मी जमिनीसारखी वाट करून देतों. हा नल विश्वकर्म्याचा पुत्र आहे. याला सेतु बांधण्याची आज्ञा व्हावी; यानें बांधलेला सेतु मी आपल्या देहावर धारण करीन." याप्रमाणें समुद्रानें वाट देण्याचें कबूल केलें, तेव्हां रामचंद्र म्हणाले:—"हा बाण ओढला आहे, तो कोठें टाकूं? माझा बाण फुकट जाणार नाहीं." तेव्हां सागरानें विनंति केली कीं, "माझा एक द्रुमकुल्य म्हणून पुण्यभाग उत्तरेकडे आहे. तेथें पापाचरण करणारे दस्यु मला नेहमीं संसर्गानें दूषित करतात; त्या देशावर हा बाण टाक." तेव्हां रामानें त्या देशावर बाण टाकतांच तो सर्व मरुदेश झाला. त्या देशांतलें सर्व जल शोषून गेलें. मात्र जेथें बाण लागला तेथें एक कूप उत्पन्न होऊन त्यातून पाणी अमोघ वाहूं लागलें. तो 'व्रण' नांवाचा कूप अद्यापि तेथें आहे. त्या देशांतलें जल आपल्या बाणामुळें नाहींसें झालें, म्हणून रामांनीं त्या देशाला असा वर दिला कीं, येथें पशु पुष्कळ व चांगले होतील, रोगराई कमी होईल, तीळ वगैरे गळिताचीं धान्यें पुष्कळ येतील, गाईम्हशींना दूध पुष्कळ राहील, नानाप्रकारचीं सुगंधी द्रव्यें, औषधि, फलमूलें व रस तेथें पुष्कळ होतील. याप्रमाणें रामाचा वर मिळाल्यामुळें मारवाड देश जरी जलहीन आहे, तरी संपन्न व आनंदांत आहे. असो. समुद्र अंतर्धान पावल्यावर नलानें हात जोडून रामाला विनंति केली, "समुद्रानें ज्याअर्थी ठाव दिला आहे, त्याअर्थी मी सेतु बांधण्यास तयार आहें. मी विश्वकर्म्याचा पुत्र असून मजला त्याच्या वरानें ही विद्या अवगत झाली आहे. मी होऊन आपल्या तोंडानें आपलें वर्णन काय करावें, म्हणून आतांपर्यंत मी बोललों नाहीं. असो, आतांच वानरांना वृक्ष, लता, पाषाण, आणण्यास आज्ञा व्हावी, म्हणजे सेतु तयार करतों." रामाची आज्ञा होतांच कोट्यावधि वानर धांवले व अरण्यांतून लाखों वृक्ष मोडून व लता

उपटून भराभर आणून टाकूं लागले. हत्तीसारख्या शिला यंत्रांनीं ओढून आणून भराभर समुद्रांत टाकीत, तेव्हां समुद्राचें पाणी आकाशाला लागून पुनः खालीं पडे. हत्तीसारखे कोट्यवधि वानर या कामाला लागल्यावर मग काय कमी पडेल ? पहिल्या दिवशीं चौदा योजनें लांब सेतु तयार झाला, दुसऱ्या दिवशीं वीस, तिसऱ्या दिवशीं एकवीस, चौथ्या दिवशीं बावीस आणि पांचव्या दिवशीं तेवीस, याप्रमाणें पांच दिवसांत शंभर योजनें लांब आणि दहा योजनें रुंद असा तो नलसेतु तयार झाला आणि आकाशांत जशी गंगा दिसते त्याप्रमाणें तो त्या समुद्रावर दिसूं लागला. नंतर बिभीषण पुढें जाऊन शत्रूच्या तोंडावर उभा राहिला; व मागून ती वानरसेना रामाला, लक्ष्मणाला व सुग्रीवाला पुढें करून सेतूवरून समुद्राच्या पार होऊं लागली. कोणी सेतूवरून पाण्यांत उडी टाकीत, तर कोणी आकाशांतून जात. याप्रमाणें वानरस्वभावाला अनुरूप क्रीडा करीत तो वानरांचा सागर सेतूवरून चालला असतां एवढा मोठा समुद्राच्या गर्जनेचा आवाज, परंतु तोही सैन्याच्या गोंगाटामुळें ऐकूं येईनासा झाला. सेना पार झाल्यावर सुग्रीवानें चांगलें पाणी व फळेंमुळें यांची विपुलता पाहून तेथें सेनेचा तळ दिला. तों लंकेंतून भेरी–मृदंगांचा आवाज ऐकूं येऊं लागला. तो सहन न होऊन वानरसैन्यानें एक आवेशाची गर्जना केली. तिनें आकाश व पृथ्वी भरून गेली, व लंकेंतील राक्षसांच्याही कानांवर ती गर्जना जाऊन आदळली. ( युद्ध० सर्ग० २०–२३ ).

सैन्याचा तळ टाकिल्यावर राम, लक्ष्मण, सुग्रीव व बिभीषण, अंगद, हनुमान वगैरे सरदारांसह सुवेलाशिखरावर चढून लंकेचें निरिक्षण करूं लागले; तों सुंदर राजवाड्यांनीं भरलेली, सोन्याच्या कोटानें वेष्टिलेली व सुंदर बागांनीं सुशोभित झालेली ती नगरी पर्वताच्या शिखरावर जणूं काय आकाशांत असलेल्या त्रिपुरनगरासारखी शोभिवंत दिसूं लागली. तेव्हां रामलक्ष्मणांस मोठा आनंद झाला. परंतु याच पुरींत त्या दुष्टानें सीतेला राक्षसिणींच्या पाहऱ्यांत ठेविलें आहे, हें मनांत येऊन रामाला दुःखानें व कोपानें घेरून टाकिलें. परंतु धैर्यानें आपलें दुःख गिळून लंकेला कोणत्या तऱ्हेनें वेढा दिला पाहिजे, या गोष्टीचा विचार ठरवून राम सैन्यांत परत आले. समुद्रावर सेतु बांधून वानरसैन्य समुद्र उतरून अलीकडे आल्याची खबर रावणाला लागलीच होती. वानरांची सेना किती आहे व त्या सेनेची

तयारी कशी आहे, रामाचीं आयुधें काय आहेत व रामलक्ष्मणांचें स्वरूप कसें आहे हें पाहण्यासाठीं शुक व सारण नांवांचे राक्षसहेर रावणानें पाठविले होते. ते वानरांच्या रूपानें सैन्यांत फिरत असतां बिभीषणानें त्यांस ओळखलें; तेव्हां रामांनीं तुमचें कार्य झालें, तुम्ही जा, असें म्हणून त्यांस सोडून दिलें! त्यांनीं रावणास जाऊन विनंति केली, " राजा, वानरांचें सैन्य अपरंपार आहे, व त्यांत एकाहून एक बलाढ्य असे वानरवीर सहस्रशः आहेत. राम, लक्ष्मण, सुग्रीव, बिभीषण हे चार लोकपालकासारखे पराक्रमी पुरुष जेथें एकत्र झाले, तेथें राक्षसांचा काय टिकाव लागणार आहे? याकरितां रामाला सामोपचारानें सीता द्यावी, हेंच आम्हांला सयुक्तिक वाटतें." रावणानें त्यांची निर्भर्त्सना केली व त्यांस घेऊन तो आपल्या अत्यंत उंच प्रासादावर चढला. तेथून पर्वताग्रापासून थेट समुद्रापर्यंत पसरलेलें वानर-सैन्य निरखून पाहून त्यानें सारणाला वानरसेनापतींचीं नांवें विचारलीं. सारण हातानें दाखवीत म्हणालाः—" हा वानरसैन्याच्या बिनीवर अग्निपुत्र नील आहे. त्याच्या मागें अंगद, हा सेतु बांधणारा विश्वकर्म्याचा पुत्र नल हा कुमुद, हा संरभ, हा शरभ, हा पनस, हा विनत, हा क्रथन; हे अस्वलांचे राजे धूम्र व जाम्बवान्, रंभ, सत्तादन, क्रथन, क्रमाथी, गालांगूल, गवाक्ष, केसरी, शतबली, हे यमाचे पांच पुत्र गज, गवाक्ष, यवज, शरभ व गंधमादन; हा धर्मपुत्र सुषेण, हा सोमपुत्र दधिमुख, हे अश्विनीकुमाराचे पुत्र मैंद व द्विविद आणि हा वायूचा पुत्र हनुमान्. याप्रमाणें सर्व वानरसरदार दाखवून सारणानें श्यामवर्ण, सुमुख, कमलनेत्र, सिंहस्कंद अशा रामचंद्रास दाखविलें; व त्याच्या भोंवतीं उभे असलेले लक्ष्मण, बिभीषण व सुग्रीव दाखविले. एकंदर वानरांची संख्या शंकु, महाशंकु, वृंद, पद्म, खर्व, महाखर्व, समुद्र, महौघ, यांच्याही पलीकडे असल्याचें त्यानें सांगितलें. तेव्हां रावण स्तब्ध झाला; व शुक, सारण, शार्दूल, इत्यादि हेरांस रजा देऊन आपल्या महा-लांत गेला. (युद्ध० सर्ग० २४–३०)

दुष्ट व कपटपटु रावणानें अंतःपुरांत जाऊन सीतेला फसविण्याच्या इरा-द्यानें रामाचें शिर व धनुष्य मायेनें निर्माण करून तीं तिला दाखविलीं; आणि तो म्हणालाः—"हे मूर्ख हट्टी स्त्रिये, राम वानरसैन्यासह समुद्र ओलांडून आला असतां त्याजवर रात्रीं माझा सेनापति प्रहस्त यानें छापा घालून

त्यास ठार मारून हें त्याचें शिर आणिलें आहे, हें पहा आणि आतां तरी तूं आपला हट्ट सोड आणि मला वश हो." तें शिर पाहून सीता अत्यंत शोक करून म्हणाली:—"रावणा, मलाही ठार मारून टाक आणि या शिरावर माझें शिर पडूं दे. हा कैकेयी! तुझें कृत्य आतां खरोखर सफल झालें. माझ्याकरितां माझे आर्यपुत्र प्राणास मुकले! मी किती तरी अभागी आहें!" इत्यादि विलाप सीता करीत असतां प्रहस्तानें येऊन रावणास विनंति केली कीं, कांहीं अत्यंत जरूरीचें काम आलें आहे, तरी आपण सभेंत यावें. तेव्हां रावण तसाच निघून गेला. त्याबरोबर तें शिरही नाहींसें झालें. 'सरमा' नांवाच्या राक्षसिणीनें, हें शिर केवळ मायामय आहे, मीं रामास सुरक्षित पाहिलें आहे, असें सांगून सीतेचें सांत्वन केलें. तेव्हां सीता म्हणाली:—"हें जर खरें आहे तर रावण आतां काय करितो आहे, हें पाहून ये." सरमेनें सूक्ष्म रूप धारण करून व सभेंतून पाहून येऊन सीतेस सांगितलें कीं, "रावणाची आई, रावणाचा आजा माल्यवान् व रावणाचे मंत्री यांनीं रावणाची विनवणी केली कीं, 'असंख्य वानर घेऊन लक्ष्मणासह राम समुद्र ओलांडून आला आहे. धर्माला सोडून तूं सीतेचें हरण करून तिला येथें आणली आहेस, ती रामास परत देऊन आपल्यावर आलेलें हें विघ्न टाळ, नाहीं तर ही सर्व राक्षसपुरी नाश पावेल', परंतु रावणानें कोणाचेंच ऐकलें नाहीं व त्यानें आपलें सर्व सैन्य जमा करण्याकरितां भेरी वाजविण्याविषयीं आज्ञा दिली." अशी ती राक्षसी बोलत आहे तों भेरींचा भयंकर शब्द ऐकूं येऊं लागला. रावणाची ती आज्ञा ऐकतांच कोट्यावधि राक्षसवीर सशस्त्र होऊन जमा झाले. मग रावणानें पूर्वदरवाजावर प्रहस्ताची, दक्षिणदरवाजावर महोदय व महापार्श्व यांची, पश्चिमदरवाजावर इंद्रजिताची, उत्तरदरवाजावर शुकसारण यांची नेमणूक करून शुकसारण यांना मदत करण्यास मी स्वतः हजर राहीन असें त्यानें सांगितलें. शिवाय मध्यम गुल्मावर विरूपाक्षाला नेमलें. याप्रमाणें रावणानें लंकेच्या संरक्षणाचा पक्का बंदोबस्त केला. इकडे बिभीषणाच्या हेरांनीं ही बातमी त्यास कळविली तेव्हा रामांनीं आपली फौज लंकेच्या भोंवतीं बसवून देऊन पूर्वेकडील दरवाजावर नील, दक्षिणेकडील दरवाजावर अंगद व पश्चिमेकडील दरवाजावर हनुमान् यांची नेमणूक करून, खुद्द आपण लक्ष्मणासहित उत्तरेकडील दरवाजावर राहिले व सर्वांस मदत करणाऱ्या सैन्याच्या विभागावर राजा सुग्रीव, अस्वलांचा राजा जांबवान्, व राक्षसांचा राजा

बिभीषण यांस नेमून दिलें आणि सर्व वानरांस आज्ञा केली कीं वानरांनीं मनुष्यरूप धरूं नये. फक्त राम, लक्ष्मण, व बिभीषण वगैरे पांच राक्षस, मिळून सात इसमांनींच मनुष्यरूपानें लढावें. याप्रमाणें व्यवस्था करून रामांनीं लंकेला चोहोंबाजूंनीं असा वेढा दिला कीं, बाहेरून आंत चिटपांखरूंसुद्धां जाईनाशें झालें. ( युद्ध० स० ३१–३७ ).

लंकेचा वेढा कायम करून राम आपल्या सरदारांना घेऊन सूर्यास्त झाल्यावर सुवेलपर्वतावर चढले, तों तेथून पूर्णचन्द्राच्या प्रकाशानें लंकेची अपूर्व शोभा दिसूं लागली, त्रिकुटाच्या शत–योजन–विस्तीर्ण शिखरावर वसलेली लंका सुवर्णाच्या तटानें व त्यांजवर उभ्या असलेल्या राक्षस रक्षकांच्या जणूं काय दुसऱ्या काळ्या तटानें विलक्षण शोभायमान दिसत होती. तटावरील राक्षसवीरांस पाहून वानरांच्या अंगांत वीरश्रीचा संचार झाला. इतक्यांत, रावण आपल्या वाड्याच्या उंच गोपुरावर उभा राहून वानरसैन्याची मांडणी पाहूं लागला. त्यास पाहतांच सुग्रीवाच्या पायाची आग एकदम मस्तकास गेली. त्यानें जें उड्डाण केलें त्याबरोबर एकदम रावणाच्या गोपुरावर गेला व रावणाची निर्भर्त्सना करून तो रावणास म्हणालाः–“ मी लोकनाथ रामचंद्राचा दास आहे. तूं आतां माझ्या तडाक्यांतून सुटणार नाहींस. ” असें म्हणून दुसरी उडी मारून त्यानें रावणाचा मुकुट खालीं पाडला ! तेव्हां रावणानें त्यास आपल्या हातांनीं धरून जमिनीवर हापटलें. परंतु तो चेंडूसारखा उठून रावणाशीं बाहुयुद्ध खेळूं लागला. एक घटकापावेतों त्या दोघां वीरांचें बाहुयुद्ध झालें. याजवर आपल्या केवळ शक्तीचा प्रभाव चालत नाहीं, असें पाहून रावण आपल्या मायेचा उपयोग करणार, इतक्यांत सुग्रीव सुटून आकाशांत उड्डाण करून पुन्हां सुवेल पर्वतावर रामचंद्रापाशीं आला. रामचंद्रांनीं त्याच्या बलाची तारीफ करून प्रीतीनें म्हटलेंः–“ सुग्रीवा, आमचे सर्वांचे प्राण अगदीं कंठांत आले होते; अशा प्रकारचे धाडस करूं नये. कारण यापासून कदाचित् अपघात होण्याचा संभव आहे. सुग्रीवा, तुला जर अपघात झाला तर मग मला माझें जीवित ठेवून काय करावयाचें आहे ? आणि सीतेला सोडवून तरी काय करावयाचें आहे ? असो, यापुढें आपण फार सावधगिरीनें वागलें पाहिजे. ” ( युद्ध० सर्ग० ३८–४० ).

सुवेल पर्वतावरून उतरून रामचंद्रांनीं लंकेच्या वेढ्याचा ठरल्याप्रमाणें बंदोबस्त करून प्रत्येक दरवाजावर कोटि कोटि वानर बसविले व आपण

स्वतः उत्तर दरवाजावर ठाणें दिलें. नंतर राजधर्माला अनुसरून व बिभीषणाचीही संमति घेऊन रामचंद्रांनीं एकवार सामाचें बोलणें करण्याकरितां रावणाकडे अंगदास पाठविण्याचा निश्चय केला व त्याला बोलावून ते म्हणालेः—“ अंगदा, निःशंक मनानें तूं या लंकापुरींत प्रवेश कर आणि बुद्धि नष्ट झालेल्या व मृत्यूच्या फेऱ्यांत सांपडलेल्या रावणाला माझा असा निरोप सांग कीं, “ राक्षसाधमा, ज्या जोरावर सीतेला मायेनें हरण करून तूं माझा उपमर्द केलास, तें बळ आतां दाखीव; त्या सीतेला घेऊन तूं जर मला शरण आला नाहींस, तर मी आपल्या तीक्ष्ण बाणांनीं लंकेंतील राक्षसांचा संहार करीन. आणि हा तुझा बंधु, धर्मात्मा राक्षसश्रेष्ठ बिभीषण, याला लंकेचें निष्कंटक राज्य देईन. तूं स्वतः पापी असून तुझ्या भोंवतीं सर्व मूर्ख जमले आहेत, असें दिसतें. कारण, त्यांना हें समजत नाहीं कीं, अधर्मानें राज्याचा उपभोग घेणें कधींही शक्य नाहीं. ” याप्रमाणें रामाचा तीक्ष्ण पण सामाचा निरोप घेऊन अंगद एकदम आकाशमार्गानें उड्डाण करून लंकेंत रावण आपल्या सभेंत बसला होता, तेथें थोड्याच वेळांत येऊन पोंचला. अनेक सचिवांसह सभेंत बसलेल्या रावणाच्या समोर जाऊन कनकांगदें घातलेल्या अंगदानें आपलें नांव सांगून रामचंद्रानें सांगितलेला निरोप त्यास अक्षरशः ऐकविला. परंतु रावण केवल मदांध झाला होता; त्यास सुबुद्धि कोठून उपजणार! त्यानें क्रोधाच्या आवेशांत आपल्या सचिवांस अंगदास पकडण्याविषयीं हुकूम केला. तेव्हां चौघे राक्षसवीर अंगदाला जाऊन बिलगले. त्या चौघांनाही घेऊन अंगदानें आकाशांत उड्डाण केलें. तेव्हां त्या त्याच्या उडण्याच्या वेगानें ते राक्षस रावणाच्या समक्ष धाडकन् खालीं पडले! अंगदानें वाड्याच्या शिखरावर चढून त्याजला इतक्या जोरानें धक्का दिला कीं, तें शिखर लागलेंच ढांसळून खालीं पडलें! रावणाच्या समक्ष त्याच्या प्रासादशिखराचा भंग करून अंगद सिंहनाद करीत आकाशांत उडाला व वानरसैन्यांत रामाच्या जवळ उतरला. तो सुरक्षित पोहोंचलेला पाहून राक्षसांनीं दुःखाचा सुस्कारा टाकिला व वानरांनीं आनंदाची गर्जना केली. आपल्या राजवाड्याचें शिखर कोसळलेलें पाहून हा मोठा अपशकून झाला असें वाटून रावणास फार दुःख झालें व तो मोठ्यानें सुस्कारे टाकूं लागला. इकडे रामानें अंगदाची सर्व हकीकत ऐकून त्याची

तारीफ केली; व लागलींच लंकेवर हल्ला करण्याविषयीं वानरांस आज्ञा केली. ( युद्ध० स० ४१ ).

रामाची आज्ञा होतांच शेंकडों अक्षौहिणी वानरदलें लंकेवर धांवलीं. तांबड्या तोंडाचे व पिंगट वर्णाचे ते असंख्य वीर हातांत कोणी दगड, कोणी दांडकीं, कोणी आपल्या शक्त्यनुरूप मोठमोठीं पर्वतशृंगें किंवा वृक्ष घेऊन जेव्हां धांवले, तेव्हां कित्येक राक्षसांच्या पोटांत धडक्या भरल्या; कित्येक आश्चर्यानें नुसतें पाहूं लागले, व कित्येक खरे वीर होते त्यांना वानरांचा आवेश पाहून युद्धाची वीरश्री चढली. चारी बाजूंनीं वानर धावले,ते कोटावर चढले. तेव्हां तो सर्व कोट वानरमय दिसूं लागला. वानरांनीं कोटाचे बुरूज मोडून टाकण्यास आरंभ केला. कित्येकांनीं कोटाच्या बाहेरचा खंदक पाण्यानें भरलेला होता, तो भरून काढण्याचा सपाटा लाविला. हत्तीसारखे मोठाले वानर कोटावरून शिळा, सोन्याचीं तोरणे व गोपुरें उपटून खालीं खंदकांत टाकूं लागले. "महाबलवान् रामाचा लक्ष्मणासह जयजयकार असो!" "प्रभु रामचंद्रासह राजा सुग्रीवाचा जयजयकार असो!" अशा आरोळ्या ठोकीत व उड्या मारीत वानरसैन्य कोटाला जाऊन बिलगलें. कोटावरच्या संरक्षक राक्षसांनीं रावणाला हल्ल्याची खबर देताच मोठ्या त्वेषानें रावणानें रणभेरी वाजविण्याचा हुकूम केला. त्याबरोबर शेंकडों भेरी दुमदुम वाजूं लागल्या, हजारों शंखांचेंही उत्साहजनक आवाज होऊं लागले, व रावणाचें सर्व सैन्य वानरांचा प्रतिकार करण्यास बाहेर पडलें. तेव्हां, अगणित वानरराक्षसांची भयंकर लढाई सुरूं झाली. नखें, दात,बुक्या, मोठाल्या खांद्या, सबंध झाडें, दगड, पाहाड इत्यादि हत्यारांनीं वानरवीर लढूं लागले व गदा, शक्ति, शूल, पट्टिश, परश्वध, धनुष्य इत्यादि हत्यारें राक्षस चालवूं लागले. प्राकारावर वानर राक्षस लढत होते. इतकेंच नव्हे तर प्राकारावर असलेले राक्षस बाहेर जमिनीवर असलेल्या वानरांशींही लढत होते. अशा तुमुल संग्रामांत रक्तमांसाच्या नद्या वाहूं लागल्या. इतक्यांत महान् वीरांचीं द्वंद्वें सुरूं झालीं. इंद्रजित व अंगद, सुग्रीव आणि प्रहस्त, निकुंभ आणि नील, वज्रमुष्टि आणि मैंद इत्यादि वानर व राक्षस–वीरांचीं भयंकर द्वंद्वयुद्धें चालूं झालीं. हजारों राक्षस यमसदनास पोहोंचले, हजारों वानरही मेले. याप्रमाणें युद्ध चालतां चालतां सूर्य अस्तास गेला. राक्षसांना रात्रीं युद्ध करण्यांत तर अधिक जोर. वानरांचाही दम अजेय होता. तेव्हां

'हा राक्षस मारला,' 'हा वानर मारला,' याप्रमाणें काळोखांत आरोळ्या ऐकूं येऊं लागल्या. रात्रींच्या समयीं काळेभिन्न राक्षस सुवर्णाच्या अलंकारामुळें व कवचामुळें दिव्य वनस्पतींसारखे चमकूं लागले. राक्षस वानरांना मारून भक्षण करूं लागले. वानर हत्तींनाही मारून हत्तीवरच्या राक्षसांना मारूं लागले. तसेंच रथाचा चुराडा करून रथ्यांनाही यमसदनास पाठवूं लागले. सारांश, ती रात्र कालरात्रीसारखी भासूं लागली. त्या अंधारांत राक्षसांनीं रामावरही हल्ला केला.परंतु रामाच्या पुढें राक्षसांचा टिकाव लागेना. आपल्या अमोघ बाणांनीं हजारों राक्षस रामांनीं ठार केले; जो जो राक्षस समोर येई, तो तो रामाच्या धनुष्याच्या अग्नींत पतंगासारखा जळून जाई.सुवर्णमुखाचे रामाचे बाण त्या काळोख्या रात्रीं आकाशांत काजव्यांप्रमाणें चमकत होते. अंगदानें इंद्रजिताचा रथ घोड्यांसह गदेनें चूर्ण केल्यावर इंद्रजित आकाशांत उडून अदृश्य झाला, व तेथून वानरसैन्यावर शरवृष्टि करूं लागला, तेव्हां चोहोंकडे हाहाःकार झाला. रामलक्ष्मणांनीं त्याच्यावर अनेक बाण सोडले, परंतु तो अदृश्य असल्यामुळें त्यांचा नेम लागेना. इंद्रजितानें नागमय बाणांनीं दोघांसही बहुतेक बांधून टाकलें. त्यानें रोषानें व गर्वानें आकाशांतून आरोळी देऊन म्हटलें:—"मी अदृश्य होऊन युद्ध करूं लागलों म्हणजे देवाधिपति इंद्रालासुद्धां माझा ठिकाणा लागत नाहीं, व तोही माझ्यावर नेम धरूं शकत नाहीं. मग तुम्हां मानवांची काय कथा ! मी तुम्हांला बाणजालानें बांधून काढून आतांच यमसदनास पाठवतों," असें म्हणून इंद्रजितानें त्यांस शेंकडों बाण मारून जखमी केलें व मोठ्या हर्षानें विजयनाद केला. रामलक्ष्मणांना सर्व देहभर बाण लागून बांधावयाची दोरी तुटली म्हणजे जसा ध्वज धाडकन खालीं पडतो, त्याप्रमाणें रामलक्ष्मण जमिनीवर मृतप्राय पडले. ज्या इंद्रजितानें इंद्रालाही जिंकलें होतें, त्यानें मर्मावर बाण मारल्यामुळें प्रथम रामचंद्र खालीं पडला; त्यामागून लक्ष्मणही पडला. तेव्हां इंद्रजिताला मोठा हर्ष होऊन रामलक्ष्मण ठार झाले, असा जयघोष करीत तो लंकेंत परत गेला. वानर मोठ्या दुःखानें रामाभोंवतीं जमले; व राक्षस, आनंदानें गर्जना करीत लंकेंत गेले. ( युद्ध० सर्ग ४२–४५ )

वृष्टि करून शांत झालेल्या मेघाप्रमाणें हजारों बाणांचा वर्षाव करून शांत झालेल्या रामास पाहून बिभीषण तेथें आला. त्याचप्रमाणें सुग्रीव, हनुमान्, अंगद, नल, नील, सुषेण, जाम्बवान् वगैरे सरदारही येऊन पोंचले.

अंगांत शरांचें जाल शिरलेलें असून त्यांतून रक्त बाहेर वाहत आहे, आणि जमिनीवर स्तब्ध व निश्चेष्ट पडलें असून श्वास मात्र मंद चालू आहे, अशी त्या राजपुत्रांची अवस्था पाहून सर्वांस अत्यंत दुःख झालें. वानरसैन्यातून दुःखाचा प्रचंड ध्वनि उठला, त्याने आकाश व पृथ्वी व्यापून टाकिली. त्या सर्वांना हे मेले, असें वाटून त्यांनीं फारच शोक केला. इतक्यात त्रिजटेसह सीतेला पुष्पकविमानात बसवून तो देखावा पाहण्यास रावणानें मुद्दाम पाठविलें व लंकेंतही रावणानें रामलक्ष्मण ठार झाल्याची दवंडी पिटाविली. आकाशांतून सीतेनें रामलक्ष्मणास जमिनीवर निश्चेष्ट पडलेले पाहून जो शोक केला, त्याचें कोठवर वर्णन करावें ? "हा कैकेयी, तूं कलहानें समग्र कुळाचा नाश केलास. सामुद्रिक लक्षण पाहणारानीं मला सांगितलें होतें कीं, तूं पुत्रवती होऊन सुवासिनी मरशील, परंतु ते सर्व भाकित आज खोटें झालें. पतीचें आपल्या अगोदर मरणें हें स्त्रीला पहिल्या प्रतीचे वैगुण्य आहे. त्यात तुम्ही पुण्यशील असून मीही पुण्य आचरण करीत आहें, असें असता तुम्ही माझ्या अगोदर स्वर्गवासी कसें झालांत ? या अभागिनीकरितां तुम्ही समुद्रावर सेतु बांधून समुद्र उल्लंघन करून आलांत; आणि या लहानशा डबक्यात कसें मृत्यु पावलात ? " याप्रमाणें सीता विलाप करूं लागली. तेव्हा त्रिजटा सीतेचें सांत्वन करून म्हणाली:—"सीते, तूं शोक करूं नकोस. याच्या लक्षणांवरून हे मेले नाहींत, असें मला वाटतें. त्याशिवाय तूं जर विधवा झाली असतीस तर तुला घेऊन हें विमान आकाशांत जातेंचना. हे वानरवीर रामलक्ष्मणांच्या भोंवतीं जमले आहेत, व पाहरा देत आहेत ते कोणालाही त्यांस स्पर्श करूं देणार नाहींत. रामलक्ष्मण मूर्च्छेतून लवकरच उठतील. " सीतेनें, 'तुझ्या तोंडांत साखर पडो.' असें म्हणून आपल्या चित्ताला धीर दिला; इतक्यांत तें विमान परतून त्रिजटेसह सीतेला पुनः लंकेंत घेऊन आलें. इकडे कांहीं वेळानें आपल्या सत्त्वाच्या बळानें रामचंद्र मूर्च्छेतून प्रथम उठले व त्याच्या नंतर लक्ष्मणही उठला. याप्रमाणें ते दोघेही बंधु जिवंत उठतांच वानरसैन्यानें आनंदाची गर्जना केली. कोट्यवधि वानर लंकेवर धांवले, तेव्हां हजारों भेरी व शंख वाजूं लागले. तो आनंदाचा आवाज लंकेंत रावणाच्या कानीं पडतांच त्याचें तोंड खाडकन् उतरलें. ( युद्ध० सर्ग०४६–५० ).

रामलक्ष्मण जिवंत होऊन पुन्हां वानरसैन्यासह लंकेवर हल्ला करीत आहेत, असें दूतांनींच येऊन रावणास सांगितलें. रावण चिंताक्रांत

झालाच होता, तो कांहीं वेळ स्तब्ध राहिला. थोड्या वेळानें त्यानें ताम्राक्ष नांवाच्या राक्षससरदारास लंकेंतून बाहेर पडून शत्रुसैन्यावर हल्ला करण्याविषयीं आज्ञा केली. ताम्राक्षाने रथांत बसून, हजारों राक्षस बरोबर घेऊन पश्चिम दरवाजानें बाहेर पडून वानरसैन्यावर हल्ला केला. तेथें मारुति त्याची वाट पाहातच होता. मारुतीच्या वानरांनीं ताम्राक्षाच्या सैन्यावर जोराचा हल्ला केला व ताम्राक्षावर खुद्द मारुती चालून गेला. मारुतीस पाहताच ताम्राक्षानें क्रोधानें जी गदा फेंकून मारिली ती मारुतीच्या डोक्यावर जोरानें लागली. परंतु त्या गदाप्रहाराचा यत्किंचितही गुमान न करितां मारुतीनें एक मोठा पाषाण उचलून ताम्राक्षाच्या रथावर टाकला. त्या पाषाणानें ताम्राक्ष रथासहित चूर्ण होऊन जमिनीवर गतप्राण पडला. तेव्हां त्याचे राक्षस लंकेंत परत फिरले, आणि त्यांनीं रावणाला सर्व वर्तमान जाऊन सांगितलें. रावणानें क्रोधानें वज्रदंष्ट्र नांवाचा महशूर राक्षससरदार होता, त्यास लंकेबाहेर पडून वानरांवर हल्ला करण्याची आज्ञा केली. त्यानें दक्षिण दरवाजानें बाहेर पडून एकदम अंगदावर चाल केली. वानरसैन्याची व राक्षसांची भयंकर लढाई झाली. अंगदानेंही हनुमानासारखा पराक्रम करून लवकरच वज्रदंष्ट्राला यमसदनाला पाठविलें. आपला नायक पडला हें पाहून राक्षससैन्य लंकेंत माघारें पळालें. रावणास तें वर्तमान कळतांच दांत ओंठ खाऊन राक्षसांचा सेनापति प्रहस्त याजला त्यानें अकंपनाला शत्रुसैन्यावर पाठविण्याविषयीं आज्ञा केली. याप्रमाणें अकंपन सैन्यासह निघाला तो पुनः पश्चिम द्वारानें बाहेर पडला व हनुमानाच्या तावडींत सांपडला. हनुमानानें एक वृक्ष उपटून इतक्या जोरानें त्याच्यावर प्रहार कला कीं, अकंपनाचें मस्तक सहस्रधा फुटून गेलें! अकंपनाचाही याप्रमाणें निकाल लागलेला ऐकून रावणानें खास प्रहस्त सेनापतीसच बाहेर पडण्याची आज्ञा केली. मणिमानास जिंकणारा, महाबलाढ्य प्रहस्त सेनापति, लक्षावधि राक्षस चार सरदारांच्या सेनापत्याखालीं बरोबर घेऊन, रथांत बसून बाहेर पडला. तेव्हां सर्व वानरसेना बहुतेक एकत्र झाली. रामांनीं बिभीषणाला हा उंच व प्रचंड राक्षस कोण आहे म्हणून विचारलें. तेव्हां हा रावणाचा खास सेनापति प्रहस्त बाहेर पडला आहे, असें त्यानें सांगितलें. प्रहस्त पूर्व दरवाजानें बाहेर पडला होता, म्हणून लढाईचा सर्व मारा नीलावर पडला. राक्षसवानरांचें तुमुल युद्ध होऊन रक्ताच्या नद्या वाहिल्या. दोन्ही बाजूंकडील असंख्य वीर पडले. परंतु

नीलानें शेवटीं प्रहस्ताला यमसदनासच पाठविलें, व त्याचे चार सरदारही लढाईत मारले गेले. जिवंत राहिलेले राक्षस भयानें पळून लंकेत गेले व त्यांनीं रावणाला सर्व हकीकत सांगितली. तेव्हां क्रोधानें नेत्र आरक्त करून, हातावर हात पिळून 'मीच बाहेर पडून रामलक्ष्मणांचा समाचार घेतो' असें म्हणून, रथ सज्ज करण्याविषयीं रावणानें आज्ञा केली. तेव्हां हजारो शंखभेरींच्या आवाजांनीं व वीरांच्या सिंहनादांनीं दशदिशा दणाणून गेल्या ! रावणाच्या रथाभोंवतीं लक्षावधि तरवारी चमकू लागल्या; किंबहुना, सर्व राक्षससेना रावणाबरोबर बाहेर पडूं लागली. तेव्हां रावणानें तिचा निषेध करून लंका शून्य झाल्यास वानरसेना सर्व बाजूंनीं हल्ला करील, असें राक्षसास समजावून परतविलें व आपण निवडक लोकांनिशीं एकदम उत्तरदरवाजाच्या बाहेर पडला. त्यांस दुरून पाहतांच रामानें त्यास ओळखलें. त्याचें तेज, बल व ऐश्वर्य पाहून रामालाही समाधान वाटलें कीं, शत्रु असावा तर असाच असावा. रावण बाहेर पडल्याची खबर लागतांच सर्व वानरसेनापति एकत्र झाले; आणि मोठें तुमुल युद्ध सुरूं झालें. रावणानें वानरसैन्य बाणांनीं अगदीं जर्जर केलें; तेव्हां हनुमानानें एकदम उड्डाण करून व रावणाच्या रथावर जाऊन त्यास जोरानें लत्ताप्रहार केला ! त्याबरोबर रावण खालीं पडला; परंतु पडतां पडतां सावरला, व त्यानें मारुतीला चपराकीचा प्रहार करून रथाखालीं ढकललें. तेव्हां राक्षसवानरांनीं दोघांचा तारीफ केली, इतक्यांत रावणानें नीलावर शरवृष्टि केली. मारुतीनें रामास म्हटलें, 'रावण रथावर बसून युद्ध करीत आहे, तर तुम्ही माझ्या खांद्यावर बसून रावणाशीं लढा.' त्याप्रमाणें रामांनीं हनुमानाच्या खांद्यावर बसून रावणाबरोबर बाणयुद्ध सुरूं केलें. त्या युद्धाचें काय वर्णन करावें ? "रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव," त्या युद्धाला दुसरी उपमाच नाहीं. शेवटीं रामानें एक बाण रावणाच्या ऐन वक्षःस्थलावर मारिला व एका बाणानें रावणाचा मुकुट खालीं पाडला ! यावेळेस रावणाच्या पोटांत भीति शिरून त्याचा उत्साह भग्न झाला व रथ परत फिरवून तो लंकेंत पळून गेला. ( युद्ध स० ५१, ५९ ).

रावणास आजपर्यंत पराजय ठाऊक नव्हता. देव, दानव, गंधर्व यक्ष, राक्षस, नाग, पक्षी, यांजपासून अवध्यत्वाचा वर त्यानें ब्रह्मदेवापाशीं मागितला, तेव्हां त्यानें यःकश्चित् मनुष्य काय करणार, या कल्पनेनें

मनुष्याचें नांव ब्रह्मदेवापाशीं घेतलें नव्हतें व ब्रह्मदेवानें त्यास 'बाबारे, तुझा मृत्यु मनुष्याचे हातून आहे असें तेव्हाच बजावलें होतें. त्या ब्रह्मदेवाच्या वाक्याची त्यास आता आठवण झाली. चारी बाजूंनीं आकाश फाटलेलें पाहून व आजपर्यंत ज्या अंतःकरणांत भीति म्हणून ठाऊक नव्हती, त्याजवर भीतीचा पगडा बसलेला जाणून रावणाला अतिशय दुःख झालें, व तो आपल्या राजवाड्यांत बसून पुढें काय करावें, याजविषयीं विचार करूं लागला. शेवटीं या प्रसंगीं आपल्यास कुंभकर्ण उपयोगी पडेल, असें वाटून त्यानें कुंभकर्णास जागे करण्याविषयीं आज्ञा दिली. कुंभकर्ण निजल्यास आज ९ दिवस झाले आहेत. तो तर नऊ, आठ, सात, कमींतकमी सहा महिने निजतो. परंतु इलाज नाहीं. त्याला आताच उठवा व माझी ही भयंकर अवस्था कळवा.' असें रावणानें आपल्या सचिवास म्हणतांच, त्याचे सचिव सुरा, मांस व गन्धमाल्य घेऊन धांवले; आणि एक योजन लांब अशी कुंभकर्णाची निजण्याची गुहा होती तेथें आले. ते राक्षस जरी बलवान् होते, तरी त्या गुहेत ते मोठ्या प्रयासानें शिरले, कारण, कुंभकर्णाच्या श्वासोच्छ्वासाचा सोसाटा गुहेच्या दारांतून त्यांना मागें ढकली! कसेबसें त्या गुहेंत शिरून ते कुंभकर्णापाशीं पोंचले. त्या गुहेची भुई, रत्नें व सोनें यांनीं कुट्टिमाची केलेली होती. तेथें सर्व प्रकारचीं सुगंधी द्रव्यें ठेवलेलीं होतीं. त्या रम्य गुहेंत कुंभकर्ण पर्वताप्रमाणें पसरलेला होता. त्याचें तोंड किंचित् उघडें पडलें असून गुहेसारखें दिसत होतें. अंगावरचे केस उभे आणि मोठमोठ्या शरासारखे दिसत होते व त्याच्या श्वासाचा जोर डोंगराच्या प्रचंड वाऱ्यासारखा चालला होता. अशा त्या अजस्र धुडास जागे करण्याकरितां आलेल्या राक्षसांनीं प्रथम गुहेंत मोठमोठाल्या मांसाच्या राशी केल्या. हरिण, डुक्कर, रेडे, वगैरेंच्या खंडोगणती मांसाच्या त्या राशी भयंकर दिसूं लागल्या. नंतर त्याच्या सर्व अंगाला चंदनाचें गंध लावून दिलें आणि त्याच्या गळ्यांत फुलांचे लांबलांब हार घातले. अशी तयारी केल्यावर त्या राक्षसांनीं सहस्रावधि शंख कुंभकर्णाच्या कानांशीं वाजवले, परंतु ते शंख वाजवणें व्यर्थ झालें. ओरडून व शंख वाजवूनही तो जागा होईना तेव्हां एक हजार भेरी त्याच्या कानापाशीं एकदम वाजविल्या. तरीही काम होईना तेव्हां मोठमोठ्या मुद्गलांनीं व मुसळांनीं त्याच्या अंगावर आपल्या ऐन सामर्थ्यांनीं त्यांनीं प्रहार केले; पण तेही व्यर्थ गेले. शेवटीं मोठमोठाल्या शतघ्नी दोरखंडांनीं त्याच्या अंगावरून ओढल्या,

परंतु कुंभकर्ण जागा झाला नाहीं. मग एक हजार हत्ती त्याच्या अंगावर धांवविले. तेव्हां बाळाला वाटलें कीं, अंगावर कांहीं वजन पडलें आहे आणि त्यानें जांभई दिली. कुंभकर्ण जागा होऊन उठून बसल्याबरोबर भोंवतालीं जमलेले राक्षस प्रथम दूर पळाले. कुंभकर्णानें उठतांच अगोदर त्या मांसाच्या राशींवर हल्ला केला; त्याची भूक शांत झाल्यावर त्या राक्षसांनीं समोर येऊन त्यास प्रणिपात केला तेव्हा त्यानें सर्वांचा स्वागतपूर्वक सत्कार केला, आणि "आपल्यास जागें कां केलें, राजा तर खुशाल आहेना, त्याला मोठें भय तर उपस्थित झालें नाहींना" म्हणोन त्यास प्रश्न केला. "अथवा प्रश्न काय विचारावयाचा आहे; ज्या अर्थीं मला तुम्ही अकालीं जागें केले आहे, त्या अर्थीं निश्चयानें राजावर संकट ओढवलें आहे; परंतु तुम्ही घाबरूं नका. मी या संकटाचा आता फडशा करितों. मी महेंद्रपर्वतालासुद्धां फोडून टाकीन किंवा महाप्रचंड अग्नीलाही शांत करीन." हे त्याचे शब्द ऐकून सचिवांनीं त्याजला 'रावण आपली आठवण करीत आहे, आपल्याला बोलाविलें आहे,' अशी विनंति केली. त्याबरोबर कुंभकर्ण उठला आणि प्रथम दोन हजार घट सुरा भडाभड पिऊन व किंचित् मदोन्मत्त होऊन गुहेच्या बाहेर पडला. तो लंकानगरीच्या रस्त्यानें राजवाड्याकडे चालला, तेव्हा त्याचें उंच शरीर लंकेंतल्या वाड्यांहूनही अतिशय उंच दिसून कोटाबाहेरही असलेल्या वानरसैन्याला दिसूं लागले. त्याबरोबर हजारों वानर भीतीनें पळूं लागले. रामानें बिभीषणास विचारतां, "हाच तो रावणाचा प्रचंड बंधु कुंभकर्ण. हा इंद्रासारखा पराक्रमी आहे. परंतु याला भिण्याचें कारण नाहीं" असें त्यानें सांगितलें. तेव्हा रामानें बिभीषणाच्या आणि सुग्रीवाच्या सल्ल्यानें 'हें एक राक्षसांनीं यंत्र उभें केलें आहे; याला मुळींच भिऊं नका' अशी वानरसैन्यात द्वाही फिरविली. वानराची याप्रमाणें समजूत घालीत आहेत तो कुंभकर्ण राजवाड्यांत पोहोंचून रावण दीन मनानें पुष्पकविमानात पर्यंकावर बसला होता, तेथे आला. कुंभकर्णानें रावणाच्या चरणाचें वंदन केलें आणि मला कां बोलाविलें असा प्रश्न केला. उत्तम आसनावर कुंभकर्णास बसविल्यावर रावण रागानें डोळे लाल करून म्हणालाः—"कुंभकर्णा, ही काय तुझी निजावयाची वेळ आहे! अरे, तूं आपल्या ठिकाणीं मस्त आहेस, म्हणून मला रामापासून उत्पन्न झालेलें भय तुला ठाऊक नाहीं. या लंकेकडे पहा, हीं सर्व वनें व उपवनें वानरमय

झालीं आहेत. रामानें समुद्राला सेतु बांधून इतके वानर इकडे आणले आहेत कीं, ही लंका वानरांनीं भरलेला दुसरा एक समुद्रच झाली आहे! राक्षसाचे हजारों वीर रोज पडतात. आपले मोठमोठे सरदार पडले, परंतु वानरांचा पहावा तर मुळींच क्षय दिसत नाहीं. या लंकेत आतां बाल, वृद्ध व स्त्रिया तेवढ्या राहिल्या आहेत. सर्व खजिना खर्चून गेला आहे; तर आता या पुरीचें व माझें तूं रक्षण कर. भावाकरिता आज तूं महान् पराक्रम करून दाखव. मीं आजपर्यंत भावालाही अशी विनति केली नाहीं." हें रावणाचें दीन वचन ऐकून कुंभकर्ण मोठ्यानें हंसून म्हणालाः—"मीं पूर्वी राजसभेंत सल्ला देताना ज्या प्रसंगाचें भाकीत केलें होतें, तो प्रसंग इतक्या लवकर येईल, असें मला वाटलें नव्हतें. पण यात नवल तें कोणतें? दुष्कर्माचें फळ फार लवकर येतें. प्रथमच हें कर्म अविचारानें झाले आहे; यात पुढे काय होईल याचा विचार केलेला नाहीं. असो; आता तूं संताप करूं नकोस! क्रोध टाकून स्वस्थ हो; मी जें पूर्वी बोललों तें बंधूच्या नात्यानें व बंधुप्रेमानें तुझ्या हिताचें सांगितलें. परंतु प्रसंगीं भावानें भावाकरितां काय करावें, ते मी तुला दाखवितों. आज रणाच्या ठिकाणीं तुझ्या शत्रूचा नाश करितों. मग प्रत्यक्ष यम, इंद्र, वायु, जरी पुढें उभे राहिले तरी मला पर्वा नाहीं. हा मी चाललों." असें म्हणून रावणाला पुन्हां नमस्कार करून व त्याला प्रदक्षिणा घालून कुंभकर्ण निघाला. त्या वेळेस रावणानें एकदम पुढें होऊन त्याला आलिंगन दिलें, त्याच्या गळ्यांत रत्नांचा हार बांधला व त्याला गंधमाल्यादि अर्पण केलीं. याप्रमाणें भावानें व राजानें पूजा व सत्कार केलेला कुंभकर्ण एक भयंकर त्रिशूळ घेऊन बाहेर निघाला. तेव्हां त्याच्यावर राक्षसांनीं आपल्या घरांतून पुष्पवृष्टि केली. रावणाच्या आज्ञेनें अनेक रथी व पदाति राक्षस त्याजबरोबर निघाले. तें भयंकर प्रकरण दरवाजांतून बाहेर पडणें शक्यच नव्हतें. कुंभकर्णानें सहज एक पाय तटाच्या पलीकडे टाकून तटाचें उल्लंघन केलें! ते महान् अरिष्ट पाहतांच वानरसैन्याची दाणादाण झाली. तेव्हां राजपुत्र अंगद सर्व वानरांना हांक मारून म्हणालाः—"अरे, आपलीं पूर्वीचीं वीरकृत्यें स्मरा; आपल्या दर्पोक्तींची आठवण करा आणि आतां पराक्रम करून दाखवा. ही पळण्याची वेळ नव्हे." असें अंगदाचें भाषण ऐकून ते वानर परत फिरले, आणि त्या पर्वताकार राक्षसावर हल्ला करण्यास त्यांनीं प्रारंभ केला. कोणी त्याच्या-

वर मोठमोठे पाषाण फेकले. कोणी गिरिशृंगें फेंकलीं व कोणी झाडें फेंकून मारिलीं. परंतु ते दगड, पाषाण व गिरिशृंगे त्या राक्षसाच्या कठिण देहावर पडून फुटून खालीं पडत आणि झाडें तर कडकडून मोडत! इकडे कुंभकर्णानें वानरसैन्याचा विध्वंस चालविला. रक्तबंबाळ झालेले हजारों वानर वसंतातील तांबड्या पुष्पांनीं भरलेल्या झाडाप्रमाणें दिसूं लागले. जे वानर भीतीनें पळाले, ते इतके बेफाम पळाले कीं, कित्येक समुद्रात जाऊन पडले व कित्येकांनीं आकाशमार्ग धरिला. तत्रापि हजारों वानर मोठ्या शौर्यानें कुंभकर्णाला जाऊन बिलगत आणि त्यास नखांनीं व दातांनीं फाडण्याचा यत्न करीत. कुंभकर्ण शेकडो वानरांना पकडून काखेत दाबी, कित्येकाना नुसतें तोंडात टाकी, तेव्हां कित्येक त्याच्या नाकांतून बाहेर पडून पळून जात! याप्रमाणें त्यानें भयंकर रणकंदन केलें. तों मारुतीनें मोठ्या जोरानें त्याच्या हातचा त्रिशूळ खेचून पायांनीं मोडून टाकला. तेव्हा तो एक गिरिशृंग घेऊन रामावर धांवला. त्या गिरिशृंगास रामांनीं बाणांनीं फोडून टाकलें. नंतर रामांनीं कुंभकर्णाला बाणांनीं जर्जर केलें. ज्या बाणांनीं सात वृक्ष उलथे पाडले आणि ज्या बाणांनीं वालीला जमीनदोस्त केले, तेच बाण आता अंतकाप्रमाणें कुंभकर्णाच्या देहावर पडूं लागले. वायव्यास्त्रानें त्याचा उजवा बाहु रामांनीं तोडला, तेव्हां कुंभकर्ण एका हातानेच एक तालवृक्ष उपटून रामावर धांवला. तेव्हा ऐंद्रास्त्रानें रामांनीं तालवृक्षांसहित त्याचा डावा बाहु तोडून टाकिला. तरी तो पुढें धांवत आला. तेव्हा रामांनीं त्याचे दोन्ही पाय दोन बाणांनीं तोडले. तेव्हा कुंभकर्णाचें धूड एवढ्या जोरानें खालीं पडलें कीं, त्यानें सर्व लंका हादरून गेली! शेवटीं ब्रह्मास्त्र सोडून रामांनीं बाण मारून कुंभकर्णाचें शिर उडविलें! ब्रह्मास्त्रानें उडविलेलें हें शिर मोठ्या वेगानें लंकेंतील कित्येक वाड्यावर पडून त्याचा विध्वंस झाला, व त्याचें जें शरीर जमिनीवर पडलें तें समुद्रापर्यंत पसरून समुद्रातील माशांना त्याचें मांस खावयास मिळालें! याप्रमाणे आजपर्यंत अजिंक्य मानलेल्या त्या प्रचंड राक्षसाचा वध रामांनीं केला; तेव्हां सर्व वानरसैन्यात अत्यंत आनंद झाला व रामलक्ष्मणासही मोठा हर्ष झाला. (युद्ध० सर्ग० ५९–६७).

कुंभकर्णाचाही रामानें वध केला, हें ऐकून रावणाला जे दुःख झालें तें वर्णन करितां येत नाहीं. कुंभकर्णावर त्याची मोठी भिस्त होती. रामानें त्याचा पराभव करून त्याला पळाविलें, त्याचें त्यास इतके वाईट वाटलें नाहीं.

पण आपणावर निःसीम प्रेम करणारा व प्रचंड शक्तीचा आपला सख्खा भाऊसुद्धां जेव्हां समरांत पडला, तेव्हां आतां आपला निभाव लागत नाहीं, असें त्याला पक्कें वाटूं लागलें व त्याची कंबर खचून गेली! ही त्याची स्थिति पाहून त्याचे पुत्र त्रिशिरा, अतिकाय, देवातक व नरांतक यांनीं त्यास विनंति केली:—" महाराज, आमच्यासारखे पुत्र रामलक्ष्मणास जिंकण्यास समर्थ असतां, आपल्या आज्ञेची प्रतीक्षा करीत आपल्यासमोर उभे असतां आपण काळजींत कां पडला आहांत?" ही त्याची वीर्योत्साहजनक वाणी ऐकून रावणानें त्यांची प्रशंसा केली, व त्यांस वानरांवर चाल करून जाण्याची आज्ञा केली; आणि त्याच्या रक्षणाकरिता महोदर व महापार्श्व या सरदारास त्यांजबरोबर दिलें. तेव्हा ते वीर अनेक राक्षसांस बरोबर घेऊन निरनिराळ्या दरवाजांतून बाहेर पडून, वानरसैन्यावर चालून गेले. तेव्हा वानरराक्षसांचें पुनः भयंकर युद्ध सुरू झाले. नरांतक घोड्यावर बसून प्रासानें लढत होता. शेंकडों वानर त्यानें प्रासानें ठार मारिले. तेव्हां अंगद त्याच्यावर धांवून गेला. त्याजवरही नरांतकानें प्रास फेंकून मारिला; परंतु त्या प्रासाचे तुकडे तुकडे झाले. अंगदानें घोड्याला इतक्या जोरानें लत्ताप्रहार केला कीं, तो तोंडाबाहेर लांब जीभ काढून गतप्राण होऊन खालीं पडला. तेव्हां नरांतकाला नुसता मुष्टिप्रहार करून त्यानें त्यास यमलोकास पाठविलें! ते पाहून देवांतक, महोदर व त्रिशिरा हे अंगदावर धावले. देवातकावर एका वृक्षाचा प्रहार करून अंगदानें त्यास ठार केलें. अंगदाच्या मदतीला हनुमान् धावला. त्यानें महोदर व त्रिशिरा या दोघांस ठार केलें. याप्रमाणें आपले बंधु व आपला चुलता हे ठार झालेले पाहून अतिकाय रथावरून युद्ध करीत होता, त्यास दुःखाचा व क्रोधाचा वेग आला, व त्यानें अंगदावर व हनुमानावर बाणांचा वर्षाव केला. त्याला ब्रह्मदेवाच्या वरानें अवध्य कवच मिळालें होतें, त्यामुळें त्याजवर वानरांनी टाकलेले पाषाण व वृक्ष फुकट जात. याप्रमाणें अतिकायानें दोन घटकांपर्यंत सर्व वानरसैन्यास हाहाःकार करण्यास लाविले. तेव्हा लक्ष्मण त्याजवर धावून गेला. लक्ष्मणानें अनेक अस्त्रें त्याजवर टाकिलीं; परंतु त्यांजपासून त्याचें कांहींच नुकसान होईना. शेवटीं ब्रह्मास्त्राशिवाय हा मारला जाणार नाहीं, यानें अंगावर ब्रह्मदेवाच्या प्रसादानें अवध्य झालेलें कवच घातलें आहे, अशी अंतरिक्षांतून वायूनें लक्ष्मणाला सूचना केली. तेव्हां

लक्ष्मणानें ब्रह्मास्त्र योजून बाण सोडला, तेव्हां अतिकायाचें शिर मुकुटासहित तुटून खालीं पडलें ! ( युद्ध० सर्ग० ६८–७४ ).

महोदरासहित चारी राजपुत्र याप्रमाणें समरांगणांत मरून पडले; तेव्हां सुग्रीवानें हनुमानास म्हटलें:—" रावणाचे कुंभकर्णादि तीन बंधु मेले, व चार पुत्रही मेले. आता रावण बहुधा दरवाजाबाहेर छापा घालण्यास कोणास पाठवणार नाहीं; तर शत्रूला जर्जर करण्याची हीच वेळ आहे. जे जे मजबूत व चपळ वानर असतील त्यांनीं मोठमोठाल्या चुडी घेऊन लंकेंत शिरून शहराला आग लावून द्यावी. " अशी आज्ञा होतांच हनुमानानें तसे वीर शोधून काढून त्यास चुडी तयार करून दिल्या. संध्याकाळ होऊन अंधार पडतांच ते वानर पेटलेल्या चुडी घेऊन चोहोंकडून लंकेंत शिरले व मोठमोठ्या वाड्याच्या गच्च्यांवर उड्या मारून त्या वाड्यांस आग लावूं लागले. थोड्याच वेळानें लंकेंत भयंकर आग पसरली. हजारों वाडे पेट घेऊन धडाधड पडूं लागले ! अगरुचंदनाचीं मौल्यवान् लांकडें जळूं लागलीं; मोत्यें, हिरे, पोवळीं, अग्नीच्या उष्णतेनें तडातड फुटून जाऊं लागलीं; उत्तम उत्तम लोकरीचीं, व रेशमाचीं वस्त्रें पेटून राख होऊं लागलीं; किंबहुना, माणसें मुलें, स्त्रिया, नोकरही अग्नींतून पळावयाला वाव न मिळाल्यामुळें जळून मरूं लागले. त्या वेळचा तो लंकेंतील भयंकर अनर्थ कोठवर वर्णन करावा ! अग्नीच्या प्रचंड ज्वाळा आकाशात जाऊं लागल्या. त्या ज्वालांचा प्रकाश समुद्रावर पडून समुद्राचें पाणी रक्तानें भरल्याप्रमाणें लाल दिसूं लागलें. शेंकडों हत्ती व घोडे बंधनें तोडून इकडून तिकडे धांवूं लागले; त्यामुळें ही प्राणहानि अधिक वाढली. अशा जनावराच्या तडाक्यांत सापडलेल्या किंवा अग्नीच्या दुःसह तापानें तप्त झालेल्या स्त्रीपुरुषाचें हृदयद्रावक ओरडणें दोन दोन कोस बाहेर ऐकूं येऊ लागलें. कपडे पेटलेले किंवा अर्धांग जळलेले राक्षस नगराबाहेर पडूं लागले, तेव्हां त्यांना वानर ठार मारूं लागले. त्याप्रमाणें भयंकर आकांत झालेला पाहून व प्रत्येक द्वारावर चुडी घेऊन उभ्या राहिलेल्या वानरसैन्याला पाहून रावणाच्या अंगाची लाही झाली. त्यानें कुंभकर्णाचे पुत्र कुंभ व निकुंभ यांस शत्रूवर हल्ला करण्याची आज्ञा करितांच ते दोघे वीर त्या वानरसैन्यावर तुटून पडले. त्याजबरोबर यूपाक्ष, शोणिताक्ष, प्रजध व कंपन हे चार सरदारही रावणाच्या आज्ञेनें निघाले. पण त्या सर्व राक्षसांनीं तुमुल युद्ध करून सरतेशेवटीं समरांगणीं आपले देह ठेविले. तेव्हां

रावणानें खराचा पुत्र मकराक्ष यास पाठविलें; त्याचाही नाश रामानें केला. तेव्हां रावणानें शेवटीं क्रोधानें दांत करकर खाऊन इंद्रजितास म्हटलें:— " इंद्रजिता, तूं इंद्रालाही जिंकले आहेस. रामलक्ष्मणांचा तुझ्यापुढें टिकाव लागणार नाहीं. तूं स्वत: जाऊन रामलक्ष्मणास रणांत ठार मारून मला या चिंतेंतून मुक्त कर. " याप्रमाणे आज्ञा होतांच इंद्रजित् उत्तम रथावर बसून युद्धाकरितां नगराबाहेर पडला. ( युद्ध०सर्ग० ७५-७९ ).

समरांगणात अग्नीला आहुति देऊन युद्धास गेला असतां इंद्रजित् ब्रह्मदेवाच्या वराने अदृश्य होत असे; व यामुळें त्याजपुढे शत्रूचें कांहीं चालत नसे. इंद्रजित् या वेळीं नित्याप्रमाणें निकुंभिलेवर जाऊन व आपल्या भोंवतीं राक्षसांचा पाहरा ठेवून रथातून खालीं उतरला; आणि रणभूमीवर त्यानें यज्ञ सुरू केला. रक्तवस्त्र नेसलेल्या राक्षसिणी त्याला मदत करीत होत्या. अग्नीची प्रतिष्ठा करून त्याजभोंवतीं तलवारी हेच दर्भ त्यानें ठेविले आणि बिब्याच्या झाडाच्या समिधांनीं व लोखंडाच्या स्रुव्यानें त्याने आहुति दिल्यावर एक सबंध जिवंत काळा बकरा त्यानें अग्नींत अर्पण केला. तो अग्निपुरुषानें स्वतः अग्नींतून बाहेर निघून घेतला. याप्रमाणें यज्ञ करून इंद्रजित् रथावर चढतांच तो रथ अदृश्य झाला आणि त्यानें वानरसैन्यावर धांवून जाऊन बाणांचा वर्षाव सुरू केला. बाण कोठून येतात, हे वानरांस समजेना. तेव्हां बिचाऱ्यांची अगदीं गाळण झाली. त्यांनीं कल्पनेनें शेकडों पाषाण इंद्रजितावर म्हणून टाकले; परंतु बाणांचा शब्द बंद होईना. अलीकडच्या लढाईतसुद्धा धूमरहित व शब्दरहित दारूचा उपयोग होऊं लागल्यापासून थोडीबहुत अशीच स्थिति होते. एखाद्या गुप्त ठिकाणीं तोफखाना ठेवून मारा सुरू झाला, म्हणजे गोळा कोठून येतो हें बराच वेळ समजत नाहीं! असो; याप्रमाणें इंद्रजिताचा मारा सुरू झाला, तेव्हां लाखो वानर गतप्राण होऊन पडले; हजारों इकडे तिकडे सैरावैरा धांवूं लागले व शेंकडों रणांगण सोडून बाजूस झाले. रामलक्ष्मणावरही तो मारा सुरू झाला. तेव्हां त्यांनीं आपल्या अस्त्रविद्येनें व धनुष्य चालाविण्याच्या चपळतेने त्या बाणांचा प्रतिकार केला. परंतु त्याजवर बाण सोडणारा इंद्रजित् त्यांच्या दृष्टीस पडेना; व त्यामुळें त्यांचा कांहींच उपाय चालेना. शेवटीं लक्ष्मणानें क्रोधाने, "राक्षसमात्रांचा नि:पात करण्याकरितां ब्रह्मास्त्र योजितो म्हणजे इंद्रजित् असेल तेथें मरून पडेल " असें रामास म्हटलें. परंतु " अपराधी व निरपराधी

यांचा सरसहा वध करूं नकोस; जे आपल्यांशीं लढत नाहींत त्यांना आपण मारूं नये, अशी नीति आहे. तर अशा ब्रह्मास्त्राचा प्रयोग करूं नकोस. इंद्रजित् केव्हा तरी आपल्या दृष्टीस पडेल. " असें म्हणून रामांनीं लक्ष्मणास आवरून धरिले. श्रीरामचंद्रांची केवढी नीतिमत्ता आणि केवढी धर्माच्या ठिकाणीं स्थिरता ! अशा दुर्धर प्रसंगींही त्यानीं क्रोधाला वश होऊन धर्माची कास सोडिली नाहीं. असो; रामलक्ष्मणांशीं इंद्रजित् अदृश्य राहून प्रहरभर लढला. परंतु पूर्वींप्रमाणें ते हार जाईनात असें पाहून इंद्रजित् दुःखानें लंकेंत परत फिरला.

रामलक्ष्मणास जिंकण्याची दुसरे दिवशीं त्याने एक विलक्षण युक्ति योजिली. एक मायावी सीता उत्पन्न करून तिला रथावर घेऊन इंद्रजित् पश्चिम दरवाजानें बाहेर पडला. तेथे हनुमान् वानरसैन्यासह तयार होताच, तो इंद्रजितावर धांवला. तेव्हा इंद्रजितानें ओरडून म्हटलें:—" अरे मूर्खा, तुम्हां सर्वांच्या आशेचा भंग मी आतांच करतों. या राक्षसांवर ओढवलेल्या अनर्थांचें मूळ ही पापिणी आहे. हिचा नाश करून मग तुझा, सुग्रीवाचा आणि रामलक्ष्मणांचा मी समाचार घेईन. " असें म्हणून त्या मायामयी सीतेचे डाव्या हातानें केश धरून दुसऱ्या हातानें एका तलवारीच्या घावानें इंद्रजितानें तिचे दोन तुकडे केले ! ते त्याचें अत्यंत निंद्य व दारुण कर्म पाहून मारुतीच्या अंगावर रोमांच उभे राहिले. त्यानें सीतेस पाहिलेंच होतें. यामुळें रामाची प्रियपत्नी सीता प्राणास मुकली, असा त्याचा पक्का समज झाला, आणि दुःखाच्या व क्रोधाच्या आवेशात त्यानें एक प्रचंड शिला उचलून इंद्राजिताच्या अंगावर टाकिली. इंद्रजिताच्या सारथ्यानें एकदम रथ दुसऱ्या बाजूस काढून तो प्रहार चुकविला. तेव्हां ती शिला धाडकन् जमिनीवर पडून जमिनींत घुसली. शिला फुकट गेलेली पाहून मारुतीला पुनः अत्यंत दुःख झालें, व आता हें लढणें व्यर्थ आहे असें म्हणून आपली सेना एकवट करून तो रामाकडे जावयास निघाला. इंद्रजित् हा नित्याप्रमाणें रणभूमीवर यज्ञ करण्याकरितां निकुंभिलेकडे गेला.

पश्चिमदरवाजावर इंद्रजिताची व मारुतीची लढाई जुंपली आहे, अशी रामास बातमी लागतांच त्यांनीं जांबवानाला त्याच्या मदतीला पाठविलें. जांबवानाची व दीनवदन झालेल्या मारुतीची रस्त्यातच गाठ पडली. मारुतीनें रामापाशीं येऊन त्यास ती भयंकर हकीकत सांगितली. तेव्हां जसा एखादा

मुळाशीं तोडलेला वृक्ष कोसळून पडतो, त्याप्रमाणें श्रीरामचंद्र धाडकन् खालीं पडले, तों लक्ष्मणानें पुढें धांवून त्यांस आपल्या बाहूंत धरिलें. लक्ष्मण रोषानें व दुःखानें संतप्त होऊन रामांस म्हणालाः–"रामा, धर्म धर्म म्हणून तुम्ही त्याचें जिवापाड रक्षण करितां. परंतु तो धर्म तुमचें रक्षण करीत नाहीं. मला वाटतें, धर्म व अधर्म हे पदार्थच नाहींत. अधर्म खरोखरी असता तर रावण नरकास गेला असता. आणि धर्म खरा असता तर तुम्हांलाही दुःखपरंपरा आली नसती. धर्म पाळल्यापासून सुख जर खरोखर होतें तर अधर्माकडे माणसाची प्रवृत्तिच झाली नसती. धर्मपरायण माणसेंच दुःख पावतात; आणि अधर्मशील समृद्धि भोगतात. तस्मात् धर्माधर्म या गोष्टीच खोट्या आहेत. अथवा धर्म हा नपुंसक असून तो बळाचा आश्रय करून राहतो, असें वाटतें. कारण बळानें व पराक्रमानें सर्व प्राप्त होतें. तर मग तुम्ही केवळ पराक्रमाचाच का मार्ग स्वीकारीत नाहीं? धर्माधर्म कशास पाहतां? मला वाटतें,अर्थ हेंच धर्माचें मूळ आहे.तुम्हीं राज्य टाकलें, तेव्हांच तुमचें हें मूळ नाहींसें झालें.अर्थ ज्याजवळ आहे तो बुद्धिवान्, तो पराक्रमी, तो सर्व कांहीं आहे. अर्थापासून हर्ष, काम, धर्म, शम, दम, सर्व साध्य आहेत. तो अर्थ, जेव्हां तुम्हीं पित्याच्या आज्ञेनें हीं वल्कलें धारण केलीं, तेव्हाच तुम्हीं टाकिला; आणि यामुळें तुमची भार्या रावणानें नेली, आणि आतां त्या दुष्ट इंद्रजितानें तिचा वध केला!" मनुष्यावर जेव्हा एकावर एक सारखीं संकटें येतात, तेव्हां सदाचरणी पुरुषांच्या अंतःकरणाची कशी धांदल उडते व त्यांच्या मनांत धर्माविषयीं अश्रद्धा कशी उत्पन्न होते, याचें चित्र कवीनें येथें काढलें आहे. श्रीरामचंद्रास लक्ष्मणाला जबाब देण्याची जरुरीच पडली नाहीं. सुग्रीव व इतर वानर शोकाकुल होऊन रामाभोंवतीं जमले होते, तेव्हां तेथे बिभीषण नव्हता, तो लंकेंभोंवतीं लाविलेल्या सर्व चौक्यांची व्यवस्था पाहून याच वेळीं तेथें आला. त्यास तो सर्व प्रकार कळतांच त्यानें रामाचें सांत्वन करून म्हटलें:—

"महाराज, तुम्ही बिलकुल शोक करूं नका. रावण सीतेचा कधींही घात करणार नाहीं. मीं त्यास अनेक प्रकारें सीतेला परत देण्याविषयीं सांगितलें; परंतु त्याने माझें ऐकिले नाहीं. कांहींही झालें तरी रावण सीतेचें जिवापलीकडे रक्षण करील. इंद्रजितानें मारिली असेल तर ती मायामयच सीता असली पाहिजे; उठा, ही शोक करण्याची वेळ नाहीं. इंद्राजित् निकुंभिलेस

यज्ञ करण्याकरितां जात आहे. यज्ञ समाप्त करून तो रथावर चढला कीं, तो देवांनाही अजिंक्य होईल. तर लक्ष्मणाला माझ्याबरोबर द्या. आम्ही तावडतोब निकुंभिलेस जाऊन इंद्रजिताचा यज्ञ संपतो आहे, तोंच त्याजवर घाला घालून त्यांस ठार करितों. हें बिभीषणाचें उत्साहजनक भाषण व योग्य सल्ला ऐकून रामानीं तावडतोब लक्ष्मणास बिभीषणाबरोबर जाण्याची आज्ञा केली, व त्याच्या मदतीस हनुमान् व जांबवान् यांस त्यांच्या सैन्यांसह पाठविलें.

लक्ष्मण रामचंद्रांचे चरण वंदन करून व त्यांस प्रदक्षिणा घालून जो निघाला तो बिभीषण, हनुमान् व जांबवान् यासह झपाट्यानें निकुंभिलेस येऊन पोहोंचला. आपल्या कर्मांत विघ्न न यावें म्हणून इंद्रजितानें मोठें राक्षससैन्य पहाऱ्यावर ठेविलें होतें. त्या सैन्यावर एकदम हल्ला करण्यास हनुमान् व जांबवान् यांस बिभीषणानें सांगितले. तेव्हां ते दोघे आपल्या सैन्यासह त्या राक्षससैन्यावर तुटून पडले. राक्षसावर असा निकराचा हल्ला झालेला पाहून इंद्रजित् यज्ञकर्म सोडून उठला आणि रथावर बसून त्यानें मारुतीवर बाणांचा वर्षाव सुरू केला. बिभीषणानें लक्ष्मणाला इंद्रजिताचें चैत्य म्हणजें मंदिर दुरून दाखवून तेथेंच असलेला एक वटाचा वृक्ष दाखविला. त्याच्या गर्द छायेमुळें व त्याच्या हजारों शाखा भुईंत गेल्या असल्यामुळें त्याच्या खालीं निबिड अंधकार होता. बिभीषणाने लक्ष्मणास सांगितलें कीं, "या वडाचे अंधारांत इंद्रजित् यज्ञ करतो. आतां हा बाहेर आला आहे, याला परत वडाखालीं जाऊं देऊं नका." लक्ष्मणानें पुढें सरसावून व मोठ्यानें आरोळी मारून, इंद्रजिताला द्वंद्वयुद्धास बोलाविलें. तेव्हा इंद्रजित् मारुतीला सोडून त्वेषानें लक्ष्मण बिभीषणाकडे वळला. दांतओंठ खाऊन इंद्रजितानें बिभीषणास म्हटलें:—"राक्षसाधमा, तूं माझ्या बापाचा भाऊ असून मला ठार मारण्यास उद्युक्त झाला आहेस. धिःकार असो तुला! अरे, तूं आपली जात व आजपर्यंतचे स्नेहसंबंध सर्व विसरलास! स्वजनांना सोडून परांचा दास बनला आहेस, यामुळें साधु लोक तुझी निंदाच करतील. स्वजन दुर्गुणी असला तरी तो गुणवान् परजनांहून पुष्कळ चांगला. कारण, परकी तो परकीच. जो स्वपक्ष सोडून परपक्षाला मिळतो, तो स्वपक्षाचा नाश झाला म्हणजे परपक्षाकडूनच मारला जातो. हे मूर्खा, तुला कळत नाहीं काय?" याप्रमाणें आपल्या पुतण्याचे कठोर शब्द ऐकून बिभीषणानें

उत्तर केलें:–" धर्मापासून परावृत्त झालेल्या पापी मनुष्यास–मग तो स्वजन असला तरी सोडलेंच पाहिजे. परद्रव्याचें हरण करणारा व परस्त्रीचा अभिलाष धरणारा या दोघां पाप्यांस जळत्या घराप्रमाणें टाकून जावें, असें शास्त्र सांगते. परवित्तहरण, परजायाभिलाष आणि स्वमित्राविषयीं अतिशंका.या तिन्ही गोष्टी भयंकर आहेत. अभिमान, रोष, दीर्घ वैर, नीतीच्या उपदेशाला प्रतिकूलता इत्यादि ऐश्वर्याचा व जीविताचा नाश करणारे आणखी दोषही तुझ्या पित्याचे अंगीं आहेत. याकरितां त्याचा मीं परित्याग केला, आणि त्याच वेळेस सांगितलें कीं, ही पुरी नाश पावल्याशिवाय राहणार नाहीं. असो. माझें कर्तव्य मीं केलें. परंतु तूं बालिशतेमुळें, उद्दामपणामुळें, व मृत्यूच्या तडाख्यांत सांपडल्यामुळें, वाटेल तें मला दुरुत्तर बोलतो आहेस, बोल; पण या वेळेस लक्ष्मणांच्या शरांपासून आपलें संरक्षण मात्र कर. इंद्रजितानें बिभीषणाला प्रत्युत्तर दिलें नाहीं. परंतु क्रोधानें लाल होऊन त्यानें लक्ष्मणावर चाल केली. त्या दोघांचें द्वंद्वयुद्ध पाहण्यास देवदानवांची आकाशांत गर्दी झाली. तीन अहोरात्रपर्यंत त्यांचे एकसारखें युद्ध होऊन शेवटीं लक्ष्मणानें बाणानें इंद्राजितार्चे शिर उडविलें. तेव्हा देवांनीं आकाशांत दुंदुभि वाजविल्या व लक्ष्मणावर पुष्पवृष्टि केली ! इंद्रजितासारख्या महान् पराक्रमी व मायावी राक्षसाचा लक्ष्मणानें नाश केल्यानें सर्व पृथ्वीचा भार हलका झाला; आणि तिन्ही लोकांना आनंद झाला. बिभीषणानें लक्ष्मणाला आलिंगन देऊन, त्याची अत्यंत प्रशंसा केली; याप्रमाणें कृतकार्य होऊन लक्ष्मण, बिभीषण, हनुमान् व जांबवान् रामापाशीं आले व त्यांस त्यांनीं सर्व हकीकत सांगितली. तेव्हां श्रीरामचंद्रांनीं लक्ष्मणास पोटाशीं धरून त्यांचें मस्तक मोठ्या ममतेनें हुंगलें व वारंवार त्याच्या अंगावर हात फिरवून म्हटलें:–" लक्ष्मणा, तूं आज एक दुष्कर कर्म केलेंस. आतां रावण मेलाच असें मी समजतों. त्याचे कुंभकर्ण व इंद्रजित् हे दोन्ही हात तुटले. बिभीषणा, तुम्हीं फारच योग्य सल्ला मला दिली व हनुमान् व जांबवान् यांनींही लक्ष्मणास चांगली मदत केली." मग अंगदानें सुषेणास हांक मारून बोलावल्यावर रामानें म्हटलें:–" सुषेणा, या चौघांच्या जखमा लौकरच बऱ्या करा." तेव्हां सुषेणानें त्यांस औषधि हुंगावयास देऊन, हुशार करून व त्यांच्या अंगांत घुसलेलीं शल्यें काढून जखमांना औषधें लाविलीं. ( युद्ध० स० ८०–९३ ).

इंद्रजिताच्या मृत्यूची भयंकर वार्ता रावणास त्याच्या सचिवांनीं जाऊन

सांगितली; तेव्हां त्याला एकदम मूर्च्छा येऊन त्याच्या डोळ्यासमोर अंधेरी आली. कांहीं वेळानें शुद्धीवर येऊन पुत्रस्नेहानें व्याकुळ होऊन त्यानें पुष्कळ विलाप केला. परंतु विलाप करून मेलेला पुत्र परत कसा येणार ? वृद्धापकाळीं पुत्रशोक फार भयंकर असतो. पुत्रशोकानें संतप्त झालेल्या त्या दुष्टाच्या मनांत एकाएकीं एक दारुण कल्पना उत्पन्न झाली. इंद्रजितानें मायिक सीतेचा वध केला, तो प्रत्यक्ष करून रामलक्ष्मणाचा पराक्रम निष्फळ करून टाकावा, अशी कल्पना मनात येऊन तो उठला. त्याच्या चेहऱ्यावर क्रोधाच्या परमावधीची कळा दिसत होती. त्याच्या तोंडांतून क्रोधाग्नीचा धूम जणूं काय बाहेर पडतो आहे असें वाटलें. जसें जळत्या काकड्यांतून तेलाचे तप्त बिंदु झटपट खालीं पडतात त्याप्रमाणें त्याच्या डोळ्यातून अत्युष्ण क्रोधाश्रु खालीं पडत होते. एक काळीभोर तीक्ष्ण सुरी घेऊन तो अशोकवनाकडे धांवला. तेव्हा त्याचे भयभीत झालेले सरदार व त्यांच्या रडणाऱ्या स्त्रिया त्याच्या मागें धांवल्या. सीतेनें रावणाचें तें उग्र स्वरूप पाहताच ताडलें कीं, हा राक्षसाधम पुत्रशोकानें अंध होऊन माझा खून करण्याकरितां येत आहे. माझ्यावाचून रामचंद्रांची काय स्थिति होईल! वानरसैन्य निराश होऊन कसें छिन्न होईल ! कौसल्या माता आपला एकुलता एक पुत्र मरण पावल्यानें कशी विव्हल होईल ! इत्यादि कल्पना तिच्यापुढें उभ्या राहिल्या व आपण मारुतीनें विनंति केल्याप्रमाणें त्याच्या पाठीवर बसून जाण्याचें कबूल केलें असतें, तर हा सर्व अनर्थ टळला असता, असें वाटून तिला पश्चात्तापाचें वाईट वाटलें; परंतु ती कांहीं बोलली नाहीं. तिच्याजवळ रावण पोहोंचला तेव्हां त्याचा सुपार्श्व नांवाचा सचिव त्यास हात जोडून म्हणालाः—" राक्षसराज, स्त्रियांचा वध करणें हें तुमच्यासारख्या शूर वीरास शोभत नाहीं. त्यांत सीतेच्या सौंदर्याकडे पहा. असल्या स्त्रीरत्नावर पराक्रम गाजवण्याऐवजीं रामलक्ष्मणावर पराक्रम गाजवा. रामलक्ष्मणांस जिंकण्याचें सामर्थ्य तुम्हांस खचित आहे. मग असा अविचार कां करतां ? सर्व राक्षससैन्य घेऊन, रथावर बसून व धनुष्यबाण घेऊन तुम्हीं शत्रूवर चालून जाल तर मला खात्री आहे कीं, तुम्ही शत्रूचा नाश कराल; आणि मग तुम्हांला सीता अजूनही प्राप्त होई." हें ऐकून रावण कांहींएक न बोलतां परतून, आपल्या सभेंत आला. सभेंत आल्यावर त्यानें आपलें सर्व राहिलेलें सैन्य जमा करून सर्व सेनापतींना आज्ञा केली कीं, तुम्ही जाऊन एकत्र होऊन

रामावर एकदम हल्ला करा. या आज्ञेप्रमाणें हजारों हत्ती, लाखों रथ आणि कोडों पदाति राक्षस शहराबाहेर पडून सर्व बाजूंनीं वानरसैन्यावर मोठ्या त्वेषानें तुटून पडले. आजपर्यंत जितकीं युद्धें झालीं त्यांत इतकें राक्षसाचें सैन्य कधींच बाहेर पडलें नव्हतें व तें केवळ आता निराशेच्या त्वेषानें लढूं लागलें; त्या भयंकर संग्रामात दोहों बाजूंचे असंख्य वीर गतप्राण होऊन पडले; रक्ताच्या नद्या वाहूं लागल्या, परंतु कोणतीही बाजू मागें हटेना. श्रीरामचंद्रानीं तर त्या दिवशीं केवळ अंतकाचें स्वरूप धारण करून आपल्या अस्त्रविद्येचें सामर्थ्य राक्षसाना दाखविलें. त्याचें स्वरूप लुप्त होऊन केवळ त्याचें धनुष्य दिसत होतें! अक्षय्य बाणाच्या भात्यातून बाण केव्हां काढीत व धनुष्याला केव्हां लावीत, याजवर नजर ठरेनाशी झाली. ज्या रामानीं चौदा हजार राक्षस जनस्थानांत मारिले त्यांनीं या वेळीं आपल्या अस्त्रप्रभावानें दहा हजार रथी, अठरा हजार हत्ती, चौदा हजार स्वार आणि दोन लक्ष पदाति इतके राक्षस एका प्रहरांत यमसदनास पाठविले! शेवटीं राक्षससैन्यानें कच खाऊन माघार घेतली, आणि हतशेष सैन्य लंकेंत परतून गेलें.

त्या दिवशीं सर्व शहरांत कल्लोळ उसळून गेला. घरोघर रडारड सुरू होऊन बायका-पोरें, म्हातारे-कोतारे आपल्या मेलेल्या नवऱ्यांसाठीं, बापासाठीं, मुलासाठीं, शोक करूं लागले. शोक करतां करतां त्या उघड्या पडलेल्या राक्षसांच्या स्त्रिया रावणाची निंदा करून त्यास शाप देऊं लागल्या. "या शहरावर हा भयंकर अनर्थ त्या मेल्या शूर्पणखेनें आणला आहे, ही शूर्पणखा शंकराच्या कोपानें उत्पन्न झालेली कृत्याच आहे, हिनें आमच्या घरादारांचा नाश केला, हा दुष्ट हट्टी दुराचारी रावण आमच्या कुंकवावर उठला आहे." स्त्रियांच्या अशा अनेक प्रकारच्या विलापानें तें शहर शोकसमुद्राच्या वादळांत सांपडल्यासारखें दिसूं लागलें. त्या राक्षसस्त्रियांचे विलाप ऐकून रावण चाबूक बसलेल्या घोड्याप्रमाणें तडफडून उठला. 'माझा रथ तयार करा,' अशी त्यानें दांतओंठ खात अस्पष्ट शब्दानें राक्षसांस आज्ञा दिली; व महापार्श्व व विरूपाक्ष यांस आपल्याबरोबर निघण्यास सांगितलें. थोडयाच वेळांत रावणाचा मजबूत व आठ घोडे लावलेला रथ तयार होऊन आला. "आज रामलक्ष्मणांस मी आपल्या दिव्यास्त्रानें ठार मारून ज्याचे बंधु, पति, पुत्र, मेले आहेत, त्यांच्या अश्रूंचें परिमार्जन करितों." असें

म्हणून रावण रथावर चढला. त्या वेळेस त्याच्या चर्येकडे कोणास पाहवेना. सर्व राक्षस त्याजपासून दूर हात जोडून उभे होते. रावण युद्धास निघाला तों सूर्य धुळीनें अंधुक झाला; चारी दिशांना अंधकार पसरला, धरणी कंपायमान झाली; घोडे अडखळूं लागले व रथाच्या ध्वजावर गिधाडानें झडप मारिली. याप्रमाणें अनेक अपशकुन झाले, तरी त्या सर्वांचा अनादर करून रावण आपल्या सरदारांसह उत्तर-दरवाजानें बाहेर पडला. क्रोधानें संतप्त होऊन त्यानें वानरसैन्यावर बाणांचा वर्षाव सुरू केला; व त्याचे सरदारही शत्रूवर तुटून पडले. त्या वेळच्या घनघोर संग्रामांत दोन्हीकडील वीरांनीं आपल्या पराक्रमाची शर्थ केली. अंगद, सुग्रीव, हनुमान्, नीळ इत्यादिकांनीं जीं जीं कृत्यें केलीं तीं समग्र वर्णन करणें शक्य नाहीं. महापार्श्व व विरूपाक्ष हे राक्षसवीर समरांगणीं पडलेले पाहून रावणानें क्रोधानें दांत ओठ चावून मोठ्या त्वेषानें रामलक्ष्मणांवर चाल केली. तेव्हां लक्ष्मणानें सात बाणांनीं रावणाचे घोडे व सारथी मारले. तेव्हां रावणानें रथाखालीं उडी टाकून लक्ष्मणावर एक भारी व तीक्ष्ण शक्ति हातानें तोलून इतक्या जोरानें फेंकून मारिली कीं, ती लक्ष्मणाची छाती फोडून आंत घुसली, आणि लक्ष्मण मूर्च्छित होऊन धाडकन् खालीं पडला. ते पाहून रामानें धावून ती शक्ति लक्ष्मणाच्या अंगातून खेचून काढली आणि रागाच्या आवेशांत ती कडाड मोडून फेंकून दिली. रावण रामावर बाण मारीतच होता, तें सर्व सहन करून रामानें सुग्रीवादिकांस सांगितले कीं, तुम्ही लक्ष्मणाला गराडा घालून त्याचें रक्षण करा. मी या दुष्टाचा निकाल आजच लावतों. असें सांगून रामानें रावणावर बाणांचा केवळ वर्षाव सुरू केला. तो दुःसह होऊन रावण पुनः पूर्वीप्रमाणे भीति खाऊन लंकेंत पळून गेला.

( युद्ध० सर्ग० ९४-१०१ ).

इकडे राम लक्ष्मणाजवळ येऊन व त्याचें डोकें मांडीवर घेऊन मोठ्यानें शोक करूं लागले, " आजपर्यंत मला साथ देऊन लक्ष्मणा, आज तूं स्वर्गलोकास कां चाललास ? मी एकटा अयोध्येंत आतां कसा परत जाऊं ? तुझ्या आईला मी काय सांगूं ? आतां सीतेला सोडवून तरी मला काय करावयाचें आहे? सुषेणा, हा वीर आपली मातुःश्री व राज्य सोडून माझ्याबरोबर वनवासांत दुःख भोगण्यास आला. असा बंधु मला पुनः मिळेल काय ? या जगतांत बायको मिळेल, संबंधी मिळतील, पण लक्ष्मणासारखा बंधु

मिळणार नाहीं. लक्ष्मणा, माझ्याबरोबर तूं वनवासास आलास;तेव्हां तुझ्या-बरोबर मीही स्वर्गास येतों. तूं एकटा तेथें जाऊं नको ! " असें म्हणून रामांनीं लक्ष्मणास मिठी मारली. तो त्यांचा अनावर शोक पाहून सर्व वानर सरदार व बिभीषण रडूं लागले. इतक्यांत सुषेण रामचंद्रास धीर देऊन म्हणालाः—" महाराज, लक्ष्मण मेला नाहीं, असें मला वाटतें. याचें मुख निस्तेज झालें नाहीं. त्याच्या हातचे तळवे पद्मपत्रासारखे थंड व सुखस्पर्श लागतात. याच्या हृदयात धुगधुगी अजून आहे. श्वासोच्छ्वासही मंद चालू आहे. या वेळेस जर संजीवनी मिळेल, तर मी याला आतां शुद्धीवर आणतों. " तेव्हां हनुमान् पुढें होऊन म्हणालाः—" सुषेणा, संजीवनी कोठें मिळेल ती सांग. मी ती एका क्षणार्धांत घेऊन येतों. " तेव्हां सुषेण म्हणालाः—" हें दुष्कर कर्म तुझेंच आहे, दुसऱ्याचें नाहीं.जा; हिमालयावर महोदयगिरीच्या दक्षिण शृंगावर संजीवनी महौषधि आहे, ती घेऊन ये; व तेथेंच विशल्यकरणी व सावर्णकरणी औषधि आहेत, त्याही घेऊन ये. " असें म्हणतांच मारुतीनें एकदम उड्डाण केलें. थोड्याच वेळांत हिमालय पर्वतावर पोंचून महोदयगिरीच्या दक्षिणशृंगावर तो औषधि शोधूं लागला;परंतु त्याला ती ओळखेना.आतां येथें शोध करीत बसण्याची वेळ नाहीं, असा विचार करून सबंध शृंगच्या शृंग मारुतीनें उपटून चेंडू-सारखें हातावर तोलून धरून पुनः हिमालयावरून उड्डाण केलें आणि लंकेंत सुषेणाजवळ तो खालीं उतरला. सुषेणानें मारुतीचें आश्चर्यकारक कर्म पाहून तोंडांत बोट घातलें; आणि अत्यंत प्रेमानें त्याची पाठ थोपटली. मारुतीनें किंचित् दम खाऊन म्हटलें:—" या शृंगावरील औषधि तुम्ही ओळखून घ्या. मला ओळख पटेना; आणि वेळ जास्त लागल्यास लक्ष्मणा-च्या जिवाला धोका होईल, असें वाटून हें शृंगच मी आणिलें आहे. " सुषेणानें जरूर होत्या त्या औषधि घेऊन त्या वांटून लक्ष्मणाच्या नाकांत रस पिळला, त्याबरोबर लक्ष्मण सावध होऊन उठून बसला. तेव्हां रामानें " बाळा लक्ष्मणा " म्हणोन त्यास पोटाशीं धरिलें आणि म्हटलें:— " लक्ष्मणा, तूं मारुतीच्या प्रयत्नानें व सुषेणाच्या कृपेनें पुनः जीवलोकांत आलास, हें पाहून मला किती तरी आनंद झाला आहे ! तूं मरतास तर मला माझ्या जिवाची आणि सीतेचीही कांहीं गरज नव्हती. " लक्ष्मणानें रामाचें सांत्वन करून म्हटलें, "मी आतां चांगला आहे, आपण आपली प्रतिज्ञा

पूर्ण करून त्या राक्षसाधमाचा निःपात करा,'' अशी रामास विनंति केली.
( युद्ध० सर्ग०—१०२ ).

एवढ्या कृत्याला एक मुहूर्त लागला नसेल. रावण लंकेंत परतला होता, तो क्रोधाचा व वीरश्रीचा पुनः आश्रय करून दुसऱ्या रथावर बसून व मरेन किंवा मारीन असा निश्चय करून पुनः शहराबाहेर पडला; आणि मेघ जशी पर्वतावर पर्जन्याची वृष्टि करतो, त्याप्रमाणें रामावर शराचा वर्षाव करूं लागला. रामालाही लक्ष्मणाच्या संबंधानें त्वेष आला होता. तेव्हां त्यांनीही आपल्या अक्षय्य बाणांनीं रावणाच्या बाणांस हाणून पाडिलें. त्याप्रमाणें त्या दोघां पराक्रमी वीरांचें द्वंद्वयुद्ध सुरूं झालें. तेव्हां सर्व राक्षस व वानर रणांगणावर स्तब्ध होऊन तें द्वंद्वयुद्ध पाहूं लागले. देव, असुर, दानव, गंधर्वही आकाशांत जमा झाले. इंद्राच्या आज्ञेनें दिव्य रथ घेऊन मातलि रामापाशीं आला; आणि ''रावण रथावर आहे, तुम्ही पादचारी आहां; तेव्हां इंद्रानें आपला रथ तुम्हांकरितां पाठविला आहे; याजवर चढून युद्ध करा;'' अशी त्यानें रामास विनंति केली. तेव्हां ती विनंति मान्य करून राम रथावर बसले. याप्रमाणें दोघे समान वाहक होऊन युद्ध चालूं झालें; तें रात्रंदिवस चाललें. रावणानें प्राण घेईन किंवा ठेवीन, हाच निर्धार केला होता. रामानेंही आज अराम किंवा अरावण जग होईल, अशी प्रतिज्ञा केली होती. अनेक अस्त्रांचे प्रयोग एकमेकांनीं एकमेकांवर केले. परंतु कोणीही हार जाईना. शेवटीं रामानें पराक्रम करून एका बाणानें दशाननाचें शिर उडविलें. परंतु चमत्कार असा झाला कीं, त्या शिराऐवजीं दुसरें शिर पुनः उत्पन्न झालें! असें शंभरदां झालें तेव्हां अगस्त्य ऋषींनीं खुद्द येऊन रामास सूर्याचा स्तव करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें सूर्याची स्तुति करून रामचंद्रानें अगस्त्य ऋषींनींच पूर्वी दिलेला बाण धनुष्यास लाविला. हा बाण ब्रह्मदेवानें त्रैलोक्याच्या जयासाठीं उत्पन्न करून इंद्रास दिला होता. त्याच्या पिसाऱ्यांत वायूचें तत्त्व भरलें होतें आणि त्याच्या फळांत अग्नि व सूर्य यांचें तेज भरलें होतें. असा तो दिव्य बाण प्रजापति अस्त्रानें भारून रामानें रावणाच्या वक्षस्थलावर मारला. तेव्हां तो बाण रावणाचें हृदय फोडून बाहेर पडून जमिनींत घुसून गेला! त्याबरोबर रावण एकदम गतप्राण होऊन रथांतून धाडकन् खालीं जमिनीवर पडला! तें पाहून हतशेष राक्षस भयानें लंकेंत पळून गेले व वानरसैन्यानें एकदम जय शब्दाची आरोळी ठोकिली! आकाशांतून देवांनीं

रामावर पुष्पवृष्टि केली आणि ' साधु साधु ' शब्दानें त्यांनीं रामाचा जयजयकार केला. सर्व चराचर जगतास त्रास देणारा भयंकर रावण मरण पावला हें पाहून तिन्ही लोकांना आनंद झाला.

( युद्ध० सर्ग० १०३—१११ ).

एवढा वेळ शत्रुत्वानें लढणाऱ्या बिभीषणास आतां दुःखाचा वेग असह्य होऊन त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या. तेव्हां रामानें त्याचें सांत्वन करून म्हटलें:—" बिभीषणा, रणांत जय किंवा अपजय ठरलेलाच आहे. परंतु हा तुझा शूर भ्राता पराक्रम करून रणांत समोर घाव खाऊन मेला आहे. क्षत्रिय शूराला असेंच मरण यावें. असें मरण शोकाचें कारण नसून उलट प्रशस्त आहे. तर आता शोक करूं नको. याच्या पुढच्या विधीच्या तजविजीस लाग. आमचें वैर याच्या मरणाबरोबर संपलें.जसा हा तुझा भाऊ तसा माझाही आहे. आतां याच्या उत्तरक्रियेची व्यवस्था कर. तर ऊठ, याच्या प्रेताची व्यवस्था योग्य रीतीनें लाव." याप्रमाणें बिभीषणाचें सांत्वन रामचंद्र करीत आहेत, तों दशमुखाच्या सहस्र स्त्रिया रावण मेल्याची खबर ऐकून शोक करीत शहराबाहेर पडल्या. रणभूमीवर हजारों प्रेतें पडलेलीं पाहत पाहत त्या रावणाच्या प्रेताशीं येऊन पोहोंचल्या, आणि छिन्न झालेल्या वेलीप्रमाणें त्याजवर एकदम पडल्या. कोणीं त्याचे चरण अंकावर घेतले, कोणीं हात घेतले, कोणीं शिर घेतलें, व " हा नाथ, हा महाराज, आम्हांला सोडून कसे गेलां ! " याप्रमाणें त्या आक्रोश करूं लागल्या. तेव्हां सर्वांचें हृदय दुःखानें भरून गेलें.सर्वांत श्रेष्ठ पत्नी मंदोदरी रावणाच्या मुखावर अश्रुधारा टाकीत शोक करीत म्हणाली:—"महाराज, तुमच्या समोर कृतांत सुद्धां उभा रहाण्यास भीत असे; त्या तुम्हांला आज मनुष्याच्या हातून कसें मरण आलें ! मला वाटतें, हा राम नव्हे श्रीविष्णुच प्रत्यक्ष अवतार घेऊन आला आहे आणि हे वानरही नव्हत, तर सर्व देव वानररूप घेऊन त्याच्या साहाय्याकरितां आले आहेत. किंवा परम पतिव्रता सीता हिला तुम्हीं जबरदस्तीनें आणलें हेंच पातक तुम्हांला घातक झालें नाहींना ! लोक म्हणतात, तें कांहीं खोटें नाहीं कीं, पातिव्रतेचे अश्रु जमिनीवर फुकट पडत नाहींत. नाहीं तर सर्व देवदानवांना जिंकून आज तुम्ही रणांगणावर मृत्युमुखीं कसे पडला असतां ! महाराज, मी तुम्हांला कित्येकदां विनवणी केली कीं,सीतेला पाठवा; परंतु तुम्हीं माझें

ऐकिलें नाहीं आणि आतां आपलाही नाश करून घेतला व आम्हा सर्वांचाही केला. सीता आतां मोठ्या आनंदानें रामासह विहार करील, आणि मी अभागी मात्र शोकसागरांत पडून राहणार! महाराज, तुम्ही रत्नखचित पलंगावर निजणारे असून आतां या रणांगणांत जमिनीवर कसे पडलां! राक्षसांच्या राजाची मी पट्टराणी, दानवांचा राजा माझा बाप, देवांच्या राजाला जिंकणारा माझा पुत्र, असें माझें भाग्य असतां मी आता पुत्रपतिविहीन होऊन दुःखसागरांत पडलें आहे. मी स्वप्नांत तर नाहींना! महाराज, उठा. ह्या तुमच्या पट्टराणीशीं कांहीं तरी बोला. स्वर्गाला मला बरोबर घेऊन चला. मीं आता तुमच्यावांचून क्षणभरही जीव ठेवणार नाहीं." असें म्हणून शोकानें विव्हल होऊन रावणाच्या विस्तीर्ण वक्षस्थलावर ती मूर्च्छित होऊन पडली. तेव्हां अंतःपुरांतील स्त्रियांनीं तिला उचलून दूर केलें. इतक्यांत बिभीषणानें रावणाच्या प्रेतकृत्याची तयारी करविली; आणि चंदन, अगरु इत्यादि काष्ठ जमा करून व रावणाचें प्रेत सुवर्णरथांत घालून दहनाच्या जागेवर नेलें; व त्या प्रेतास यथाविधि अग्नि दिला. नंतर सर्व स्त्रियांसहवर्तमान रावणास तिलांजलि देऊन व सर्व स्त्रियांचें सांत्वन करून त्यानें त्यांस शहरांत पाठविलें आणि तो त्वरेनें रामाजवळ आला. तेव्हां रामानें त्यास व सुग्रीवास मोठ्या प्रेमानें आलिंगन देऊन म्हटलें:—" आज तुमच्या दोघांच्या साहाय्यानें मी कृतकृत्य झालों आहें." असें म्हणून रामांनीं धनुष्य खालीं ठेविलें. नंतर लक्ष्मणाकडे पाहून राम म्हणाले:—" लक्ष्मणा, हा माझा परम भक्त व मित्र बिभीषण याला लंकेंत नेऊन राज्याभिषेक कर; व हेंच माझें कर्तव्य आहे. आणि हीच माझी अत्यंत उत्कट इच्छा आहे कीं, बिभीषणाला लंकेच्या राज्यावर बसलेला पहावें." असें म्हणतांच लक्ष्मणानें वानरांना सुवर्णकलश देऊन समुद्रजल आणण्यास सांगितलें. त्याप्रमाणें ते थोड्याच वेळांत पाणी घेऊन येतांच बिभीषणास घेऊन लक्ष्मण लंकेंत गेला. जे राक्षस जिवंत राहिले होते त्यांनीं मोठ्या प्रेमाने बिभीषणास लंकेच्या राजसिंहासनावर बसवून राज्याभिषेक केला. जिकडे तिकडे जयशब्दाचा घोष होऊन मंगल वाद्यें वाजू लागलीं. नंतर सर्व राक्षसांचें सांत्वन करून बिभीषण मोठ्या त्वरेनें लंकेबाहेर जेथें रामचंद्र होते तेथे लक्ष्मणासहित आला, व रामास हात जोडून दधि, अक्षता, लाह्या इत्यादि

मंगलसूचक पदार्थ त्यानें त्यांस अर्पण केले; व ते रामांनीं मोठ्या प्रीतीनें ग्रहण केले. (यु० स० ११२-११४).

नंतर समोर नम्रतेनें उभा राहिलेला शैलासारखा प्रचंड वीर मारुति याजकडे पाहून रामचंद्र म्हणाले:—" बा हनुमाना, बिभीषणाची आतां परवानगी घेऊन व लंकेंत जाऊन सीतेला मी लक्ष्मण व सुग्रीव कुशल आहेंत, असें कळवून रावण मारला गेला असें सांग. ही प्रिय वार्ता सीतेला सांगण्यास तूंच योग्य आहेस, आणि ती जो जबाब देईल तो घेऊन ये." अशी आज्ञा होऊन बिभीषणाची परवानगी घेऊन हनुमान् मोठ्या त्वरेनें लंकेंत गेला व अशोकाच्या वनांत त्यानें सीतेची भेट घेतली. कित्येक दिवस स्नान नसल्यामुळें मलिन झालेली परम साध्वी सीता कांहीं वेळपर्यंत स्तब्ध वृत्तीनें त्याच्याकडे टक लावून पाहत होती. पूर्वीपासूनचें सर्व वृत्त तिच्या डोळ्यांसमोर उभें राहिलें, आणि हर्षानें तिच्या अंगावर रोमांच आले. तिचें सौम्य आनंदित मुख पाहून मारुतीनें रामाचा निरोप सांगण्यास आरंभ केला:—" वैदेहि, रामचंद्र कुशल आहेत. लक्ष्मण, सुग्रीवही आनंदांत आहेत. श्रीरामचंद्रानें आपल्या शत्रूचा वध करण्याची प्रतिज्ञा सिद्धीस नेऊन तुला कुशल विचारिलें आहे. आणि असा निरोप सांगितला आहे कीं, "सीते, वानरांच्या आणि बिभीषणाच्या साहाय्यानें रावणास मीं समरांगणांत ठार मारिलें आहे, ही प्रिय बातमी तुला कळवीत आहे. सीते, यांत मी तुझेंच मनोभावानें अभिनंदन करतों. कारण **तुझ्यासारख्या धर्मपरायण स्त्रीच्या प्रभावानेंच मला हा लढाईत मोठा जय मिळाला आहे.** समुद्रावर सेतु बांधून मीं आपली दुष्कर प्रतिज्ञा पार पाडली आहे. तर आतां तूं काळजी करूं नको. लंकेंत तुला कोणाचीही भीति नाहीं. कारण, आतां लंकेंत बिभीषण राज्य करीत आहे. तूं आपल्या घरींच आहेस असें समज आणि हा माझा अत्यंत आनंदित झालेला मित्र हनुमान् मीं तुझ्याकडे पाठविला आहे." याप्रमाणें रामाचा अक्षरशः निरोप सीतेला हनुमानानें सांगितला. परंतु सीतेनें कांहींच प्रत्युत्तर दिलें नाहीं. तिची मुद्रा मात्र विलक्षण तेजस्वी व आनंदित दिसूं लागली व तिच्या विशाळ नेत्रांतून घळघळ अश्रु निघूं लागले. कांहींशा चिंतायुक्त स्वरानें हनुमानानें विचारिलें:— "देवि वैदेहि, मला तूं कांहीं प्रत्युत्तर देत नाहींत !" तेव्हां सीतेनें म्हटलें:—" हनुमाना, ही जी प्राणाहूनही अत्यंत प्रिय बातमी तूं मला

सांगितली, त्याबद्दल तुला योग्य बक्षीस द्यावयास मजजवळ कांहीं नाहीं, हें मनांत येऊन मी अशी स्तब्ध झाल्यें आहें. या पृथ्वीवरील सर्व रत्नें किंबहुना त्रैलोक्याचें राज्यही मी तुला दिलें तरी मी तुझी या प्रियवार्तेबद्दल उतराई होणार नाहीं." हे शब्द ऐकून मारुतीच्या मनांतली सर्व शंका नाहींशी होऊन त्याला एकदम आनंदाचें भरतें आलें, व त्यानें हात जोडून प्रार्थना केली, "वैदेहि, तुझ्या मोठेपणाला हे शब्द शोभतात. इतरांजवळ असें भाषण कोठून ऐकावयास मिळणार आहे; असो, मी या प्रत्युत्तरानें धन्य झालों आहें, आतां मला एक परवानगी दे. तुला मृत्युतुल्य त्रास देणाऱ्या या क्षुद्र आणि दुष्ट राक्षसिणींना हाल हाल करून मी ठार मारूं इच्छितों. यांच्या पशुतुल्य आचरणाला हेंच पारिपत्य योग्य आहे." हें ऐकून सीतेनें काकुळतीनें उत्तर दिलें:—"नको नको, हनुमाना, यांना मारूं नको, यांचा कांहीं अपराध नाहीं. यांनीं जें केलें तें केवळ रावणाच्या आज्ञेनें केलें. ह्या बिचाऱ्या रावण मेल्यापासून मला मुळींच त्रास देत नाहींत. जें झालें तें माझ्या नशिबानें झालें. शिवाय **दुसऱ्यानें आपल्यास दुःख दिलें म्हणून आपला जय झाल्यावर त्याचें उसनें कधींही फेडूं नये.** वनातल्या अस्वलाची आणि माणसाची गोष्ट तुला ठाऊक आहेना? अस्वलाला वाघाच्या शिकवणीवरून माणसानें खालीं ढकललें. तेव्हां अस्वलानें सावरून वर चढतांना त्या माणसाचा सूड उगवला नाहीं. त्यानें म्हटलेलें वचन लक्षांत ठेव. पापाचरण करणाऱ्याचें पाप शहाण्या मनुष्यानें घेऊं नये. **आपलें शील कायम ठेवावें. कारण शील हेंच सज्जनाचें भूषण आहे.** पापी माणसाचा किंबहुना वधार्ह मनुष्याचा सुद्धां अपराध शक्य असेल तर आर्यजन क्षमा करितात. कारण अपराध कोणाच्या हातून घडत नाहीं?" हें सीतेचें अत्यंत उदारपणाचें भाषण ऐकून मारुतीच्या तोंडांतून 'धन्य धन्य' अशीं अक्षरें निघालीं. व "रामचंद्राची तूं योग्य धर्मपत्नी आहेस," असें त्यानें म्हटलें. नंतर रामचंद्रास काय जबाब सांगूं, असें विचारतां 'मी आपल्या भक्तवत्सल पतीचें मुख पाहूं इच्छितें.' असें सीतेनें म्हटलें. तेव्हां मारुति मोठ्या त्वरेनें लंकेबाहेर रामचंद्रापाशीं येऊन म्हणालाः—"जिच्याकरितां हा एवढा खटाटोप केला, ती शोकमूर्ति सीतादेवी आपल्यास भेटूं इच्छित आहे. तुमचा विजय झालेला ऐकून तिच्या डोळ्यांत आनंदाश्रु

आले व तिनें आपल्या दर्शनाची उत्कट इच्छा प्रदर्शित केली. पूर्वीच्या ओळखीपासून तिचा माझ्यावर विश्वास आहे; आणि म्हणूनच लज्जा सोडून मी भर्त्याला पाहूं इच्छितें, असें डोळ्यांत आसवे आणून ती म्हणाली." याप्रमाणें हनुमानाचें भाषण ऐकून रामचंद्र अत्यंत दुःखित होऊन कांहीं वेळ स्तब्ध राहिले; व दीर्घ उच्छ्वास टाकून जमिनीकडे डोळे लावून बिभीषणाला म्हणालेः-- "बिभीषणा, सीतेला स्नान घालून, दिव्य अंगराग लावून व उत्तम वस्त्रालंकारांनीं भूषित करून येथे लवकर आणवा; विलंब करूं नका" त्या आज्ञेप्रमाणें बिभीषणानें सीतेला स्नान करण्यास विनंति केली. तिची तशी इच्छा नव्हती, तरी भर्त्याची आज्ञा शिरसावंद्य करून तिनें स्नान केलें; उत्तम वस्त्र परिधान करून अलंकारही घातले व शिबिकेंत बसून बिभीषणाबरोबर निघाली. ती लंकेबाहेर वानरसैन्यापाशीं येतांच बिभीषणाचे सोन्याच्या काठीचे चोपदार रामचंद्रापाशीं असलेल्या वानरांना 'हटा हटा' म्हणत बाजूला करूं लागले; तेव्हां मोठा गलबला झाला. रामचंद्रानें किंचित् नाराज होऊन म्हटलें:--"बिभीषणा, या माझ्या प्रिय वानरांना माझ्या आज्ञेवांचून व्यर्थ कां त्रास देतां ! सीतेला शिबिकेतून उतरून पायींच येथें घेऊन या. जिच्याकरितां या वानरांना मीं इतका त्रास दिला, तिला त्यांना पाहूं द्या. दुःखाचे प्रसंगीं, विवाहांत, युद्धांत अथवा यज्ञाच्या वेळीं स्त्रिया लोकांच्या समोर आल्या तरी हरकत नाहीं." बिभीषणानें या आज्ञेप्रमाणें सीतेला पायीं सर्वांच्या समक्ष रामापाशीं आणलें. परंतु रामाचे हे कठोर शब्द लक्ष्मण, हनुमान् व सुग्रीव यांच्या कानाला कसेसेच लागले. सीतादेवीचें नर लज्जेनें सर्व अंग विरघळून जाऊन ती मोठ्या प्रयासानें रामचंद्रापाशीं येऊन पोहोंचली. आपलें परम दैवत म्हणजे पति, असें मानणारी सीता अत्यंत हर्षानें, विस्मयानें व प्रेमानें रामचंद्राच्या मुखकमलाकडे पाहूं लागली. पण त्या मुखावर त्या वेळेस तिला प्रीतीची प्रतिछाया दिसली नाहीं. त्या मुखावर एकामागून एक दैन्य व रोष यांच्या लहरी येत होत्या. ती रामाची विलक्षण स्थिति पाहून सीतेला अकल्पित विषाद व भीति उत्पन्न झाली. सीता हात जोडून विनयानें व लज्जेनें लीन होऊन आपल्याजवळ उभी आहे, असें पाहून आपल्या हृदयांतील भाव प्रकट करून रामचंद्र बोलूं लागले:--"सीते, शत्रूला रणांगणांत ठार मारून व तुला बंदिवासांतून सोडवून येथें आणिलें

आहे. शूर पुरुषानें जें कर्तव्य करावयाचें तें मीं केलें. माझ्या शत्रूचा आणि माझ्या अवमानाचा मीं बरोबर निःपात केला. माझ्या पराक्रमाची आज सिद्धता झाली आहे; माझे श्रम आज सफल झाले आहेत. दुस्तर समुद्र उतरून येऊन मीं आपली प्रतिज्ञा आज सिद्धीस नेली आहे. दुराचरणी परपुरुषानें तुला बलात्कारानें नेलें, हा माझ्या दैवानें मला कलंक लागला होता, तो मीं मनुष्यप्रयत्नानें आज धुऊन टाकला आहे. **दुसऱ्यानें अवमान केला असतां, जो मनुष्य आपल्या तेजानें त्याचा प्रतिकार करीत नाहीं त्या क्षुद्रचित्ताचें सामर्थ्य किंवा पौरुष काय कामाचें ?** हनुमानानें शतयोजन समुद्राचें उल्लंघन करून लंकेचा विध्वंस केला, त्या महान् पराक्रमाचें चीज आज झाले आहे. सुग्रीवानें व त्याच्या सैन्यानें जें कित्येक दिवस भयंकर युद्ध केलें तें आज सफल झालें आहे. आपल्या दुष्ट भावाला सोडून माझ्यासाठीं बिभीषणानें जी मेहनत केली, ती आज फलद्रूप झाली आहे. '' याप्रमाणें भाषण करीत असतां सीतेचें हृदय, रामचंद्र पुढें काय म्हणतात, या जिज्ञासेनें उचंबळून येऊन ती आपल्या पतीकडे उत्फुल्ल नयनांनीं पाहूं लागली; तों रामचंद्र म्हणालेः—

'' पण सीते, हा जो एवढा मीं अट्टाहास केला तो तुझ्याकरितां नव्हे, हें तुला लक्षांत घेतलें पाहिजे. माझ्यावर व माझ्या विख्यात कुलावर जो कलंक आला होता, तो धुऊन काढण्याकरितां हा महान् युद्धाचा परिश्रम मीं व माझ्या मित्रांनीं केला, तो तुझ्याकरितां नव्हे. कारण, तुझ्या शुद्ध स्थितीविषयीं संशयाला जबर कारण उत्पन्न झालें आहे. तूं आतां माझ्या पुढें उभी आहेस, ती तूं मला आनंद देत नसून जसा डोळे आलेल्या मनुष्यास दिवा नकोसा होतो, त्याप्रमाणें तुझें मुख पाहूं नये, असें मला वाटतें. तर वैदेहि, तूं येथून जा. तुला जेथें इच्छा असेल तेथें जा. माझी तुला परवानगी आहे. या दाही दिशा तुला मोकळ्या आहेत. कोणता कुलीन व तेजस्वी पुरुष परगृहांत बराच काळ कैदेंत टाकलेल्या स्त्रीस लोभांत गुंतून आपल्या घरात परत घेईल ! '' असें म्हणून क्रोधानें लाल झालेलें आपलें मुख रामचंद्रांनीं सीतेकडून दुसरीकडे फिरविलें. याप्रमाणे रामाचे रोमांच आणणारे कठोर भाषण ऐकून सीतेला डोक्यावर जशी वीज कोसळावी, त्याप्रमाणें झालें. ती दुःखाच्या वेगानें मूर्च्छित होऊन खालीं पडली असती, पण रागाच्या भरानें तिला सावरून धरिलें. भरसमाजांत बोललेलें तें अश्रुतपूर्व रामाचें

भाषण सीतेला सहस्र भाल्यांप्रमाणें टोंचलें, व तिच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. कांहीं वेळानें हातानें डोळे पुसून सद्गदित वाणीनें ती हळू हळू म्हणाली:—" जसा एखादा प्राकृत पुरुष आपल्या प्राकृत बायकोला टाकून बोलतो त्याप्रमाणें हें कर्णकठोर भाषण वीरा रामचंद्रा, मला कां ऐकविलें? जशी तुम्हाला शंका आहे, त्याप्रमाणें मी नाहीं; याची तुम्हीच आपल्या ठिकाणीं परीक्षा पहा. तुम्हांला तुमच्याच मोठेपणाची शपथ आहे. आतां रावणानें मला उचलून नेलें, तेव्हां त्याचा मला स्पर्श झाला; याला माझा इलाज नाहीं. हा माझ्या दैवाचा अपराध आहे; पण माझें हृदय माझ्या हातांत आहे, तें तुमच्याशिवाय अन्य पुरुषाकडे कधींही गेलें नाहीं. जर तुमच्याबरोबर इतकीं वर्षें काढूनही माझी ओळख तुम्हांला झाली नाहीं, तर माझा कायमचाच नाश झाला असें मी समजत्यें. महाराज, ज्या वेळेस तुम्हीं हनुमानाला माझी स्थिति पाहण्याकरितां लंकेंत पाठविलें तेव्हांच तुम्ही माझा त्याग कां केला नाहीं? तसें होतें तर मीं तेव्हांच त्याच्यासमोर प्राण दिला असता. मग तुम्हांस इतक्या असंख्य वीरांचे प्राण संकटांत पाडावे लागले नसते. राजसिंहा, तुम्ही या वेळेस रोषाधीन होऊन लहानपणीं लग्नांत मीं तुमचा हात धरिला, त्या गोष्टीकडे अगदीं दुर्लक्ष केलें. माझी इतके दिवस दिसून येणारी भक्ति माझें प्रख्यात कुळ, माझें शील, या सर्व गोष्टी तुम्हीं मागें सारल्या." असें म्हणताना सीतेचा कंठ दाटून आला व तिच्यानें पुढें बोलवेना. थोड्या वेळानें बाष्पपूर्ण नेत्रांनीं लक्ष्मणाकडे वळून ती म्हणाली:—" लक्ष्मणा, या संकटांतून मला एकच तरणोपाय दिसतो. बाळा, काष्ठें आणवून आतांच चिता तयार कर, म्हणजे मी चितेंत उडी घेत्यें. मी शुद्ध असेन तर मला अग्निनारायण जाळणार नाहीं; मी पापी असेन तर अग्नींत जळून मरणें हेंच मला उचित आहे." लक्ष्मणानें अत्यंत दैन्यानें रामाकडे पाहिलें तों त्यांनींही खुणेनें परवानगी दिली. तेव्हां लक्ष्मणानें लागलीच चंदनकाष्ठें आणवून व चिता तयार करवून ती पेटविली. रामचंद्राकडे त्यावेळेस कोणासही पाहवत नव्हतें. कृतांताप्रमाणें ते दुर्धर दिसत होते, त्यांजवळ रदबदली करण्याची गोष्ट कशाला? चिता तयार होऊन भडका होतांच, सीता अधोवदन झालेल्या रामास प्रदक्षिणा घालून अग्नीपाशीं आली, आणि देवब्राह्मणांना नमस्कार करून हात जोडून अग्नीला म्हणाली:—" अग्निनारायणा, सर्व लोकांचा साक्षी तूं आहेस. माझें

चित्त जर रामचंद्राशिवाय दुसऱ्याकडे कधींही गेलें नसेल, तर माझें रक्षण कर; रामचंद्र, मला समजतात त्याप्रमाणें जर मी अशुद्ध नसेन तर माझें रक्षण कर. " याप्रमाणें अग्नीची प्रार्थना करून व अग्नीला प्रदक्षिणा घालून, तिनें निःशंक अंतःकरणानें अग्नींत उडी टाकली ! हजारों स्त्रिया व पुरुष तिचें तें दुष्कर कर्म पाहण्यास जमा झाले होते. वानराच्या व राक्षसांच्या तोंडांतून एकदम ' हाय हाय ' असा शब्द निघून मोठा आक्रोश झाला. इतक्यांत अग्निपुरुष स्वतः सीतेला हातांत धरून चितेबाहेर निघाला. मध्यान्हींच्या सूर्याप्रमाणें देदीप्यमान दिसणारी, सुवर्णाच्या दिव्य अलंकारांनीं भूषित केलेली, तांबडें वस्त्र परिधान केलेली, दिव्य पुष्पमाला गळ्यांत घातलेली, काळे कुळकुळित केश असलेली व निरुपम सौंदर्यवती अशी ती विशुद्ध झालेली जानकी रामाच्या स्वाधीन करून सर्वसाक्षी भगवान् पावक रामाला म्हणाला :—"ही आपली सीता सांभाळ. इच्या ठिकाणीं यत्किंचितही पाप नाहीं. ही अत्यंत शुद्ध व निष्पाप आहे. हिचा प्रतिपाळ कर." याप्रमाणें अग्नीनें स्वतः सीतेला शुद्ध करून दिल्यावर रामाला जो आनंद झाला, तो कोठवर वर्णन करावा ! थोडा वेळ तल्लीन राहून त्यांनीं हात जोडून अग्नीस उत्तर केलें:—" सीतेनें हें दिव्य करणें जरूर होतें. कारण, दुष्ट रावणाच्या अंतःपुरांत दीर्घ काल राहिल्यामुळें पावन केल्याशिवाय मीं तिचें ग्रहण केलें असतें, तर मला लोक केवळ मूर्ख, बालिश, कामपरायण म्हणते. सीता शुद्ध आहे व माझ्यावर तिचें चित्त पूर्ण आहे, हें मी जाणतों. याशिवाय अशा पतिव्रता स्त्रियांना त्यांच्या सद्गुणाच्या तेजामुळें अग्निज्वालेप्रमाणें परपुरुषास स्पर्शही करतां येणें शक्य नाहीं. तथापि लोकांच्या शंकेकडे पाहिलें पाहिजे. आपण विशुद्ध करून मला ही माझी प्रिय भार्या दिली आहे, तेव्हां आतां तर शोधलेल्या सोन्याप्रमाणें मला ती अधिकच प्रिय आहे. " असें रामचंद्र म्हणत आहेत तों इंद्रादि लोकपाल आकाशांत येऊन त्यांनीं रामचंद्रावर व सीतेवर पुष्पवृष्टि केली, व इंद्रानें रामास म्हटलें:—" रामचंद्रा, रावणास मारून सर्व देवांना भीतीपासून तूं मुक्त केलें आहेस; व या परम साध्वीनें हें दुष्कर दिव्य करून आपली कीर्ति तिन्ही लोकांत अक्षय्य केली आहे; म्हणून संतुष्ट होऊन आम्ही दर्शन देत आहों. रामा, आमचें दर्शन कधींही निष्फळ होत नाहीं. आम्ही तुला वर देतों. तुला जें हवें असेल तें माग. " तेव्हां रामचंद्रांनीं

'रणांत मेलेल्या सर्व वानरांना व अस्वलांना जिवंत करा,' असा वर इंद्रापाशीं मागितला. इंद्रानेंही रामाला 'धन्य धन्य' अशी शाबासकी देऊन आपल्या अमृत दृष्टीनें मेलेले सर्व वानर व अस्वल उठाविले. याप्रमाणें मेलेले वानर व ऋक्ष जिवंत झाले तेव्हां सुग्रीव, जांबवान् वगैरे सर्व सरदारांनीं रामचंद्राभोंवतीं जमून व आनंदाचा टाहो फोडून रामाचा जयजयकार केला. त्या वेळेस आनंदाचीच पराकाष्ठा झाली. रामचंद्रास व सीतेस जो आनंद झाला, तो तर शब्दातीत होता. देवांनाही त्रिजगताचा शत्रु मेल्याचा आनंद होऊन त्यांनीं रामाला अयोध्येस लौकर परत जाण्याविषयीं सांगून व रामचंद्रानें आदरानें केलेला नमस्कार घेऊन ते अदृश्य झाले. नंतर रामानें बिभीषण, सुग्रीव, जांबवान् व हनुमान् यांस आलिंगन देऊन त्या दिवशीं निश्चित विश्रांति घेण्याविषयीं त्यास आज्ञा केली.

(युद्ध० स० ११५-१२२).

त्या रात्रीं सर्वांनीं सुखानें व आनंदानें झोंप घेतली. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं बिभीषणानें येऊन रामास उत्तम सुगंधि द्रव्यानें मंगल स्नान घालण्याची तयारी करविली व सीतेस स्त्रियांकडून स्नान घालविण्यास रामाची आज्ञा मागितली, व तसेंच सर्व वानरसरदारांनाही स्नान घालण्यास आज्ञा देण्याविषयीं विनंति केली. रामानें उत्तर केलें:—" बिभीषणा, माझा दीन भ्रातृवत्सल बंधु भरत नंदिग्रामांत मुनिव्रतानें रहात आहे. 'चौदा वर्षांनीं तुम्ही परत न आलां तर मी प्राण देईन,' अशी त्यानें प्रतिज्ञा केली आहे. त्याला भेटण्याची मला उत्कट इच्छा झाली आहे. माझा सत्कार करण्याची तुझी फार इच्छा आहे. पण भरताला भेटून त्याला मुक्त केल्यावांचून स्नानालंकार मला गोड लागत नाहींत, तर माझ्या जाण्याची तात्काळ तयारी कर. सुग्रीव वगैरे मित्राना स्नानानें सत्कार कर म्हणजे तो मलाच पोहोंचेल." असें म्हणतांच बिभीषणानें म्हटलें:—" पुष्पक विमानानें आपण आजच्या आज अयोध्येस पोहोंचाल. आपल्यास त्याची काळजी नको. पण माझ्या येथें लक्ष्मणासह व सीतेसह एक दिवस तरी रहा; आणि माझा सत्कार घ्या." परंतु रामचंद्रानें त्याचें समाधान करून पुष्पक विमान लागलेंच आणविण्याविषयीं त्यास आज्ञा केली. तेव्हां तें दिव्य विमान ताबडतोब तेथें आलें. रामानें बिभीषणास म्हटलें:— "बिभीषणा, या वानरांनीं जिवावर उदार होऊन युद्धांत अनेक पराक्रम केले

आणि यांच्या मदतीनें तुला राज्य मिळालें आहे. यांची धनरत्नांनीं तूं संभावना करावी असें मला वाटतें. राजानें प्राप्त झालेल्या धनानें सैन्याला नेहमीं संतोषित करावें." तेव्हां बिभीषणानें सर्व वानरांचा अनेक रत्नें व धन वगैरे देऊन सत्कार केला. मग रामांनीं विमानात बसून सीतेला जवळ घेतलें व लक्ष्मणही विमानांत बसला. नंतर राम सर्वांना म्हणाले:—" सुग्रीवा, बिभीषणा, हनुमाना, जांबवाना, तुम्ही सर्वांनीं हें मित्रकार्य फार उत्तम रीतीनें पार पाडलें. आतां तुम्ही आनंदानें आपआपल्या घरीं जा." तेव्हा सर्वांनीं हात जोडून विनंति केली:—" महाराज, आम्हांस अयोध्येस घेऊन चला. आपला राज्याभिषेक पाहून व भरत, शत्रुघ्न व कौसल्या माता यांना भेटून आम्ही आपल्या घरीं जाऊं." ही विनंति ऐकून रामास फारच आनंद झाला, व त्यांनीं 'उत्तम आहे' असें म्हणून सर्वांस विमानांत घेतलें. त्या दिव्य विमानांत सर्व राक्षस व वानर उत्तम तऱ्हेने अडचणीशिवाय बसले. मग आज्ञा होतांच तें विमान आकाशात उडून उत्तरेकडे जाऊं लागले. राम सीतेला विमानांतून निरनिराळे प्रदेश दाखवून म्हणाले:— " सीते, हा येथें कुंभकर्ण तुझ्याकरितां मारला गेला. हा येथें इंद्रजित् लक्ष्मणानें मारला. ही सर्व लढाईची जागा राक्षसांच्या प्रेतांनीं भरली आहे. ही पहा लंका नगरी, त्रिकूट पर्वतावर बसलेली दिसत आहे. समुद्र उल्लंघून आल्यावर पडलेला हा वानरसेनेचा तळ पहा. हा समुद्रांत तुझ्याकरिता नलानें बांधलेला सेतु पहा. हा भयंकर, अपार, व शंखशुक्तींनीं भरलेला समुद्र पहा. हा पहा हिरण्यनाभ पर्वत, समुद्राच्या मध्ये मारुतीला विश्रांति देण्याकरिता बाहेर निघालेला दिसत आहे. या समुद्राच्या उत्तरतीरावरची ही सैन्याच्या तळाची जागा पहा. येथें महादेवानें माझ्यावर कृपा केली, व येथून हा सेतु बांधला. म्हणोन हा सेतुबंधतीर्थ प्रख्यातीस पावेल. हे पहा, आपण सुग्रीवाच्या किष्किंधेला आलों. ही दिव्य व सुंदर किष्किंधा नगरी पहा." तेव्हां सीतेनें विनंति केली:—" महाराज, तारेला व इतर वानरांच्या स्त्रियांना विमानांतून अयोध्येस आपल्याबरोबर नेण्याची मला फार इच्छा आहे." रामानें लागलेंच विमान खालीं उतरविलें; आणि सुग्रीवास आपल्या सर्व वानरस्त्रियांस आणण्याविषयीं आज्ञा केली. तेव्हा सुग्रीवानें मोठ्या आनंदानें तारेसह सर्व वानरस्त्रियांना उत्तम उत्तम अलंकार घालून विमानापाशीं आणले. त्या विमानांत बसल्या, तेव्हां त्यांनीं

सीतेचें दर्शन घेऊन तीस नमस्कार केला. मग तें विमान पुनः आकाशांत उडून जाऊं लागलें. तेव्हां रामानें सीतेला ऋष्यमूक पर्वताजवळ म्हटलें:— " सीते, हाच तो ऋष्यमूक पर्वत. येथें सुग्रीवाची व माझी भेट होऊन वालीला मारण्याविषयीं मीं वचन दिलें आणि सुग्रीवाशीं सख्य केलें. हें सुंदर पंपासरोवर पहा. तेथें तुझ्याकरितां मीं फार शोक केला. हीच ती आपली पंचवटी, आणि रम्य गोदावरी नदी. या मोठ्या वृक्षावर जटायु बसला होता, तेथून त्यानें रावणावर झडप मारिली व तो तुझ्यासाठीं प्राणास मुकला. सीते, हा केळींच्या झाडांनीं भरलेला अगस्त्यांचा आश्रम पहा. हें पहा; विराध राक्षसास मारल्याचें ठिकाण. हा अत्रिमुनींचा आश्रम पहा. हा चित्रकूट पर्वत पहा. ही पहा विस्तीर्ण आणि खोल अशी पुण्यजला भागीरथी आली. हा भरद्वाजांचा आश्रम आला. हें पहा, शृंगवेरपूर दिसत आहे व त्याच्या पलीकडे दूर अयोध्या दृष्टीस पडत आहे. **सीते अयोध्येला नमस्कार कर. ही आपली पुण्य पितृभूमि आहे** हिला आपण १४ वर्षांनीं परत आलों. " सीतेनें उठून मोठ्या उत्सुकतेनें अयोध्येस नमस्कार केला. वानरराक्षस स्त्रीपुरुषही मोठ्या कौतुकानें उठून अयोध्येस पाहूं लागले. इतक्यांत श्रीरामांनीं विमानास खालीं उतरविण्याची आज्ञा केली तेव्हां तें भरद्वाज ऋषींच्या आश्रमांत उतरलें, व सर्व मंडळींनीं विमानांतून उतरून भरद्वाज मुनींचें दर्शन घेतलें. रामांनीं अयोध्येकडील कुशलवृत्त विचारिलें, तेव्हां भरद्वाज मुनींनीं कुशल असल्याबद्दल कळवून रामाला येथेंच मुक्काम करून उद्ईक भरताला भेटावें असें सांगितलें. त्याप्रमाणें तेथेंच मुक्काम झाल्यावर भरद्वाजांनीं सर्वांचें आतिथ्य केलें, व तें सर्वांनीं प्रीतीनें व आदरानें ग्रहण केलें. ( युद्ध० सर्ग १२३–१२६ ).

भरताला पूर्वी सूचना देण्याकरितां व भरताच्या मनोभावाची परीक्षा करण्याकरितां मारुतीला रामचंद्रांनीं पुढें पाठविलें; व त्यास सांगितलें कीं, " प्रथम शृंगवेरपुरांत निषादाला माझी सर्व हकीकत सांगावी; तो माझा परम स्नेही आहे, नंतर भरतालाही नंदिग्रामांत जाऊन हकीकत सांगावी, व त्याचें चित्त कसें काय आहे, तें पहावें. कारण १४ वर्षें राज्यसुख अनुभवल्यानंतर राज्य सोडणें फार कठिण आहे. भरतासारख्या निःसीम प्रेम करणाऱ्या भावालासुद्धां कदाचित् मोह उत्पन्न होणें शक्य आहे. तरी त्याच्या मनाची व त्याच्या चेहऱ्यावर दिसणाऱ्या मनोविकारांची स्थिति लक्ष

लावून पाहावी." अशी रामाची आज्ञा होतांच मारुती गरुडासारखा निघाला. तो प्रथम शृंगवेरपुरांत येऊन, त्यानें राम भरद्वाजाश्रमीं सुखरूप आल्याची खबर गुहाला सांगितली. गुहाचा आनंद गगनांत मावेना. त्यानें मारुतीला आलिंगन देऊन रामाची सर्व हकीकत विचारिली. ती सर्व सांगून व 'नौकेची तयारी नको, राम पुष्पक विमानांतून येतील,' असें त्यास सुचवून नंतर मारुति नंदिग्रामांत आला व मनुष्याचें रूप धारण करून भरतास भेटला. व्रतानें कृश झालेला, मुख म्लान असलेला, जटामंडल धारण करणारा असा भरत पाहताच जणूं काय प्रत्यक्ष धर्म देह धारण करून बसला आहे असें मारुतीस वाटलें. भरताची निरातिशय बंधुप्रीति पाहून मारुतीस अत्यंत आनंद झाला, व त्यानें भरताला हात जोडून, "राम रावणाला मारून सुखरूप आले आहेत," असें सांगितलें. तें ऐकतांच हर्षाच्या उन्मादानें भरताला एकदम मूर्च्छा आली, व तो धाडकन् खालीं पडला. कांहीं वेळानें सावध होऊन त्यानें हनुमानास कडकडून मिठी मारिली, व त्याला आपल्या आनंदाच्या विपुल अश्रुधारांनीं भिजवून टाकिलें; आणि म्हटलें:—"तूं देव अस, किंवा मनुष्य अस; तुला या प्रिय वार्तेबद्दल मी सहस्र गायी आणि शंभर गांवें इनाम देतों." नंतर भरतानें शत्रुघ्नाला सर्व शहरांत खबर देण्याविषयीं व सर्व नगर तातडतोब शृंगारण्याविषयीं आणि राजमाताना व वसिष्ठ गुरूंना घेऊन येण्याविषयीं आज्ञा केली. भरतानें हनुमानाला तूं कोण, कोठील, वगैरे प्रश्न विचारून नंतर रामचंद्राची हकीकत विचारली. तेव्हां हनुमानानें, चित्रकूट पर्वत सोडून गेल्यापासून तों रावण मारून व बिभीषणाला लंकेचें राज्य देऊन सुग्रीवबिभीषणांसह भरद्वाजाश्रमांत राम येईपर्यंतची हकीकत सांगितली. व आतां लवकरच राम, लक्ष्मण व सीता पुष्पक विमानातून येतील असें त्यास सांगितलें. तों शहरांतील सर्व लोक उत्तम पोषाख करून आपआपल्या ऐश्वर्यानुरूप वाहनांवर बसून चौदा वर्षांनीं येणाऱ्या व रावणाचा वध करणाऱ्या आपल्या प्रिय व पराक्रमी राजास पाहण्याकरितां नगराबाहेर आले. दशरथाच्या सर्व स्त्रियाहि कौसल्येला पुढें करून आल्या. श्रेष्ठ ब्राह्मणांना व नगरांतील प्रमुख गृहस्थांना घेऊन नंदिग्रामांतून भरत मंत्रिजनांसह रामाला सामोरा आला, तेव्हां शेंकडों वाजंत्री व नगारे वाजूं लागले. सर्वांच्या हातीं पुष्पें, अक्षता वगैरे मंगल वस्तु होत्या. भरताच्या डोक्यावर रामचंद्राच्या पादुका व हातांत पांढरें

राजछत्र व चामरें होतीं. अशा रीतीनें भरत अयोध्यावासी लोकांसह सामोरा आला; तों दुरून पुष्पक विमान येताना हनुमानानें भरताला दाखविलें. तेव्हां "रामचंद्र आले, रामचंद्र आले" म्हणून एकदम आनंदाचा शब्द लाखों माणसांच्या तोंडून निघाला, त्यानें आकाश भरून गेलें. तें अत्यंत सुंदर रत्नखचित सुवर्णविमान सावकाश पुढे आलें, तेव्हां रामचंद्राचें मनोहर मुख लोकांना दिसूं लागलें. तेव्हां पौर्णिमेचा चंद्रच आकाशांतवर आला आहे, असें लोकास वाटलें; व सर्वांनीं रामास नमस्कार केला. भरताजवळ विमान येतांच भरतानें रामाला जमिनीवर साष्टांग नमस्कार घातला. विमान खालीं उतरतांच भरताला रामचंद्रांनीं विमानांत घेतलें; तों भरतानें रामाच्या पायांवर मस्तक ठेवलें. "भरता, तूं माझ्या विवंचनेनें अगदीं कृश झाला आहेस!" असें म्हणून रामांनीं भरताला पोटाशीं धरिलें. नंतर भरतानें सीतेला नमस्कार केला; व लक्ष्मणाला आलिंगन दिलें. सुग्रीवादि सर्व वानरांनीं मनुष्यरूप धारण केलें होतें. त्या सर्वांस भरतानें आलिंगन देऊन कुशल विचारलें. नंतर रामचंद्र व सर्व लोक विमानाखालीं उतरले व प्रथम कौसल्या मातुःश्रीच्या पायां पडले. तेव्हा त्या वृद्ध रामैकचित्ता मातेच्या प्रेमाचा पूर अश्रुरूपानें रामचंद्राच्या डोक्यावर अमृतवर्षावासारखा पडला! नंतर इतर मातुःश्रींना नमस्कार करून वसिष्ठगुरूंच्या पायांवर रामानें डोकें ठेविलें. नंतर प्रजाजनांची, मंत्रिजनांची व लोकांची भेट रामचंद्रांनीं घेतली. सीतेला ती पायां पडत असतां कौसल्येनें पोटाशीं धरिलें. ताराप्रभृति वानरस्त्रियांनीं राजमातेला नमस्कार केले; तेव्हां सीतेनें सर्वांची ओळख करून दिली. याप्रमाणें त्या वेळेस त्या मैदानावर प्रेमसमुद्रच उचंबळला! राजा-प्रजा, माता-पुत्र, सास्वा-सुना, बंधु-बंधु, गुरु-शिष्य, स्नेही स्नेही व त्यांच्या स्त्रिया इत्यादि संबंधांत अतिशय प्रेम साहजिकच असतें. त्यांत रामचंद्र व सीतेसारखीं आपल्या गुणांनीं सर्वांचें चित्त आकर्षण करणारीं अवतारी मनुष्यें चौदा वर्षें दृष्टीआड राहून मोठ्या संकटांतून मोठ्या पराक्रमानें व धैर्यानें बाहेर पडून जेव्हां लोकांच्या दृष्टीस पडलीं, तेव्हां प्रेमाला भरतें आलें तें समुद्राच्या वर्षाकाळांतील अफाट लाटाप्रमाणें पुष्कळ वेळपर्यंत उचंबळत राहिलें, यात नवल कोणतें? असो; सर्वांच्या भेटी झाल्यावर भरतानें रामचंद्रांच्या पायांत पादुका घालून म्हटलें:—"रामा, चौदा वर्षें ही ठेव मोठ्या प्रयासानें मीं बाळगली. ही

आपली आपल्यास देऊन आज आपण अयोध्येचे राजे झालेले पाहून मी कृतार्थ झालों. आपलें राज्य किती काळजीपूर्वक मीं चालविलें, हें दश-गुणित खाजिना आपल्या हवालीं करितों याजवरून आपल्यास समजेल. कोष्ठागार पाहून घ्यावें.'' याप्रमाणें भरताचें निःसीम भ्रातृप्रेम व निरपेक्षता पाहून वानरांच्या व बिभीषणाच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. भरतानें हात जोडून आजच आपण अयोध्या नगरींत चलून राज्याभिषेक करून घ्या, म्हणजे आम्हां सर्वांना अत्यंत आनंद होईल, अशी रामास विनंति केली. तीस अनुमोदन देऊन रामांनीं पुष्पकविमानास आपला मालक कुबेर याजकडे जावें असें सांगितलें, तेव्हां ते विमान उत्तर दिशेकडे निघून गेलें. ( युद्ध० स० १२७-१२९ ).

नंतर रामचंद्र सर्वांसह नंदिग्रामास आले. तेथें प्रधानानीं प्रथम भरताच्या जटा काढवून त्यास मंगलस्नान घातले. तसेंच लक्ष्मणाच्याही जटा काढवून त्यासही मंगलस्नान घातलें. सर्व वानरांना स्नानें घालविलीं. नंतर रामचंद्रालाही दिव्यासनावर बसवून, त्याचा जटाभार काढवून व उत्तम सुगंधि द्रव्यांचें त्याच्या अंगाला उटणें लाववून स्नान घातले. इकडे कौसल्येनें मोठ्या प्रीतीनें सीतेला व सर्व वानरस्त्रियाना स्नाने घातलीं; व सर्वांना उत्तम उत्तम वस्त्रें नेसण्यास दिलीं. रामचंद्र, लक्ष्मण, व भरत यांना उत्तम अलंकार घालावयास दिले. इतक्यात सुमंत्र सर्व रत्नांनीं सजविलेला आठ घोड्यांचा राजरथ घेऊन आला. त्यांत रामचंद्र बसल्यावर भरत स्वतः घोड्यांचे लगाम घेऊन रथ हांकावयास बसला. शत्रुघ्नानें रामावर छत्र धरलें. बिभीषणानें चामरें धरिलीं; लक्ष्मण व सीता रामाजवळ रथांत बसलीं. सुग्रीवादि वीर व मंत्री हत्तीवर बसले. अशा रीतीनें लाखों मनुष्यांनीं गजबजलेल्या व सहस्रावधि तोरणानीं शृंगारलेल्या अयोध्या-नगरींत रामचंद्रांनीं प्रवेश केला. सर्व लोक रामाचा जयजयकार करीत होते. शहरांतील स्त्रिया आपआपल्या वाड्याच्या खिडक्यातून सीतेस व वानरांच्या स्त्रियांस पाहण्यास उत्सुकतेनें उभ्या होत्या व रामावर फुलाचा वर्षाव करीत होत्या. याप्रमाणें स्वारी जाता जाता राजवाड्याशीं येतांच राम रथाखालीं उतरले. तेव्हां स्त्रियानीं सुवर्णकलशानीं रामलक्ष्मण व सीता यांवरून लिंबलोण उतरलें; व रामांनीं राजवाड्यांत प्रवेश केला. आपल्या राहण्याच्या

वाड्यांत रामानें सुग्रीव वगैरे पाहुण्यांस उतरवण्यास भरतास सांगितलें. त्याप्रमाणें त्यांस उतरवून भरतानें सुग्रीवास चार सुवर्णकलश देऊन अशी विनंति केली:—आपले बलशाली वानर पाठवून सायंकाळच्या आंत चतुः- समुद्राचें जल आणवावे. कारण समुद्रजलाशिवाय राज्याभिषेक व्हावयाचा नाहीं.' तेव्हा सुग्रीवानें ताबडतोब वानर पाठवून दिले. श्रीरामचंद्रांनीं कौसल्या मातेस नमस्कार करून मुख्य राजवाड्यांत प्रवेश केला. नंतर सायंकाळपर्यंत अभिषेकाची सर्व तयारी होऊन वसिष्ठप्रभृति ऋषि, ज्या मोठ्या दालनांत मनूपासून आजपर्यंतच्या इक्ष्वाकुवंशाच्या राजांना राज्या- भिषेक होत आला, त्या दालनांत आले व त्यांनीं परंपरागत सिंहासनावर रामचंद्रास सीतेसह बसविलें; नंतर समुद्रजलानें त्यांस अभिषेक करून मनू- पासून चालत आलेल्या व खुद्द ब्रह्मदेवाने निर्माण केलेला रत्नमय किरीट रामचंद्राच्या डोक्यांवर वसिष्ठांनीं ठेविला. तेव्हां सर्व लोकांनीं जयजयकार केला व सहस्रावधि मंगलवाद्यें वाजूं लागलीं. वसिष्ठ महर्षींनीं रामाला राजालंकार घातले. शत्रुघ्नानें श्वेत छत्र रामावर धरिलें, एक चामर सुग्रीवानें धरिलें, दुसरें बिभीषणानें धरिलें. नंतर रामचंद्रांनीं तीस कोटि सुवर्ण ब्राह्म- णांना दक्षिणा दिली. प्रधानाना अलंकार व पोषाख दिले. सुग्रीव, बिभी- षण, जाम्बवान् व हनुमान् वगैरे सर्व पाहुण्यांनाही रत्नें देऊन विभूषित केलें. सीतेला रामचंद्रांनीं मोत्याचा हार व आणखी अनेक अलंकार देऊन दिव्य वस्त्रें दिलीं. इतक्यांत सीतेनें आपल्या गळ्यांत घातलेल्या हाराच्या आकड्या- वर हात ठेवून कुतूहलानें सर्व वानरांकडे व नंतर रामाकडे पाहिलें. तेव्हां रामानें तिचें हृद्गत ओळखून प्रेमानें म्हटलें:—"दे. तुला वाटेल त्याला तो हार दे." अशी परवानगी मिळतांच सीतेनें आपल्या गळ्यांतील हार काढून मारुतीला जवळ बोलावून, "तुझ्या ठिकाणीं बल, बुद्धि, तेज, धैर्य, विनय, नय व पराक्रम हीं नेहमीं वास करितात," असें म्हणत त्याच्या गळ्यात तो हार बांधला. तेव्हा सर्व सभाजनांनीं मारुतीचा जयजयकार केला. असो, याप्रमाणें तो दिवस सर्वांना अपरिमित उत्सवाचा व आनंदाचा गेला. नगरवासी सर्व लोकांना वानरांच्या पराक्रमाचें मोठें आश्चर्य वाटलें. नंतर थोडे दिवस तेथें राहून बिभीषण, सुग्रीव, हनुमान्, जाम्बवान्, नळ, नीळ, अंगद, मैद, द्विविद वगैरे सर्वांची

यथायोग्य बोळवणी करून रामांनीं त्यांस आपआपल्या घरीं पाठविलें. यापुढें अयोध्येंत रामचंद्र इतक्या उत्तम रीतीनें राज्य करूं लागले कीं, सर्व प्रजा सुखांत व आनंदांत राहूं लागल्या. रामराज्यांत विधवा दृष्टीस पडत नाहींशा झाल्या; सर्पांचें व रोगांचें भय नाहींसें झाले; चोरी नाहींशी झाली; सर्व प्रकारचे अनर्थ नाहींसे झाले. वृद्धानें बालकांचें प्रेतकार्य करावें असा उलट प्रसंग येणें बंद झालें. सर्व लोक रामचंद्राच्या धर्मपरायण वृत्तीला पाहून स्वतः धर्मपरायण झाले. मूल, फल, पुष्प, धन, यांची नेहमीं समृद्धि होऊं लागली. पर्जन्य वेळेवर पडूं लागला. याप्रमाणें सर्व राज्यांत सुखाचा व नीतीचा प्रकर्ष होऊन लोक आनंदित झाले. रामचंद्रांनी दहा भूरिदक्षिण अश्वमेध करून अक्षय्य कीर्ति मिळविली. याप्रमाणें दहा हजार दहाशें वर्षें राज्य करून राम वैकुंठाला गेले. हें वाल्मीकिकृत धन्य व यशस्कर रामायणकाव्य जो पठण किंवा श्रवण करील तो सर्व संकटांतून तरेल. ( युद्ध० स०–१३० ).



# उत्तरकांड

श्रीरामचंद्र अयोध्येंत परत येऊन राज्याभिषेक करून घेऊन राज्य करूं लागल्यानंतर, एके दिवशीं चारी दिशांचे ऋषी रामचंद्राचें अभिनंदन करण्याकरितां अयोध्येस आले. विश्वामित्र, कश्यप, वसिष्ठ, अत्रि, गौतम, जमदग्नि, भरद्वाज, हे उत्तरेकडील ऋषी, आत्रेय, नमुचि, प्रमुचि, अगस्त, सुमुख, आणि विमुख हे दक्षिणेकडील ऋषी, कौशिक, यवक्रीत, गार्ग्य, गालव, कण्व, मेधातिथिपुत्र इत्यादि पूर्वेकडील ऋषी, व हषंगु, कवषी, धौम्य, कौतेय वगैरे पश्चिमेकडील ऋषी, आपआपल्या शिष्यांसह राजसभेंत आले, तेव्हां रामचंद्रांनीं उठून सर्वांचा सत्कार केला, आणि त्यांस उत्तम आसनावर बसवून त्यांची मधुपर्कानें यथासाग पूजा केली, व हात जोडून सर्वांस कुशल विचारलें. तेव्हां ऋषी म्हणाले:—" रामचंद्रा, आमचें सर्वांचें कुशल आहे, व आम्हांस तुला कुशल पाहून फार आनंद झाला आहे. कारण त्रैलोक्यास रडवणारा असा भयंकर राक्षस जो रावण तो तूं जिंकून नाहींसा केलास, हें महादुष्कर कार्य करून तूं निर्विघ्नपणें अयोध्येस परत आला आहेस, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. प्रहस्त, विरूपाक्ष इत्यादि राक्षस तूं मारलेस यांत नवल नाहीं. पण आजपर्यंत ज्याच्याहून मोठा राक्षस उत्पन्न झालाच नाहीं, त्या कुंभकर्णालाही तूं मारलेंस तेव्हां तुझी धन्य आहे. सर्वांत आम्हांस इंद्रजिताच्या वधाचे फारच आश्चर्य वाटतें. कारण इंद्रजित् रावणकुंभकर्णाहूनही जिंकण्यास कठिण होता. असो; अशा सर्व भयंकर शत्रूंना मारून तूं सुखरूप परत आला आहेत; तुझा नेहमीं जयजयकार असो." हें ऐकून रामचंद्रांनीं " इंद्रजिताची आपण एवढी महती कां मानितां ! " असा ऋषींस प्रश्न केला. तेव्हां अगस्त्य मुनींनीं राक्षसांची सर्व हकीकत रामास सांगितली. अगस्त्य ऋषि दक्षिणेकडील असल्यानें त्यांना राक्षसांची चांगली माहिती होती, हें निराळें सांगणें नकोच. ती हकीकत येणेंप्रमाणें:—

ब्रह्मदेवानें समुद्र निर्माण केले, तेव्हां त्या समुद्राचें रक्षण करण्याकरितां त्यानें दोन जाती निर्माण केल्या. एक यक्ष व दुसरी राक्षस. राक्षसांमध्यें दोन अग्रणी होते, हेति व प्रहेति. प्रहेति हा विरक्त असल्यामुळें तपस्वी झाला व हेतीनें राक्षसांचें राज्य केलें. त्याजला कालाची बहीण भामा इच्यापासून विद्युत्केश नांवाचा मुलगा झाला. हेतीनें विद्युत्केशाला संध्येची मुलगी सालकटंकटा ही केली. तिजपासून विद्युत्केशाला सुकेश नांवाचा पुत्र झाला. सुकेशाला देववती नांवाच्या गंधर्वकन्येपासून तीन पुत्र झाले. माल्यवान्, सुमाली आणि माली. त्या तिघांनीं मेरुपर्वतावर उग्र तपश्चर्या केली, तेव्हां ब्रह्मदेवानें संतुष्ट होऊन शत्रूंकडून तुम्ही जिंकले जाणार नाहीं, व तुम्ही दीर्घजीवी व्हाल, असा त्यास वर दिला. त्या वरानें उन्मत्त होऊन ते देवदानवादिकांना त्रास देऊं लागले. त्यांनीं विश्वकर्म्याकडून आपल्यासाठीं लंकेंत त्रिकूट पर्वताच्या शिखरावर एक अत्यंत सुंदर व विस्तीर्ण अशी पुरी निर्माण करविली; सुवर्णतटानें वेष्टिलेल्या त्या लंका-नगरींत माल्यवान्, सुमाली व माली हे राहूं लागले व राक्षसांचें राज्य करूं लागले. नर्मदा नामक अप्सरेनें आपल्या तीन मुली त्या तिघां भावांस दिल्या. कालक्रमानें माल्यवान् याजला वज्रमुष्टि, विरूपाक्ष, दुर्मुख वगैरे सात पुत्र व अनला नांवाची मुलगी झाली. सुमाली याजला प्रहस्त, अकंपन, धूम्राक्ष वगैरे दहा पुत्र, व राका, पुष्पोत्कटा, कैकसी व कुंभीनसा अशा चार मुली झाल्या.· मालीला अनल, अनिला, हर आणि संपाति असे चार पुत्र झाले. हेच बिभिषिणाचे चार साथीदार होते, व हेच त्याच्या बरोबर तुला शरण आले.

ते तिघे बंधु लंकेचें राज्य करीत असतां, त्यांनीं सर्व पृथ्वीचें राज्य संपादन केलें. तेवढ्यानेंहि तृप्ति न झाल्यामुळें ते देवांवर हल्ला करूं लागले. ब्रह्मदेवाच्या वरामुळें उन्मत्त होऊन त्यांनीं वैकुंठावरही हल्ला केला. तेव्हां नारायणानें आपल्या चक्रानें मालीचें शिर उडविलें. राक्षसांनीं आपली पराकाष्ठा केली; परंतु जेव्हां विष्णूच्या चक्रानें व गरुडाच्या पंखांच्या तडाख्यानें हजारों राक्षस प्राणास मुकूं लागले, तेव्हां माल्यवान् व सुमाली यांनीं पळ काढला. विष्णूच्या भयानें त्यांनीं लंकेचेंही राज्य सोडून दिलें

व ते रसातळांत जाऊन तेथें राहूं लागले. तेव्हां लंका कांहीं वेळपर्यंत ओस पडली.

प्रजापतीचा मानसपुत्र पुलस्त्य ऋषि याजला तृणबिंदु राजानें आपली मुलगी दिली. त्याच्यापासून त्यास विश्रवा नांवाचा पुत्र झाला. तोही आपल्या बापासारखा महान् तपस्वी होता. त्याजला भरद्वाज ऋषींनीं आपली मुलगी दिली; तिजपासून त्यास जो मुलगा झाला तो अत्यंत भाग्यवान् व तपस्वी झाला. ब्रह्मदेवानें त्यास देवाचा धनाध्यक्ष करून लोकपालही केलें. विश्रव्याचा पुत्र म्हणून त्यास वैश्रवण हें नांव मिळालें. याशिवाय कुबेर, धनद इत्यादि नांवेंही त्याचींच होत. राक्षसांनीं लंका सोडल्यामुळें ती नगरी शून्य पडली होती; ती त्यास पित्यानें रहावयास दिली. सर्व धनाचा अधिपतीच कुबेर झाला होता, तेव्हां सोन्याच्या लंकेचें स्वामित्व सहजच त्याजकडे गेलें. याप्रमाणें कुबेर लंकेंत राहून यक्षांचें राज्य करूं लागला. ब्रह्मदेवानें कुबेराला लोकपाल केलें तेव्हां त्यास पुष्पक नांवाचें विमान दिलें. त्यांत बसून तो इंद्राप्रमाणें सर्व लोकांत फिरे, व मधून मधून आपला पिता पौलस्त्य अथवा विश्रवा ऋषि याचें दर्शन घेण्यास मेरु पर्वतावर जाई. ( उत्त० स० १-८ ).

सुमाली राक्षस एकदा आपली उपवर कन्या कैकसी हिला वर पाहण्याकरितां तिला बरोबर घेऊन पाताळांतून मृत्युलोकीं आला असतां कुबेर पुष्पक विमानांतून बसून लंकेहून निघून आपल्या बापाकडे जातांना त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां त्यास कुबेराचें ते ऐश्वर्य पाहून आपल्या निकृष्ट स्थितीबद्दल फार वाईट वाटलें; व तो आपल्या कन्येस म्हणाला:—" मुली, ह्या कुबेराला आपल्या पित्याच्या प्रसादानें केवढें ऐश्वर्य मिळालें आहे! आमच्या वंशांत येऊन तूं आमच्या वंशाचा जर उद्धार करशील, तर खरोखर तुझे या कुलावर मोठे उपकार होतील. विश्रवा ऋषीस आपल्या तपानें संतुष्ट करून त्यास वरून त्यांजपासून कुबेरासारखे पुत्र माग ! म्हणजे ते राक्षसांना पुनः वैभव मिळवून देतील.'' हें बापाचें म्हणणें कैकसीनें लागलेंच मान्य केलें आणि ती विश्रवा ऋषीच्या आश्रमांत उतरली. आपल्या तपानें तिनें ऋषीला संतुष्ट करून त्याजपाशीं कुबेरासारखे तेजस्वी पुत्र मागितले. दुष्ट लोकांनीं कितीही चांगलें आचरण केलें, तरी त्यांचे मूळ हेतु दुष्ट असल्यामुळें ते कधींही पूर्ण

सिद्धीस जात नाहींत. कैकसीनें विश्रवा ऋषीपाशीं पुत्र मागितले,तेव्हां ती वेळ संध्याकाळची असून फार भयंकर होती. ऋषीनें तिचें म्हणणें मान्य केलें; परंतु, अशा भयंकर वेळीं तूं हा वर मागितलास, म्हणून तुला भयंकर पुत्र होतील असें त्यांनीं तिला सांगितलें. तेव्हां तिने महर्षींची पुन्हां हात जोडून प्रार्थना केली. तेव्हां एक पुत्र चांगला होईल, असें सांगून त्यांनीं तिचें समाधान केलें. कैकसीला विश्रवा ऋषीपासून प्रथम दशग्रीव राक्षस उत्पन्न झाला. त्या वेळेस शेंकडों भयसूचक अपशकुन झाले. दुसरा पुत्र झाला तो अतिप्रचंड झाला; त्याचें नांव कुंभकर्ण ठेविलें. तिसरी कन्या शूर्पणखा + झाली व चौथा बिभीषण झाला. तीं मुलें पित्याच्या आश्रमांत वाढूं लागलीं, तेव्हां सहजच आश्रमांतील व बाहेरच्या लोकांना फार त्रास होऊं लागला. कुंभकर्ण तर मधून मधून मुनींच्या बालकाना चट्ट करूं लागला. एके दिवशीं कुबेर विमानात बसून आपल्या पित्याच्या दर्शनास आला; तेव्हां कैकसीनें बापाचें पूर्वीचे भाषण मनांत आणून दशग्रीवास म्हटलें:—" हा तुझा भाऊ कुबेर आपल्या पराक्रमानें व कर्तृत्वानें केवढ्या पदवीला चढला आहे ! यासारखेच तुम्ही सर्व पराक्रमी निपजून ऐश्वर्य मिळवाल तर तुम्ही आपल्या बापाचे खरे पुत्र. " असें मातुःश्रीचें मर्मभेदक प्रोत्साहन ऐकून त्या तिघां भावांनीं तपश्चर्या करण्यास आरंभ केला. त्यांत दशग्रीवानें तर कमाल केली ! दहा हजार वर्षें निराहार उभें राहून त्यानें तप केलें. त्यांत एक हजार वर्षें झालीं कीं, दशग्रीवानें आपल्या शिरांपैकीं एक शिर तोडून अग्नींत हवन करावें. याप्रमाणें नऊ हजार वर्षें तप होऊन नऊ शिरें अग्नींत पडलीं. दहा हजार वर्षें पूर्ण होऊन दशग्रीव दहावें शिर तोडूं लागला; तेव्हां ब्रह्मदेव प्रसन्न होऊन व त्यास प्रत्यक्ष दर्शन देऊन ' वर माग ' असें म्हणाले. दशग्रीवानें मृत्यूची भीतीच नाहींशी करण्यासाठीं अमरत्व मागितलें; परंतु ' अमरत्व तुला देतां येत नाहीं, दुसरा वर माग, ' असें ब्रह्मदेव म्हणाले. तेव्हा त्यानें, यक्ष,राक्षस, गंधर्व, पिशाच्च, नाग, असुर, देव, दानव यांपैकीं कोणाच्याही हातून मला मृत्यु नसावा; मनुष्याची मला भीति नाहीं, असा दशग्रीवानें वर मागतांच ब्रह्मदेवांनीं ' तथास्तु ' असें म्हटलें.तुझीं हवन केलेलीं शिरें तुला पुन्हां मिळतील,आणि

+ महाभारतात शूर्पणखा ही रावणाची सावत्र बहीण असे वर्णन आहे.

तुझे जे जे मनोरथ असतील ते ते पूर्ण होतील,असे आणखी दोन वर देऊन ब्रह्मदेवांनीं त्यास संतुष्ट केलें; नंतर बिभीषणासही ब्रह्मदेवानें ' वर माग ' म्हणून म्हटलें. तेव्हां त्या धर्मात्म्यानें " कोणत्याही प्रसंगीं माझी धर्मबुद्धि ढळूं नये, " असा वर मागितला. तेव्हां सर्व लोकांनीं त्याच्या धर्मशीलतेची तारीफ केली. ब्रह्मदेवानें त्याला तो वर देऊन शिवाय अमरत्वही त्यास दिलें. वाईटाला मरण आहे, धर्माला आणि नीतीला मरण नाहीं, हाच भावार्थ येथें ब्रह्मदेवानें स्पष्टपणें सुचविला. असो. कुंभकर्णालाही ब्रह्मदेवाने 'वर माग' असें म्हटलें. तेव्हा सर्व देवानीं ब्रह्मदेवास विनंति केली कीं, हा ' वराशिवायच माणसाना खाऊन टाकतो आहे, मग वरानें आणखी बलवान् झाला तर सर्वच लोकांना खाऊन टाकील. याकरितां याला वर देऊं नये. परंतु ब्रह्मदेवानें, त्यास'वर माग' म्हणून म्हटलें, तें माघारें घेतलें नाहीं. मात्र सरस्वतीची प्रार्थना करून तिला कुंभकर्णाच्या कंठांत बसून कांहीं तरी चांगलें मागणें मागण्यास त्यांनीं सुचाविलें. याप्रमाणें सरस्वतीनें कुंभकर्णाच्या तोंडून ' मला वर्षानुवर्ष स्वस्थपणें झोंप मिळावी ' असें मागणें मागितलें व तें त्यास ब्रह्मदेवानें दिलें ! याप्रमाणें त्या तिघां भावांनीं तपश्चर्या करून ब्रह्मदेवापासून वर मिळविले, व आपल्या आश्रमांत आईपाशीं येऊन तिला सर्व हकीकत सांगितली.

[ उत्त० स०-९-१० ]

दुष्ट लोकांना ब्रह्मदेवानें वर कसे दिले, ही एक शंका येईल. पण यांतलें इंगित लक्षांत आणले पाहिजे. बल मिळविण्याचें साधन तपाशिवाय दुसरें नाहीं, हा सिद्धांत येथें व्यक्त केला आहे. देहशोषण करण्याच्या व्रतांनीं चित्ताची एकाग्रता करून ईश्वराची निःसीम आराधना करणें, याचें नांव तप.अशा प्रकारच्या तपानें बळाची प्राप्ति झालीच पाहिजे, मग तें तप करणारा सज्जन असो किंवा दुर्जन असो. ज्याप्रमाणें स्वयंपाक तयार केला असतां पाकनिष्पत्ति झालीच पाहिजे,मग तो स्वयंपाक चोरांनीं केलेला असो किंवा सावांनीं केलेला असो, त्याप्रमाणें दुष्टांनीं सुद्धां तप केलें तर त्यांस परमेश्वराकडून फलप्राप्ति झाल्याशिवाय रहात नाहीं. किंबहुना जेथें जेथें आपल्यास बल दृष्टीस पडतें तेथें आपण हें समजलें पाहिजे कीं, हें बल तपामुळें मिळालेलें आहे. दुष्ट लोकांजवळ बल असतें, तें तपश्चर्येचेंच असतें.

मात्र त्या बलाचा ते दुरुपयोग करतात, या कारणानें त्यांचे बल पुढें हळूहळू नाहींसें होतें. चांगल्या लोकांची तपश्चर्या नेहमीं चालूंच असते, म्हणून त्यांचें बल सदैव वृद्धिंगत होतें. तात्पर्य, बल हें तपाचें अबाधित फल आहे, ह्यांत संशय नाहीं. या सिद्धांताची उपपत्तीही सुगम आहे. जोंपर्यंत मनुष्याची तपश्चर्या चालली आहे, तोंपर्यंत सुष्ट आणि दुष्ट दोघेही सारख्याच नीतीच्या व धर्माच्या मार्गानें चालत असतात, आणि म्हणूनच दुष्टांसही तप फलद्रूप होतें, यात आश्चर्य नाहीं.

असो; दशग्रीव कुंभकर्ण, बिभीषण यांनीं तपश्चर्येनें ब्रह्मदेवापासून वर मिळाविले आहेत, ही गोष्ट त्यांचा आजा सुमाली यास कळताच त्यास मोठा आनंद झाला; व त्यानें दशग्रीवापाशीं येऊन त्याजला आपली लंका परत मिळविण्याविषयीं आग्रह केला. दशग्रीवानें प्रथम आपला बाप पौलस्त्य याजला कुबेराजवळ लंकेविषयीं गोष्ट काढण्यास सांगितले, परंतु त्यानें ती गोष्ट मान्य केली नाहीं. दशग्रीवानें नंतर प्रहस्ताला आपला भाऊ कुबेर याजकडे पाठवून त्यास राक्षसाची मूळची लंका खालीं करून देण्याविषयीं सामोपचारानें विनंति केली. कुबेरास आपल्या भावाचा स्वभाव ठाऊकच होता. त्यानें आपला पिता विश्रवा ऋषि याच्या संमतीनें लंका खालीं करून राक्षसांच्या स्वाधीन केली; व आपण पित्याच्या आज्ञेप्रमाणें कैलास पर्वतावर ‘ अलका ’ नांवाचें एक नवीन सुंदर शहर बांधून तेथे राहूं लागला.

पाताळांत गेलेले सर्व राक्षस आतां लंकेंत परत येऊन व दशमुखाला राज्याभिषेक करून त्याच्या छत्राखालीं आनदानें राहूं लागले. थोड्याच दिवसांनीं दशग्रीवानें आपली बहीण शूर्पणखा इचें लग्न केलें, व तिला कालकेय दानवांचा राजा विद्युज्जिव्ह याला दिलें. नंतर दशग्रीवाला मयासुरानें हेमा नांवाच्या अप्सरेपासून झालेली सुंदर व सद्गुणी कन्या मंदोदरी दिली. दशग्रीवानें आपल्या दोघां बंधूंचींही लग्नें केलीं. वैरोचनाची नात वज्रज्वाला ही कुंभकर्णाची स्त्री होय, व शैलूम गंधर्वाची मुलगी सरमा ही बिभीषणाची बायको होय. याप्रमाणें ते तिघे बंधु सुखानें कालक्रमणा करीत असतां, तिघांसही मोठमोठे पराक्रमी पुत्र झाले. त्यांत दशग्रीवास मंदोदरीपासून पुत्र झाला, तो होतांक्षणींच मेघासारखा त्याने नाद केला म्हणून

त्याचें नांव मेघनाद ठेविलें. ह्यालाच इंद्रजित् हें नांव पुढें मिळालें. कांहीं काळानंतर ब्रह्मदेवाच्या वराप्रमाणें कुंभकर्णाला अनिवार झोंप येऊं लागली. तेव्हां दशग्रीवानें त्याच्याकरितां दोन योजनें रुंद व चार योजनें लांब अशी एक विस्तीर्ण गुहा तयार करविली; व ती सुवर्ण, रत्नें वगैरे साधनांनीं उत्तम तऱ्हेनें सुशोभित केली. त्यांत कुंभकर्णबोवा जे झोंपीं गेले, ते कित्येक वर्षें जागे झाले नाहींत. इकडे दशग्रीवालाही ऐश्वर्याचा उन्माद आल्यामुळें अवदसा आठवूं लागली. व त्यानें देव, ऋषि, गंधर्व, यक्ष इत्यादिकांना त्रास देण्यास सुरवात केली. त्यानें त्यांचीं शहरें लुटलीं व त्याचे नंदनवनासारखे बाग उध्वस्त केले. याप्रमाणें दशग्रीवाचें उन्मत्त वर्तन पाहून कुबेरानें त्याजकडे दूत पाठवून त्यास शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न केला. “ मी सहस्र वर्षें तप करून शंकराची आराधना करून त्याचें सख्य मिळविलें, त्याप्रमाणें तूंही आपल्या कुळाला उचित असें धर्माचरण करून आपली उन्नति करून घे, ” असा आपल्या भावाचा निरोप ऐकून दशमुखाला एकदम क्रोध आला, व “ मला शंकराचें सख्य मिळविल्याची घमेंड दाखवितो आहेस काय ? पहिल्याने तुझाच समाचार घेतला पाहिजे, ” असें म्हणून उन्मत्तपणानें त्या दूताचा त्यानें शिरच्छेद करविला, व लागलीच कुबेरावर स्वारी करण्याची तयारी केली ! महोदर, प्रहस्त, मारीच, शुक, सारण व धूम्राक्ष, या सहा बलाढ्य सरदारांना बरोबर घेऊन लाखों राक्षसवीरांसह दशग्रीव कुबेरावर चालून गेला. तेव्हां कुबेराचे यक्ष राक्षससैन्यापुढें उभे राहतनासे झाले. हजारों यक्ष, मृत्युमुखीं पडलेले पाहून, कुबेरानें मणिभद्र नांवाच्या यक्ष सरदारास त्या राक्षसांवर पाठाविलें, तेव्हां प्रहस्तानें त्या मणिभद्राचा व त्याच्या सर्व वीरांचा नाश केला. शेवटीं कुबेर स्वतः रावणावर चालून आला. दशग्रीवाचें व त्याचे मोठें भयंकर युद्ध झालें. कुबेरानें अनेक अस्त्राचा प्रयोग त्याजवर केला. परंतु त्याला यत्किंचितही इजा झाली नाहीं. शेवटीं दशग्रीवाच्या गदाप्रहाराने कुबेर बेशुद्ध होऊन रणांगणांत पडला. दशग्रीवानें त्याचा प्राण न घेतां त्याचें पुष्पक विमान घेतलें; व त्याच्या पुरीचा विध्वंस करून तो पुष्पक विमानांत बसून कैलासावरून खालीं उतरला. ( उत्त० स० ११–१५ ).

विमानांत बसून दशग्रीव जात असतां एके ठिकाणीं त्याच्या विमा-

नाची गति एकदम कुंठित झाली; तेव्हां त्याला मोठें आश्चर्य वाटलें. इतक्यांत वानराचें स्वरूप धारण केलेला नंदी तेथें आला व त्यानें "या पर्वतावर शंकरपार्वती क्रीडा करीत आहेत, तेथें कोणाला येण्याची परवानगी नाहीं; याकरितां तूं येथून दुसरीकडे जा," अशी दशग्रीवास विनंति केली. तेव्हां नंदीचें तें रूप पाहून दशानन प्रथम मोठ्याने खदखदा हांसला. नंदीनें क्रोधानें त्यास शाप देऊन म्हटलें कीं, याच वानरकुलांत शेंकडों वीर उत्पन्न होऊन तुझा नाश करतील. दशमुखाने त्या बोलण्याकडे लक्ष न देतां नदीस म्हटलेः—"अरे, शंकर शंकर म्हणजे कोण आहे? माझें विमान ज्या डोंगरावर अडकले, तो डोंगरच मी उपटून टाकतो." असें म्हणून दशग्रीवानें विमानांतून खालीं उतरून आपल्या बाहुबलाच्या गर्वानें वीस हातांनीं त्या पर्वताला वेंग मारली, व त्यानें त्या डोंगरास हलविलें. तेव्हां शंकरास राग येऊन त्यानें लीलेने पायाच्या अंगठ्यानें पर्वतास दाबतांच तो पर्वत खालीं पडून दशग्रीवाच्या वीस भुजा त्याच्या खालीं चेंगरल्या. हात चेंगरल्याच्या वेदनेनें दशग्रीवानें जी आरोळी मारली तीमुळें सर्व पृथ्वी दणाणून गेली, आणि देव, दानव, गंधर्व भयभीत होऊन तेथें येऊन तो चमत्कार पाहूं लागले. त्या वेळेस दशाननाची ती स्थिति पाहून त्यांस त्याची कींव आली, व त्यानीं त्यास शंकराचा धांवा करण्याविषयीं सल्ला दिली. दशाननानें शंकराची स्तुति करून त्यास प्रसन्न केलें. तेव्हा त्याचे हात बाहेर निघाले. शंकरानें संतुष्ट होऊन त्यास दर्शन दिलें आणि त्यास एक तलवार दिली. दशग्रीवाच्या ह्या ओरडण्यानें सर्व चराचर सृष्टि गडबडून गेली, इतकेंच नव्हे तर हे त्याचें ओरडणें एक हजार वर्षें सतत चाललें होतें म्हणून त्यास शंकरांनीं 'रावण' हे नवीन नांव दिलें. तेव्हांपासून दशाननाचें रावण हेंच नांव प्रसिद्ध झालें.

याप्रमाणें शंकरास प्रसन्न करून रावण पुष्पक विमानांत बसून पुन्हां निघाला. तों एके ठिकाणीं हिमालयांत मरुत्त राजा यज्ञ करीत होता तेथें आला. रावणास पहातांच सर्व देवता भीतीनें गुप्त होऊन पशुपक्ष्यांचीं स्वरूपें धारण करून बसल्या. इंद्र मोर झाला, यमराजानें कावळ्याचें रूप घेतलें, कुबेरानें सरडोक्याचें व वरुणानें हंसाचें घेतलें. इतर देवतांनींही निरनिराळीं रूपें घेतलीं. मरुत्त राजा धनुष्यबाण घेऊन युद्ध करण्यास निघाला, परंतु

बृहस्पतीचे बंधु संवर्त त्याचा यज्ञ चालवीत होते, त्यांनीं मरुत्तास मार्गे फिरविलें. 'यज्ञदीक्षा घेतल्यावर क्रोध येऊं देणें सुद्धां विघातक आहे; मग युद्धाची गोष्ट कशाला ?' असें त्यांनीं मरुत्तास समजावून युद्धापासून परावृत्त केलें. तेव्हां रावणानें त्याच्या यज्ञाचा विध्वंस करून व कित्येक ऋषींस ठार मारून पुढचा रस्ता धरिला. रावण गेल्यावर देवांनीं आपलीं पूर्व स्वरूपें धारण करून ज्या ज्या प्राण्यांचीं रूपें त्यांनीं घेतलीं होतीं, त्यांस वर दिले. इंद्रानें मोरास डोळ्यासारखा ठिपक्याचा पिसारा दिला. यमानें कावळ्यास तुला कोणीं मारलें तरच मृत्यु येईल, नाहींतर येणार नाहीं, असा वर दिला. वरुणानें हंसाला स्वच्छ पांढरा रंग दिला, व वैश्रवणानें सरड्यास सोनेरी छबी दिली. असो. रावण तेथून निघाला तो पृथ्वविरील सर्व राजे जिंकीत चालला. जे राजे शरण येत त्याना तो सोडून देई व जे युद्धास उभे रहात त्यांना जिंकून ठार मारी. याप्रमाणें रावण अयोध्येंत आला, तेव्हां अनरण्य राजा त्यास शरण जाण्याचें नाकारून आपलें सैन्य घेऊन त्याजवर चालून आला. मग जो भयंकर संग्राम झाला, त्यांत अनरण्य मारला गेला. याप्रमाणें अनेक राजे मारले गेले; तेव्हां नारदानें रावण पुष्पक विमानांत बसून चालला असतां त्यास म्हटलें:—"अरे, मनुष्यांना जिंकून त्यांस मारण्यांत काय पुरुषार्थ आहे ? मनुष्यें मृत्यूच्या मुखीं पडलेलींच आहेत. खास मृत्यूस समरांगणांत जिंकशील, तर तुझी थोरवी आहे." असा नारदाचा उपदेश होताच रावणाची स्वारी यमलोकाकडे वळली. दाक्षिणेकडे जाऊन यमपुरीवर रावणानें हल्ला केला. यमाचे दूत लढण्यास पुढें आले, त्या सर्वांचा पराभव झाला; तेव्हां सर्व लोकांचे प्राण हरण करणारा यम खुद्द आपल्या भयंकर रथांत बसून युद्धास आला. प्रत्यक्ष यमराजास पाहतांच रावणाचे राक्षस भयभीत होऊन पळाले. पण रावणाच्या हृदयांत भीतीचा लेशही शिरला नाहीं. राक्षसांच्या राजाचें व प्रेतांच्या राजाचें युद्ध सुरू झालें. यमानें हजारों शस्त्रें व अस्त्रें त्याजवर टाकिलीं, परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अविश्रांत सात दिवस आणि सात रात्र तें युद्ध चाललें. शेवटीं यमानें आपला दंड घेऊन रावणावर फेकण्याकरिता तोलला. इतक्यांत साक्षात् ब्रह्मदेव तेथें प्रकट होऊन त्यास म्हणूं लागले:—"हा कालदंड सर्व प्राण्यांचा संहार करणारा आहे.

हा अमोघ दंड मींच तुला दिला आहे; पण रावणालाही वर मींच दिला आहे. तूं दंड फेकून मारलास आणि रावण मेला, तर माझ्याकडे खोटेपणा येणार आहे; आणि रावण मेला नाहीं तरीही मजकडे खोटेपणा येणार आहे. तर तूं हा दंड रावणावर टाकूं नकोस." तेव्हां 'तुम्ही आम्हा सर्वांचे शास्ते आहां, तुमची आज्ञा आम्हास शिरसावंद्य आहे, मी आतां येथून नाहींसा होतो, याशिवाय दुसरें गत्यंतर नाहीं, असें म्हणून यमानें आपला दंड ठेविला व त्यासहित तो तेथेंच गुप्त झाला. तेव्हा रावणानें जयघोष करून आपलें नांव पुन्हां एकदा यमपुरींत ऐकविलें व आपल्या सेनापतीस घेऊन व पुष्पक विमानात बसून तो तेथून निघाला.

(उत्तर० सर्ग० १६-२२).

यमाला जिंकून रावण पश्चिमेकडे वळला. वरुण लोकातील भोगावती नगरीवर प्रथम हल्ला करून नागांचा राजा वासुकी याजला त्याने जिंकिलें. नंतर मणिमयी नगरीवर हल्ला करून निवातकवच राक्षसांना जिंकिलें. तेथून अश्मवती पुरींतील कालकेयांच्या राजावर चढाई केली. आपला मेहुणा शूर्पणखेचा नवरा विद्युज्जिव्ह, याजला त्यानें युद्धांत ठार मारलें ! कालकेयास जिंकून रावण वरुणपुरीस जाऊन पोहोंचला. तेथे सुरभि नावाची कामधेनु उभी होती. तिजला प्रदक्षिणा घालून त्याने वरुणाच्या लोकाना युद्धास आव्हान केलें. त्या वेळेस वरुणाचे पुत्र त्याजवर शस्त्र घेऊन धावले; त्याचा महोदरानें पराजय केला. ब्रह्मदेवाच्या वरानें हा राक्षस अजिंक्य आहे, असें जाणून वरुणाच्या लोकांनीं, वरुण ब्रह्मलोकीं गेला आहे, अशी रावणाची समजूत घालून त्यास परत फिरविलें. याप्रमाणें उत्तर, दक्षिण व पश्चिम या तीन दिशांचे लोकपाल कुबेर, यम व वरुण यांस रावणानें जिंकले. नंतर पुष्पक विमानांत बसून रावण लंकेंत परत आला. तों त्याची विधवा झालेली बहीण शूर्पणखा त्याच्या समोर रडत ओरडत येऊन पडली. प्रत्यक्ष आपल्या मेहुण्यास सुद्धां तूं ओळखलें नाहींस, इत्यादि अनेक तऱ्हांनीं तिनें त्याची निर्भत्सना केली. 'शत्रु लढाईंत उभा राहिला म्हणजे मग पितापुत्रांचें सुद्धां नातें ठेवितां येत नाहीं,' अशी रावणानें तिची समजूत घालून तिला दंडकारण्य राहावयास दिलें, व तिचा मावसभाऊ खर याजला १४ हजार राक्षस बरोबर देऊन तिच्या तैनातीस पाठवून दिले. (उत्तर० सर्ग० २३-२४).

लंकेंत निकुंभिला नांवाचा एक सुंदर बाग होता, त्यांत एक सुवर्ण-स्तंभाचें देवालय बांधून तेथें मेघनादानें शुक्राच्या साह्यानें यज्ञ करून शंकरास संतुष्ट केलें व शंकरानें त्यास दिव्य रथ, बाणाचे दोन अक्षय्य भाते व एक धनुष्य दिलें. याशिवाय जिच्या योगानें रथात बसून, व अदृश्य होऊन शत्रूंवर मारा करितां येईल, अशी तामसी नांवाची विद्याही त्यास दिली. रावण परत आला, तेव्हा मेघनाद नुकताच माहेश्वर यज्ञ संपवीत होता; तें रावणास कळताच त्यानें निकुंभिलेंत जाऊन त्यास मोठी शाबासकी दिली. परंतु आतां देवांची जास्त आराधना करण्याचें कारण नाहीं, असें त्यानें त्यास सांगितलें. नंतर रावणानें राहिलेल्या दिशेचा म्हणजे पूर्व दिशेचा लोकपाल जो इंद्र त्याजवर स्वारी करण्याची तयारी केली. त्याने कुंभकर्णास जागा करून त्यास आपलेबरोबर घेतलें, व मेघनादासही घेतलें. लंकेंत बिभीषणास ठेवून रावण मोठें बलाढ्य सैन्य बरोबर घेऊन देवांना जिंकण्याकरितां निघाला. तो कैलासावरून स्वर्गलोकास पोहोंचतांच आदित्य, रूद्र, मरुत्, वसु, अश्विनीकुमार, इत्यादि देवांस घेऊन इंद्र रावणाशीं युद्ध करण्यास बाहेर पडला. देवांचें व राक्षसांचें भयंकर युद्ध सुरू होऊन दोन्ही पक्षांचे वीर समरांत मरूं लागले. सुमालीचें व अष्टम वसूचें द्वंद्वयुद्ध होऊन वसूनें सुमालीस गदाप्रहारानें ठार केलें. सुमाली मृत्युमुखीं पडला, हें पाहून रावणाचा पुत्र मेघनाद यानें देवांवर आपल्या मायेने चाल केली. शंकरानें दिलेल्या वरानें अदृश्य होऊन त्यानें आपल्या अक्षय्य भात्यांतून लक्षावधि बाणांचा देवांवर वर्षाव केला. कुंभकर्ण व रावण यांसमुद्धां देव हार गेले नसते; पण मेघनादाच्या अदृश्य युद्धापुढें त्यांचा टिकाव लागेना. इंद्राचा पुत्र जयंत हा अग्रभागीं लढत असतां, मेघनादानें त्यास मूर्च्छित केलें. तेव्हां शचीचा बाप म्हणजे जयंताचा आजा पुलोमा दैत्य यानें त्यास एकदम समरांगणांतून काढून समुद्रांत लपवून ठेविलें. पुत्र युद्धांत पडल्याची खबर इंद्रास कळतांच तो क्रोधानें मेघनादावर चालून आला. तेव्हां मेघनादानें आपल्या अस्त्रप्रभावानें व अदृश्य होणाऱ्या मायेनें इंद्रासही जर्जर करून त्यास बांधून आपल्या सैन्यांत आणिलें ! त्या वेळीं सर्व राक्षसांना जो हर्ष झाला तो वर्णन करतां येत नाहीं. रावणानें आपल्या पुत्रास आलिंगन देऊन म्हटले, “ माझ्या कुलांत माझ्यापेक्षाही प्रतापी तूं उत्पन्न झाला आहेस. माझ्यासारखा या

पृथ्वीवर खरोखर कोणी धन्य नाहीं. इंद्रास आतां आपण लकब घेऊन जाऊ. " याप्रमाणें देवांचा पराभव करून इंद्राला कैद करून घेऊन रावण आपल्या पुत्रांसह व भावांसह लंकेंत आला. इकडे स्वर्गांत चोहोंकडे हाहाःकार झाला. शेवटीं सर्व देव ब्रह्मदेवाला घेऊन लंकेस आले आणि ब्रह्मदेवानें आकाशांतून रावणाची स्तुति करून म्हटलें:—" तुझ्या पुत्राच्या पराक्रमानें मी अत्यंत संतुष्ट झालों आहें. तुझा पुत्र तुझ्यासारखा किंबहुना तुझ्याहूनही अधिक पराक्रमी आहे. तुझा पुत्र मेघनाद यापुढे इंद्रजित् ( इंद्रास जिंकणारा ) या नांवानें प्रसिद्धि पावेल. परंतु आतां सर्व देव तुला शरण आले आहेत, तेव्हां इंद्रास सोडून दे. " त्या वेळीं इंद्रजितानें ब्रह्मदेवापाशीं ' मला अमरत्व द्या, ' असें मागणें केलें. ' पृथ्वीवर कोणीही अमर नाहीं, तुला अमरत्व कसें द्यावें ? ' असें ब्रह्मदेव म्हणाले. तेव्हां इंद्रजितानें पुनः विनंति केली कीं, ' अग्नीचे हवन केलें असतां मला अग्नींतून दिव्य रथ मिळावा, आणि त्या रथावर बसून शत्रूंवर गेलों असता मला अमरत्व असावे, असा तरी मला वर द्या. ' ब्रह्मदेवानें संतुष्ट होऊन तसा वर इंद्रजितास दिला व इंद्राची सुटका केली; मग सर्व देव स्वर्गलोकास परत गेले. याप्रमाणें जे काम रावण व कुंभकर्ण यांसही कठिण पडलें होतें तें इंद्रजितानें केलें. इंद्राजिताचा पराक्रम व त्याला प्राप्त झालेले वर असे विलक्षण होते कीं, तो केवळ अजिंक्य होता; परंतु त्याचाही वध या लक्ष्मणाने केला, म्हणून आम्हांस आश्चर्य वाटतें, आणि याकरतांच रामचंद्रा, तुला आम्ही धन्यवाद देतो. " ( उत्तर० सर्ग० २४-३०. )

इंद्रजिताचा व रावणाचा अद्भुत इतिहास ऐकून रामचंद्रांनीं अगस्त्य मुनींस पुनः प्रश्न केला कीं, " रावण सर्व पृथ्वीवरील राजेलोकांस जिंकीत फिरत होता, तर त्या वेळेस रावणास तोंड देईल असा पृथ्वीवर कोणीही नव्हता काय ? सर्व पृथ्वी त्या वेळेस निर्वीर झाली होती काय ? " असा प्रश्न ऐकून अगस्त्य ऋषि म्हणाले:—" असे कसें होईल ? शेरास सव्वाशेर या जगतांत आहेतच. असा कधींही कोणीं गर्व करूं नये कीं, माझ्यासारखा शहाणा व शक्तिमान् दुसरा कोणीं नाहीं. रावण एकदां पृथ्वीवर फिरत असतां माहिष्मती नगरींतून सहस्रार्जुन राज्य करीत होता, त्यास जिंकण्याकरितां तेथें आला. अर्जुनास रावणाने युद्धास आव्हान केले तेव्हां

त्याच्या प्रधानांनीं रावणास विनंती केली कीं, ' सहस्रार्जुन नर्मदा नदीवर स्नानास गेले आहेत; आपण आज येथें रहावें. ' तेव्हां रावण आपल्या सरदारांसह विंध्यपर्वतावर जाऊन, तेथें मुक्काम करून नर्मदा नदीवर स्नान करून नित्याप्रमाणें सुवर्णलिंगाची पूजा करीत बसला. इकडे खालीं कोसावर सहस्रार्जुन नदींत क्रीडा करीत होता. त्यानें लीलेनें आपल्या हजार बाहूंनीं नदीचें पाणी अडविलें, तेव्हां नदीचें पाणी साहाजिकच वर चढून रावण जेथें तीरावर पूजा करीत बसला होता तेथें एकाएकीं आलें व त्यामुळें सर्व पूजासाहित्य वाहून गेलें. तेव्हां रावणानें क्रोधानें हें काय आहे, तें पाहण्यास शुकसारणांस पाठविलें. नदीतीरानें खालीं जातां जातां सहस्रार्जुनानें नदींत उभें राहून पाणी अडविलें आहे, असें पाहून त्यांनीं येऊन तें रावणास सांगितलें. त्याबरोबर रावण सहस्रार्जुनावर धांवला. अर्जुनाच्या अमात्यांनीं ही लढाईची वेळ नव्हे म्हणून विनंति केली. परंतु राक्षसांनीं त्यास मारून गट्ट करून टाकलें; तेव्हां एकदम हलकल्लोळ झाला. सहस्रार्जुनास ही हकीकत कळतांच तोही नदीतीरावर येऊन गदा घेऊन रावणास आडवा झाला. रावणाचा सेनापति प्रहस्त प्रथम पुढें सरसावला. त्यास त्यानें एका प्रहारानें जमिनीवर लोळविलें; तेव्हां बाकीचे सरदार मागें फिरले. परंतु रावण गदा घेऊन पुढें झाला व त्या दोघांचें गदायुद्ध सुरू झालें. रावणाच्या अंगावर गदाप्रहार जोरानें बसत, परंतु वरप्रदानामुळें त्यास इजा होईना. इतक्यांत सहस्रार्जुनानें आपल्या पांचशें हातांच्या जोरानें एक गदाप्रहार त्याजवर केला, तो मात्र रावणास वर्मी लागला. गदेचे तुकडे झाले, पण रावण ओरडत खालीं बसला. अर्जुनानें एकदम धांवून हजार बाहूंनीं रावणास पकडलें, आणि दोरखंडानें बांधून त्यास माहिष्मती नगरींत नेलें. प्रहस्त शुद्धीवर येऊन सर्व राक्षसांसह अर्जुनावर धांवला व रावणास सोडविण्याची त्यानें खटपट केली. परंतु ते सर्व पराभव पावून पळून गेले. रावणास सहस्रार्जुनानें बांधून कैद केल्याची बातमी सर्व त्रैलोक्यांत पसरली, तेव्हां पुलस्त्य ऋषि नातवावरील प्रेमामुळे माहिष्मती नगरींत स्वतः आले. सहस्रार्जुनानें त्यास सामोरें जाऊन हात जोडून विचारलें:—" महाराज, मी आपल्या येण्यानें आज धन्य जाहलों आहें, आपली काय इच्छा आहे ? " तेव्हां पौलस्त्य महर्षि म्हणाले:—" रावणाचे यश तूं हरण केलेंस यांत संशय नाहीं. तुझा पराक्रम अवर्णनीय

आहे. आतां हा माझा नातू आहे, म्हणून याजबद्दल मी रदबदली करतों; तेव्हां यास सोडून दे. '' याप्रमाणें पौलस्त्य ऋषींनीं रावणास सोडविलें व त्या दोघांचें सख्य करून दिलें. आणखी एका प्रसंगीं रावण वालीचा पराक्रम ऐकून त्यास जिंकण्याकरितां किष्किंधेस आला. वाली दररोज चारी समुद्रावर जाऊन संध्या करीत असे. रावण आला तेव्हां वाली दक्षिण समुद्रावर संध्येस गेला होता. वालीच्या लोकांनीं रावणास तें सांगताच रावण पुष्पक विमानांत बसून दक्षिण समुद्रावर गेला. वाली दृष्टीस पडतांच त्याला हळूच मागून जाऊन पकडावा, असा विचार करून विमानांतून उतरून हळूच पावलें टाकीत रावण वालीजवळ येऊन पोहोंचला. परंतु वालीला त्याची चाहूल लागली होती, तेव्हां त्यानेंही रावणास अचानक पकडण्याचा विचार आपल्या मनांत केला होता. रावण वालीवर हात टाकणार तों वालीनें मागें न पाहतां शेपटीनें रावणास विळखा घालून पकडलें आणि आकाशांत उड्डाण केलें. पश्चिम, उत्तर व पूर्व समुद्रावर जाऊन नित्याप्रमाणें त्यानें संध्या केली, आणि मग किष्किंधेस येऊन व त्यास शेपटीच्या विळख्यांतून सोडून, ' तूं कोण म्हणून ' विचारलें. रावण अर्धमेला झाला होता; त्यानें हात जोडून म्हटलें, " तुझ्यासारखा बलवान् प्राणी मीं पाहिला नाहीं. मी तुला जिंकण्याकरितां आलों होतों. परंतु मला चांगलीच अद्दल घडली. तुझ्याशीं सख्य असावें अशी माझी इच्छा आहे. '' तेव्हां वालीनें त्याचा हात धरून त्याच्याशीं सख्य केलें, आणि त्यास एक महिना किष्किंधेस ठेऊन घेवून मग लंकेस रवाना केलें. असो; तर रावणाहूनही बलाढ्य लोक त्या वेळेस होते. परंतु ते सत्त्वस्थ असून लोकास त्रास देत नसत. रावणाचें ऐश्वर्य व बल त्याच्या उन्मत्तपणामुळें व दुराचारामुळें कमी झालें व तो जरी देवादिकांस अवध्य होता, तरी तूं त्याचा वध केलास, व राक्षसांच्या त्रासापासून सर्व पृथ्वीस सोडविलेंस, हे तुझे जगतावर उपकार आहेत. असो; आता आम्ही येतों. '' तेव्हां रामचंद्रानें मोठ्या विनयानें त्या ऋषींस विनंति केली कीं " सर्व कामांची व्यवस्था लागल्यावर अनेक यज्ञ करण्याचें माझ्या मनांत आहे; तरी मी जेव्हां जेव्हां आपणास यज्ञाचें बोलावणें करीन, तेव्हां तेव्हां आपण सर्वांनीं येऊन माझे यज्ञ सिद्धीस न्यावे. '' त्याप्रमाणें सर्व

ऋर्षीनीं येण्याचें कबूल करून व रामचंद्रास आशीर्वाद देऊन ते आपआपल्या आश्रमास गेले. (उत्तर० सर्ग ३१—३६ ).

नाना देशांचे राजेही रामचंद्राचें अभिनंदन करण्याकरतां आले; त्यांचा उत्तम प्रकारें सत्कार करून त्यांस कांहीं दिवस ठेवून घेऊन व त्यांस उत्तम उत्तम रत्नें देऊन त्यांची रामचंद्रानें योग्य रीतीनें बोळवण केली. व विदेहाचा राजा व सीतेचा बाप जनक हाही रामास भेटून व त्यास नाना प्रकारचीं रत्नें, अलंकार, वस्त्रें, दासदासी, घोडे, रथ, हत्ती, इत्यादि देऊन परत गेला. त्याचप्रमाणें भरताचा मामा युधाजित् हाही रामचंद्रास भेटून गेला. याप्रमाणें श्रीरामचंद्राचे कित्येक महिने अत्यंत सुखांत गेले. सकाळीं उठून, स्नानादि कर्में आटोपून, होम व देवतांचें पूजन करून, अतिथींचा सत्कार करावा; नंतर दोन प्रहरीं प्रजांचें सर्व काम करावें; अपरान्हीं सुग्रीव, बिभीषणादि मित्र-मंडळीसह आनंदांत वेळ काढावा व सीतेलाही सर्व प्रकारें सुख द्यावें. याप्रमाणें कित्येक दिवस आनंदाच्या पराकाष्ठेत गेले. सीतेनेंही धर्मकृत्यें आटोपून प्रातःकालपासून सर्व सास्वांची सेवा करावी, व दोन प्रहरांनंतर तारा व इतर वानरस्त्रिया यांसह खेळून आनंदांत वेळ घालवावा. याप्रमाणें कित्येक दिवस गेल्यानंतर रामचंद्रानें सुग्रीवास आपल्या देशास परत जाण्याविषयीं आज्ञा केली. तशीच बिभीषणासही केली. “ तुमचे प्रजाजन तुमच्याकारितां फार उत्कंठित झाले असतील, तेव्हां तुम्ही आतां परत जा. मला तुम्ही अत्यंत कठिण प्रसंगीं साहाय्य केलें. मला तुमचें वारंवार स्मरण झाल्यावांचून राहणार नाहीं. ” असें म्हणून सुग्रीव, बिभीषण, जांबवान्, मैंद, द्विविद, अंगद, हनुमान्, वगैरे सर्व जणांचा रत्नांनीं व पोशाखांनीं रामानें सत्कार केला व “ माझी आठवण ठेवा बरें, ” असें त्यांस वारंवार बजाविलें. तेव्हां सर्वांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. सर्वांनीं रामचंद्राच्या पायांवर मस्तक ठेवून व त्याजला प्रदक्षिणा घालून, त्याचा निरोप घेतला. हनुमानानें निरोप घेतांना हात जोडून विनंति केली, “ महाराज, माझें प्रेम, माझी भक्ति तुमच्या ठिकाणीं निश्चल राहील, दुसऱ्या कोणत्याही ठिकाणीं जाणार नाहीं. जोंपर्यंत रामकथा या जगांत प्रचलित राहील, तोंपर्यंत या देहांत माझे प्राण राहतील. तुमचे गुणनुवाद नित्यश: मी ऐकेन, आणि याच रीतीनें माझ्या विरहदु:खाचें शमन होईल. ” हें

मारुतीची विनंति ऐकून रामास गहिंवर आला व त्यांनीं एकदम सिंहासनावरून उठून मारुतीस कडकडून आलिंगन दिलें आणि म्हटलें, " हनुमाना, तुझे माझ्यावर एवढे मोठे उपकार आहेत, कीं एकाही उपकाराचा मी उतराई होणें शक्य नाहीं. पण तुझे उपकार माझ्याच डोक्यावर अक्षय राहोत; कारण प्रत्युपकार करण्यासारखा प्रसंग तुझ्यावर कधींही येऊं नये, अशीच माझी इच्छा आहे. तूं म्हणतोस त्याप्रमाणें जोंपर्यंत माझी कथा लोक गातील, तोंपर्यंत तूं जिवंत राहून तुझें यश सर्वत्र पसरेल. " असें म्हणून रामांनीं आपल्या गळ्यांतील नवरत्नांचा हार त्याच्या गळ्यांत घातला. तेव्हां सर्व वानरांनीं उड्या मारून आपला हर्ष व्यक्त केला. असो; याप्रमाणें रामचंद्रानें सर्व वानरांना व राक्षसांना रजा देऊन आपआपल्या देशांत पाठविलें. ( उत्तर० सर्ग ३८–४० ).

चांगलें होऊं लागलें म्हणजे सर्वच बाजूंनीं होतें. रामचंद्रास सीतेसह अयोध्येंत राज्याभिषेक झाला, तेव्हां सर्व राजेरवाड्यांनीं येऊन व रामचंद्राचें अभिनंदन करून त्यास नजरनजराणे दिले. महान्‌महान् ऋषीही येऊन रामचंद्रास आशीर्वाद देऊन गेले. वानर, राक्षस संतुष्ट होऊन आपल्या घरीं रवाना झाले. इतक्यांत पुष्पक विमान कुबेराकडे पाठविलें होतें, त्याला परत जाण्याची आज्ञा करून त्याबरोबर " आपण रावणास जिंकलें आहे त्या अर्थीं पुष्पक विमानावर आपली सत्ता आहे, " असा उलट निरोप कुबेरानें रामास पाठविला. तेव्हां रामानें कुबेरास धन्यवाद देऊन विमानास पुनः परत पाठाविलें आणि ' मी आठवण करीन त्या वेळेस यावें,' अशी त्यास आज्ञा केली. सीतेस पुढें गर्भ राहून कांहीं महिने गेले, तेव्हां रामचंद्रास अत्यंत आनंद झाला. कौसल्या मातुःश्रीस जो आनंद झाला तो सांगता येत नाहीं. सीतेचें मन संतुष्ट ठेवण्याकरितां रामचंद्रानें अत्यंत परिश्रम घ्यावेत. कारण तिला वनवासात फार दुःख भोगावें लागलें, असें त्यास नेहमीं वाटे; व त्याचा परिहार करण्यासाठीं ते नेहमीं प्रयत्न करीत. एके दिवशीं सीतेस रामांनीं विचारलें:—"सीते, तुला काय इच्छा होत असेल ती मला सांग. तुझे डोहाळे पूर्ण करणें माझें कर्तव्य आहे."त्या धर्मशील साध्वीला डोहाळे अत्यंत पवित्रच होणार ! सीता म्हणाली:—"मला असें वाटतें कीं, गंगातीरावर राहणाऱ्या मुनींच्या आश्रमांतील बायकांना उत्तम उत्तम अलंकार

व वस्त्रें देऊन यावें." रामांनीं उत्तर केलें:-- "फारच उत्तम आहे. ही इच्छा तुझ्या सद्गुणांना व कुलीनपणाला फारच शोभा देते. तुझा जणयाचा मी आतांच बंदोबस्त करतों." असें म्हणून रामचंद्र अंतःपुरांतून राजसभेंत आले. ( उत्तर० सर्ग ४१--४२ ).

पण पुढें विचित्रच घडून यावयाचें होतें. रामचंद्राच्या व सीतेच्या सुखरूपी निर्मल आकाशांत एकाएकीं दुःखाचे ढग येऊन त्यांच्या राहिलेल्या आयुष्याच्या भागावर वीज कोसळणार होती. पण तो प्रसंग शांतपणें सहन करून अशा अकाल्पित दुःखाच्या प्रसंगीं मनुष्यानें कसें वागावें, याचें रामचंद्रांनीं उत्कृष्ट उदाहरण घालून दिलें. असो. रामचंद्र राजसभेंत येऊन नित्याप्रमाणें आपल्या मित्रांशीं व संवगड्यांशीं आनंदानें गोष्टी सांगत बसले. गोष्टी सांगतां सांगतां रामानें सहज प्रश्न केला, "मित्रांनो! शहरांत, देशांत, लोक काय बोलतात? लोकांत मुख्यतः चर्चेचा काय विषय आहे?" तेव्हां भद्र नावाच्या हेरानें हात जोडून विनंति केली:— "महाराज, राजरस्त्यांच्या चवाठ्यांवर, बाजारांत, वनांत, उपवनांत ज्या चांगल्यावाईट गोष्टी चालतात, त्यांत आपल्या पराक्रमाचें लोक अत्यंत वर्णन करतात. समुद्रांत आपण सेतु बांधला, हे ऐकून लोक तोंडांत बोटें घालतात. असें करणें देवदानवांना सुद्धां दुष्कर आहे, असें ते म्हणतात. वानरांशीं व अस्वलांशीं सख्य करून व राक्षसांचा पराभव करून रावणासारखा बलाढ्य राजा तुम्हीं रसातळास मिळविलां, ह्याचेंही लोक आश्चर्य करितात. पण रावणाच्या घरीं एक वर्ष कैदेंत राहिलेल्या सीतेस सोडवून आपण आपल्या घरांत घेतलें, याबद्दल मात्र लोक आपल्यास दूषण देतात. राजानेंच जर असें केलें तर आम्हांला असें करण्यास कोणती हरकत आहे? 'यथा राजा तथा प्रजा' असेंही कोणी म्हणतात." हें त्याचें भाषण ऐकून रामचंद्रांचें हृदय दुःखानें एकदम फाटून गेलें व त्यांनीं सर्व मित्रास रजा दिली. बराच वेळ एकांतांत बसून त्यांनीं आपल्या मनाशीं कांहीं निश्चय ठरविला. द्वारपालास हाक मारून लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न यांना बोलावून आणण्याची आज्ञा केली. रामाच्या आज्ञेप्रमाणें तिघेही सत्वर येऊन वर्दी देऊन आंत गेले. तो ग्रहण लागलेल्या चंद्राप्रमाणें रामाचें मुख निस्तेज झालें आहे व डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या आहेत, असें पाहून त्या तिघांच्या पोटांत धस्स

झालें. तिघांनीं पुढें होऊन व हात जोडून रामाच्या पायांवर मस्तकें ठेविलीं, तेव्हां रामांनीं प्रेमानें त्यांस उठवून व आलिंगन देऊन उत्तम आसनांवर बसविलें; आणि बोलण्यास सुरवात केली:-"प्रिय बंधूंनो, तुम्ही मला माझ्या प्राणापेक्षांही प्रिय आहां. तुम्ही माझें केवळ सर्वस्व आहां. तुम्हीं चालविलेलें राज्य मी केवळ पहात आहें. तुम्ही सर्व बुद्धिमान् व शास्त्रें शिकलेले आहां. माझा निवाडा तुम्ही करा." असें राम म्हणत असतां त्या तिघांचीं मुखें दीन झालीं व राजा रामचंद्र पुढें काय बोलत आहे, हें कळण्यास त्यांचीं मनें उद्विग्नपणें अत्यंत आतुर झालीं. राम पुढें म्हणाले:—

"प्रिय बंधूंनो, तुम्ही शांतपणें ऐका. तुमचें मन कलुषित होऊं देऊं नका. लोक मला सीतेस घरांत घेतल्याबद्दल नांवें ठेवीत आहेत. हा जनापवाद माझें काळीज तोडून टाकीत आहे. लक्ष्मणा, तुला सर्व गोष्टी ठाऊक आहेत. जनस्थानांतून सीतेला रावण आपल्या पश्चात् जबरदस्तीनें घेऊन गेला, तें अपयश मीं लंकेवर स्वारी करून रावणास ठार मारून धुऊन टाकिलें. तेव्हांच मला सीतेस परत घ्यावी किंवा नाहीं, ही शंका उत्पन्न झाली; आणि मीं तिला घेण्याचें नाकारलें. लक्ष्मणा, तुझ्या समक्ष तिनें दिव्य केलें आणि अग्नींत उडी टाकिली. तेव्हां अग्निनारायणानें साक्षात् प्रगट होऊन मला सीता देऊन सांगितलें कीं, 'सीता निष्पाप आहे.' लक्ष्मणा, हें सर्व तूं पाहिलें आहेस. मीही आपल्या हृदयानें जाणतों कीं, सीता शुद्ध आहे, आणि म्हणून मी तिला घेऊन अयोध्येस परत आलों व तिच्यासहवर्तमान राज्याभिषेकही करून घेतला. असें असून हा लोकप्रवाद उत्पन्न झाला आहे. आणि सर्व देशांत व या नगरींत चोहोंकडे माझी अकीर्ति पसरली आहे. प्रिय बंधूहो, ज्या मनुष्याची लोक अकीर्ति गातात तो अधःपातास जातो. आपली अकीर्ति होणें हें चांगलें नाहीं. सत्कीर्तीस सर्व लोक किंबहुना देवसुद्धां पूज्य मानतात. चांगले लोक आपली सत्कीर्ति व्हावी म्हणून नेहमीं आपले प्रयत्न चालू ठेवितात; फार काय, अपकीर्तीचे डाग नाहींसे करण्याकरितां आपले प्राण सुद्धां खर्चीं घालितात. प्रिय बंधूंनो, सत्कीर्तीसाठीं मीं तुमचासुद्धां त्याग करीन मग सीतेची गोष्ट काय ? तरी आतां जें प्राप्त झालें आहे, तें केले पाहिजे. जरी मी शोकसमुद्रांत पडतों आहे, किंबहुना माझ्यासारखा दुःखी प्राणी या वेळेस

मला या जगतात कोणी दिसत नाहीं; तरी लोकाराधन हेंच माझें परम कर्तव्य आहे. तर लक्ष्मणा, उदईक सकाळीं सीतेला रथांत घालून गंगेच्या पार तमसा नदीच्या कांठीं वाल्मीकि ऋषींचा आश्रम आहे, तेथें अरण्यांत सोडून ये. मी जें सांगतों आहे तें तूं निःशंक कर. माझ्यावर जर तुमची प्रीति असेल, तर तुम्ही मला या निश्चयापासून परतविण्याचा यत्न करूं नका. माझ्या पायाची तुम्हांस शपथ आहे. या गोष्टीला तुम्ही या वेळेस अनुमोदन द्या; व मला एक शब्दही बोलूं नका. सीतेनें मला आतांच गंगातीरावरील आश्रमांतील मुनींच्या स्त्रियांना वस्त्रालंकार देण्याविषयीं विचारिलें आहे व मीं तिला तिकडे पाठविण्याचें कबूलही केलें आहे. यामुळें लक्ष्मणा, सीता तुझ्याबरोबर आनंदानें येईल. तर आतां जा, आणि माझी आज्ञा अंमलांत आणा." असें म्हणून रामचंद्रानें दुःखाच्या आवेशानें तोंड फिरवून त्या तिघास निरोप दिला; व तेही शोकानें व्याकुळ होऊन मोठ्या कष्टानें बाहेर पडले. ( उत्तर० सर्ग ४३ –४५ ).

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं रामचंद्रांचा शीघ्रगामी रथ सुमंत झपाट्यानें हाकीत आहे आणि रथांत सीता व लक्ष्मण बसलीं आहेत, असें दृष्टीस पडलें. लक्ष्मणाचे डोळे शोकानें लाल झाले होते; पण सीता बिचारी आनंदांत होती. तिच्यापाशीं अनेक सुंदर वस्त्रें व स्त्रियांचे अनेक प्रकारचे दागिने होते. तिच्या चेहऱ्यावर गर्भारपणाची कांति चमकत होती. इतकेंच नव्हे, तर तिच्या निष्पाप व निष्कंटक हृदयांत मुनींच्या स्त्रियांना हे वस्त्रालंकार आपण देऊं तेव्हां त्यांस फार आनंद होईल, ही कल्पना भरली असल्यामुळें एक प्रकारच्या धर्माच्या व औदार्याच्या उत्साहाची छटा तिच्या मुखकमलावर पसरली होती. " हीं वस्त्रें मुनींच्या बायकांना फार आवडतील नाहीं बरें ! अलंकार त्यांनीं पाहिले तरी असतील का ! " इत्यादि प्रश्न ती लक्ष्मणास विचारी, तेव्हां त्याच्या हृदयांत भडका होऊन जाई; आणि या बिचारीला पुढें आपल्यावर येणाऱ्या अत्यंत कष्टप्रद विपत्तीची कांहींच कल्पना नाहीं, असें वाटून त्याचें अंतःकरण अगदीं कालवून जाई. " लक्ष्मणा, तूं इतका उदास कां झाला आहेस ? तुझ्या डोळ्यांस आसवें येत आहेत. महाबाहु रामचंद्राचा वियोग मलासुद्धां दुःसह वाटतो आहे. पण मला मुनींच्या

आश्रमांत एकच रात्र रहावयाचें आहे, जास्त नाहीं. बाळा लक्ष्मणा, राजाधिराज रामचंद्रांपासून आपणांस फार वेळ दूर रहावयाचें नाहीं." हे शब्द तर लक्ष्मणाच्या काळजास भाल्यासारखे लागले; आणि या निरपराधी व आपणावर पूर्ण विश्वास टाकणाऱ्या देवीचा आपण कपटानें गळा कापणार आहों, असें वाटून त्यास दुःखानें व दैन्यानें भडभडून आलें; परंतु तो कांहीं बोलला नाहीं. सीतेनें त्यास दुःखाचें कारण पुनः पुनः विचारलें. "मलाही कसेंसेच होत आहे; मला हे अपशकुन कां बरें होत आहेत ? मी तर चांगलें धर्मकृत्य करण्यास जात आहे." इत्यादि भाषण करितां करितां सायंकाळच्या सुमारास तीं भागीरथीवर पोहोचलीं. भागीरथीवर गुहाच्या लोकांनीं नावेची ताबडतोब तजवीज केली. लक्ष्मण व सीता रथांतून उतरून नावेवर जाऊन बसलीं, व नावाड्यांनीं नाव पैलतीरास लवकरच पोहोंचविली. लक्ष्मणानें सीतेला नावेंतून उतरून तीरावर घेतलें. त्या प्रदेशांत पोहोंचतांच लक्ष्मणानें एकदम सीतेला साष्टांग नमस्कार घातला, व हात जोडून "देवि सीते"—एवढेंच शब्द उच्चारिले; पण त्याचा कंठ दाटून आल्यामुळें त्याच्यानें पुढें बोलवेना. तेव्हां सीतेचे पोटांत एकदम धस्स झालें, व तिनें मोठ्या काकुळतीनें म्हटलें—"लक्ष्मणा, तूं सारा दिवस रडतो आहेस; आणि आताही माझ्या पायां पडतो आहेस. काय असेल ते मला लौकर सांग. माझ्यानें धीर धरवत नाहीं." तेव्हा लक्ष्मण मोठ्या प्रयासानें म्हणाला:—"देवि, राजा रामचंद्रानें लोकापवादास भिऊन तुला येथेंच वाल्मीकींच्या आश्रमापाशीं अरण्यांत सोडून देण्याची मला आज्ञा केली आहे." हें वाक्य पुरें होत आहे तोंच बिचारी सीता तोडलेल्या केळीप्रमाणें एकदम मूर्च्छा येऊन खालीं पडली. कांहीं वेळानें शुद्धीवर येऊन तिनें आक्रोश करून म्हटलें:—"हा कृतांता, तूं अद्यापही माझ्या पाठीस लागला आहेस ना ? लक्ष्मणा, ब्रह्मदेवानें मला दुःख भोगण्याकरितांच उत्पन्न केलें आहे काय ? मीं पूर्वजन्मीं असें कोणतें भयंकर पातक केलें होतें, कोण जाणे! मीं कोणा तरी सुखांत नांदणाऱ्या नवराबायकोची ताटातूट केली असावी खचित ! लक्ष्मणा, मी तुझ्यासमक्ष अग्नीचें दिव्य करून आपली शुद्धता सिद्ध करून दाखविली; असें

असून न्यायी महाराज लोकापवादाला भिऊन मला टाकून देत आहेत ना ! पूर्वी वनवासाचें पुष्कळ दुःख मीं भोगिलें. पण श्रीरामचंद्रांच्या पायांच्या दर्शनामुळें मला तें दुःखसें मुळींच वाटलें नाहीं; व त्यांच्या आश्रयानें मला प्रत्येक आश्रमांत आदरानें 'या' म्हणून म्हणत. पण आतां या स्थितींत मला कोण आश्रय देईल व दिला तरी रामचंद्रांशिवाय मी दिवस कसे कंठूं ? कोण माझें दुःख ऐकून घेईल ? रामचंद्रांनीं मला कां टाकिलें म्हणून सांगूं ? देवा, नको—मला हा जीव नको. लक्षणा, मला वाटतें, कीं, या गंगेत आतांच तुझ्यासमक्ष जीव द्यावा; पण माझ्या पोटांत हा रामचंद्राचा अंश आहे. त्याचा घात करतां येत नाहीं." याप्रमाणें शोक करीत असतां भावी संततीच्या प्रेमानें किंचित् जिवाची परवा उत्पन्न होऊन सीतेला कांहीं धीर आला, व ती म्हणालीः—"लक्ष्मणा, बरें आहे; जें माझ्या कपाळीं आलें तें मी भोगण्यास तयार आहें. जा. तूं परत जा. मला तूं राजाच्या आज्ञेप्रमाणें सोडून जा. माझी ही गर्भारपणाची स्थिति मात्र पूर्ण अवलोकन करून ठेव. जा. तुझें कर्तव्य तूं कर. सर्व सासूबाईंना माझा हात जोडून नमस्कार सांग आणि त्या परम धार्मिक राजाला माझा असा निरोप सांगः— "महाराज, सर्वांसमक्ष दिव्य करून मी निष्पाप आहें, हें मीं सिद्ध केलें. माझी तुमच्या ठिकाणीं भक्ति किती आहे, हें पूर्णपणें जाणत आहां. असें असून लोकापवादाच्या भीतीनें माझा तुम्हीं त्याग केला तो मला सर्वथैव मान्य आहे, कारण स्त्रियांना पति हेच दैवत आहे, पति हाच त्यांचा बंधु, पति हाच त्यांचा गुरु आहे. लोकापवादानें सत्कीर्तीस कलंक लागूं नये, ही तुमची इच्छा तुम्हांला भूषण देणारी आहे; व राजा ह्या नात्यानें तुमचा हा परम धर्म आहे. आपल्या कीर्तीला कलंक न लागावा हें मलाही इष्ट आहे; म्हणूनच मी आपल्यास मला टाकून दिल्याबद्दल मुळींच दोष देत नाहीं. मला माझ्या या देहाची आतां मुळींच परवा नाहीं. आपला वंश माझ्या पोटांत आहे, तो बाहेर पडल्यावर जन्मोजन्मीं मला आपणच पति मिळावे, परंतु या जन्माप्रमाणें आपला मला वियोग न व्हावा, याकरितां मी उग्र तप करणार आहें. तेव्हां जरी पत्नी या नात्यानें आपण माझ्यावर यापुढें प्रेम न ठेवलें तरी आपल्या राज्यांतील एक तपस्विनी या दृष्टीनें माझ्यावर आपली सदैव कृपादृष्टि असावी." हें त्या पतिव्रतेचें निःसीम पतिप्रेम पाहून व

सदाचरणाचा निश्चय व्यक्त करणारे शब्द ऐकून लक्ष्मणाच्या डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा वाहत होत्या. शेवटीं, ' जा, लक्ष्मणा, जा. राजाची आज्ञा आपल्या कर्तव्याप्रमाणे पाळ, ' अशी तिची परवानगी झाल्यावर लक्ष्मणानें पुनः एकवार तिला साष्टांग नमस्कार केला, व तिला प्रदक्षिणा घालून तो गंगेच्या किनाऱ्यावर येऊन नावेंत बसला. थोड्याच वेळानें तो गंगा उतरून अलीकडे आला व रथ जोडून त्याजवर बसून अयोध्येला जावयास निघाला. व तो जेव्हां जेव्हां मागें वळून पाही, तेव्हा सीता आपल्याकडे पहात आहे असें त्यास दिसे. बिचारी सीता पैल तीरावरून त्याजकडे पहात होती. तिजला रथ दिसेनासा झाला, तेव्हां तिनें एकदम " महाराज, मला अरण्यांत कसें टाकलेंत ! " असा मोठ्यानें टाहो फोडून मुक्तकंठ रडण्यास आरंभ केला. त्या अरण्यांत तिचें तें अत्यंत शोकावेगाचें रुदन भरून गेलें, व वनांतील मोरांचे टाहो सुद्धां बंद पडून गेले. त्या वेळीं वाल्मीकि ऋषींचे शिष्य समिधा आणण्यास त्या बाजूला आले होते, त्यांना तें रडणें ऐकून कळवळा आला; व त्यांनीं सीतेची स्थिति पाहिल्यावर धांवत जाऊन वाल्मीकि ऋषींस ' कोणा थोराची स्त्री अरण्यांत गंगातीरीं एकटीच रडत बसली आहे, ' असें सांगितलें. शिष्यांचे शब्द ऐकून वाल्मीकि ऋषि एकदम उठले व अर्घ्य घेऊन धांवतच तेथें आले, आणि म्हणाले, " सीते, माझे परम मित्र दशरथ यांची तूं सून आहेस. तुला रामानें कां टाकलें तें मला अंतर्ज्ञानानें समजलें आहे. तूं निष्पाप आहेस, हें मी पूर्ण जाणून आहें. तर तूं आतां शोक करूं नकोस. चल माझ्याबरोबर. माझ्या आश्रमांतील तापसी तुझी पोटच्या मुलीप्रमाणें काळजी घेतील. आश्रमाजवळच एका उटजांत तुझी सर्व व्यवस्था लागेल; तर चल. " असे वाल्मीकि ऋषींचे आश्वासनयुक्त शब्द ऐकून सीतेनें उठून त्यांस नमस्कार केला व त्यांच्या मागोमाग हात जोडून ती त्यांच्या आश्रमाकडे गेली. ( उत्तर० सर्ग ४६–४९ ).

सीतेला वाल्मीकि ऋषि घेऊन गेले, एवढी बातमी पक्की मिळवून, लक्ष्मण मोठ्या कष्टी हृदयानें अयोध्येकडे परत फिरला. त्यांच्या शोकाकुल मुद्रेकडे पाहून सुमंत्र म्हणाला, " लक्ष्मणा, तूं व्यर्थ दुःख करूं नकोस. ही गोष्ट अशीच होणार, हें यापूर्वीच दुर्वास ऋषींनीं दशरथाला भाकीत सांगितलें

होतें. अपरिहार्य गोष्टीचा शोक करण्यांत अर्थ नाहीं. सीतेला दोन पुत्र होतील व त्यांस रामचंद्र राज्यावर बसवून मग निजधामाला जातील, असेंही दुर्वासांचें भाकीत आहे. पहिलें भाकीत खरें झालें आहे, तर हेंही पुढचें खरें होईल. परंतु ही गोष्ट कोणाजवळ सांगावयाची नाहीं; आज प्रसंगानें मीं तुला सांगितली आहे." सुमंत्राचें हें बोलणें ऐकून लक्ष्मणाचा शोक बराच कमी झाला, व लवकरच ते अयोध्येस येऊन पोहोंचले. लक्ष्मणानें राजवाड्यांत शिरून रामाची भेट घेतली, आणि त्याच्या पायांवर डोकें ठेवून व हात जोडून विनंति केलीः—"महाराज, आपल्या आज्ञेप्रमाणें जानकीला गंगेच्या पलीकडे वाल्मीकींच्या आश्रमांत सोडून आलों. त्या परम साध्वीनें जो आपणांस निरोप सांगितला आहे तो ऐका." असें म्हणून सीतेचा निरोप अक्षरशः त्यानें रामास कळविला, तेव्हां रामचंद्राच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. लक्ष्मणानें रामाचें सांत्वन करून म्हटलें:—"महाराज, कालाची गति विचित्र आहे. जे होणार तें कधींही चुकत नाहीं. यावर नजर देऊन आपण शोक आवरावा. तुमच्यासारखे निश्चयी व नीतिमान् पुरुष शोकाधीन होत नाहींत. संचयाच्या अंतीं क्षय आहे; उन्नतीच्या अंतीं पतन आहे. संयोगाच्या अंतीं वियोग आहे; व जन्माच्या अंतीं मृत्यु आहे; यांजकरितां पुत्र, स्त्री, मित्र, धन इत्यादिकांच्या ठिकाणीं अधिक स्नेह करूं नये. मी अल्पबुद्धीचा मनुष्य, मीं आपणांस सांगावें असा माझा अधिकार नाहीं. तुम्ही आपलें आपण समाधान करून घेण्यास समर्थ आहांत. किंबहुना सर्व लोकांचें समाधान तुम्ही करूं शकतां, मग या शोकाला आवरण्यास तुम्हांस काय कठीण आहे? तुमच्यासारखे पुरुषसिंह अशा विपत्तीच्या प्रसंगीं डगमगत नाहींत. ज्या अपवादाच्या भीतीनें तुम्हीं सीतेचा त्याग केला आहे, तो अपवाद आपल्यापुढें वारंवार लोकांत निघेल. तथापि त्याचा विचार न करितां धैर्यानें आपण आपल्या मनास आवरा. आणि ही दुर्बल बुद्धि टाकून संताप करून घेणें सोडून द्या." ही लक्ष्मणाची विनंति ऐकून रामचंद्रांनीं लक्ष्मणास पोटाशीं धरून म्हटलें:—"लक्ष्मणा, तूं म्हणतोस तें अक्षरशः खरें आहे. असो; माझी ही दुस्तर आज्ञा तूं सिद्धीस नेलीस, याबद्दल मला फार संतोष झाला आहे. तुझ्या भाषणानेंही माझ्या मनाला समाधान वाटलें आहे; व मीं संताप टाकून दिला आहे. आज ४ दिवसांत

मी राज्यकार्य पाहिलें नाहीं. लोकांच्या कांहीं फिर्यादी आहेत कीं काय याची चौकशी केली नाहीं. जो राजा पौरजनांची दाद घेत नाहीं तो नरकास जातो. नृग राजाला दोघा ब्राह्मण वादीप्रतिवादींनीं याच कारणाकरितां तूं सरडा होशील असा शाप दिला होता. तर आतां राजसभेंत जाऊन कोणी फिर्यादी आले आहेत कीं काय, याची चौकशी कर." याप्रमाणें लक्ष्मणास सांगून रामचंद्र नित्याप्रमाणें राजसभेंत गेले.

(उत्तर० सर्ग ५०-५३.)

शिशिर ऋतूचे दिवस जाऊन वसंताचे दिवस येऊन पोहोंचले. रामचंद्र नित्याप्रमाणें प्रातःकर्म आटोपून पौरजनाच्या फिर्यादी ऐकण्याकरिता राजसभेंत येऊन बसले. इतक्यात द्वारपालानें येऊन "महाराज, यमुनेच्या तीरावर राहणारे ऋषि च्यवन महर्षींना पुढे करून राजद्वारांत आले आहेत; आपणास भेटण्याची त्यांची इच्छा आहे," अशी विनंति केली; तेव्हां त्यांस ताबडतोब घेऊन येण्याविषयीं त्यानीं आज्ञा केली. रामचंद्रानीं त्या ऋषींचें मोठ्या प्रेमानें व नम्रतेनें स्वागत करून त्यांस उत्तम आसनावर बसविलें. नंतर रामचंद्र हात जोडून म्हणाले:-" ऋषींनो, आपली काय इच्छा आहे, मला सांगा. माझा देह, माझें राज्य, माझे बंधु आपल्या सेवेस अर्पण केले आहेत." तेव्हां सर्व ऋषींनीं रामाला 'धन्य धन्य' म्हणून त्याची स्तुति केली, व च्यवन भार्गव ऋषींनीं त्यास अशी हकीकत सांगितली:- " मधूचा पुत्र लवण राक्षस या ऋषींना फार त्रास देतो. शंकरानें त्याच्या पित्याला दिलेला शूल त्याच्याजवळ असल्यामुळें तो अजिंक्य असून अत्यंत उन्मत्त झाला आहे. तूं रावणाचा वध केलास, तेव्हां लवणाचाही वध करणें तुलाच शक्य आहे, असें समजून हे ऋषि तुझ्याकडे आले आहेत." हें ऐकून रामचंद्रांनीं आपल्या भावांस म्हटलें:- " लवणाचा वध करण्यास कोण तयार होतो आहे? भरत कीं शत्रुघ्न?" शत्रुघ्नानें म्हटलें, " भरतानें १४ वर्षे दुःख भोगिलें आहे, त्याला या वेळेस त्रास न देता मला कामगिरी सांगावी." असें म्हणतांच शत्रुघ्नाचें म्हणणें मान्य करून रामांनीं त्या कामावर त्याचीच योजना केली. लवणाला मारून मधुपुरीमध्यें तूंच राज्य कर, तुला आतांच मधुपुरीचा राज्याभिषेक करवितों, असें म्हणून व वसिष्ठ महर्षींकडून मोठ्या आनंदानें

शत्रुघ्नास अभिषेक करविला. नंतर दुसरे दिवशीं रामचंद्रांनीं त्याजबरोबर सैन्य देऊन त्यास सांगितलें:—" हे ऋषि सैन्यासह मागून येतील, तूं पुढें जा. लवण राक्षसाच्या दृष्टीस जो पडेल तो मारला जाईल, असा त्याला वर आहे. तर गुप्त राहून या बाणानें लवणाला ठार मार. हा शर विष्णूनें मधुकैटभांच्या वधाकरितां निर्माण केला होता. " असें म्हणून रामांनीं त्यास तो बाण दिला. शत्रुघ्नानें रामांच्या चरणांवर मस्तक ठेवून व त्यांस प्रदक्षिणा करून कूच केलें. सूर्यास्ताला गंगापार होऊन वाल्मीकींच्या आश्रमांत त्यानें मुक्काम केला. त्याच दिवशीं मध्यरात्रीं सीतेला दोन जुळे पुत्र झाले. तेव्हां आश्रमांत चोहोंकडे आनंदाची गडबड उडाली. शत्रुघ्नास ही बातमी कळतांच तो तेथे गेला; त्या नूतन बालकांस पाहून त्यासही अत्यंत आनंद झाला; व त्यानें सीतामातेचें नम्रपणे अभिनंदन केलें. वाल्मीकि महर्षींनीं मुलांचें रक्षोबंधन करण्याकरितां दर्भ मंत्रून व त्यांचे अग्र म्हणजे कुश तोडून दायांना ज्येष्ठ मुलाला अभिषिंचन करण्यास सांगितलें. नंतर दर्भांचे खालचे भाग (लव) पुनः दायांना देऊन धाकट्या मुलास अभिषिंचन करण्यास सांगितलें, व हीं मुलें कुश व लव या नांवांनीं पुढें विख्यात होतील, असा त्यांनीं त्या वेळेस त्यांस आशीर्वाद दिला. ( उत्तर० सर्ग ६०–६६ ).

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं शत्रुघ्नानें उठून प्रातःकर्मे आटोपून पश्चिमेकडे कूच केलें. सात दिवसांनीं तो यमुना नदीवरील भार्गव मुनींच्या आश्रमांत पोहोंचला. तेथें रात्रीं मुक्काम करून सकाळीं लवण राक्षस आहार आणण्याकरितां मधुपुरींतून बाहेर पडतांच शत्रुघ्नानें यमुना उतरून मधुरेच्या दरवाजांत ठाणें दिलें. दोन प्रहरच्या सुमारास लवण राक्षस अनेक श्वापदें व मनुष्यें मारून त्यांच्या मांसाचा भारा घेऊन आला. त्यास पाहतांच शत्रुघ्नानें त्याजवर धनुष्य उचलले व ' लढाईस सिद्ध हो; मी दशरथाचा पुत्र, रामचंद्राचा बंधु तुला मारून या देशास अभय देण्याकरितां आलों आहें, ' अशी हाक दिली. ती ऐकतांच लवणानें मांसाचा भारा खालीं ठेविला आणि जवळ शूल नसल्याकारणानें एक वृक्ष उपटून तो शत्रुघ्नावर धांवला. शत्रुघ्नानें रामचंद्रानें दिलेल्या दिव्य बाणाचें अनुसंधान करून त्याजवर तो सोडला, तेव्हां तो बाण

लवण राक्षसाचें हृदय फोडून व बाहेर पडून, पुनः शत्रुघ्नाच्या भात्यांत आला ! याप्रमाणें लवणाचा वध करून शत्रुघ्नानें त्या देशास निर्भय केलें. मागाहून त्याची शूर सेना आली व त्याजबरोबर अयोध्येहून आलेले व्यापारी, शिल्पी वगैरे सर्व लोकही आले. त्यांनीं मधुरापुरी वसविली, तेव्हां तो देश 'शूरसेन' या नांवानें प्रसिद्धीस आला, व शत्रुघ्नाच्या छत्राखालीं सर्व प्रकारच्या धनधान्यादिकांनीं समृद्ध झाला. बारा वर्षें मथुरेंत उत्तम तऱ्हेनें राज्य करून शत्रुघ्नानें त्या देशास सुखी केलें. नंतर रामचंद्रांच्या दर्शनाच्या लालसेने तो तेथून निघाला तो वाल्मीकीच्या आश्रमांत पूर्वीप्रमाणे येऊन एक दिवस तेथे राहिला. तों आश्रमांत रामायणाचे सुस्वर वीणामृदगासहित गायन चाललें होतें, तें ऐकून रामाचें चरित्र पूर्वी झाल्याप्रमाणें आपल्यासमोर प्रत्यक्ष होत आहे, असा त्यास भास होऊन त्याची चित्तवृत्ति तल्लीन झाली. परंतु हें काय आश्चर्य आहे, हें वाल्मीकि ऋषींस विचारण्याचें त्यास धैर्य झालें नाहीं. ऋषींच्या आश्रमांत नानाप्रकारचे दिव्य चमत्कार दृष्टीस पडतात अशी त्यानें आपली व सैनिकांची समजूत घातली. दुसरे दिवशीं तेथून निघून शत्रुघ्न तिसरे दिवशीं अयोध्येस पोहोचला. राजसभेंत रामचंद्राचें त्यानें अवितृप्त दर्शन घेतले आणि आपणांस नेहमीं जवळ ठेवून घेण्याविषयीं रामाला त्यानें विनंति केली. रामचंद्रांनीं त्याचें सात्वन करून व प्रजापालन हा आपणां क्षत्रियांचा मुख्य धर्म आहे, तो आपण पाळलाच पाहिजे;' असें सांगून व त्यास सात दिवस आपल्यापाशीं ठेवून घेऊन पुनः त्यास मधुरेस आपल्या राज्यावर पाठविलें.

( उत्तर० सर्ग ६७–७२ ).

शत्रुघ्न गेल्यावर एके दिवशीं प्रातःकाळीं एक ब्राह्मण बारा तेरा वर्षांच्या मुलाचें प्रेत घेऊन राजसभेच्या बाहेर येऊन शोक करीत म्हणूं लागलाः—" अहो, आम्ही आईबाप जिवंत असतांना हा आमचा लहान अल्पवयी मुलगा कसा मेला ? मीं कधींही खोटें बोललों अगर अन्य पाप केलें, असें मला आठवत नाहीं. पूर्वजन्मीं कांहीं भयंकर पाप केलें असेल तर तसेंही माझ्या हल्लींच्या स्थितीवरून संभवत नाहीं. तेव्हां हा अनर्थ राजाच्याच दोषामुळें माझ्यावर कोसळला आहे. जें

पातक राजा करतो किंवा राजाच्या अमलाखालीं होतें तें प्रजेला बाधतें. रामचंद्रा, याचा कांहीं विचार कर. नाहींतर मी आपल्या पत्नीसह येथें राजद्वारांत प्राण देतों. '' असा त्या ब्राह्मणाचा आक्रोश ऐकून रामचंद्रांनीं वसिष्ठप्रभृति विद्वान् ब्राह्मणांना व सचिवांना सभेंत बोलावून ब्राह्मणाची सर्व हकीकत त्यांस सांगितली, व माझ्या ठिकाणीं अगर माझ्या राज्यांत पातक होत आहे असें हा ब्राह्मण म्हणतो आहे, तेव्हां ही गोष्ट खरी आहे काय, असा प्रश्न त्यानें सर्व सभासदांस केला. याप्रमाणें रामचंद्रांनीं खिन्न व आतुर वाणीनें केलेला प्रश्न ऐकून नारदांनीं उत्तर दिलें:—'' रामा, हा अनर्थ कां घडला आहे, तें ऐक. पूर्वकाळीं कृतयुगांत फक्त ब्राह्मण तपश्चर्या करीत होते. ब्राह्मणांशिवाय कोणीही तप करीत नसत. त्या युगांत सर्व लोक दीर्घदृष्टि, निरोगी व दीर्घजीवि होते. नंतर त्रेतायुगांत क्षत्रिय तप करूं लागले. वीर्य व तप या दोन्ही गोष्टींनीं क्षत्रिय व ब्राह्मण या युगांत संपन्न झाले. पण अधर्मानें आपला एक पाय या पृथ्वीवर ठेविला. अनृत, हिंसा, असंतोष व विरोध, हे अधर्माचे चार पाय आहेत. त्यांपैकीं त्रेतायुगांत त्याचा एक पाय या पृथ्वीवर पडल्याबरोबर मनुष्याच्या आयुष्याची मर्यादा कमी झाली. पुढें द्वापारांत वैश्यांनींही तपोग्रहण केलें, व ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे तिन्ही वर्ण तप करूं लागले; परंतु अधर्माचा दुसरा पाय ' हिंसा ' पृथ्वीवर पडल्यामुळें आयुष्यमर्यादा आणखी कमी झाली. असो; शूद्रांना तपाचा अधिकार कधींच नाहीं. भावी कलियुगांत ते तप करतील, ही गोष्ट निराळी आहे. या द्वापारयुगात पृथ्वीवर कोठें तरी कोणी शूद्र तपश्चर्या करीत आहे, यामुळें हा अनर्थ ओढवला आहे. त्या शूद्राचा तपास करून त्याचें पारिपत्य कर; म्हणजे हा ब्राह्मणाचा मुलगा जिवंत होईल. '' नारदाचें हें भाषण ऐकून रामचंद्रांनीं लक्ष्मणास त्या ब्राह्मणाचें सांत्वन करण्यास सांगितलें व त्याच्या पुत्राचें शव तेलांत ठेवण्याविषयीं आज्ञा केली. नंतर रामांनीं पुष्पक विमानाचें स्मरण करताच तें विमान हात जोडून पुढें उभें राहिलें. मग श्रीरामचंद्र सर्व ऋषींस नमस्कार करून विमानांत बसले व एकंदर पृथ्वी शोधण्यास निघाले. त्यांनीं पूर्व, उत्तर व पश्चिम या तिन्ही दिशा अनुक्रमें शोधल्या, परंतु तप करणाऱ्या शूद्राचा त्यांस पत्ता लागला

नाहीं. नंतर दक्षिण दिशेस शोध करितां शैवल पर्वताच्या पायथ्याशीं असलेल्या सुंदर सरोवराजवळील, एका वृक्षावर आपणांस उलटा टांगून घेऊन कोणी तपश्चर्या करतो आहे, असें त्यांस दिसलें. तेव्हां लागलेंच विमान थांबवून तूं कोण व कां तप करितो आहेस असा त्यास रामचंद्रांनीं प्रश्न केला; व मी अयोध्येचा राजा रामचंद्र तुला विचारीत आहे, असेंहीं त्यास त्यांनीं बजाविलें. तेव्हां मी शंबूक नावाचा शूद्र स्वर्गप्राप्तीकरितां तप करीत आहे, असें त्यानें सांगतांच रामचंद्रांनीं तावडतोब त्याचें शिर खड्गानें उडवून त्यास शासन केलें. त्या वेळेस स्वर्गातून रामचंद्रावर पुष्पवृष्टि झाली व देवांनीं रामास प्रत्यक्ष दर्शन दिलें. ब्राह्मणाचा मृत पुत्र अयोध्येंत जिवंत झाला आहे, असें सांगून व अगस्त्यांचा आश्रम जवळच आहे तेव्हां त्यांचे दर्शन घेऊन मग अयोध्येस जावें, अशी आज्ञा करून देव अदृश्य झाले. रामचंद्र अगस्त्यांच्या दर्शनास गेले, तेव्हां अगस्त्य मुनींनीं मोठ्या प्रेमानें रामाचें स्वागत केलें, व शंबुकाचें पारिपत्य केल्याबद्दल रामाची तारीफ केली. तपावांचून सिद्धि नाहीं ही गोष्ट जितकी खरी आहे, तितकीच पात्रतेवांचून तप नाहीं, हीही गोष्ट खरी आहे. शंबुकाला मारून ब्राह्मणपुत्राला जिवंत केलेंस, हें महत् कार्य तूं केलें आहेस, असें म्हणून अगस्त्य ऋषींनीं एक दिव्य कंकण रामास दिलें. तें रामचंद्रांनीं भक्तिपुरःसर ग्रहण केलें. हा विस्तीर्ण देश अरण्य कां झाला, हें दिव्य सरोवर कसें उत्पन्न झाले असा रामांनीं प्रश्न विचारल्यावरून अगस्त्य ऋषींनीं दण्डकारण्याची उत्पत्ति रामास सांगितली. मनूचा पुत्र इक्ष्वाकु याजला शंभर पुत्र होते; त्या सर्वांस त्यानें पृथ्वी वांटून दिली. सर्वांत धाकटा पुत्र दण्ड हा अत्यंत उनाड व दांडगा होता, तेव्हां त्यास हा विन्ध्य व शैबल पर्वत यांमधील शंभर योजनें लांब-रुंद देश इक्ष्वाकूनें दिला. दण्डानें एकदां भृगु ऋषींची तरुण कन्या अरजा इजवर बलात्कार केला, तेव्हां भृगु ऋषींनीं या देशावर सात दिवस राखेची वृष्टि होऊन हा देश दण्डासहित नाश पावेल, असा शाप दिला. व आपल्या आश्रमातील लोकांस त्या देशाच्या बाहेर जाऊन वसति करण्यास सांगितलें. भृगूंच्या शापाप्रमाणें हा देश उद्ध्वस्त होऊन अरण्य झाला व यास दण्डकारण्य हें नांव पडलें. लोकांनीं देशाच्या बाहेर जाऊन जेथें वसती केली, तें

जनस्थान झालें. भृगु ऋषींनीं अरजेस तपश्चर्या करण्याकरितां आश्रमांतच ठेवून तेथें सुंदर सरोवर उत्पन्न केलें. याप्रमाणें दण्डकारण्याची हकीगत सांगितल्यानंतर अगस्त्यांनीं रामास त्या रात्रीं आपल्या आश्रमांतच सत्कारानें ठेवून घेतलें. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं रामचंद्र पुष्पक विमानांत बसून अयोध्येस परत आले, आणि त्या ब्राह्मणाचा त्याच्या जिवंत झालेल्या पुत्रासह योग्य सत्कार करून त्यास आपल्या घरीं परत पाठवून दिलें. ( उत्तर० सर्ग ७३-८२ ).

यानंतर रामचंद्रांनीं भरताचा व लक्ष्मणाचा अभिप्राय घेऊन सर्व पापांचें क्षालन करणारा जो अश्वमेध तो करण्याचा निश्चय केला. त्यांनीं चारी दिशांकडून मोठमोठे ऋषि बोलावून आणले. निरनिराळ्या देशांच्या राजांनाही निमंत्रण केलें. किष्किंधेहून सुग्रीव आपल्या वानरासह रामचंद्रांच्या निरोपावरून यज्ञांत मदत करण्याकरितां धांवत आला. तसाच लंकेहून बिभीषण आपल्या राक्षससरदारांस घेऊन आला. शत्रुघ्नही मधुरेहून रामाच्या आज्ञेप्रमाणें ताबडतोब आला. मग भरतशत्रुघ्नांनीं ऋषींच्या मतानें गोमतीच्या कांठीं नैमिषारण्यांत एक विस्तीर्ण यज्ञमंडप तयार केला. राजे लोकांना व ब्राह्मणांना राहावयाकरितां जवळच सुंदर इमारती व पर्णशाला उभारल्या आणि सर्व प्रकारची धान्यादिकांची सामुग्री तेथें सांठविली. याप्रमाणें सर्व तयारी झाल्यावर सुमुहूर्तावर अयोध्येंतून सीतेची सुवर्णाची मूर्ति मोठ्या थाटानें मिरवीत गोमती तीरावरच्या युद्धमंडपांत लक्ष्मणानें नेली व तेथें ऋषींनीं लागलीच रामचंद्रास यज्ञाची दीक्षा दिली. उत्तम लक्षणांनीं युक्त असा याज्ञिय अश्व सोडून त्याजबरोबर सैन्यासह लक्ष्मणाची रवानगी केली. जे जे राजे, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र येत त्यांस योग्य सत्कारानें भरत व शत्रुघ्न उतरवीत व त्यांची व्यवस्था लावीत. यज्ञ सुरू झाल्यापासून ब्राह्मणसंतर्पण सुरू झालें. ब्राह्मणांस जेवूं घालण्याच्या कामावर सुग्रीवाची योजना होती, व ब्राम्हणांस दक्षिणा देण्याचें काम बिभीषणाकडे होतें. सुग्रीवानें जेवण्याची इतकी उत्तम व्यवस्था ठेविली कीं, जो जो पदार्थ कोणी मागे त्यास तो ताबडतोब मिळे; त्याचप्रमाणें कोणी जें जें दान मागत असे, तें तें त्यास बिभीषण देई. सुवर्णाच्या व रत्नांच्या अपरंपार राशी दानाकरितां त्यानें तयार ठेविल्या होत्या. याप्रमाणें दान होऊं लागलें,

तेव्हां आजपर्यंत असें दान कोणत्याच अश्वमेधांत झालें नाहीं, असें सर्व ऋषी म्हणूं लागले. याप्रमाणें तो समारंभ वर्षभर चालला होता. रामाच्या अश्वमेधाची अपूर्व कीर्ति ऐकून वाल्मीकि महर्षि आपल्या शिष्यांसह यज्ञ पाहण्यास आले. तेव्हां भरतानें अत्यंत प्रीतीनें व नम्रतेनें सामोरा जाऊन त्यांस एका सुंदर पर्णशाळेत उतरविलें. वाल्मीकींनीं कुशलवांस बरोबर आणलेंच होतें. त्यांस त्यांनीं ठिकठिकाणीं—राजांच्या प्रासादांत, ऋषींच्या आश्रमांत, बाजारांत, राजद्वारांत—वीणामृदंगादि साहित्यानिशीं रामायण म्हणण्यास आज्ञा केली. जेव्हां ते सुंदर राजपुत्र आपल्या मधुर कंठानें तें अद्भुत काव्य ठिकाठिकाणीं गाऊं लागले, तेव्हां ऐकणारांस मोह उत्पन्न होऊं लागला. हजारों लोक त्या मुलांची तारीफ करूं लागले. त्यांची कीर्ति रामचंद्राच्या कानावर गेली. तेव्हां एके दिवशीं रामचंद्रांनीं त्या मुलास यज्ञमंडपांत बोलावून सर्व ऋषींसमोर तें काव्य गाण्यास आज्ञा केली. त्या दिवशीं त्या मुलांनीं आदिकाण्डाचे २० सर्ग गाऊन दाखविले. ते ऐकून रामचंद्र इतके प्रसन्न झाले कीं, त्यांनीं त्या मुलास अठरा हजार मोहरा देण्याविषयीं भरतास आज्ञा केली. भरत त्यांस तें बक्षीस देऊं लागला, 'तेव्हां आम्ही आश्रमवासी मुलें; आम्हांला सोनें घेऊन काय करावयाचें आहे,' असें म्हणून त्यांनीं तें बक्षीस घेण्याचें नाकारलें. त्या वेळेस सर्व सभेस मोठें कौतुक वाटलें. त्या मुलाचें रूप पाहून तर लोकांस अधिकच आश्चर्य वाटलें. तें केवळ रामचंद्राचें प्रतिबिंबच होतें. मात्र त्याच्या डोक्यावर जटा वाढल्या होत्या, व अंगावर वल्कलें होतीं. ते त्यांचे हुबेहुब रामाच्या तोंडासारखे तोंडावळे पाहून लोक अधिकाधिक मोहांत पडूं लागले; व ते सुंदर मुलगे आपल्या मधुर कंठानें आदि-काव्य जेव्हां प्रत्यक्ष रामाच्या सभेत गात, तेव्हां तर सर्वांची वृत्ति अगदीं तल्लीन व तटस्थ होई! याप्रमाणें यज्ञमंडपांत यज्ञाच्या फुरसतीच्या वेळीं कित्येक दिवस या मुलांचे गाणें झाल्यानंतर, हे आपलेच पुत्र आहेत व सीताही वाल्मीकि महर्षींबरोबर आली आहे, असें जाणून एके दिवशीं कुशल व आचारसंपन्न अशा दूतांस बोलावून रामचंद्र त्यास सर्व सभेंत म्हणाले:— "तुम्ही जाऊन वाल्मीकि महर्षींना हात जोडून माझा असा निरोप सांगा, 'भगवन्, आपली परवानगी असेल तर सीतेनें राजसभेंत येऊन आपल्या

शुद्धतेविषयीं शपथ करावी; म्हणजे मला अत्यंत आनंद होईल.' याजवर वाल्मीकींचा व सीतेचा जो अभिप्राय दिसेल, तो मला येऊन कळवा." त्या दूतांकडून तो रामाचा निरोप ऐकून, "बरें आहे, सीता आपल्या आज्ञे-प्रमाणें उदईक आपल्या सभेंत दिव्य करील; स्त्रियांना पति हेंच दैवत आहे," असा वाल्मीकींनीं जबाब दिला. दुसरे दिवशीं यज्ञमंडपांत सभा जमल्यावर रामांनीं यज्ञास आलेल्या सर्व ऋषींना व लोकांना मुद्दाम बोलावून आणलें. तेव्हां वसिष्ठ, विश्वामित्र, जाबाली, काश्यप, अगस्त्य, दुर्वास, भृगु, मार्कंडेय, पुलस्त्य, मौद्गल, गार्ग्य, च्यवन, शतानंद, भरद्वाज, नारद, पर्वत इत्यादि महान् महान् ऋषी सभेत आले. त्यांस रामांनीं महार्ह आसनांवर बसविलें. तसेंच सर्व राजे, वानर व राक्षसही आपआपल्या ठिकाणीं येऊन बसले. क्षत्रिय, वैश्य, शूद्र, इत्यादि सर्व लोक तें दिव्य पाहण्याकरितां यज्ञमंडपात जमा झाले. आतां पुढें काय होतें, हें पाहण्याच्या उत्सुकतेनें सर्व सभा पाषाणासारखी निश्चल झाली. इतक्यांत वाल्मीकि महर्षि पुढें व हात जोडलेली, डोळ्यांतून अश्रु चालत असलेली व मुख खालीं केलेली सीता मागें, अशीं तीं दोघें सभेच्या मध्यभागीं आलीं. तेव्हां सर्व सभेंतून 'धन्य धन्य' असा ध्वनि एकदम निघाला. रामचंद्राचें व सीतेचें विलक्षण प्रेम व तीं भोगीत असलेलें त्याहूनही विलक्षण दुःख यांची प्रतिमा, त्या दोघांकडे पाहून प्रत्येकाच्या अंतःकरणांत उभी राहिली. प्रत्येकाच्या नेत्रांवाटे अश्रुधारा सुरू झाल्या व कोणी 'धन्य राजा रामचंद्र' व कोणीं 'धन्य सीताबाई' असे उद्गार काढले. कांहीं वेळानें सर्व सभा शांत झाल्यावर सभेच्या मध्यें उभे राहून वाल्मीकि म्हणाले:—"दाशरथे रामचंद्रा, ही तुझी पतिव्रता व धर्मशील पत्नी सीता लोकापवादामुळें तूं अरण्यांत टाकलीस; तेव्हांपासून ती माझ्या आश्रमांत आहे. ही तुझ्या समाधाना-करितां आज दिव्य करून दाखविणार आहे. हे सीतेचे दोघे पुत्र तुझेच आहेत. मी प्रचेतसाचा आठवा पुत्र आहे. मी आजपर्यंत कधींही खोटें बोललों नाहीं. विदेह राजाची ही कन्या सर्वथैव निष्पाप व शुद्ध आहे, हें मी सत्य सांगतों आहे. हें खोटें असेल तर माझी आज हजारों वर्षें केलेली तपश्चर्या निष्फल होईल. सीताही आपण निष्पाप असल्याबद्दल अशीच तुझी आणखी खात्री करून देईल." हें वाल्मीकींचें भाषण

ऐकून रामचंद्र हात जोडून म्हणाले:-" सीतेनें अग्नीचें दिव्य एकदां केलें, व सर्व देवांनीं ती निष्पाप असल्याबद्दल माझी खात्री केली; आणि म्हणूनच मीं तिचा स्वीकार करून तिला अयोध्येस घेऊन आलों. परंतु येथें तिच्याविषयीं लोकापवाद सुरू झाला; म्हणून सीता निष्पाप आहे असें जाणत असूनही मीं तिला टाकिलें याजबद्दल आपण मला क्षमा करा. हे दोघे पुत्र माझे आहेत हें मला ठाऊक आहे. आतां या सर्व लोकांच्या खातरीकरितां सीतेनें पुनः दिव्य करावें. सर्व लोकांसमक्ष सीता शुद्ध झाली, म्हणजे मला तिच्याविषयीं अत्यंत प्रीति वाटेल. " याप्रमाणें रामचंद्राचा अभिप्राय पाहून सीता पुढें झाली. त्या वेळीं तिनें तपस्वी जनांच्या वेषाला योग्य असें भगवें वस्त्र धारण केलें होतें. ती अगोदर जात्याच कृश, तशांत शोकानें अधिकच कृश झाली होती. तिची दृष्टि सारखी जमिनीवर लागली होती. तिनें हात जोडून मोठ्यानें म्हटलें:- " जर आजपर्यंत रघुनाथाशिवाय दुसऱ्या कोणत्याही पुरुषास मनांतसुद्धां मीं आणलें नसेल, तर धरणीमाते, मला पोटांत घेशील. जर मनानें, कर्मानें व शब्दानें आजपर्यंत रामचंद्रावरच मीं प्रेम केलें असेल तर धरणीमाते, मला पोटांत घेशील. मला रामचंद्रावांचून दुसरा कोणताही मनुष्य माहीत नाहीं, हें जर अक्षरशः सत्य असेल तर धरणीमाते, मला पोटांत घेशील. " अशी त्रिवार शपथ सीतेनें घेतांच पृथ्वी एकदम दुभंगली आणि आंतून एक दिव्य सिंहासन बाहेर आलें. त्या रत्नखचित सिंहासनावर प्रत्यक्ष भूदेवी बसली होती. तिनें आपल्या हातानें आपल्या प्रिय कन्येस सिंहासनावर घेतलें, व हजारों लोक पाहत असतां तें सिंहासन पृथ्वीच्या पोटांत गडप झालें ! तो चमत्कार पहात असतांना सर्व लोक जागच्याजागीं मोहित झाले होते ! मुनि, राजे, वानर, राक्षस, विस्मयानें सीतेकडे पाहत होते. एक क्षणभर ती सभा चित्रासारखी तटस्थ होती. कांहीं वेळानें शुद्धीवर येऊन सीता पृथ्वीच्या पोटांत नाहींशी झाली, हें जाणून " धन्य धन्य ! " असा सर्व वानरांनीं उद्गार काढला; व तो उद्गार ऋषींनींही काढला, तो रामचंद्राच्या कानांवर पडला. रामचंद्राचेही देहभान नाहींसें झालें होतें. त्या ' धन्य ' शब्दानें ते शुद्धीवर येऊन डोकें खालीं घालून दीन मनानें अश्रु गाळीत दुःखसमुद्रांत मग्न झाले. बराच वेळ

याप्रमाणें गेल्यावर क्रोधाचा व शोकाचा वेग दुःसह होऊन ते म्हणाले:— " आजपर्यंत कधींही अनुभवला नाहीं, असा दुःखाचा वेग या वेळेस माझ्या मनाला वाहून नेऊं पाहत आहे. माझ्या समक्ष मी पाहतां पाहतां माझी प्रत्यक्ष लक्ष्मी अशी प्रिय पत्नी नाहींशी झाली. पूर्वी अशीच सीता नाहींशी होऊन रावणानें समुद्राच्या पार लंकेंत तिला दडवून ठेवलें होतें; तेथूनसुद्धां मीं तिला आणिलें. मग पृथ्वीच्या पोटांतून तिला वर आणणें काय कठीण आहे ! " असें म्हणतांना रामचंद्राचे नेत्र क्रोधानें लाल झाले व देहभान विसरून ते म्हणाले:—" देवी वसुधे, माझी सीता मला परत दे; नाहीं तर माझा सर्व राग मी तुझ्यावर काढीन. आई वसुधे, माझी सीता मला परत द्यावी, अथवा मला तरी आपल्या पोटांत घ्यावें. तिच्या सहवासांत मला पाताळांत सुद्धां स्वर्गलोकाप्रमाणें सुख होईल. पृथ्वीमाते, माझी सीता मला परत न देशील तर नदी, पर्वत, समुद्र यांसह मी आपल्या बाणानीं तुझा उच्छेद करून टाकीन. सर्व पृथ्वीचा नाश करून सर्वत्र जलमय करीन." असें म्हणून रामचंद्र धनुष्यबाण घेण्याकरितां उठले. तेव्हां सर्व ऋषींनीं व देवांनीं रामचंद्राचा कोप शांत केला. "जें झालें तें कां झालें, हे तुम्हास सर्व माहीतच आहे. तुम्ही कोण आहां, याचा विचार करा, " असें सांगून त्यानीं रामाचें समाधान केलें, तेव्हां रामचंद्रांनीं सभा बरखास्त करवून व दीन मनानें आपल्या पर्णशाळेंत जाऊन आपणांस कोंडून घेतलें, व तो सगळा दिवस व ती सर्व रात्र सीतादेवीच्या त्या अत्यद्भुत दिव्याचें ध्यान करून काढली. दुसरे दिवशीं रामचंद्राची प्रकृति पूर्वीप्रमाणे शांत होऊन ते यज्ञमंडपांत आले व राजांस बोलावून आपल्या पुत्रांस भविष्यरामायण म्हणजे यापुढील होणारी सर्व हकीकत वाल्मीकि महर्षींनीं जशी वर्तविली होती, तशी निःशंक मनानें गाण्यास आज्ञा केली. ती भविष्यकथा येणेप्रमाणें:—

(उत्तर० सर्ग ८३–९८).

यज्ञ संपल्यानंतर महर्षींनीं, राजांना, सुग्रीवासहित वानरांना व बिभीषणासहित राक्षसांना सत्कारपूर्वक रामचंद्रानीं निरोप देऊन आपआपल्या घरीं रवाना केलें. सीतेच्या विरहानें होणारें दुःख रामांनीं आपल्या दोघां मुलांकडे पाहून कमी केलें, व आपला सर्व वेळ प्रजेचें कार्य पाहण्यांत

व प्रजेचें कल्याण साधण्यांत त्यांनीं घालविला. याप्रमाणें हजारों वर्षें गेलीं. रामराज्यांत प्रजा अतिशय सुखाचा अनुभव घेत होती. पर्जन्य योग्य वेळीं पडून लोक धनधान्यानें संपन्न होते. अकालीं कोणी मरत नव्हते; किंवा कोणी स्त्री विधवा होत नव्हती. रामचंद्रांनीं अनेक वाजपेय, अग्निष्टोम, अतिरात्र वगैरे यज्ञ केले. त्या सर्व यज्ञांत सीतेची सुवर्णमय मूर्ति पत्नीच्या ठिकाणीं ठेविली जात होती. कारण रामचंद्रांनीं दुसरी भार्या केलीच नाहीं. कांहीं वर्षांनंतर राजमाता कौसल्या स्वर्गवासी झाली; तेव्हां रामांनीं अनेक प्रकारचा धर्म केला. कौसल्येच्या मागें सुमित्रा, कैकेयी याही निवर्तल्या; व त्यांचीं श्राद्धें वगैरे कृत्यें राजा रामचंद्रांनीं आपल्या वैभवानुसार केलीं. याप्रमाणें कित्येक वर्षें लोटल्यावर भरताचा मामा युधाजित् यानें आपल्या गार्ग्य गुरूंस रामचंद्राकडे घोडे, हत्ती, रत्नें इत्यादि नजराणा देऊन पाठविलें; आणि कळविलें कीं, " सिंधुनदीच्या दोन्ही काठचा प्रदेश गंधर्व बळकावून बसले आहेत, तो जर तुम्ही जिंकाल तर फार उत्तम होईल. तुमच्याशिवाय हें दुष्कर कर्म दुसऱ्यास साध्य नाहीं." रामचंद्रांनीं गार्ग्य गुरूंस सामोरे जाऊन सन्मानानें अयोध्येस आणिलें आणि युधाजिताचा निरोप ऐकून लागलीच भरतास सैन्यासह जाऊन तो देश जिंकण्याविषयीं आज्ञा केली; व हेंही सांगितलें कीं, 'आपल्या तक्ष व पुष्कल या दोघां पुत्रांत तो देश वांटून देऊन त्यांना राजधानीसाठीं नवीन शहरें वसवूस द्यावीं आणि मग परत यावें.' रामचंद्रांनीं लागलाच त्या दोघां पुतण्यांस राज्याभिषिक करविला; व भरताबरोबर मोठ्या सैन्यानिशीं त्यांसही पाठविलें. दीड महिन्यानें कैकेय नगरास पोंचून व आपल्या मामास बरोबर घेऊन त्यानें गंधर्वांवर स्वारी केली; व त्याचा पराभव करून तो देश सोडविला. सिंधूच्या पूर्वेकडील देशांत तक्षाला राज्य देऊन तक्षशिला नगरी वसवून त्यांस दिली, व पश्चिमेकडील देशांत पुष्कलावती नगरी स्थापून तेथील राज्य पुष्कलास दिलें. याप्रमाणें व्यवस्था लावून भरत पुन: अयोध्येस आला; तेव्हां रामास मोठा आनंद झाला. रामांनीं लक्ष्मणाचे दोघे मुलगे अंगद व चंद्रसेन यांच्याकरितां वायव्येकडील कारुपथ देशांत व मलदभूमींत अंगदिया व चंद्रकांता हीं दोन शहरें स्थापन करून त्यांस तेथील राज्य दिलें. लक्ष्मण व भरत हे दोघे त्यांजबरोबर गेले व त्या दोघां राजपुत्रांस नवीन राज्यावर स्थिर करून

ते अयोध्येस परत आले. शत्रुघ्नाला यापूर्वीच रामानें मधुरेचें राज्य दिलें होतें. याप्रमाणें आपल्या बंधूंच्या मुलांना नविन राज्यें संपादून देऊन रामचंद्रांनीं सुखी केलें. ( उत्तर० सर्ग ९९—१०२ ).

एके दिवशीं सर्व जगाचा संहार करणारा प्रत्यक्ष काळ मुनीचा वेष घेऊन रामचंद्राच्या भेटीस आला. ब्रह्मदेवाचा कोणी अत्यंत तेजस्वी दूत आला आहे, अशी वर्दी पोहोंचताच रामचंद्रानें त्यास मोठ्या सत्कारानें बोलावून उत्तम आसनावर बसविलें; आणि ब्रह्मदेवाची काय आज्ञा आहे, म्हणून प्रश्न केला. तेव्हां तुम्ही व मी यांशिवाय तिसरें कोणी आपलें भाषण ऐकतां कामा नये, ऐकल्यास त्यास देहान्त प्रायश्चित्त व्हावें, अशी त्या मुनीनें विनंति केली. तेव्हां रामचंद्रांनीं लक्ष्मणास तशी आज्ञा देऊन त्यास दरवाजावर बसविलें. काळानें "आपण विष्णूचे अवतार आहां; ज्या कार्याकरितां आपण अवतार धारण केला तें झालें. तर आतां देव आपली वाट पहात आहेत, आपण लवकर निघून यावें; अथवा प्रजेची आणखी सेवा करणें असल्यास आणखी रहावें," असा ब्रह्मदेवाचा निरोप रामास कळविला. तेव्हां रामचंद्रांनीं 'ठीक आहे' म्हणोन जबाब दिला. इतक्यांत बाहेर दुर्वास ऋषि आले व लक्ष्मणास म्हणाले:—"मला रामचंद्राची आतांच भेट घेणें आहे, ताबडतोब भेट करीव." लक्ष्मण आढेवेढे घेऊं लागला, तेव्हां दुर्वास ऋषि क्रोधानें लाल होऊन म्हणाले:—"विलंब करशील तर तुला, भरताला, रामचंद्राला किंबहुना सर्व राज्याला शाप देईन. माझा क्रोध या वेळेस आवरत नाहीं." असे त्यांचें भाषण ऐकून लक्ष्मणावर कठिण प्रसंग गुदरला. शेवटीं सर्वांवर आपत्ति येण्यापेक्षां आपल्या एकट्यावर आलेली पत्करली, असा निश्चय करून लक्ष्मण आंत गेला व दुर्वास ऋषि आपणांस आतांच भेटूं इच्छितात, अशी त्यानें रामास विनंति केली. रामानें मुनिवेष धारण केलेल्या काळास लागलाच निरोप देऊन दुर्वास ऋषींची भेट घेतली व हात जोडून आपली काय इच्छा आहे, असें विचारलें. तेव्हां आज सहस्र वर्षें तप करून मी उठलों आहे, मला भूक लागली आहे; जें सिद्ध अन्न असेल तें द्यावें; असें त्यांनीं म्हणतांच रामचंद्रांनीं दुर्वास ऋषींस प्रेमानें व अत्यादरानें यथेच्छ उत्तम भोजन घातलें, व दुर्वास ऋषि त्यास आशीर्वाद देऊन निघून गेले.

दुर्वास ऋषि जातांच रामचंद्राचा आनंद एकदम नाहींसा झाला. आपण प्रतिज्ञा केल्याप्रमाणें लक्ष्मणास देहान्त शासन कसें द्यावें, या कल्पनेनें त्यांचें चित्त एकदम दुःखानें भरून गेले व तोंड खालीं करून नेत्रावाटे अश्रु ढाळीत कांहीं वेळ स्तब्ध बसले. लक्ष्मणानें रामचंद्राच्या मनाची स्थिति तावडतोब ताडिली, व तो हात जोडून म्हणालाः—" महाराज, जी आपण प्रतिज्ञा केली आहे ती पाळलीच पाहिजे. माझा आपण निःशंक मनानें शिरच्छेद करावा. हा पुढचा प्रसंग लक्षांत घेऊन मी आपल्या एकांतांत आलों. आतां मला कोणतीही इच्छा या जगांत उरली नाहीं. आपल्या हातून मला मरण येईल तर माझें भाग्यच होय. आपण यत्किंचितही दुःख करूं नका. " परंतु रामचंद्रांनीं सर्व प्रधानांस व वसिष्ठ महर्षीस बोलावून त्यांच्यापुढें सर्व हकीकत मांडिली, आणि ' आतां मीं काय करावें, ' असा त्यास प्रश्न केला. तेव्हां वसिष्ठ ऋषि म्हणालेः—" रामा, लक्ष्मणाचा त्याग तूं करावा हेंच उचित आहे. याचा त्याग करून तूं आपली तापसाच्या समक्ष केलेली प्रतिज्ञा पालन कर. कारण प्रतिज्ञा नष्ट झाली तर धर्म नष्ट होईल; आणि धर्म नष्ट झाला असतां सर्व प्रजेचें अकल्याण होईल. याकरिता लक्ष्मणाचा त्याग करून तूं धर्माचें प्रतिपालन कर. " ही वसिष्ठांची सल्ला ऐकून सर्व सभेमध्यें रामचंद्र म्हणालेः—" लक्ष्मणा, धर्मरक्षणाकरितां मी तुझा त्याग करितों. सज्जनास त्याग हा वधासारखा आहे. अशी आज्ञा होतांच लक्ष्मण रामचंद्रास नमस्कार करून सभेच्या बाहेर पडला; तो घरीं गेला नाहीं. शरयू नदीवर त्याने स्नान केलें आणि शुचिर्भूत होऊन दर्भासनावर बसून त्याने श्वास कोंडून धरिला; व याप्रमाणें प्रायोपवेशनानें आपला देह सोडला.

आपल्यास कितीही दुःख झालें तरी धर्माकरितां प्राणाहूनही प्रिय वस्तूंचा त्याग केला पाहिजे, हें रामचारित्राचें सर्वांत उदात्त सार होय. या तत्त्वाप्रमाणें त्यांनीं पूर्वीं सीतेचा त्याग केला; व आतां लक्ष्मणाचाही त्याग केला. लक्ष्मणाचा त्याग केल्यावर दुःखानें आर्त होऊन वसिष्ठ महर्षीस, सर्व प्रधानांस व इतर सभ्यांस रामचंद्र म्हणालेः—" आजच भरतास मी अयोध्येंत राज्याभिषेक करवितों आणि मी वनवासास जातों. ज्या गतीला लक्ष्मण गेला तीच गति मला आदरल्यावांचून रहावत नाहीं.

तर ताबडतोब भरताच्या अभिषेकाची तयारी करा; विलंब करूं नका. मी आजच महाप्रस्थानास जाणार." असे त्यांचे दुःखोद्गार ऐकून भरत व सर्व प्रजाजन शोकानें ग्रस्त होऊन गेले; व सर्वांनीं एकदम रामचंद्रास साष्टांग नमस्कार घातला. भरतानें शपथ घेऊन म्हटलें:–रामा, मला राज्य करण्याची मुळींच इच्छा नाहीं. मला आपल्याबरोबर घेऊन चलावें. या कोसल देशांत कुशाला राजा करून उत्तर कोसलांत लवाला राज्य द्यावें." सर्व प्रधानांनींही हात जोडून तीच प्रार्थना केली; व रामाबरोबर स्वर्गास चलण्याचा हट्ट धरिला. वसिष्ठ महर्षींनींही त्यांचीच बाजू धरिली. सर्व प्रजाजनांनीं हात जोडून रामास म्हटलें:–" रामचंद्रा, आमच्यावर जर आपली प्रीति असेल तर आम्हांस आपल्याबरोबर घेऊन चला." याप्रमाणें सर्वांचें प्रेमातिशयाचें व दुःखाचें भाषण ऐकून रामचंद्रासही 'नाहीं' म्हणवेना. मला लागलेच दक्षिणकोसलांत कुशावती नगरींत कुशास व उत्तरकोसलांत श्रावस्ती येथें लवास राज्य देऊन दोघांसही ताबडतोब राज्याभिषेक करविला व त्या प्रत्येकास हजारों रथ, हत्ती, घोडे, धन व रत्नें दिलीं; आणि दासदासी, मनुष्यें व सैन्य तैनातीस देऊन त्यांना आपआपल्या राजधानीस रवाना केलें. नंतर शत्रुघ्नास बोलाविण्याकरितां दूत मधुरेस पाठविले; त्यांनीं तीन दिवसांत मधुरा गांठून शत्रुघ्नास सर्व हकीकत कळविली. तोही ती कुलक्षयाची घोर बातमी ऐकून अत्यंत खिन्न झाला. त्यानें आपल्या दोघां पुत्रांत राज्य वांटून सुबाहूस मधुरा दिली व शत्रुघातीला वैदिश नगरी दिली. त्याचप्रमाणें संपत्ति, नोकर-माणसें वगैरे सर्व त्या दोघां मुलांस वांटून देऊन, शत्रुघ्न एकटाच रथांत बसून अयोध्येस आला व रामाचें दर्शन घेऊन "आपल्याबरोबर मला घेऊन जावें, यांत यत्किंचितही अंतर करूं नये." अशी त्यानें रामास शपथ घातली. तेव्हां त्याची निष्ठा पाहून त्यासही रामचंद्रांनीं 'ठीक आहे' म्हणोन उत्तर दिले. इतक्यांत हजारों वानर, ऋक्ष व राक्षस तेथें येऊन पोंचले. सुग्रीवानें हात जोडून विनंति केली:–" आपण स्वर्गास जातां, हें ऐकतांच अंगदाला राज्याभिषेक करून मी आपल्याबरोबर जाण्याच्या निश्चयानें आलों आहे, मला बरोबर घेऊन चलावें." सुग्रीवाप्रमाणें इतरांनीं विनंति केली, व आमची विनंति मान्य न कराल तर आम्हांस मृत्यूचीच

शिक्षा दिल्याप्रमाणें होईल, असा आग्रह धरिला. तेव्हां रामांनीं सर्वांचें म्हणणें कबूल केलें. बिभिषणाला मात्र म्हटलें कीं, " जोंपर्यंत सूर्यचंद्र आहेत तोंपर्यंत तुम्ही लंकेचें राज्य करा. " तसेच हनुमानासही " जोंपर्यंत रामकथा या जगात प्रचलित आहे, तोपर्यंत तुझी जिवंत राहण्याची इच्छा आहे, त्याप्रमाणें मागें रहावें, " म्हणोन आज्ञा केली. जांबवानास " कलि लागेपर्यंत रहावें, " असें सांगितलें. बाकी सर्वांस आपणाबरोबर चलावें म्हणून परवानगी दिली.

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं वसिष्ठ महर्षींस अग्निहोत्र पुढें घेऊन वाजपेयाच्या छत्रासह निघण्याविषयीं रामांनीं विनंति करितांच ते देदीप्यमान् अग्नि व यज्ञछत्र घेऊन पुढें निघाले. मागून रामचंद्र महाप्रस्तानाचा विधि करून, घरांतून बाहेर पडून मुखावाटे अक्षर न काढतां शरयू तीराकडे चालले. त्याच्या सभोंवतीं दिव्य अस्त्रें, वेद व गायत्री मनुष्यरूप धारण करून चाललीं होतीं. मागून अंतःपुरांतील सर्व स्त्रीबालपरिजनांसह यत्किंचित् मनुष्य निघालें. त्याच्या मागें आपआपल्या अंतःपुरासह भरत व शत्रुघ्न, त्यांच्या पाठीमागे सर्व मंत्री, प्रधान वगैरे, त्यांच्या मागें पुत्रदारादिकांसहित सर्व पौरजन, त्यांच्या मागून सर्व वानर, ऋक्ष व राक्षस, याप्रमाणें लाखों जनांचा समूह निघाला. सर्वांच्या हृदयात अवर्णनीय आनंद व उत्साह भरला होता; व ते सर्व स्वेच्छेनें देह टाकण्यास तयार झाले होते. किंबहुना रामाचें महाप्रस्थान पाहण्याकरितां जे जे बाहेरगांवचे लोक आले, तेही ह्या समूहांत आनंदानें मिसळून गेले. फार काय, पशुपक्षीही अयोध्येंतून बाहेर पडून रामाच्या मागें चालले. अयोध्येत जितका सजीव प्राणी होता, तितका बाहेर निघाला. केवळ घरें मात्र तेथें बाकी राहिलीं. दीड योजन गेल्यावर जेथे शरयू पश्चिमवाहिनी झाली आहे, त्या तीर्थावर रामचंद्र येऊन पोंचले. तेव्हा त्या प्रचंड जनसमूहावर आकाशांतून पुष्पवृष्टि होऊं लागली; लाखों दिव्य विमानें आकाशांत दिसूं लागलीं; उत्तम सुगंधि वायु वाहूं लागला. श्रीरामचंद्रांनीं शरयूंत स्नान करितांच ते दिव्य वैष्णवतनूंत मिसळून गेले. त्याप्रमाणें भरतशत्रुघ्नही वैष्णवतनूंत मिळाले. नंतर जो जो शरयूंत स्नान करी, तो तो दिव्य देह धारण करून विमानांत बसून स्वर्गलोकीं जाई. त्या लाखों लोकांकरितां ' संतानार्क ' नांवाचा

निराळाच स्वर्ग ब्रह्मदेवानें उत्पन्न केला. याप्रमाणें असंख्य जीव रामाच्या भक्तीनें त्या तीर्थावर स्नान करून मुक्तीस गेले. अशा रीतीनें श्रीरामचंद्रांनीं आपल्याच अमर्याद प्रीतीनें अयोध्येंतील यच्चयावत् प्राण्यांस उत्तम लोकास पोंचविल्यावर, अयोध्या नगरी शेंकडों वर्षें शून्य राहिली, ती पुनः ऋषभ राजाच्या कारकीर्दीत वसली गेली.

( उत्तर सर्ग १०२. )

समाप्त.

# उपसंहार



वाल्मीकीनें वर्णिलेलें श्रीरामचंद्राचें उदात्त चरित्र वाचून कोणत्या भारतवासीयास प्रेम, आल्हाद व आदर वाटत नाहीं ! आपल्या आर्य-भूमीच्या वैभवाचें व नीतीचें शिखररूप झालेल्या या काळाचें चित्र मनांत उभें राहून कोणत्या आर्याचें हृदय उचंबळून येत नाहीं ! आपल्या देशाचा प्राचीन इतिहास फारच थोडा उपलब्ध आहे हें खरें, पण अशा अंधकारमय आपल्या प्राचीन काळांत श्रीरामचंद्राचा काळ शरदृतूंतील पौर्णिमेच्या रात्रीप्रमाणें शुभ्र व आल्हादकारक अशा प्रकाशानें भरलेला दिसत आहे. या काळीं श्रीरामचंद्राची मोहक मूर्ति पूर्णचंद्राप्रमाणें भव्यवर्ति दिसत असून, श्रीरामचंद्रापासून क्षणभरही अन्यत्र न राहणारी जानकी चंद्राच्या ज्योत्स्नेप्रमाणें आपल्या पतीबरोबर शोभत आहे. तेजस्वी व शीघ्रकोपी लक्ष्मण मंगळाच्या ताऱ्याप्रमाणें लाल प्रकाशानें भासत आहे व शांत व प्रेमळ भरत गुरूच्या ताऱ्याप्रमाणें शुभ्र व कोमल तेजानें शोभत आहे. वसिष्ठ—विश्वामित्र,दशरथ—जनक, भरद्वाज—अगस्त्य, कौसल्या—अनसूया इत्यादि अनेक वंद्य स्त्रीपुरुषांच्या विभूति स्वतःच्या तेजानें चमकणाऱ्या ताऱ्याप्रमाणें याच काळीं चमकत आहेत. अशा या उत्कृष्ट काळाबद्दल आम्हां भारतवासी आर्यांस सानंद अभिमान वाटावा, यांत नवल कोणतें ! अशा या काळाचें प्रत्येकाच्या मनापुढें उभें राहणारें चित्र शब्दरूपी रेघांनीं या उपसंहारांत रेखाटून ठेवल्यास या ग्रंथाची पूर्तता होईल हें निराळें सांगणें नको.

त्या वेळचा आपला आर्यदेश म्हटला म्हणजे सिंधुनदापासून पूर्वेस गण्डकी पलीकडेपर्यंत व हिमालयापासून दक्षिणेस प्रयागापर्यंत असून या देशांत कोसल, विदेह इत्यादि अनेक आर्यांचीं राज्यें नांदत होतीं. या प्रदेशांत सिंधु, वितस्ता ( जेलम ),विपाशा ( बियास ), शतद्रु ( सतलज ) वगैरे पश्चिमवाहिनी नद्या असून यमुना, गंगा, शरयू, गण्डकी वगैरे पूर्ववाहिनी नद्या होत्या व मध्यें सरस्वती नदी दक्षिणेकडील कुरुक्षेत्रांतून वाहत होती. या नद्यांतून हिमालयांतील बर्फाचें झालेलें थंड व गोड

पाणी वाहत होतें. सर्वांत गंगा नदी विशाळ असून तिचें जल अत्यंत शीतल, मधुर, स्वच्छ व पाचक असें होतें; व तिच्याविषयीं लोकांत इतका पूज्यभाव होता कीं, तिला स्वर्णदी अथवा स्वर्गांतील नदी ही संज्ञा मिळाली होती. या प्रदेशाची जमीन सपाट असून अत्यंत सुपीक होती. व येथील हवा निरोगी, सशक्त व समशीतोष्ण अशी होती. यामुळें व या प्रदेशांतील राज्यांची व्यवस्था चांगली असल्यामुळें येथील लोक सुखी व आनंदांत होते. श्रीरामचंद्र वनवासास चालले तेव्हां कोसलदेशांतील हृष्टपुष्ट जनांनीं भरलेला जनपद पाहून त्यांस समाधान वाटलें. गांवळ्यांतील लोक हृष्ट व पुष्ट असणें यासारखें देशाच्या सुस्थितीचें दुसरें लक्षण कोणतें ! रामचंद्राच्या रथाला गाईंच्या कळपांनीं वारंवार अडथळा होई असेंही वाल्मीकीनें खुबीनें वर्णन केलें आहे. त्याजवरून त्याच वेळेस गांवळ्यांतून हजारों गाईंचे कळप असून त्या गाई लोकांस विपुल दूधदुभतें देत व शेतीकरितां शेंकडों बैल देत, असें स्पष्ट दिसतें. याप्रमाणें आर्यांच्या या लहान लहान राज्यांतील वैश्यादि सामान्य लोक गोधनानें व धान्यादि संपत्तीनें युक्त असून पूर्ण सुखाचा अनुभव घेत होते.

कोणत्याही देशांतील सामान्य जनसमूहाची सुस्थिति वरिष्ठ वर्गाच्या कर्तबगारीवर व नीतिमत्तेवर अवलंबून असते हें उघड आहे. या वेळचे वरिष्ठ वर्ण म्हणजे ब्राह्मण व क्षत्रिय हे आपआपल्या कर्तव्यांत दक्ष व तेजस्वी होते हें साहजिकच निष्पन्न होतें. आर्यांचें तेज व नीतिमत्ता या वेळेस दोन्ही वर्णांच्या लोकांत पूर्णपणें दिसून येत होती. आर्य लोक अनार्यांपेक्षां मजबूत, सुस्वरूप व सुधारलेले होते हें जसें खरें आहे, तसेंच ते त्यांच्याहून नीतिमत्तेंतही अधिक होते असें दिसतें. किंबहुना आपल्या उच्च नीतिमत्तेस अनुलक्षून ते आपणांस आर्य म्हणवून घेत असत. आर्य या शब्दांत सर्व उच्च कल्पना व उदात्त आचरण यांचा त्यांनीं समावेश केला होता. अमुक एक गोष्ट वाईट म्हणजे ती ‘ अनार्यजुष्ट ’ “ आर्यांनीं आदरलेली नव्हे ” असें म्हणण्याचा सांप्रदाय त्या वेळेस पडला होता. सारांश, आर्य लोकांचें आर्यत्व त्यांच्या उदात्त नीतिमत्तेमुळें आहे अशी लोकांची समजूत असे; व त्या समजुतीप्रमाणें ब्राह्मण व क्षत्रिय आपलें आचरण शुद्ध व उच्च ठेवण्याविषयीं खबरदारी घेत. अशा प्रकारचा वरिष्ठ वर्ग ज्या समाजांत आहे, तेथें सुख व आनंद का नांदणार नाहीं !

प्रथम आपण ब्राह्मणांची स्थिति पाहूं. ब्राह्मणांचें मुख्य कर्तव्य म्हटलें म्हणजे स्वतः विद्या शिकणें व दुसऱ्यास शिकविणें, स्वतः यज्ञयागादि करणें व दुसऱ्यांकडून करविणें, हें होय. ह्या कर्तव्यांत त्या वेळचे ब्राह्मण मग्न व तत्पर होते. स्वतः शिकणें व दुसऱ्यास शिकविणें हाच आपल्या आयुष्याचा मुख्य उद्देश त्यांनीं आपल्यापुढें ठेविला होता. हें काम उत्तम रीतीनें करतां यावें म्हणून ब्राह्मण बहुधा शहरांत रहात नसत, तर ते शहाराजवळ किंवा अरण्यांत आश्रम बांधून तेथें रहात. वसिष्ठांचा आश्रम अयोध्येजवळ बाहेर होता. वाल्मीकि, तमसा व गंगा यांच्या संगमावर रहात, भरद्वाज प्रयागास रहात, विश्वामित्र गंगेच्या पलीकडे सिद्धाश्रमांत रहात व जनकाचे उपाध्याय गौतम मिथिलेजवळच्या एका सुंदर वनांत रहात होते. याप्रमाणें ब्राह्मण निर्भय जागींच आश्रम बांधून रहात नसत तर मोठमोठाल्या भयंकर अरण्यांतही रहात. दण्डकारण्यात ठिकठिकाणीं आश्रम बांधून अनेक ऋषि राहिले होते. अत्रि, सुचक्षू, अगस्त्य इत्यादि ऋषींचे आश्रम या भयंकर अरण्यांत होते, व ते कधीं स्वतःच्या रक्षणाकरितां शस्त्रही धारण करीत. परंतु ब्राह्मणांचें मुख्य कर्तव्य जें विद्यार्जन व विद्यादान तें करण्यास हेही ब्राह्मण कधीं विसरले नाहींत.

त्यावेळच्या या विद्यालयांचें वर्णन वाचलें म्हणजे आनंद झाल्यावांचून राहात नाहीं. हे आश्रम बहुधा शहराच्या वर्दळीपासून दूर एखाद्या रम्य नदीच्या कांठीं शांत व रमणीय स्थळीं असत. आश्रमाच्या भोंवतीं सुंदर बागबगीचे व शेतवाड्या असत. कारण आश्रमांत राहणारे ऋषी व विद्यार्थी आपला अल्प चरितार्थ बहुधा आपल्या उद्योगानेंच चालवीत. विद्यार्थी रानांतून लांकडें तोडून आणून त्यांचा आश्रमाजवळ संचय करीत. तसेंच ते वनांतून कंदमूळें व फळें हीं घेऊन येत. यामुळें विद्यार्थ्यांवर विद्याभ्यासाचा भार एकसारखा न पडतां अरण्यांतून व वनांतून फिरण्याचें व इतर शारीरिक श्रम करण्याचें काम त्यांस पडे. ऋषींच्या आश्रमाच्या आंत शांत व रमणीय असा नेहमीं देखावा असे व तेथें सुंदर पक्षी व मृग आनंदानें इतके तिकडे फिरत. इंद्र, वरुण, यम इत्यादि वैदिक देवतांचीं आयतनें आश्रमांत असत व अग्नीची होमशाळाही असे. विद्यार्थ्यांच्या राहणाऱ्या जागाही आश्रमांत निराळ्या असत. अशा प्रकारच्या शांत व निर्वैर जागेंत

विद्यार्थ्यांचें शिकणें निराबाध चाले, तेव्हां संसाराच्या दुःखाचें किंवा मोहाचें त्यांस वारेंसुद्धां लागत नसे यामुळें अशा आश्रमांत ऋष्यशृंगासारखे तेजस्वी व पुण्यशील विद्यार्थी तयार होत यांत नवल काय ?

या आश्रमांतील शाळांतून विद्या शिकण्यास ब्राह्मणच येत होते असें नाहीं. तिन्ही वर्णांचे विद्यार्थी विद्या शिकण्यास येत व त्यांत धार्मिक शिक्षणाशिवाय आपआपल्या कर्तव्यास योग्य असें निराळें शिक्षणही ब्राह्मणच देत. तिन्ही वर्णांना शिकविण्याची जबाबदारी ब्राह्मणांनीं आपल्या शिरावर घेतली होती. साहाजिकच ब्राह्मणांच्या चरितार्थाची थोडीबहुत काळजी इतर वर्ण वाहत असत. आश्रमांतून राहणारे ऋषि आपल्या चरितार्थासंबंधानें दुसऱ्यावर अवलंबून नसत, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. तथापि प्रसंगविशेषीं राजेलोक त्यांस देणग्या देत, श्रीरामचंद्रांनीं वनवासास जातेवेळीं आपलें वित्त ब्राह्मणांस वाटतांना म्हटलें, " लक्ष्मणा, ब्राह्मण स्वाध्यायनिरत असल्यानें आपल्या चरितार्थाची काळजी बाळगीत नाहींत. अशा ब्राह्मणांस दान देणें हें आपलें कर्तव्य आहे." याप्रमाणें विद्यार्जनांत किंवा विद्यादानांत मग्न असलेल्या ब्राह्मणांस आपल्या चरितार्थाची काळजी न राहिल्यामुळें ते आपलें विद्यादानाचें कर्तव्य उत्तम रीतीनें बजावीत.

विद्यार्जनानंतर यजन करणें हें ब्राह्मणांचें दुसरें कर्तव्य आहे. दुसऱ्यास विद्या देणें हें जसें ब्राह्मणांचें काम आहे, तसें दुसऱ्यांकडून यज्ञ करविणें हेंही त्यांचेंच काम आहे. अश्वमेधासारख्या यज्ञांचा अधिकार क्षत्रियांसच आहे, ते त्याजकडून ते करवीत; पण याजकडे त्यांचें मुख्य लक्ष नसे. स्वतः यज्ञ करण्याकडेसच त्यांचा कटाक्ष होता. विश्वामित्रानें स्वतः यज्ञ केल्याचें वर्णन रामायणांत आहे. ब्राह्मणांस करावयाचे यज्ञ अनेक आहेत. " यज्ञानां जपयज्ञोऽस्मि " या भगवद्गीतेच्या वाक्याप्रमाणें सर्वांत मुख्य यज्ञ जो जपयज्ञ तो करण्यांतच त्या वेळचे ब्राह्मण निमग्न असत. सारांश, सर्वप्रकारचें तप करण्यांतच ब्राह्मण आपलें राहिलेलें आयुष्य व राहिलेला वेळ खर्च करीत. याप्रमाणें विद्या व तप करणारे ब्राह्मण इतरांस सर्वतोपरी पूज्य व वंद्य होत यांत आश्चर्य नाहीं. कारण विद्या व तप यांचें सामर्थ्य अलौकिक व विलक्षण आहे. " धिग्बलं क्षत्रियबलं ब्रह्मतेजोबलं बलम् " असें जें विश्वामित्रानें म्हटलें त्यांत विद्यातपाचीच त्यानें स्तुति केली आहे.

जसे ब्राह्मण त्या वेळीं स्वकर्तव्यांत दक्ष होते तसेच क्षत्रियही आपल्या कर्तव्यांत दक्ष होते. पठन व यजन हीं त्यांचीं ब्राह्मणाशीं सामान्य कर्तव्यें असून युद्ध व प्रजापालन हीं त्यांचीं विशिष्ट कर्तव्यें होतीं. या सर्वांत त्या वेळचे क्षत्रिय कुशल व अग्रणी होते. विद्या संपादन करण्याच्या कामांत ते ब्राह्मणांहून केंसभरही मागें नव्हते. " यथावत्सांगवेदवित् " अशी रामचंद्राची प्रजाजनांनीं दशरथापाशीं स्तुति केली. रामचंद्रांनीं वसिष्ठ गुरूपाशीं त्यांच्या आश्रमांत वेदविद्येचें अध्ययन केलें होतें हें निराळें सांगणें नको. असो. त्या वेळचे क्षत्रिय नुसती वेदविद्या शिकत नसत, तर वैदिक कर्मेंही यथासांग करीत. श्रीरामांनीं वेळेवर संध्या केली हें सांगण्यास वाल्मीकि कधींच विसरले नाहींत, इतकेंच नव्हे तर वास्तुशमन इत्यादि विधि यथासांग रामांनीं केल्याचें त्यांनीं वर्णन केलें आहे. साराश, पठन य यजन या दोन्ही गोष्टींत त्या वेळचे क्षत्रिय ब्राह्मणांच्या बरोबरीनें विद्वान् व कुशल होते.

शत्रूंशीं युद्ध करणें हें क्षत्रियांचें विशिष्ट कर्तव्य असल्याकारणानें वेदविद्या शिकल्यानंतर युद्धोपयोगी सर्व विद्या त्या काळीं क्षत्रिय शिकत. तलवार मारणें, घोड्यावर बसणें, हत्तींशीं खेळणें इत्यादि विद्या ते मोठ्या मेहनतीनें संपादन करीत. पोहणें वगैरे उपयुक्त कलातही ते तरबेज होत. रामलक्ष्मणांनीं सीतेस काष्ठाच्या प्लवावर बसवून त्या प्लवास पोहत पोहत यमुनेपलीकडे नेलें हें वाचून त्यांच्या पोहण्याच्या कौशल्याबद्दल कौतुक वाटतें. सर्वांत धनुर्विद्येकडे क्षत्रियांचें अधिक लक्ष होतें. कारण सर्व आयुधांत त्या वेळेस धनुष्य होतें. धनुर्विद्येंत त्यांचे प्रावण्य इतकें होतें कीं, नुसत्या शब्दावरही ते अचुक शरसंधान करीत. मृगया ही युद्धाची तालीम असल्याकारणानें क्षत्रिय लोक मृगया करीत, व वाघ, सिंह, हत्ती वगैरे भयंकर पशूंस बाणांनीं मारीत. इतकेंच नव्हे, तर क्षत्रियांनीं आपलें सामर्थ्य इतकें वाढविलें होतें, कीं नुसत्या बाहूंनीं वाघाशीं युद्ध करून त्यास ठार मारणारे क्षत्रिय दशरथाच्या पदरीं शेंकडों होते. असो. शरीरांत कितीही शक्ति असली व शस्त्रें कितीही उत्तम चालवितां आलीं तरी मनुष्यास हिम्मत अथवा धैर्य नसेल तर सर्व व्यर्थ होय. त्या वेळच्या क्षत्रियांनीं आपलें धैर्य परंपरेनें इतकें वाढविलें होतें, कीं युद्धांतून परत फिरणें हें त्यांस माहीत नव्हतें. ' युद्धे चाप्यपलायनं ' हा आपला विशिष्ट गुण आहे, असें त्या वेळचे क्षत्रिय मानीत.

युद्धांतून पळतांना पाठीवर घाव लागणें यासारखें महापातक नाहीं, अशी त्यांची समजूत होती. आपल्या मनाच्या शुद्धतेबद्दल भरतानें ज्या अनेक शपथा वाहिल्या त्यांत युद्धांतून पळतांना माझ्या पाठीवर घाव लागो, अशी एक शपथ त्यानें वाहिली, यावरून ही गोष्ट स्पष्ट दिसते. सारांश, शस्त्र-कौशल्य, शरीरसामर्थ्य व शौर्य या तिन्ही बाबतींत त्या वेळचे क्षत्रिय अग्रणी होते व त्यामुळें ते आपल्या शत्रूंस भीति उत्पन्न करणारे व अजेय वाटत.

शत्रूंस जिंकणें कदाचित् सोपें असेल; पण स्वतःस जिंकणें कठिण आहे. आणि स्वतःस जिंकल्याशिवाय प्रजेचें यथान्याय पालन करणें शक्य नाहीं. दशरथानें रामास यौवराज्य देतांना उपदेश केल्याप्रमाणें राजानें विनयशील असून आपले कामक्रोध पायाखालीं दाबून टाकले पाहिजेत. ज्यांस शस्त्र-सामर्थ्य किंवा शरीरसामर्थ्य अधिक आहे त्यांस असें करणें कठिण जातें हें उघड आहे; पण ही गोष्ट ज्ञानानें व शिक्षणानें साध्य आहे. त्या वेळचे क्षत्रिय जसें युद्ध करण्यास योग्य असत तसेंच प्रजापालन करण्यासही ते शिक्षणानें योग्य होते. त्यांचें वेदाध्ययन गुरुगृहीं झालें असल्यामुळें त्यांस विद्या व विनय सहजच प्राप्त होत असत. याशिवाय बहुतेक सर्वांस गुरुगृहीं राजधर्मांचेंही शिक्षण मिळे. राजधर्म काय आहेत हें मनूच्या कालापासून ठरलेलें होतें व यामुळें प्रजेसंबंधानें आपलें कर्तव्य काय आहे, हे समजण्यास राजे-लोकांस अडचण पडत नसे. सारांश, प्रजापालन हा जो क्षत्रियांचा शेवटचा धर्म तोही त्या वेळचे क्षत्रिय योग्य तऱ्हेनें बजावीत.

राजाचें प्रजेसंबंधानें कर्तव्य काय आहे आणि राजानें कसें वागलें पाहिजे, यांविषयींची अत्युदात्त कल्पना वाल्मीकीनें आपल्यापुढे मांडली आहे. कल्पनेंतील उत्तम राज्य कोणतें तर तें रामराज्य होय असें आपण समजतों. अत्युत्कृष्ट राज्याचीं मुख्य लक्षणें कोणतीं आहेत हें श्रीरामाच्या चरित्रावरून सहज दिसून येईल. प्रथम राजानें प्रजेपासून जो षड्भाग म्हणजे जमिनीच्या उत्पन्नाचा सहावा हिस्सा घ्यावयाचा तो राजावर प्रजेच्या रक्षणाची जबाब-दारी आहे, म्हणून घ्यावयाचा, असा त्या वेळेस सिद्धान्त होता. भरतानें पूर्वोक्त शपथा वाहिल्या त्यांत षड्भाग घेऊन प्रजेचें रक्षण न करणाऱ्या राजाचें पाप मला लागो, अशी एक शपथ त्यानें घेतली आहे दुसरें, राज्याची इमारत सत्यावर रचलेली असते; अशी तेव्हां पूर्ण समजूत होती. चौदा वर्षें वनवास

करीन असें दशरथास दिलेलें वचन तूं न पाळलेंस तरी चालेल असें जेव्हां जाबालीनें रामचंद्रास समजावण्याचा यत्न केला, तेव्हां त्यांनीं सत्याची अत्यंत प्रशंसा केली, व विशेषतः राजानें सत्य कां पाळलें पाहिजे, हें सांगितलें. तिसरें, प्रजेचें आराधन करणें हेंच राजाचें मुख्य व श्रेष्ठ कर्तव्य आहे, असें लोक मानीत व यामुळें प्रजेचें आराधन आपलें सर्वस्व खर्चूनही राजेलोक करीत. चौथें, अधर्मानें राज्य कधींही चालणार नाहीं, धर्म पाळला नाहीं तर प्रजेचें अकल्याण होईल, असा त्या वेळेस दृढ समज होता आणि म्हणून राजेलोक धर्मानें चालण्याविषयीं अत्यंत काळजी घेत. असो; हीं चार तत्त्वें ज्या रामराज्यांत पूर्णपणें अमलांत होतीं तें रामराज्य म्हणजे सर्वतोपरी उत्तम राज्य. त्या रामाच्या राज्यांत सर्व प्रकारचीं सुखें पूर्णपणें नांदत होतीं असें जें आपण मानतों त्यांत आश्चर्य कोणतें ?

अशा राज्यांत सर्व प्रजाही धर्मानें व न्यायानें वागत असे हें निराळें सांगणें नको. धर्माचीं व नीतीचीं जीं अहिंसा, अस्तेय इत्यादि अंगें मनूनें सांगितलीं आहेत तीं यावेळीं लोकांत पूर्णपणें पाळलीं जात असत. वडिलांविषयीं म्हणजे मातापितरें, गुरु, ज्येष्ठ बंधु इत्यादिकांविषयीं लोकांत अत्यंत पूज्य भाव असे. मातापितरांची शुश्रूषा करणें व त्यांची आज्ञा पाळणें हा माझा परम धर्म आहे असें रामांनीं म्हटलें आहे. असा लोकांत वडील माणसांविषयीं आदर असे तसाच सज्जनांविषयींही लोकांत आदर वसत होता. सज्जनांच्या वर्तनाप्रमाणें आपलें वर्तन ठेविण्याविषयीं लोकांत हौस वाटे. वडिलांविषयीं भक्ति, तृष्णेचें नियमन, व सज्जनांचें अनुकरण करण्याची इच्छा हींच भरद्वाजांनीं म्हटल्याप्रमाणें आर्यनीतीचीं मुख्य लक्षणें होत. तृष्णेचें नियमन केल्याशिवाय सन्मार्ग साधावयाचा नाहीं हें उघड आहे. लोभ हेंच पापाचें प्रसिद्ध मूळ आहे; तो आवरल्याशिवाय धर्माचें व नीतीचें आचरण शक्य नाहीं. असो. सत्याचीही लोकांस अत्यंत चाड होती. सत्य बोलणें व सत्याचरण करणें हें परम श्रेयाचें मुख्य साधन आहे, असें लोक मानीत. या संबंधांत ब्राह्मणांची विशेष खबरदारी असे. " उक्तानृतमृषिं यथा " खोटें बोललेल्या ऋषीप्रमाणें निस्तेज पडला अशा प्रकारचा दाखला रामायणांत दिलेला पाहून कोणत्या ब्राह्मणास अभिमान व

खेद वाटत नाहीं? परदाराभिमर्षासारखें घोर पातक नाहीं असें त्या वेळेस लोक मानीत असत. तसेंच परद्रव्याचें हरण करणें हेंही मोठें पातक आहे, असें समजत. ब्राह्मणांना किंवा पीडितांना दान करणें, हें चांगलें आहे, असें लोक मानीत; पण विनाकारण भिक्षा मागणें चांगलें नव्हे, अशी लोकांची दृढ समजूत होती. किंबहुना भिक्षा मागत फिरणें, हें घोर पातक आहे, असें समजलें जाई, हें भरताच्या एका शपथेवरून स्पष्ट दिसतें. सुरापानाविषयीं लोकांत फार तिटकारा होता, विशेषतः समाजास धर्मशिक्षण देण्याचें ज्यांचें काम तेच ब्राह्मण सुरापान करूं लागले म्हणजे लोकांस अत्यत चीड येई व अशा मद्यपी ब्राह्मणांस रस्त्यांत शेणमार झाल्यावांचून रहात नसे. सारांश, एकंदर धर्माविषयीं लोकांत अत्यंत आस्था होती. धर्माकरितां कोणतीही प्रिय वस्तु सोडावी, पण धर्म सोडूं नये, इतका धर्माचरणाबद्दल लोकांचा कटाक्ष होता तसेंच प्रत्येक मनुष्य आपल्या कीर्तीला यत्किंचितही कलंक लागूं नये, अशाविषयीं जपत असे. ज्या मनुष्याची लोक अपकीर्ति गातात तो मनुष्य अधःपातास जातो, अशी लोकांची भावना होती. तसेंच प्रत्येकजण आपलें शील कायम राखण्याविषयीं तत्पर असे. कारण सच्छील हेंच सज्जनांचें भूषण, अशी समजूत होती. असो. याप्रमाणें बहुतेक सर्व लोक त्या वेळेस धर्म, सद्वर्तन व नीति यांच्या मार्गानें चालत होते.

स्त्रियांच्या कर्तव्याचीही कल्पना त्या वेळेस अत्युदात्त होती. पति हेंच दैवत, पति हाच गुरु,पति हाच बंधु, असें आर्यस्त्रिया म्हणजे आर्य स्वभावाच्या स्त्रिया समजत. पतिबरोबर अरण्यांतही जाण्यास त्या खुषी असत. पतीची सर्व संकटें भोगण्याची त्यांची तयारी असे, ज्यास बापानें हातावर पाणी घालून मुलगी दिली तो त्याची सर्वस्वी झाली असें त्या मानीत. त्याच्या सहवासांत जें सुख आहे, तें स्वर्गांतही नाहीं; त्याच्या विरहांत राज्यवैभवही नरकप्रमाणें आहे, अशी त्यांची भावना होती पतीची शुश्रूषा करण्यांत त्यांस अत्यंत आनंद वाटे. राजाच्या ऐश्वर्यांत नोकरांना कांहीं कमतरता आहे काय, पण रामचंद्र बसले म्हणजे सीतेनें त्यास वारा घालीत उभें राहावें ! अशा भावनेच्या व वर्तनाच्या स्त्रिया किती तेजस्वी असतील याची कल्पना करतां येईल. अशा स्त्रियांभोंवतीं एका प्रकारचें सद्गुणाचें अभेद्य कवच असतें असें म्हटलें तरी चालेल. अशा पतिव्रता स्त्रियांचा कोणत्याही तऱ्हेनें अपमान

करणें म्हणजे आपल्यावर भयंकर ईश्वरी क्षोभ करून घेणें होय, अशी लोकांची समजूत असे. पातिव्रतेचे अश्रू जमिनीवर व्यर्थ पडत नाहींत असें लोक मानीत. सारांश त्या वेळच्या स्त्रिया पातिव्रत्याच्या सद्गुणानें स्वतःस, पतीस व समाजास भूषण झाल्या होत्या. इतर गोष्टींतही त्या वेळच्या स्त्रियांची विशेषतः ब्राह्मण व क्षत्रिय स्त्रियांची योग्यता मोठी असे. त्यांस स्वगृहीं-गुरु गृहीं नव्हे-वेदांचें अध्ययन करतां येत असे व त्यांस संध्यावंदन,होम इत्यादि वैदिक क्रियांचा अधिकार असे. क्षत्रियस्त्रियांना क्षत्रोपयोगी विद्या शिकवीत असत. कैकेयीनें संग्रामांत दशरथाचें सारथ्य केलें हें वाचून कोणास कौतुक वाटत नाहीं ? स्त्रिया बहुधा समाजांत बाहेर पडत नसत; तत्रापि उत्सवाचे दिवसांत किंवा यज्ञाचे वेळीं किंवा विवाहाच्या शुभ प्रसंगीं स्त्रिया समाजांत दृष्टीस पडण्यास आडकाठी नसे. याप्रमाणें स्त्रियांना योग्य शिक्षण मिळत असून व योग्य स्वतंत्रता असून त्या आपल्या पतीचा संसार करण्यास हरत-ऱ्हेनें लायक असत.

त्या काळीं सर्वच लोक धर्मशील व नीतिमान् होते किंवा सर्वच स्त्रिया सद्गुणी व सुगृहिणी असत, असें प्रतिपादण्याचा आशय नाहीं. तथापि ' यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ' या न्यायानें समाजांतील अग्रणी धर्मानें व नीतीनें वागत असल्यामुळें बहुजनसमाजाचा ओढा नीतीकडे व धर्माकडे होता, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आतां कित्येक पापाचरणी माणसें त्या वेळींही निपजत यांत नवल नाहीं.पण याही माणसांचा सन्मार्गाकडे ओढा असे;कारण पापाचरणी मनुष्य राजदंड झाला असतां पापापासून मुक्त होतो, अशी तेव्हां समजूत होती.राजानें शासन केलें म्हणजे सोनें जसें अग्नीं-तून काढलें म्हणजे शुद्ध होतें त्याप्रमाणें मनुष्य पापापासून मुक्त होतो, असें लोक मानीत. यामुळें प्रायः पापी लोक आपला अपराध राजासमोर कबूल करीत. किंबहुना कधींकधीं ते आपण होऊन राजसभेंत हजर होत व आपल्या अपराधांबद्दल राजाकडून शासन करून घेत. अपराध्यांना राजा शासन न करील तर त्यास स्वतः तें शासन भोगावें लागेल असें मानीत असत.निरपराध्यास शिक्षा देणें व अपराध्यास शिक्षा न देणें हीं दोन्ही राजास सारखींच पातकांत ढकलणारीं आहेत, असा समज होता. अशा शासना-पासून राजपुत्रही वगळले जात नसत. राजपुत्र उन्मत्त होऊन प्रजेच्या

जिवाशीं खेळूं लागले किंवा परस्त्रीकडे वांकडे पाहूं लागले तर त्यांस हद्दपार केलें जाई. सारांश प्रजेस योग्य न्याय मिळून प्रत्येक अपराध्यास योग्य शासन त्या वेळीं मिळत असे.

प्रजेचा योग्य न्याय करणें हेंच राजाचें श्रेष्ठ व आद्य कर्तव्य समजलें जात असे. न्याय्य-अन्याय्य, साधु-असाधु हें ठरविणारा राजा जर राष्ट्रांत नसेल तर सगळा अंधःकार माजेल अशी लोकांस भीति वाटे. अराजक स्थिति फार भयंकर अशी लोकांची खात्री असल्यामुळें राष्ट्राला राजा पाहिजे असा लोकांचा ठाम समज होता, व प्रसंगविशेषीं राज्याला अधिकारी कोणीच नसेल तर लोक सभेंत जमून न्याय करण्याकरितां कोणास तरी राजा निवडीत. राजानें प्रत्यहीं राजसभेंत येऊन लोकांचा न्याय करावा असा आग्रह असे. आळसानें किंवा ऐष आरामांत गुंतून राजा इन्साफाचें काम न करील तर त्यास ब्राम्हण कधीं कधीं शापही देत. प्रजेचा न्याय राजा राजसभेंत आपल्या अष्ट प्रधानांच्या सल्ल्यानें करीत असे. महत्वाच्या राजकीय प्रश्नासंबंधानें राजे सर्व लोकांचाही सल्ला घेत असत. अशा लोकसभेस राजधानींतील व देशाच्या इतर प्रमुख प्रमुख भागांतील चारी वर्णांचे लोक व मांडलिक बोलाविले जात. राजा वृद्ध झाला म्हणजे त्याच्या मदतीकरितां त्याच्या ज्येष्ठ पुत्रास युवराज नेमीत असत. युवराजास इनसाफ करण्याचे व इतर अधिकार असत. वावभर व्यासाची दुंदुभि व शुभ्र छत्र हीं राजचिन्हें असून राजाच्या रथाला आठ घोडे असत. तसेंच वेळोवेळीं राजाच्या व राजवंशाच्या गुणांचे व यशाचें वर्णन सूत, मागध इत्यादि बंदीजन करीत व त्यास वेळेचीच आठवण देत नसत तर आपलें यश कायम ठेवण्याविषयीं प्रोत्साहन देत. याप्रमाणें यथान्याय प्रजेचें पालन करून व राज्याचा उपभोग घेऊन विशेष वृद्धावस्था झाली म्हणजे संसाराची आसक्ति सोडून राजेही राज्य सोडून वनांत जात किंवा दुसऱ्या रीतीनें मोक्षाचा मार्ग स्वीकारीत.

याप्रमाणें भारतीय आर्यांची त्या वेळेस सामाजिक, नैतिक व राजकीय स्थिति सर्वतोपरी उन्नतीस पोंचली होती. प्रवृत्ति व निवृत्ति या दोन्ही वृत्तींचें यथायोग्य सेवन ज्या समाजांत होतें तो समाज उन्नतीस पोहोंचल्याशिवाय राहणार नाहीं हें उघड आहे. "कामात्मता न प्रशस्ता न चैवेहास्त्यकामता" हें मनूचें अमूल्य वचन लक्षांत ठेवण्यासारखें आहे. भौतिक सुखाच्या अत्यंत

स्वाधीन झालेला मनुष्य किंवा समाज अवनतीस गेलाच पाहिजे. उलटपक्षीं अत्यंत निरिच्छ किंवा निराश वृत्तीनें राहणें समाजाला किंवा मनुष्याला शक्य नाहीं. सारांश, प्रवृत्ति व निवृत्ति यांचें यथायोग्य सेवन करण्यांतच खरें सुख व खरी उन्नति आहे. अशा प्रकारच्या उन्नत स्थितीस त्या वेळचे भारतीय आर्य पोंचले होते. शरीराने उंच, रंगाने गोरे व नाकाडोळ्यांनीं नीटस असे ते त्या वेळचे आर्य सशक्त व बुद्धिमान् असून त्यांच्यांत उत्साह व तप सारखेंच चमकत होतें. संसारांत उत्साह हेंच मनुष्याचें मुख्य बल आहे असें तें मानीत. तसेंच अपमानाचें प्रमार्जन जो आपल्या तेजानें करीत नाहीं, त्याच्या पौरुषाचा काय उपयोग, असें तें समजत. उद्योगाविषयीं तर त्यांची ख्याति होती. वारंवार अडथळे आले किंवा निराशेचें कारण झालें तरी ते आपला उद्योग सोडीत नसत. भगीरथाचें नांव सततोद्योगाविषयीं इतकें प्रसिद्ध आहे कीं, आर्यभाषांत हें नांव त्या अर्थीं रूढ झालें आहे. आर्यांच्या उद्योगाला साहसाचीही जोड मिळाली होती. मोठमोठ्या अरण्यांत किंवा परकी क्रूर लोकांत शिरण्यांस त्यांस भीति वाटत नसे. सारांश, उत्साह, तेज, उद्योग, साहस इत्यादि जे गुण भौतिक उत्कर्षास कारणीभूत होतात, ते त्या वेळीं त्यांच्या अंगीं होते आणि विशेष हा कीं, त्याचबरोबर धर्म, नीति, तप, अनासक्तता इत्यादि गुणही त्यांच्यांत वसत होते. आणि म्हणूनच त्यांची सर्व प्रकारें उन्नति व भरभराट त्या वेळेस झाली होती, इतकेंच नव्हे तर राक्षसांच्या बलाढ्य राजासही जिंकणें त्यांस अशक्य झालें नाहीं.

आर्यांचीं राज्यें या वेळेस हिमालयापासून प्रयागापर्यंत पसरलीं होतीं, म्हणून पूर्वीं सांगितलेंच आहे. यमुनेच्या दक्षिणेस गोदावरीपर्यंत त्या वेळेस निर्जन व भयंकर अरण्य होतें, त्यास दंडकारण्य म्हणत. हल्लींच्या मध्यप्रांताची सीमा बहुतेक या दंडकारण्याशीं समान असून या प्रांतांत हल्लींही मोठमोठालीं अरण्यें व विंध्याद्रि व सातपुडा या दोन पर्वतांच्या विस्तृत व दुर्गम ओळी आहेत. या दंडकारण्यांत त्या वेळीं कित्येक योग्य ठिकाणीं आर्यांनीं आपले आश्रम केले होते. गोदावरीच्या पलीकडे दक्षिणेस लंकेपर्यंत अनार्यांची या वेळेस दाट वस्ती होती. त्यांत राक्षस हे बलाढ्य असून त्यांचें लंकेंत अत्यंत संपन्न राज्य होतें. हे राक्षस शरीरानें

मजबूत, रंगानें काळे व स्वभावानें क्रूर व कपटी होतें. येथें राक्षस व असूर यांतला भेद लक्षांत ठेविला पाहिजे. असुर हे आर्यांचेच भाईबंद असून ते सिंधुनदापलीकडे उत्तरेस रहात असत. राक्षस हे अनार्य असून दक्षिणेस समुद्रकिनाऱ्यावर रहात. असो. राक्षसांचा सर्वांत भयंकर दोष म्हटला म्हणजे ते नरमांसभक्षक होते. दंडकारण्यांतील वसाहतींस त्यांचा फारच त्रास होता, इतकेंच नव्हे तर ते अनेकांस मारून खाऊन टाकीत असत. याशिवाय दुसऱ्याची बायको किंवा मुलगी जबरदस्तीनें हरण करून तिच्याशीं लग्न लावण्याची त्यांच्यांत चाल होती. अशा प्रकारच्या विवाहास आपल्या धर्म-शास्त्रांत राक्षसविवाह हेंच नांव पडलें आहे. राक्षसांच्या या दोन्ही भयंकर कृत्यांनीं त्यांचा व आर्यांचा साहजिकच वारंवार विरोध उत्पन्न होई. हद्दपार केलेल्या आर्य राजपुत्रास दंडकारण्यांत पाठविण्याची वहिवाट याचमुळें बहुधा तेव्हां पडली असावी. दंडकारण्यांत आश्रमांतून राहणाऱ्या ब्राह्मणांस राक्षसांविरुद्ध अशा क्षत्रियांनीं मदत करावी हा त्यांतल्या त्यांत उद्देश असावा. असो. याच कारणांनीं श्रीरामचंद्राचा व राक्षसांचा विरोध कसा उत्पन्न झाला व श्रीरामचंद्रांनीं आपल्या अलौकिक पराक्रमानें राक्षसांच्या बलाढ्य राज्याचा विध्वंस कसा केला वगैरे समग्र हकीकत मागील चरित्रांत आलीच आहे. हिंदुस्थानच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत नरमांसभक्षकांचें अनन्वित पाय समूळ नाहींसें करून टाकणें हें श्रीरामचंद्रांचें अवतारी कृत्य होय. पण तें करूनही त्यांनीं आपल्या अत्युदात्त चरित्रानें लोकांस नीतीचा उत्कृष्ट धडा घालून दिला. "लक्ष्मणा, अपराध्यांस व निरपराध्यांस सरसहा मारूं नको" असें सांगून भयंकर संकटांतही त्यांनीं नीतिमत्ता सोडली नाहीं व शेवटीं सुवर्णतटानें वेष्टिलेली व रत्नांनीं भरलेली लंका त्यांच्या पायांशीं लोळत असतां तिचा यत्किंचितही लोभ न धरितां सुवर्णरत्नांसहित लंकेचें राज्य बिभीषणाच्या हवालीं केलें. सारांश, आपल्या अलौकिक उदाहरणानें श्रीरामांनीं आपल्या वेळच्या भारती आर्यांस वैभव व नीति यांच्या शिखरास पोंचविलें, इतकेंच नव्हे तर भावी सर्व भारतीयांस संसारांत मनुष्यानें उदात्त व उच्च नीतिमत्तेनें कसें वागावें, हें दाखविणारा आपल्या चरित्राचा निर्मल आदर्श ठेविला हें आपलें केवढें भाग्य!

**समाप्त.**

